काव्यसंग्रह. ४३.

महाराष्ट्रकविवर्यवामनपंडितकृत

# यथार्थदीपिका.

## भाग दुसरा.

अध्याय ५–९.

हा

नारायण चिंतामण केळकर, बी. ए.,

यांनीं टीपा देऊन तयार केला.

तो

मुंबईंत जावजी दादाजी यांच्या 'निर्णयसागर' छापखान्याचे मालक

तुकाराम जावजी यांनीं छापून प्रसिद्ध केला.

१९०३.

किंमत २ रुपये.

# अनुक्रमणिका.

# वामनपंडितकृत यथार्थदीपिका.

## भाग दुसरा.

### अध्याय पांचवा.

जय जय परमहंसानंदावतंस! । जय भक्तजनमानसहंस! । जय जय भवदुः-खकंसविध्वंस! । देवदेव! देवकीनंदन! ॥ १ ॥ जय जय सांख्ययोगसंसिद्धरूप!। जय जय कर्मसंन्यासक्रमप्राप्यस्वरूप! । जय जय सदसद्विश्वरूप! । परमहंस! पुरुषोत्तम! ॥ २ ॥ जय जय परमसदय! । जय जय श्रीवत्सहृदय[1]! । जय मायातीत! मायामय! । जगदुदयलयनिलय[2]! गोविंद! ॥ ३ ॥ जय जय भवरोगवैद्य!। जय जय विद्यामृतप्रदाद्य! । जय जय स्वात्मत्वैकवेद्य[3]! । निखिलवंद्य! मुकुंद! सच्चिदानंद! ॥ ४ ॥ जय जय श्रीकरुणालय! । जय जय कल्याणगुणवरुणालय! । जय निखिलनिलय! स्वात्मनिलय! । पालय पालय जगद्गुरो! ॥ ५ ॥ वंदूनि तुझे पाय । पंचमाध्यायार्थबोध उपाय । करितों कीं सर्वानर्थ अपाय । परिहरती स्मरतां तुझे श्रीचरण. ॥ ६ ॥ आतां आरंभला अध्याय, । एथें आधीं प्रश्न करितो धनंजय, । कीं, 'कर्मत्याग बोलोनि कर्ममय । योग मागुती बोलसी. ॥ ७ ॥ तरी दोहींमधूनि एक । सांग करूनि बरवा विवेक । ज्याणें मी श्रेय आत्यंतिक । पावेन तुझ्या प्रसादें.' ॥ ८ ॥ या प्रश्नाचें निमित्त । ऐसें कीं पूर्वी भगवंत । 'ज्ञानी परिपक्क त्यास निश्चित । कर्म नलगे' ऐसें बोलिला. ॥ ९ ॥ आणि पूर्वाध्यायाच्या अंतीं । ऐसें बोलिला श्रीपती। कीं, 'कर्में अगा न बाधती । जो योगसंन्यस्तकर्मा तयासी.' ॥ १० ॥ ऐसें बोलोनि मागुती । अर्जुनातें म्हणे श्रीपती, । कीं, 'ऊठ युद्ध करावयाप्रती । अर्जुना!' ॥ ११ ॥ एथें वाटे अर्जुनाला। कीं, 'कर्मत्याग बोलोनिही मला । कर्म करीच म्हणतो वहिला. । दोन्ही कैसीं मी नं[illegible]' ॥ १२ ॥ त्याग कर्माचा करावा, । कीं कर्मयोगचि आचरावा, । म्हणूनि एकाचे सांग मज देवा!' । हा प्रश्न करितो अर्जुन. ॥ १३ ॥

---

१. श्रीवत्सलांछन हृदयीं ज्याच्या. २. जगदुत्पत्तिसंहारस्थानभूत. ३. अनादि.

अर्जुन उवाच—**संन्यासं कर्मणां कृष्ण पुनर्योगं च शंससि ।**
**यच्छ्रेय एतयोरेकं तन्मे ब्रूहि सुनिश्चितम् ॥ १ ॥**

कर्म टाकणें तयास । म्हणावें कर्माचा संन्यास, । तरी तो कर्मसंन्यास तूं जगन्निवास! । बोलतोसि श्रेष्ठत्वें. ॥ १४ ॥ पुन्हा मज कर्म करीं । म्हणूनि म्हणसी तूं श्रीहरी ! । तरी या दोन्हीं अंतरीं । कोण बरें ? ॥ १५ ॥ निश्चय करूनि त्याचा । हेंचि एक करीं म्हणुनी वाचा । बोल ज्याणें करूनि साचा । कल्याणमार्ग मी पावेन. ॥ १६ ॥ ऐसा प्रश्न करी **अर्जुन** । त्याचा भाव जगज्जीवन । जाणे कीं दोहींमधून एकचि करीन । **अर्जुन** म्हणतसे. ॥ १७ ॥ मी त्यास बोलिलों कर्मत्याग । कीं पक्व ज्याचा ज्ञानयोग, । हा जिज्ञासु यास कर्मयोग । बोलिलों. ॥ १८ ॥ न समजोनि तो अर्थ । प्रश्न करी हा **पार्थ**, । परंतु याचा प्रश्न व्यर्थ । ऐसें कां न म्हणे ? ॥ १९ ॥ कीं या दोहींवांचोनी । मोक्ष नव्हे म्हणोनी । दोन्ही मुमुक्षुजनीं । अनुष्ठावीं. ॥ २० ॥ तरी हा प्रश्नही याचा । कां न अंगीकारूं साचा ? । कर्मत्याग आणि कर्मयोगाविषयीं वाचा । कां न बोलूं यासी ? ॥ २१ ॥ म्हणूनि या भावें उत्तर । आतां देतो **सर्वेश्वर** । जगद्गुरु स्वतःसिद्ध चतुर । बोलतो भगवान् षड्गुण. ॥ २२ ॥

श्रीभगवानुवाच—**संन्यासः कर्मयोगश्च निःश्रेयसकरावुभौ ।**
**तयोस्तु कर्मसंन्यासात्कर्मयोगो विशिष्यते ॥ २ ॥**

अगा **अर्जुना** ! संन्यास । परम अंतरंग मोक्षास । आणि कर्मयोग चित्तशुद्धीस । मुख्य हेतु. ॥ २३ ॥ आपलें परम कल्याण । अगा **अर्जुना** ! मोक्ष जाण, । त्या मोक्षाच्या प्राप्तीस कारण । संन्यास आणि कर्मही. ॥ २४ ॥ कल्याणकर हे दोन्ही । दृढ धरीं हे गोष्टी मनीं, । तथापि कर्मसंन्यासाहूनी । कर्मयोग विशेषत्वें चढतसे. ॥ २५ ॥ ऐसें **कृष्ण** या श्लोकीं बोलिला । परंतु एथें **पार्थ** शंकला । कीं, 'कर्माहूनि थोर भला । संन्यास सर्वसंमत. ॥ २६ ॥ आणि संन्यासाहूनि । कर्म थोर म्हणोनी । **कृष्ण** कैसा बोलतो ?' ऐसा मनीं । **अर्जुन** जाला सशंक. ॥ २७ ॥ समजोनि हा **अर्जुना**चा भाव । कर्म योगींच देवाधिदेव । संन्यास दावूनी अतएव । श्रेष्ठ कर्मयोग म्हणतो या श्लोकीं. ॥ २८ ॥

**ज्ञेयः स नित्यसंन्यासी यो न द्वेष्टि न कांक्षति ।**
**निर्द्वंद्वो हि महाबाहो सुखं बंधात्प्रमुच्यते ॥ ३ ॥**

अगा ! करूनिही कर्म । जो द्वंद्वरूपीं सुखदुःखीं सम । तोचि जाणावा

परम । संन्यासी. ॥ २९ ॥ जो न अपेक्षी विषय चोखट । न निंदी विषय वाईट । ईश्वरीं अर्पी सकळ खटपट । कर्मांची. ॥ ३० ॥ न उपजे कर्मबंध-फळ । तोचि कर्मत्याग केवळ । तेव्हां कर्मयोगींही निखिल । कर्मत्याग संन्यास साधला. ॥ ३१ ॥ विषयाभिलाषवर्जित । आणि सर्वद्वंद्वातीत । कर्मे करी ईश्वरार्पित । तोचि संन्यासी जाणावा. ॥ ३२ ॥ एवं द्वंद्वातीत । आणि विषयापेक्ष द्वेषवर्जित । या शब्दीं सुचविला निश्चित । करूनि निष्काम. ॥ ३३ ॥ एवं काम्यत्याग । तोचि म्हणावा संन्यासयोग । कर्म करूनि निःसंग । तोचि संन्यासी जाणावा. ॥ ३४ ॥ परंतु जऱ्ही निष्काम । ईश्वरीं न अर्पितां कर्म । कर्मबंध घडे हा नेम । तृतीयाध्यायीं यासीच बोलिला. ॥ ३५ ॥ याकारणें निष्काम । आणि ईश्वरीं अर्पी कर्म । तोचि जाणावा परम । संन्यासी ऐसा भावार्थ. ॥ ३६ ॥ अतएव कृष्ण म्हणतो । कीं, 'तो अनायासें बंधापासूनि सुटतो । कीं जो न अर्पी ईश्वरीं तो । त्या कर्मे बंध पावणार. ॥ ३७ ॥ हा बंधापासूनि सुटतो । यावरूनि ईश्वरीं कर्में समर्पितो । ऐसा भावार्थ दावितो । श्रीकृष्ण. ॥ ३८ ॥ आतां यज्ञादि कर्मकरण । हें तों गृहस्थपण । त्यांत निर्द्वंद्व निष्काम हें लक्षण । संन्यासाचें. ॥ ३९ ॥ हें अर्जुनास वाटे कठिन । कीं गृहस्थाचें मन । निष्काम आणि द्वंद्वसहन । केंवि होय. ॥ ४० ॥ जो असेल परम समर्थ । त्यासचि साधेल हा अर्थ । आपण आइकतों व्यर्थ । उपदेश ऐसा. ॥ ४१ ॥ हा भाव पार्थाचे अंतरीं, । तों बोलिला श्रीहरी, । कीं, 'अगा महाबाहो! यापरी । कर्मयोगीही संन्यासी जाणावा. ॥ ४२ ॥ तूंही महाबाहु अगा पार्था!। साधितोस थोरा थोरा पुरुषार्थां । हे गोष्टीही तुज साधेलचि, कां वृथा । श्रम मानिसी? ॥ ४३ ॥ ऐसा हृदयीं भाव । तों मुखें म्हणे देव । कीं, 'तूं हें साधिसी अतएव । महाबाहो म्हणतों तुजला. ॥ ४४ ॥ एवं कर्मयोगीं संन्यास । साधे म्हणूनि कर्मयोगास । पूर्वश्लोकीं मीं जगन्निवास । श्रेष्ठ म्हणोनि बोलिलों. ॥ ४५ ॥ आश्रमांतराविण । गृहस्थाश्रमीं संन्यासपण । हें कर्मयोगाचें श्रेष्ठत्व-लक्षण । न ये संन्यासासी. ॥ ४६ ॥ कीं संन्यासियासी क्रिया । यज्ञादिकां न घडती धनंजया! । यालागीं कर्मयोगा या । दावूं न शके संन्यास. ॥ ४७ ॥ आणि शिखासूत्रत्याग । विनाकाम्यत्याग संन्यासयोग । आश्रम नव्हे तें सोंग । नटाचें. ॥ ४८ ॥ एवं कर्मयोगीं जें निष्कामपण । संन्यासियासी पाहिजे हाचि गुण । तेव्हां संन्यासलक्षण । सिद्ध होतां आश्रम तो शुद्ध. ॥ ४९ ॥ आणि कर्मयोगावांचूनि । अशुद्धता असतां मनीं । व्यर्थ संन्यास म्हणोनी । कर्मयोगी संन्यासी हा थोर. ॥ ५० ॥ आश्रमावांचूनि संन्यासयोग । घडे करितां का-

म्यत्याग । परि कर्मावांचूनि नव्हतां निःसंग । आश्रमसंन्यास न घडे. ॥ ५१ ॥ एवं असोनि गृहस्थधर्मीं । जो निष्काम गोस्वामी । तो संन्यासी थोर ऐसें जगत्स्वामी । श्रीकृष्ण बोलिला. ॥ ५२ ॥ आतां यापुढें श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञलोक । परिसोत. ॥ ५३ ॥ गृहस्थें कर्म करावें । आणि कर्मयोगीं संन्यासातें पाहावें । ऐसें पूर्वश्लोकीं देवाधिदेवें । निरूपिलें. ॥ ५४ ॥ परि अर्जुनास कर्मत्याग इष्ट । कीं स्वजनवधीं वाटे कष्ट । कर्म न टाकितां तो स्पष्ट । सद्य हे भीष्मादिक मारावे लागती. ॥ ५५ ॥ आणि द्वितीयाध्यायीं शरण । आला शिष्यत्वें वंदूनि चरण । तेव्हांही बोलिला कीं, 'युद्धाविण । कृष्णजी! सांगसी तें करीन.' ॥५६॥ म्हणूनि अर्जुन । आइकोनि हें वचन । करावया या पक्षाचें निरसन । युक्ति विचारी. ॥ ५७ ॥ कीं मुमुक्षूस निश्चित । कर्मयोग संन्यास दोन्ही अपेक्षित । ऐसें बोलतो अच्युत । मजलागीं. ॥ ५८ ॥ तरी सांख्य योग दोन्ही पक्ष । प्रकटले द्यावया मोक्ष । त्यांत कोणी सांख्यें कोणी योगेंच दक्ष । मोक्ष पावती. ॥५९॥ एका मोक्षाचे दोन्ही पंथ । आणि एकाविण एक समर्थ । तैसा संन्यासेंचि अथवा कर्मेंचि पुरुषार्थ । कां न साधे? ॥ ६० ॥ ऐसी कल्पना अर्जुन । करी तें जाणोनि मन । करितो त्याचें समाधान । भगवान् या श्लोकीं. ॥ ६१ ॥

**सांख्ययोगौ पृथग्बालाः प्रवदंति न पंडिताः ।**
**एकमप्यास्थितः सम्यगुभयोर्विंदते फलम् ॥ ४ ॥**

अरे सांख्य योग दोन्ही । बाल म्हणती वेगळे म्हणोनि । बाल म्हणिजे अज्ञानी । जे नेणती आत्मतत्त्वा. ॥ ६२ ॥ वेगळे दोन्ही निश्चित । ऐसें न मानिती पंडित । जयास जालें [१]अधिगत । आत्मज्ञान. ॥ ६३ ॥ सांख्य योग दोहींचिया । वेगळ्या दिसती [२]शास्त्रप्रक्रिया । म्हणूनि मार्ग वेगळे अगा धनंजया! । वाटती ज्ञानहीनासी. ॥ ६४ ॥ एकाच वाराणसीप्रती । मार्ग दोनी जे असती । जे काशीस न जाती । त्यांस ते देश वेगळे वेगळे सहजचि. ॥ ६५ ॥ तैसी आत्मजिज्ञासा नसे जयास । हीं दोन्हीं शास्त्रें सहजचि तयास । वेगळीं वाटती अज्ञानियास । तो बाल. ॥ ६६ ॥ काशीस जो जाय । त्यास कोण मार्ग जाला तरी काय? । दोन्ही मार्गीं चालती पाय । आणि पावणें काशीतेंचि. ॥ ६७ ॥ जे काशीस पावले । ते वेगळे मार्ग न म्हणती भले, । एकाच मार्गें जरी गेले । फळ पावले दोन्ही मार्गांचें. ॥ ६८ ॥ म्हणूनि जे पंडित, । जे

१. प्राप्त. २. शास्त्रांमधील घटनक्रिया.

आत्मज्ञानी अत्यंत, । ते म्हणती संत । **सांख्य योग** दोन्ही एकचि म्हणूनी. ॥ ६९ ॥ कीं **सांख्य योग** दोहींमधूनी । एकाच्याच अनुष्ठानेंकरूनी । दोहींची सिद्धि होते म्हणोनी । **सांख्य योग** वेगळे न म्हणती पंडित. ॥ ७० ॥ या दोहींची सिद्धि एक । कैसी म्हणेल तरी दोहींचा विवेक । सुचवूनि श्रीवत्सांक । एकवाक्यता बोलतो या श्लोकीं. ॥ ७१ ॥

**यत्सांख्यैः प्राप्यते स्थानं तद्योगैरपि गम्यते ।**
**एकं सांख्यं च योगं च यः पश्यति स पश्यति ॥ ५ ॥**

**सांख्य**शास्त्राची रीती । जे मुमुक्षु अनुष्ठिती । **सांख्य** म्हणावें तया जनांप्रती । अगा **अर्जुना**! ॥ ७२ ॥ त्या **सांख्य**जनीं जें पाविजे स्थान । **योग**मार्गअनुष्ठानींही तेंचि अधिष्ठान । पावती **योग**निष्ठ जन । मार्ग दोन फळ एक. ॥ ७३ ॥ एवं **सांख्य योग** दोन्ही । एकफलत्वें एकचि म्हणोनी । ऐसें जो पाहे ज्ञाननयनीं । तोचि पाहणार इतर अंध. ॥ ७४ ॥ हे श्लोकार्थस्थिती । परि येथें श्रोते म्हणती । कीं **सांख्य योग** दोहींच्या भिन्न रीती । फल एक तें कैसें म्हणोनि म्हणावें? ॥ ७५ ॥ यालागीं दोहींचे प्रकार । आणि एक प्राप्ति कैसी तो विचार । संक्षेपरूप निर्धार । बोलणें लागलें ये स्थळीं. ॥ ७६ ॥ **सांख्य** म्हणजे संख्येचा भाव । तत्त्वसंख्या विचारानुभव । ज्या विचारें परमात्मवैभव । ठायीं पडे. ॥ ७७ ॥ जीं तत्त्वें ब्रह्मांडीं । तींचि तत्त्वें पिंडीं । त्या तत्त्वांची मांडणी मांडी । तें **सांख्य**शास्त्र. ॥ ७८ ॥ आत्मतत्त्व एक । प्रकृतितत्त्वें जडें अनेक । यांचा करितां विवेक । ठायीं पडे आत्मतत्त्व. ॥ ७९ ॥ त्या आत्मसमुद्रावरी । जड प्रकृतितत्त्वाचिया लहरी । तें पाहतां न उरे उरी । भेदची. ॥ ८० ॥ दिसोनि नानातरंग । उदकचि असे अंतरंग । या दृष्टीं पाहतां जाला भंग । द्वैतभावाचा. ॥ ८१ ॥ एवं कळलें आत्मतत्त्व । तेंचि ब्रह्म सर्वात्मत्व । त्या चित्समुद्रीं जडत्व । तरंगाकारें. ॥ ८२ ॥ ऐसा **सांख्य**शास्त्राचा अनुभव । हेंचि **वे**दांताचें वैभव । या **गी**तेंतचि **दे**वाधिदेव । त्रयोदशाध्यायांत वर्णील. ॥ ८३ ॥ यावेगळें जें **सांख्य**मत । तेथें प्रकृतीचें प्राधान्यसंमत । तो सिद्धांत असंमत । **व्या**सादिकां. ॥ ८४ ॥ एवं **व्या**सादिकां संमत । तें **वे**दांतसंमत **सांख्य**मत । जेथें निर्मूल होय अत्यंत । द्वैतमोह. ॥ ८५ ॥ हे **सांख्य**बोधरीती । ठसावली ज्याच्या चित्तीं । त्यांस निःसंदेह मुक्ती । हें त्रयोदशीं श्रीकृष्णचि बोलेल. ॥ ८६ ॥

**'य एवं वेत्ति पुरुषं प्रकृतिं च गुणैः सह ।**
**सर्वथा वर्तमानोऽपि न स भूयोऽभिजायते ॥'** [अ० १३ श्लो० २३]

जो जाणतो या पुरुषातें । आणि गुणांसहित प्रकृतीतें । तो पुन्हा न पावे जन्मातें । जरी सर्वथा प्रपंचीं वर्तला. ॥ ८७ ॥ **सांख्य**मार्गें ये रीती । जे आत्मतत्त्व पावले सुमती । तेचि निरोधितां चित्तवृत्ति । पावती तें पावणें म्हणावें **योग** म्हणोनी. ॥ ८८ ॥ इत्यादि या **यो**गरीती षष्ठाध्यायीं । वर्णिजेतील याच **गी**तेच्या ठायीं । एवं दोन्ही उपायांत एक्या उपायीं । फलप्राप्ति जे उभयत्र बोलती. ॥ ८९ ॥ यालागीं **सांख्ययोग** एक । जो पाहे करूनि ऐसा विवेक । तोचि देखणा डोळस आत्यंतिक । अगा **अर्जुना!** ॥ ९० ॥ एथेंही कोणी म्हणती । कीं **सांख्यें** कळावी आत्मस्थिति । तेव्हां **योगें** निरोधाव्या चित्ताच्या वृत्ती । **यो**गचि कैसा स्वतंत्र? ॥ ९१ ॥ आणि **सांख्यें** आत्मत्व कळलें । कळोनिही जों योगावांचूनि चित्त नाहीं वळलें । तें मागुती खवळलें । आत्मविस्मृतीनें अनात्मत्वीं. ॥ ९२ ॥ तेव्हां **सांख्या**सही **योगा**विण । नसे मोक्षप्रदत्व स्वतंत्रपण । हे श्रोतयांची शंका श्रीकृष्ण । हरिता जाला श्लोकीं पूर्वीलियाच. ॥ ९३ ॥

**'एकमप्यास्थितः सम्यगुभयोर्विंदते फलम् ।'** [अ० ५ श्लो० ४]

हे वेगळे मार्ग दोन्ही । परंतु एकही या दोंमधूनी । सम्यक् म्हणिजे बरविया प्रकारें करूनी । अनुष्ठितां फलप्राप्ति दोहींची. ॥ ९४ ॥ या सम्यक्शब्दें करूनी । अनुष्ठान बरविया प्रकारें म्हणोनी । गहन भाव या वचनीं । सूचविला. ॥ ९५ ॥ कीं **सांख्यें** आत्मा कळे । तेव्हां **योगें** वृत्ति निरोधितां चित्त वळे । तो अष्टांग योग काय करितां मिळे । स्वस्वरूपीं चित्त? ॥ ९६ ॥ त्यांत कोणी अष्टांग करिती । न करितां केवळ **सांख्य** स्थिती । सम्यक्प्रकारें अनुष्ठिती । स्वरूप लक्षिती सर्वत्र. ॥ ९७ ॥ पटीं तंतूच दिसती । परि नसावी विस्मृती । धरितां तंतूची स्मृती । पट तितका तंतूचि असे. ॥ ९८ ॥ ऐसी चित्ताची एकाग्रता । तेही योगचि म्हणावी तत्त्वता । परि अष्टांगयोग न आचरतां । योग नव्हे. ॥ ९९ ॥ स्पर्शोनिही योगरीती । ते **सांख्य**चि म्हणविती । कीं जे न अनुष्ठिती । अष्टांगमार्ग. ॥ १०० ॥ एवं **यो**गाविण ही योगस्थिती । पावले जे सम्यक् शांति अनुष्ठिती । एक **सांख्यें** आत्मा समजोनि सुमती । सम्यक्प्रकारें अनुष्ठिती **योगा**तें. ॥ १०१ ॥ **सांख्य**तत्त्वाची रीती । सम्यक्प्रकारें सर्वदा चाळिती । हे तत्त्वसंख्या सोडूनि निरोधिती । चित्तवृत्तीच सम्यक्प्रकारें. ॥ १०२ ॥ एवं **सां**ख्यातें जरी सोडी । आणि सम्यक्प्रकारें योगचि जोडी । तथापि दोहीं फळीं

जे एकचि गोडी । ते पावतो. ॥ १०३ ॥ टाकूनी अष्टांगरीती । सांख्यमात्रचि सम्यक् अनुष्ठिती । तेही सिद्धि पावती । मार्गद्वयाची. ॥ १०४ ॥ एकांत एक मिळती । तथापि सम्यक्प्रकारें एकरीती । अनुष्ठितां साधक पावती । सिद्धि दोहीं मार्गांची. ॥ १०५ ॥ आधीं आपल्या ग्रामाबाहेर जावें । तेथूनी दोघीं दों मार्गीं भरावें । तेव्हां एकाचि मार्गातें सम्यक् अनुष्ठितां पावावें । एका मार्गें फल दोहीं मार्गांचें वाराणसी. ॥ १०६ ॥ ऐसें आत्मतत्त्व समजावें । मग एकें सांख्यचि सम्यक् अनुष्ठावें । एकें अष्टांगयोगीं चित्त लावावें । त्यास एकाच मार्गें फल दोहीं मार्गांचें ज्ञानपरिपाक ॥ १०७ ॥ ऐसे कर्म योग आणि संन्यास । एका वेगळे एकास । कां स्वतंत्रत्व नये म्हणूनी अर्जुनास । वाटतां चालिलें हें प्रकरण. ॥१०८॥ भाव कीं अगा अर्जुना ! । हें जें वाटलें तूझिया मना । हें सांख्ययोगांतेंचि घडे परि घडों सकेना । कर्मयोग आणि संन्यास या दोहींस. ॥१०९॥ घडों सके सांख्ययोगरीती । ते उपपादूनि श्रीपती । न घडे कर्मयोग आणि संन्यास या दोंप्रती । म्हणूनि म्हणतो या श्लोकीं. ॥ ११० ॥

**संन्यासस्तु महाबाहो दुःखमाप्तुमयोगतः ।**
**योगयुक्तो मुनिर्ब्रह्म न चिरेणाधिगच्छति ॥ ६ ॥**

संन्यास तो ऐसा योगावांचूनि । प्राप्त नव्हे म्हणूनी । सांख्ययोग पूर्वश्लोकद्वयेंकरूनी । स्वतंत्र आणि एक फलत्वें तुज बोलिलों. ॥ १११ ॥ या भावें म्हणतो हरी । कीं, 'सांख्ययोगास ऐसें घडे परी । कर्मयोगावांचूनि संन्यासाची पायरी । न वेंघवे'. ॥११२॥ योगावांचूनि योगफळ । सांख्येंचि करूनी पाविजे केवळ । सांख्यावांचूनि सांख्यफळ निष्कळ। प्राप्त होय योग सम्यक् अनुष्ठितां. ॥ ११३ ॥ तैसें कर्मयोगाविण । न साधे संन्यासपण । दों प्रकारें लक्षण । ज्या संन्यासाचें. ॥११४॥ मुख्य काम्यत्यागें स्वकर्म । करणें परम संन्यासधर्म । दुसरें शिखासूत्रत्यागें आश्रम । हें लक्षणद्वय संन्यासाचें. ॥ ११५ ॥ नित्य विहितकर्में करी । त्यावेगळें काम्य हातीं न धरी । नव्हे कर्मत्यागें बद्ध तेव्हां संन्यास परी । कर्मयोगेंचि साधे हा संन्यास. ॥ ११६ ॥ एवं हाही संन्यास । जो कर्मयोग करील त्यास । आणि काम्यत्याग संन्यास हाही ज्यास । कर्मयोग साधे त्यातेंचि. ॥ ११७ ॥ कीं न टाकितां काम्यकर्म । न घडे चित्तशुद्धिप्रद धर्म । तो कर्मयोगी नव्हे सकाम । जो कामनेनें कर्म आचरतो. ॥ ११८ ॥ काम्य टाकी सम्यक्प्रकारें । आणि कर्मयोग आचरे सम्यक् आदरें । तेव्हां ब्रह्म पावेल विचारें । वेदवाक्याचिया. ॥११९॥ एवं संन्यास विहितक-

र्मांविण । न साधे आणि **कर्म**योगपण । सिद्ध नव्हे जों काम्यत्यागलक्षण । संन्यास सम्यक्प्रकारें घडेना. ॥ १२० ॥ षष्ठाध्यायांत दुसरिया श्लोकीं । **'यं संन्यासमिति प्राहुर्योगं तं विद्धि'** या वचनीं बोलेल कीं । कर्मयोगी नव्हे तोंवरी या लोकीं । जों काम्यत्यागसंकल्प होईना. ॥१२१॥ एवं **सांख्य-योग** एक एकाविण । समर्थ तैसें संन्यास आणि कर्मयोगपण । न साधे हें श्रीकृष्ण । पूर्वापर अनुसंधान येथें सूचवी.॥ १२२ ॥ या श्लोकीं जगन्निवास । म्हणे **कर्म**योगावांचूनि **सं**न्यास । प्राप्त नव्हे म्हणूनि परि टीकाकारांस । प्रकरणानुरूप हेंही येथें सूचवी. ॥ १२३ ॥ कीं जैसा **कर्म**योगावांचूनी । **सं**न्यास न पाविजे म्हणोनी । मी बोलिलों यावरूनि मनीं । तुम्हीं हेंही विचारा.॥१२४॥ कीं काम्य टाकिल्याविण । न घडे **कर्म**योगपण । आणि **सं**न्यासत्वाचेंही हेंचि लक्षण । कीं त्याग काम्यकर्मांचा. ॥ १२५ ॥ **'काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं'** म्हणोनी । अष्टादशाध्यायांत बोलणेंचि आहे स्ववचनीं । त्यावरूनी **सं**न्यासावांचूनी । **कर्म**योगास न घडे कर्मयोगत्व. ॥ १२६ ॥ एवं काम्यत्याग मुख्य **सं**न्यास । ज्या **सं**न्यासें संन्यासाश्रमास । संन्यासत्व घडे अन्यथा आयास। शिरोमुंडण सकामातें.॥ १२७ ॥ तोही तेव्हां संन्यासधर्म । कीं चित्तशुद्ध होय करितां कर्म । परंतु कर्मयोगींच संन्यासधर्म । सांपडे काम्यकर्म त्यागितां. ॥ १२८ ॥ एवं न करितां **कर्म**योग । करी शिखासूत्रत्याग । तोही अशुद्धचित्त मनीं आठवूनी भोग । भ्रष्ट होणार. ॥ १२९ ॥ आतां काम्यत्याग मनीं । तो कर्मयोगयुक्त ही संन्यासी मुनी । कर्मयोगें संन्यासें दोहींकरूनी । ब्रह्म पावतो अतिशीघ्र. ॥ १३० ॥ या उत्तरार्धेंकरूनी । **कर्म**योगही काम्यत्याग **सं**न्यासावांचूनी । सिद्धयोग नव्हे म्हणोनी । सूचविलें. ॥१३१॥ कीं **यो**गयुक्त जो मुनी । तो ब्रह्म थोड्या काळेंकरूनी । पावतो म्हणोनी । श्रीकृष्ण म्हणे. ॥ १३२ ॥ **यो**गयुक्त तो जो युक्त **कर्म**योगेंकरूनी । तो तेव्हां **यो**गयुक्त कीं जेव्हां संन्यासी मुनी । कीं काम्यत्याग **सं**न्यास साधिला म्हणोनी । तो मुनि संन्यासी आणि कर्मयुक्त. ॥१३३॥ एवं हें श्लोकत्रय[1] । या तिहीं श्लोकीं हा निश्चय । कीं कर्मयोग आणि संन्यास हें साधनद्वय[2] । दोहींविण ब्रह्म साधेना. ॥ १३४ ॥ एक दोहींमधूनी । धरावें हें अर्जुनाचे मनीं । परी तैसें न घडे म्हणोनी । श्रीकृष्णभाव. ॥१३५॥ **सांख्य योग** दोन्ही। मोक्षमार्ग त्यामधूनी । एक एकावांचूनी। सम्यगनुष्ठितां मोक्षफळप्राप्ति दोहींची. ॥ १३६ ॥ हें घडों शके **अर्जुना** ।

---

१. हे तीन श्लोक. २. हीं दोन साधनें.

परी कर्मयोग संन्यास यांत ऐसें घडेना । कीं संन्यास कर्मयोग एक एकाविना । न घडे सर्वथा. ॥ १३७ ॥ कीं **'संन्यासस्तु महाबाहो दुःखमाप्तुमयोगतः'** म्हणोनी । संन्यास जों न पाविजे कर्मयोगावांचूनी । ऐसें **'संन्यासस्तु'** म्हणतां या **'तु'**शब्देंकरूनी । हें तों न घडे त्यासारखें हा अर्थ. ॥ १३८ ॥ ऐसा अबाधित[1] अर्थ । टाकूनि कोणी व्यर्थ । **सांख्ययोग** वाखाणिती तो नव्हे समर्थ[2] । अर्थ बाधित होतसे. ॥ १३९ ॥ सांख्यशब्दें घेती[3] संन्यास । योग म्हणती कर्मयोगास । दोहींस एकत्व आणितां आयास । पावती फार. ॥१४०॥ एकचि मार्ग दोहींमधूनी । अनुष्ठितां फलप्राप्ति दोहींची म्हणोनी । अर्थ स्पष्ट होतो यावरूनी । मोक्ष म्हणावा कर्मेंचि अथवा संन्यासेंचि. ॥ १४१ ॥ तरी कर्माविण नव्हे शुद्धचित्त । आणि संन्यासाविण नव्हे मोक्ष प्राप्त । तो संन्यास तों तेव्हां निश्चित । जेव्हां चित्तशुद्धि कर्मयोगें. ॥ १४२ ॥ आणि श्लोकार्थ तो स्पष्टतर । कीं दोहींमधूनि एकचि सम्यक् सादर । अनुष्ठितां फळ निर्विकार । पाविजे दोहींचेंही. ॥ १४३ ॥ एथें ते ऐसें म्हणती । कीं कर्मे चित्तशुद्धि बरवी ये रीती । होतां ज्ञानद्वारें होय प्राप्ती । मोक्षाची. ॥ १४४ ॥ आणि संन्यासही बरविया प्रकारें । अनुष्ठितां पूर्वीं जें कर्म केलें त्याणें बरें । त्याचें आणि संन्यासाचेंही जें फळ खरें । तें **कैवल्य** हा म्हणे पावतो. ॥ १४५ ॥ एवं कर्मयोग जरी केला । तरी काम्यत्याग संन्यास जों नाहीं साधला । तों कोणीं ज्ञानद्वारा नाहीं पावला । मोक्षफळासी. ॥ १४६ ॥ आणि कर्मयोगें चित्तशुद्धी । नव्हतां न घडे संन्याससिद्धी । हें याच **गीतें**त आणि सर्वत्रही प्रसिद्धी । गोंफाटितां[4] न ये सर्वथा. ॥ १४७ ॥ म्हणोनि ऐसें म्हणती । कीं संन्यास अनुष्ठितां बरविये[5] रीती । पूर्वीं अनुष्ठिली कर्मयोगस्थिती । या दोहींचें फळ तो पावतो. ॥ १४८ ॥ एवं संन्यासाहूनि पहिलें । कर्म बरविये रीतीं अनुष्ठिलें । तेव्हां एकावांचूनि एक कैसें जालें । प्राप्त फळ कैवल्य. ॥ १४९ ॥ आतां एक साधारण । आणि एका अनुष्ठानीं सम्यक्पण । ऐसें म्हणतांही होती क्षीण[6] । पक्ष सकळ शास्त्रांचे. ॥ १५० ॥ कीं कर्मही करावें बरें । संन्यासही अनुष्ठावा सम्यक्प्रकारें । तेव्हां कैवल्यफळ तरी याही विचारें । अर्थ होतो हा व्यर्थ. ॥ १५१ ॥ हें **सांख्ययो**गांसचि घडे । कीं दोहींमधूनि एकीचकडे । सादरत्वें उडी पडे । आणि एकीकडे अनादर. ॥१५२॥ तरी फळ उभयांचें जोडे । तैसें एथें कदापि न घडे । कीं एक पक्षीं जरी कांहीं उणें पडे । फळ विघडे दोहींचें. ॥ १५३ ॥ कीं वस्त्र

१. निर्दोष. २. खरा अर्थ. ३. स्वीकारिती. ४. झुगारितां. ५. चांगल्या प्रकारें. ६. दुर्बळ.

बरें धुतलें । आणि बरेंचि रंगें रंगविलें । तरीच तें मोलास आलें । नासे उणें पडतां एकत्र. ॥ १९४ ॥ आतां रंगाचे दोनी प्रकार । तैसे सांख्य-योगमार्गप्रचार । भलत्या एका रंगें अंबर[1] । सुरंग[2] होय. ॥ १९५ ॥ एवं या वेगळा अर्थ । बरें विचारितां अवघा व्यर्थ । हाचि अर्थ समर्थ । जो या टीकेंत वर्णिला. ॥ १९६ ॥ सांख्ययोग शब्दांचा स्पष्ट । अर्थ हा सोडोनि कां कल्पावा क्लिष्ट ? । न साधतां साधावयास कष्ट । कां करावे ? ॥१९७॥ दूषणें लागती अपार । परंतु ग्रंथ वाढेल फार । असो आतां पुढें काय विचार । बोलेल श्रीकृष्ण तें पाहों. ॥ १९८ ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञ लोक । परिसोत आधीं. ॥ १९९ ॥ कर्मयोग आणि संन्यास । दोनही साधणें अगत्य मोक्षास । हें परिसतां अर्जुनमानस । समाधान पावलें. ॥ १६० ॥ परंतु एक शंका चित्तीं । उत्पन्न जाली मागुती । कीं कर्मयोग संन्यास दोन्ही साधती । तऱ्ही ज्ञानेंचि मोक्ष. ॥ १६१ ॥ आणि ज्ञान जाहलि-याही उपरी । कर्म करणें घडेच शरीरीं । जों कर्म करणें बंध तोंवरी । तरी मोक्ष जितां घडेना. ॥ १६२ ॥ जो कर्मास लिंपतो । जीवन्मुक्त कैसा म्हणावा तो ? । तेव्हां जितां मोक्ष म्हणती होतो । हेंही अघटित. ॥ १६३ ॥ हे शंका पूर्वींही निरसली । तथापि अर्जुनास स्मृति नाहीं राहिली । म्हणूनि मागुती उपजली । हे शंका. ॥१६४॥ म्हणूनि शंकापरिहार । पुन्हा करितो सर्वेश्वर । या मिसें अकर्तृत्वप्रकार । विशद आतां बोलेल. ॥ १६५ ॥ त्यांत एक कर्म करितेकाळीं । बुद्धीनें स्वअकर्तृत्व सांभाळी । कोणी पट तंतु ऐसें न्यहाळी । सर्वभूतीं ब्रह्म. ॥ १६६ ॥ तोही अलिप्त कर्मीं । ज्याची चित्तवृत्ति सर्वत्रही ब्रह्मीं । आधीं तयास वर्णितो जगत्स्वामी । या श्लोकीं. ॥ १६७ ॥

**योगयुक्तो विशुद्धात्मा विजितात्मा जितेंद्रियः ।**
**सर्वभूतात्मभूतात्मा कुर्वन्नपि न लिप्यते ॥ ७ ॥**

अगा ! सर्वभूतें चराचरें । आणि ज्या जीवात्म्याचीं हीं शरीरें । आणि पंचमहाभूतें थोरें । आत्मा या सकळांचा जो स्वयें, ॥ १६८ ॥ तो कर्म करि-तेही काळीं । आपण अकर्त्ता ऐसें जरी न सांभाळी । तो शरीर कर्मीं जरी चाळी । तरी करूनिही लिंपत नसे. ॥ १६९ ॥ कीं आपल्या देहासहित । सर्वभूतीं देखे स्वात्मत्व निश्चित । त्यास त्याच्या कर्मासहित । प्रपंच अथवा निजात्माचि. ॥ १७० ॥ प्रारब्धें सुखदुःखभोग घडे । तो भोग लागे प्रति-

---

१. वस्त्र. २. उत्तम.

बिंबाकडे । हा बिंबैक्यपणें जरी निवडे । तरी प्रतिबिंब जीव जे त्यांचा आत्मा स्वयें हाचि. ॥ १७१ ॥ कीं सर्व प्रतिबिंबोपाधितरंग । ज्यांत बिंबला चित्समुद्र श्रीरंग । त्या उपाधितरंगीं स्वयें अंतरंग । चित्स्वरूप आपणचि सर्वत्र ऐसें अनुभवी. ॥ १७२ ॥ त्या उपाधींत प्रतिबिंब गवसे । त्याचा आत्माही हाचि असे । एवं जीवात्मत्वही भिन्न न दिसे । हाचि आत्मा तयाचा. ॥ १७३ ॥ सूर्य भासला उदकीं । तेजोरूप तें उदकचि कीं । तैसा जीवोपाधीच जीवलोकीं । चिदंशें जीवत्व पावला. ॥ १७४ ॥ एवं सर्व भूतशब्दें सर्व देह । आत्मशब्दें जीवमात्रचि निःसंदेह । पुन्हा भूतशब्दें पंचमहाभूतसमूह । दुसरिया आत्मशब्दें जड पट तंतु आत्मा चैतन्य. ॥ १७५ ॥ ऐसा सर्वभूतात्मभूतात्मा म्हणोनी । श्रीकृष्ण बोलिला स्वमुखेंकरूनी । तो करूनिही कर्म अलिप्त होऊनी । सर्वात्मभावें असतसे. ॥ १७६ ॥ हा उत्तरार्धाचा अर्थ । आधीं वर्णिला ऐसा यथार्थ । पूर्वार्धाचा अर्थ समर्थ । प्रकट होतो हेतुरूपें यावरी. ॥ १७७ ॥ कीं सर्वात्मभावें समरसें । आणि तेंचि चित्त विषयभोगीं पैसे । तरी अहंकारावीण कैसे । विषय स्फुरती भोगेच्छेंकरूनी. ॥ १७८ ॥ म्यां भोग भोगावे ऐसा । मीपणींच वासनेचा ठसा । ज्यास मीपण तो कैसा । अलिप्त कर्में करूनिही. ॥ १७९ ॥ हे शंका परिहरी । ऐसें पूर्वार्धाच्या अंतीं हरी । वचन बोलतो कीं जितेंद्रिय तोंवरी । ऐसा अनुभव तयासी. ॥ १८० ॥ कीं जो ऐसा तो जितेंद्रिय । त्यास मी विषय भोगीन हा कैसा निश्चय । वासनात्यागें मनोजय । जाहला ज्याचा. ॥ १८१ ॥ हा अर्थ 'जितेंद्रिय' पदाहूनि आधीं । 'विजितात्मा' या शब्देंकरूनि साधी । आत्मशब्दें येथें अर्थ बोधी । मन म्हणोनि. ॥ १८२ ॥ देहरथाचे घोडे । इंद्रियें फिरविती चहूंकडे । तेव्हां मनास वागोरेपण घडे । कीं मनें इंद्रियें आटोपती. ॥ १८३ ॥ ऐसेंचि बोलते श्रुती । आतां वागोरे सारथ्याआधीन असती । तरीच बुद्धीस वेद म्हणती । सारथि म्हणोनी. ॥ १८४ ॥ एवं मनोजयाची सिद्धी । तेव्हां कीं जेव्हां शुद्ध जाली बुद्धी । आत्मशब्देंचि बुद्धि ही प्रसिद्धी । ऐसी संस्कृतांत. ॥ १८५ ॥ म्हणूनि 'विजितात्मा' या शब्दाआधीं । 'विशुद्धात्मा' म्हणूनी हा अर्थ साधी । येथें आत्मशब्दें करूनी बोधी । बुद्धि म्हणोनि. ॥ १८६ ॥ तो विजितात्मा तरी । कीं विशुद्धात्मा जाला जरी । 'विशुद्धात्मा' या शब्दें हरी । सूचवी कीं बुद्धि शुद्ध ज्याची विशेषें. ॥ १८७ ॥ बुद्धि एक वृत्ति सत्त्वाची । जेथें वडामोडी निश्चयाची । सर्वां निश्चयांत गोष्टी साची । एक पाहतां.

---

१. प्रत्यक्ष होई. २. सांपडे; मिळे. ३. लगाम.

॥ १८८ ॥ कीं व्हावें आपलें बरवें । वाईट कधीं न व्हावें । भलता निश्चय याच भावें । सत्त्ववृत्ति करी ते बुद्धि. ॥ १८९ ॥ जीवात्मा पुरुष बुद्धि गृहिणी[1]। म्हणे सुखी असो दुःखी न हो माझा धनी[2]। परि गृहिणीच्या मूढपणीं । घात होतो पतीचा. ॥ १९० ॥ अपथ्यीं पथ्य मानी । स्वामीस चारी[3] गृहस्वामिनी । त्या अपथ्यभोजनीं दिनयामिनी । पुरुष दुःखी तिच्या मूढत्वें. ॥१९१॥ तीस सत्संगवैद्य भेटे । आणि अपथ्य पथ्यसें वाटे । तरी ते सुमार्गीं राहटे[4]। सुख तेव्हां पुरुषासी. ॥ १९२ ॥ यालागीं ज्या पुरुषाची गृहिणी । सत्संगें सच्छास्त्रें शहाणी । त्यास दुःखाची कहाणी । कानींही पडेना. ॥ १९३ ॥ यालागीं अनुभवियाची बुद्धी । कर्मयोगें पावली शुद्धी । ज्या कर्मयोगीं संन्यास हे प्रसिद्धी । जे सूत्रप्राय[5] येथेंही सूचविली. ॥ १९४ ॥ त्या कर्मयोगें होऊनि युक्त । शुद्धबुद्धि मनोजयें जितेंद्रिय जीवन्मुक्त । जाला तोही कां विषयासक्त । होईल. ॥ १९५ ॥ या भावें कृष्ण नित्यमुक्त । आधींच म्हणे कीं तो योगयुक्त । तेव्हां शुद्ध बुद्धि जितमन जितेंद्रिय जीवन्मुक्त । सर्वात्मभावें कर्मीं लिंपेना. ॥ १९६ ॥ अर्थ ऐसा होतो सिद्ध । यालागीं आधीं उत्तरार्ध । वाखाणूनि मग पूर्वार्ध । ये रीती वाखाणिलें. ॥ १९७ ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुश्लोक । परिसोत आधीं. ॥१९८॥ मी अकर्ता ऐसी । स्मृति नसोनिही मानसीं । सर्वत्र सर्वकर्मीं अहर्निशीं । आत्मत्व पाहे. ॥ १९९ ॥ तरी तया पुरुषाला । कर्मलेपन[6] न घडे या बोला । बोलोनि आतां ज्याला । स्मृति सर्वदा स्वअकर्तृतेची. ॥ २०० ॥ तो कर्म आचरतेकाळीं । अकर्तृत्व आपलें कैसें न्यहाळी । हें आतां वनमाळी । बोलतो या दों श्लोकीं. ॥ २०१ ॥

**नैव किंचित्करोमीति युक्तो मन्येत तत्त्ववित् ।**
**पश्यञ्शृण्वन्स्पृशञ्जिघ्रन्नश्नन्गच्छन्स्वपञ्श्वसन् ॥ ८ ॥**
**प्रलपन्विसृजन्गृह्णन्नुन्मिषन्निमिषन्नपि ।**
**इंद्रियाणींद्रियार्थेषु वर्तंत इति धारयन् ॥ ९ ॥**

**अर्जुना!** तत्त्व कळलें ज्याला । आत्मा अकर्ता कळलें त्याला । मी कर्ता ऐसा अहंकार ज्याला । आत्मरज्जु कळतां मृषा[7] सर्प. ॥ २०२ ॥ मीपणातें अवलंबूनी । मी कर्ता म्हणोनी । बुद्धि म्हणे सचेतन होऊनी । आत्मसत्तेनें.

---

१. स्त्री. २. पति; स्वामी. ३. खाववी. ४. चाले; वर्ते. ५. संक्षेपानें. ६. कर्मसंबंध. ७. मिथ्या.

॥ २०३ ॥ जडा मीपण नसे सत्ता । दिसे चैतन्यास कर्तृता । जीवात्मयास बद्धता । ऐसी संगें कुबुद्धीच्या. ॥ २०४ ॥ वाटे भोंवते[1] हे मेदिनी[2] । परि भोंवंडी[3] आपल्याच नयनीं । ते भूमि अचळ म्हणोनी । कळे भोंवंडी जातां नेत्रांची. ॥ २०५ ॥ तैसा जातां अहंकार । बुद्धीस आत्मा दिसे निर्विकार । तेव्हां अकर्तृत्वनिर्धार । होय तो म्हणावा तत्त्वज्ञ. ॥ २०६ ॥ ऐसा तत्त्वज्ञ तो । बुद्धीकरूनि ऐसें मानितो । कीं आत्मा कांहीं करितो । हें घडेना. ॥ २०७ ॥ तो आत्माच आपण । आपण कांहीं करीत नाहीं निर्गुण । ऐसी स्मरे अकर्तृत्वखूण । तेही बुद्धी. ॥ २०८ ॥ आत्मा अबोलणा बोले वाचा । हा निर्णय सर्वथा साचा । तथापि शब्द दोहीं निर्णयाचा । वाचाचि करी. ॥ २०९ ॥ तैसा आत्मा अकर्ता गुणातीत । हें मानणें बुद्धीचेंचि निश्चित । तरीच तो तत्त्वज्ञ म्हणूनि संमत । जगद्गुरू श्रीकृष्णासी. ॥ २१० ॥ या भावें श्रीकृष्ण म्हणतो । कीं तत्त्वज्ञ अगा अर्जुना ! तो । जो आपण कांहींच करीत नाहीं ऐसें मानितो । हें मानणेंही नसे आपणा. ॥ २११ ॥ तेव्हां तत्त्वज्ञ म्हणोनी । म्हणावा कीं जरी ऐसें मानी । एवं अकर्तृत्व ऐसें मानूनी । तो असतो. ॥ २१२ ॥ आतां अकर्तृत्व आपलें कळलें । आणि त्या स्मरणीं चित्त नाहीं वळलें । तें चित्त सत्त्वनिश्चित खवळलें । रजतमेंकरूनी. ॥ २१३ ॥ रजोगुण जें तें इंद्रिय । तम[4] जो तो विषय । सत्त्वीं मिसळतां हें द्वय[5] । अद्वयस्फुरण मग कैचें ? ॥ २१४ ॥ रज तम आणि सत्त्व । या त्रिगुणपटींही तंतु आत्मत्व । जो स्मरे सदा हें तत्त्व । तो पूर्वश्लोकीं वर्णिला. ॥ २१५ ॥ हें सर्वात्मत्वस्मरण । नश्वरीं जडीं नित्य चैतन्यस्फुरण । हें सिद्धाचें लक्षण । पूर्वश्लोकीं वर्णिलें. ॥ २१६ ॥ आतां आपण जडदेह । हा फिटला संदेह । स्वअकर्तृत्वस्मरणीं होय निःसंदेह । आणि त्याचे पूर्वसंस्कार मोडती. ॥ २१७ ॥ त्यानें आपलें चिदात्मत्व । ज्यास सर्वथा अकर्तृत्व । स्फुरे त्या स्मरणीं योजावें सत्त्व । रजतमावेगळें करूनी. ॥ २१८ ॥ चित्त चैतन्यस्वरूपीं योजे । ऐसें तत्त्वज्ञें आधीं केलें पाहिजे । ज्याणें ऐसें केलें त्यास म्हणिजे । युक्त म्हणोनी.॥२१९॥ एवं ऐसा युक्त जो तत्त्ववेत्ता । तो सांभाळी आपली अकर्तृता । तो आपण कांहीं करीत नाहीं तत्त्वता । ऐसें मानितो. ॥ २२० ॥ ऐसीं जगद्वंद्यपदें । पूर्वार्धीं योजिलीं पैदें[6] । तीं वाखाणिलीं 'अनु'पदें । त्यानेंचि. ॥ २२१ ॥

---

१. फिरते. २. पृथ्वी. ३. गिरकी. ४. तमोगुण. ५. हे दोन. ६. शब्द.

आतां कोण कोण कर्म । करितां आपण अकर्ता निर्धर्म । ऐसें मानितो हें सगुणब्रह्म । श्रीकृष्ण बोलतो दों अर्धीं. ॥ २२२ ॥ पाहतां ऐकतां स्पर्शतां । हुंगतां भक्षितां चालतां । निजतां ओढितां सोडितां । श्वासोच्छ्वास. ॥ २२३ ॥ बोलतां, मळमूत्र टाकितां, । हातेंकरूनि कांहीं देतां घेतां, । आणि नि[१]मिषोन्मेषही हालतां, । मानी कीं कांहीं करीत नाहीं आपण. ॥ २२४ ॥ तरी कर्म घडे तें कैसें? । अर्जुना! म्हणसील ऐसें । तरी ऐकतों जैसें । कर्तृत्व पाहतो कर्माचें. ॥ २२५ ॥ मागिलिया दोंचरणीं । अकर्तृता बोलिला चक्रपाणी । तें कर्म कैसें घडतें हे वाणी । या शेवटिल्या अर्धीं बोलतो. ॥ २२६ ॥ जो जयाचा विषय । त्या विषयांत तें इंद्रिय । वर्ततें ऐसा इंद्रियसमुदाय । स्वस्वविषयीं वर्ततो. ॥ २२७ ॥ ऐसें बुद्धीकरूनी । धरितो तो म्हणोनी । आपलें अकर्तृत्व सांभाळूनी । कर्म ऐसें पाहतो. ॥ २२८ ॥ कीं रूप पहाती नेत्र । शब्द ऐकती श्रोत्र । घेतसे स्पर्शमात्र । त्वगिंद्रिय. ॥ २२९ ॥ इत्यादि जें इंद्रिय । घेतसे आपलाला विषय । तैसाच कर्मेंद्रियसमुदाय । स्वस्वकर्मी वर्ततो. ॥२३० ॥ आपण नव्हे इंद्रिय । कीं घेऊं कांहीं विषय । आपण असतों कर्मेंद्रियसमुदाय। तरी प्राप्त होतें कर्तृत्व मजलागीं. ॥ २३१ ॥ ऐसा दों श्लोकीं साधकोत्तम । वर्णिला तत्त्वज्ञ परम । जो पूर्वसंस्काररूप भ्रम । चिदात्मत्वस्मृतीनें मोडतो. ॥२३२॥ या मागील जो श्लोक । तेथें सिद्धलक्षण उत्तमश्लोक । बोलिला आतां जिज्ञासु उपासक । जें तत्त्व जाणों इच्छिती. ॥ २३३ ॥ त्यांस आत्मज्ञान नसे। म्हणोनि स्वअकर्तृत्व न दिसे । आपण कर्ता हृदयीं जो वसे । तोंवरी बंध. ॥ २३४ ॥ कर्में बंध जया । नव्हे ईश्वरप्रसाद कर्में तया । ईश्वरप्रसादावां- चूनिया । ज्ञान नव्हे. ॥ २३५ ॥ या शंकेचा परिहार । पूर्वीं जाला वारंवार । परि थे[२]ारला नाहीं तो निर्धार । अर्जुनमनीं. ॥ २३६ ॥ आणि जो गु[३]रुगम्य विचार । तो न आइकतां वारंवार । चित्तास दृढ संस्कार । बसत नाहीं. ॥ २३७ ॥ गुरूनेंही पुनः पुन्हा । सांगितलेंच सांगावें शिष्यजना । 'तत्त्वमसि' म्हणोनियां वेदवचना । नऊदां गुरू उपदेशी. ॥ २३८ ॥ पुनःपुन्हा बोलणें यास । शास्त्रकार म्हणती अभ्यास । म्हणोनि पुनःपुन्हा अर्जुनास । हें प्रक- रण उपदेशितो. ॥ २३९ ॥ आतां जिज्ञासुजनीं । बंधन पाविजे ज्या कर्मेंक- रूनी । तें श्रीकृष्ण बोलतो येथूनि । श्लोकद्वयें. ॥ २४० ॥

---

१. डोळे झांकितां उघडितां. २. स्थिर, दृढ झाला. ३. गुरूपासूनच समजणारा.

**ब्रह्मण्याधाय कर्माणि संगं त्यक्त्वा करोति यः ।**
**लिप्यते न स पापेन पद्मपत्रमिवांभसा ॥ १० ॥**

ब्रह्मीं सगुणीं कर्में । समर्पूनि भागवतधर्में । फलसंग टाकूनि कर्में । निष्कामें जो करितो, ॥ २४१ ॥ तो पापें नव्हे लिप्त । कीं कर्मबंध त्याचा होतो समाप्त । कमलपत्र जैसें अलिप्त । उदकीं उदकेंकरूनी. ॥ २४२ ॥ श्लोकाचा इतकाच अर्थ । परि कितीएका पदीं गूढ भावार्थ । जो प्रकट होतां यथार्थ । श्रोतयां वाटे. ॥ २४३ ॥ कीं ब्रह्मीं कर्में समर्पूनी । लिप्त नव्हे पापेंकरूनी । म्हणूनि म्हणतां या वचनीं । भाव न काढितां नव्हे वाक्यार्थ. ॥ २४४ ॥ कर्में समर्पितो ब्रह्मीं । पाप कैचें त्या कर्मीं । तत्रापि संग टाकूनि पदपद्मीं । कर्में समर्पी सगुणाच्या. ॥ २४५ ॥ तो तों पुण्यकर्में करी । आणि कृष्ण पापलेप परिहरी । एवं तें पुण्यचि परी । पाप म्हणावें बंधकत्वें. ॥ २४६ ॥ सुवर्णाची तरी बेडी । तैसें पुण्यही बंध घडी । एवं पुण्यही पापचि उघडी । हे गोष्टी होते भावार्थें. ॥ २४७ ॥ ऐसे जिज्ञासु निपुण । जे जे रीती ब्रह्मार्पण । करिताति तें कर्मलक्षण । आणि निमित्तही वर्णितो या श्लोकीं. ॥ २४८ ॥

**कायेन मनसा बुद्ध्या केवलैरिंद्रियैरपि ।**
**योगिनः कर्म कुर्वंति संगं त्यक्त्वात्मशुद्धये ॥ ११ ॥**

कायेंकरूनि कर्म । स्नानसंध्यादि स्वधर्म । मनेंकरूनि उत्तम । भगवद्ध्यान. ॥ २४९ ॥ भगवद्भजनेंचि मोक्ष होय । इत्यादि बुद्धीचा निश्चय । कीं त्याच्या प्रसादेंचि अद्वय । ज्ञानसिद्धी. ॥ २५० ॥ यावेगळीं इंद्रियेंही करूनि । कर्में करिती तीं केवळ म्हणोनि । इंद्रियांस केवल शब्द लावूनि । बोलेल या भावें. ॥ २५१ ॥ कीं रजोगुणाचीं इंद्रियें । तीं सहज वासनामयें । त्यांत निष्काम भगवदर्पण निश्चयें । प्रवर्तती तीं केवळें म्हणावीं. ॥ २५२ ॥ श्रवणकीर्तनादि कर्म । भगवत्प्रीतीनिमित्त जो धर्म । घडे इंद्रियांतें उत्तम । तें कर्म केवल इंद्रियें घडतसे. ॥ २५३ ॥ ऐसीं कर्में कर्मयोगीं । करिती चित्तशुद्धीलागीं । संग टाकूनि निःसंगी । भक्तियोग करीती ये रीतीचा. ॥ २५४ ॥ आतां ऐसींच कर्में करितां दिसती । आणि बंध तरी ते पावती । म्हणोनि निवडोनि दोन्ही रीती । श्रीपती बोले या श्लोकीं. ॥ २५५ ॥

**युक्तः कर्मफलं त्यक्त्वा शांतिमाप्नोति नैष्ठिकीम् ।**
**अयुक्तः कामकारेण फले सक्तो निबद्ध्यते ॥ १२ ॥**

ईश्वरीं कर्मै अर्पी भक्त । संग टाकूनि फळीं विरक्त । तो ईश्वरीं योजिला यालागीं युक्त । तो म्हणावा. ॥ २५६ ॥ युक्त ऐसा कर्मफळ । टाकूनि ईश्वरार्थेचि केवळ । कर्मै करी तो शांति अचळ । पावतो. ॥ २५७ ॥ तद्विपरीत अयुक्त । कर्मै करूनि फळीं आसक्त । तो बंध पावतो अभक्त । अर्जुना ! ॥ २५८ ॥ काम उपजला मनीं । तो कर्मै करवी यावरूनी । सुटावें ज्या कर्मबंधापासूनी । हा वश तयातेंचि. ॥ २५९ ॥ ऐसा सकाम तो अयुक्त । कीं चित्त नसे ईश्वरीं युक्त । तो फळींच आसक्त । बंध पावतो यालागीं. ॥ २६० ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञलोक । परिसोत आधीं. ॥ २६१ ॥ ग्रंथ येथवरी आला । तेथें निर्णय इतका जाला । कीं कर्तृत्व नाहीं ज्ञानियाला । स्वअकर्तृत्व कळलें जयासी. ॥ २६२ ॥ जयास नाहीं ज्ञान । त्यांत दोन प्रकारचे जन । जिज्ञासु एक ते जरी ज्ञानहीन । कर्मै समर्पिती ईश्वरीं. ॥ २६३ ॥ जिज्ञासु ऐसे ते निष्काम । फलबंध पावती जे सकाम । परि दोहींसही अकर्तृत्ववर्म । ठाउकें नसे. ॥ २६४ ॥ अकर्तृत्व जाणती ज्ञानी । ते वर्णिले दों प्रकारेंकरूनी । एक सर्वही ब्रह्म म्हणोनी । पाहती स्वकर्मासहित. ॥ २६५ ॥ एक दर्शनश्रवणादि काळीं । इंद्रियें स्वविषयीं वर्तती ऐसें न्यहाळी । कर्तृत्व आपणावरूनि टाळी । अकर्तृत्व पाहे आपुलें. ॥ २६६ ॥ तेथें शंकेचें स्थळ । एक राहिलें कीं चिदात्मा केवळ । तो अज्ञानियास अकळ । तरी अकर्ता. ॥ २६७ ॥ तो असेचि अकर्ता । जरी वाटला कर्ता । तरी कर्तृत्वाची वार्ता । न लागे तयासी. ॥ २६८ ॥ आतां बुद्धीस अकर्तृत्व त्याचें कळे । तेव्हां अकर्तृत्व त्यास फळे । परि जों बुद्धि तन्मयत्वीं न वळे । तों तो ज्ञानी न म्हणवे अकर्ता. ॥ २६९ ॥ वळली तथापि त्या बुद्धीवांचूनी । कर्म न घडे इंद्रियवर्गेचिकरूनी । बुद्धीस कर्तृत्व यावरूनी । लागलें तेव्हां कैसा अकर्ता. ॥ २७० ॥ हे शंका हरावयास उत्तमश्लोक । बोलतो आतां हा श्लोक । गहन दृष्टि अर्थावलोक । निर्मत्सरीं करावा. ॥ २७१ ॥

**सर्वकर्माणि मनसा संन्यस्यास्ते सुखं वशी ।**
**नवद्वारे पुरे देही नैव कुर्वन्न कारयन् ॥ १३ ॥**

अगा ! सत्त्वाचे भेद चारी । अंतःकरण चित्त बुद्धि मन या प्रकारीं । त्यांत आत्मस्फुरण अंतरीं । हें अंतःकरण. ॥ १७२ ॥ आत्मचैतन्यें करूनी । चेतवी इतरां जडां म्हणोनी । चित्त या नांवें सज्जनीं । सत्ववृत्ति वर्णिली.

दुसरी ते. ॥ २७३ ॥ आत्मा नव्हे कर्ता । बुद्धीस निश्चयाची वार्ता । आत्मा तीहूनिही परता । तिचा प्रकाशक. ॥ २७४ ॥ बुद्धि करी निश्चय । मन संकल्पविकल्पकल्पनामय । त्यांत आत्मत्व अव्यय । अंतःकरणेंकरूनी अनुभवी. ॥ २७५ ॥ चित्त आपणासहित । जडें चेतवी समस्त । प्रारब्ध सरे तोंपर्यंत । असेचि तें. ॥ २७६ ॥ तें सुषुप्तीं जैसें तमीं । समाधींत तैसें ब्रह्मीं । त्यासहितही संयमी । अकर्तात्मत्वीं योजी बुद्धीतें. ॥ २७७ ॥ बुद्धि अंतःकरणीं पावे लय । तें अंतःकरण चिन्मय । उरलें संकल्पविकल्पमय । मन याचें. ॥ २७८ ॥ इंद्रियें त्या मनेंकरूनी । विषयीं वर्तती पूर्वसंस्कार स्फुरोनी । बुद्धि अकर्तात्मत्वीं मिळोनी । वेगळेपणें पाहे त्याही मनास. ॥ २७९ ॥ यालागीं मनासह । वेगळीं इंद्रियें आणि देह । वेगळे विषय वेगळें कर्म निःसंदेह । आपण अकर्ता बुद्धीनें म्हणे. ॥ २८० ॥ ऐसा जो बुद्धिमंत । तो या मनासहित । कर्म वेगळें टाकूनि अत्यंत । सुख जैसें होय असतो तैसा. ॥ २८१ ॥ मन त्याचें जें ये रीती । मोकळें न सोडी त्याहीप्रती । धरूं नेदूनि विषयप्रीती । वासनारहितबुद्धीनें. ॥ २८२ ॥ पुरुष अश्व हातीं धरी । नाचोंही दे त्यास परी । होऊं नेदी रानभरी । मागुती वेगळा पाहे साक्षित्वें. ॥ २८३ ॥ ऐसें पाहतां कांहीं । कर्म तो करीतचि नाहीं । नवद्वारपुरीं देहीं । असतो सुखें. ॥ २८४ ॥ नवद्वारपुर । हें मानूनि शरीर । त्यांत असे सुखवस्ती नर । देहांत देही तो ऐसा. ॥ २८५ ॥ नगरीं उदंड लोक वसती । बोलती चालती खाती हुंगती । देखोनिही तयांप्रती । निरभिमान जैसा. ॥२८६॥ मनासहित इंद्रियें । वेगळीं ऐशा निश्चयें । हा न करी कांहीं स्वयें । हें सिद्ध जालें. ॥ २८७ ॥ परि याच्या सत्तेंकरूनी । तीं कर्मे करिती म्हणोनी । हा न करी स्वयें परी करवी ऐसें मानूनि मनीं । क्षणीं भावील अर्जुन. ॥ २८८ ॥ म्हणूनि म्हणतो हरी । कीं तो न करी ही ज्यापरी । न करवीही याच प्रकारीं । अगा अर्जुना! ॥ २८९॥ सूर्यप्रकाश दृष्टी । त्या दृष्टीनें वर्त्ते सृष्टी । परि करणें करविणें दोन्ही अदृष्टीं । नसती सूर्याचिया. ॥ २९० ॥ समीप होतां चुंबकशिळा[1] । लोहशलाका[2] होती चंचळा । हे चुंबकाची सहजकळा[3] । नाचणें नाचवणें दोन्ही न तयासी. ॥ २९१ ॥ एवं इंद्रियें चाळी । त्या मनासह तीं वेगळीं । करणें करविणें या भावें टाळी । अनुभवी आपलें. ॥ २९२ ॥ ऐसा कर्मावेगळा । तोचि कर्मसंन्यासी आगळा । सर्वथा कर्मांहूनि निराळा । वर्णिती ते वर्णोत. ॥ २९३ ॥ सर्व कर्मे मनासहित । संन्यासूनि ऐसीं त्यागूनि

१. लोहचुंबक पाषाण. २. लोखंडाची कांब. ३. शक्ति.

निश्चित । न करी करवी सुखें अत्यंत । नवद्वारपुरीं वसे श्लोकार्थ ऐसा. ॥ २९४ ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याच निमित्तही सुज्ञलोक । परिसोत आधीं. ॥ २९५ ॥ कर्मकर्तृत्वपरिहार । अकर्त्तात्मबोधें सर्वेश्वर । बोलता जाला वारंवार । गीतेंत या. ॥ २९६ ॥ आणि पाहतां लोकव्यवहार । सर्व करवितो ईश्वर । तात्पर्य न कळोनि आधार । यास वेदाचाही मानिती. ॥ २९७ ॥

श्रुति—**एष ह्येव साधु कर्म कारयति यमेभ्यो लोकेभ्य उन्निनीषते ।**
**एष उ एवासाधु कर्म कारयति तं यमेभ्यो लोकेभ्योऽधो निनीषते ॥**

श्रुत्यर्थ—वेद म्हणती ईश्वर । उत्तम लोकास नेऊं पाहतो जो नर । त्यास साधुकर्मीं तत्पर । करीतसे. ॥ २९८ ॥ अधोलोकास जो पुरुष । न्यावा म्हणूनि जो इच्छी परमपुरुष । असाधु कर्मे सदोष । त्या हातीं करवितो ॥ २९९ ॥ वेदवचनाचें ये रीती । तात्पर्य विरळा जाणती । कीं ईश्वर उत्तम अधम गती । किंनिमित्त देऊं इच्छितो. ॥ ३०० ॥ उत्तम ज्यास गती । देईन म्हणतो जगत्पती । त्यानें यास काय देऊनि प्रीति । संपादिली याची ॥ ३०१ ॥ तो काय याचा सोयरा । आणि वैरी याचा काय दुसरा । दुर्गतीस ज्या नरा । नेईन म्हणतो. ॥ ३०२ ॥ एथें म्हणावें जैसा बाळ । पुतळे करूनि खेळे खेळ । बरीं वाईट कर्मे करवूनि सकळ फळ । बरें वाईट देतसे ॥ ३०३ ॥ तो तरी मूढ तें अचेतन । ईश्वर सर्वज्ञ हें सचेतन । एकास सुख एकास दुःख देतां निरंजन । म्हणावा विषम आणि निर्दय. ॥ ३०४ ॥ एकासी बरा एकासि वाईट । तेव्हां विषम म्हणावा चोखट । आणि दुःखें देतो तेव्हां उत्कृष्ट । निर्दय म्हणावा. ॥ ३०५ ॥ जो विषम आणि निर्दय । तो ईश्वरचि नव्हे हा निश्चय । जो सर्वसम सर्वांवरी सदय । ईश्वर तोचि. ॥ ३०६ ॥ विषम निर्दय मानिती । आणि ईश्वरास भजती । ते आपल्या पित्यास पिंड देती । नाम कुळ उच्चारूनि चांडाळाचें. ॥ ३०७ ॥ विष्णुशर्मा नामें भला । ब्राह्मण ऋषिगोत्रीं उपजला । चांडाळासंगें पिंड दीधला । त्याच्या पुत्रें कुलगोत्रनामें चांडाळाच्या. ॥ ३०८ ॥ ते पिंड न पावती पितरां । भजन न पावे ईश्वरा । तो सम सदय असोनि ज्या नरा । विषम निर्दय वाटला. ॥ ३०९ ॥ जे दुष्ट दुराचारी । ते भोजन करोत माझ्या घरीं । ऐसें म्हणतां भले सदाचारी । घरा जाती कां तयांच्या. ॥ ३१० ॥ विषम निर्दय ईश्वर । मानूनि करील जो नमस्कार । सम सदय सर्वेश्वर । नमस्कार घेईल तो

किमर्थ. ॥ ३११ ॥ एवं सर्वज्ञ सर्वसम। सर्वभूतीं दयाळु परम। तोचि एक पुरुषोत्तम। या भावें भजावा. ॥ ३१२ ॥ जे ऐसें ईश्वरातें न समजती। त्यांस सांगो नये भजनरीती। अष्टादशीं **'न च मां योऽभ्यसूयति'**। म्हणूनि कृष्ण अर्जुनातें बोलेल. ॥ ३१३ ॥ दोष लावणें निर्दोषास। असूया म्हणावी तयास। म्हणूनि मज दोष लावी त्या पुरुषास। अर्जुना! नको सांगों हे गीता. ॥ ३१४ ॥ एवं जीवाहातीं कर्म। करवी स्वयें सर्वोत्तम। तरी तो निर्दय आणि विषम। सहजचि होय. ॥ ३१५ ॥ तरी ऐसें कां बोलती श्रुति। म्हणूनि कोणी म्हणती। तरी वेदार्थ गहन तात्पर्यगती। पहावी एथें. ॥ ३१६ ॥ ईश्वर कल्पतरूपम। विषमफळ देऊनिही सम। हें या गीतेंतचि पुरुषोत्तम। चतुर्थाध्यायांत बोलिला. ॥ ३१७ ॥

**'ये यथा मां प्रपद्यंते तांस्तथैव भजाम्यहम्।'** (अ० ४ श्लो० ११)

जे जैसें मातें भजती। मी तैसाच भजतों तयांप्रती। या गीतावाक्यानुरूप श्रुती। वाखाणाव्या इत्यादि. ॥ ३१८ ॥ कीं वेद जे अनंत। त्याचा मथितार्थ हा भगवंत। गीताश्लोकरूपें बोले म्हणूनि संत। याच्या आधारें श्रुति वाखाणिती. ॥ ३१९ ॥ आणि उगाच स्वर्गास नेऊं पाहे। उगाच नरका नेऊं म्हणताहे। श्रुति म्हणती हें न साहे। वैषम्य निर्दयत्व ईश्वरीं. ॥ ३२० ॥ तेव्हां जो स्वर्गास जावें म्हणतो। त्यास ईश्वर त्याच साधुकर्मी प्रवर्तवितो। सूर्य जैसा प्रकाशितो। सन्मार्गी जातां नेत्रांसी. ॥ ३२१ ॥ जो नरकास जाईन म्हणतो। म्हणजे नरकप्रद कुमार्गी चालतो। त्यास ईश्वर त्याच मार्गीं प्रवर्तवितो। कीं कुमार्गही सूर्यच दाखवी. ॥ ३२२ ॥ एवं जगत्प्रकाशक सत्ता। तेथें शुद्धमायायोगें ईश्वरता। जैसी काष्टादियोगें नेत्रप्रकाशता। दिसे अग्नीची. ॥३२३॥ अग्नि स्वयें प्रकाशक। परी पाहिजे काष्ठादि उपाधि कांहींएक। तैसा मायाशबलित प्रवर्तक। हृषीकेश बुद्धींद्रियांचा. ॥ ३२४ ॥ प्रकाशी ब्रह्मसत्तेंकरूनी। गति दे मायांश धरूनी। सत्ता तेथें प्रवर्तक म्हणोनी। प्रकाशक श्रुति म्हणती प्रवर्तकातें. ॥ ३२५ ॥ तो मायाशबल सर्वोत्तम। प्रकाशक आणि कल्पवृक्षोपम। जो ज्या मार्गें जातो उत्तमाधम। फळ त्यास तेंचि देऊं इच्छितो. ॥ ३२६ ॥ तदनुरूप कर्मे करवितो। म्हणजे त्या त्या वाटा त्यास प्रकाशितो। या तात्पर्यें वेद बोलतो। कीं जीव संकल्पें गति संकल्पोनि करवितो कर्मे. ॥ ३२७ ॥ ऐसा अर्थ सिद्ध जाला। परी ठाव उरला एका बोला। कीं अधोगती। जावें ऐसा आपला। घात कोण हो! इच्छितो? ॥ ३२८ ॥ कोणीं न इच्छितां

अधोगति । अधोगति द्यावया जगत्पति । असाधुकर्मे करवितो म्हणती श्रुति । हें तात्पर्य एथें न लागे. ॥ ३२९ ॥ धरूनि ऐसी ही शंका । श्रुतिसिद्ध कलंक निष्कलंका । लावूं म्हणोनि मोहपंका- । माजी दाटुनि कां बुडावें. ॥ ३३० ॥ ज्यानें जैसें कल्पावें । कल्पवृक्षापासूनि तैसेंचि पावावें । एथें ईश्वर कल्पवृक्षस्वभावें । ध्यावा आणि कल्पणें तें कर्म. ॥ ३३१ ॥ जो कल्पी जैसें । कल्पवृक्ष फळ दे तैसें । हा दृष्टांत आतां दार्ष्टांतिकीं ऐसें । सिद्ध होतें. ॥३३२॥ कीं जो कर्म करी जैसें । ईश्वर फळ दे त्यास तैसें । कर्म करी तो नरकाऐसें । तेंचि फळ देऊं इच्छितो ईश्वर. ॥ ३३३ ॥ मग त्या हातीं तैसेंचि कर्म । करवितो म्हणजे सगुणब्रह्म । त्याची बुद्धि आणि इंद्रियग्राम । नरकमार्गींच प्रकाशितो. ॥ ३३४ ॥ एवं जो प्रकाशक । त्यास श्रुति म्हणती प्रवर्तक । हा अर्थ आत्यंतिक । सिद्ध पूर्वींच जाहला. ॥ ३३५ ॥ ईश्वर नव्हेचि कांहीं कर्ता । तेव्हां अजागलस्तन[1] ऐसी वार्ता । आणितील[2] सर्वथा अकर्ता । तो म्हणतां. ॥३३६॥ हें म्हणणेंही खरें । कीं निर्धर्मपणें असिजेतें ईश्वरें । परी ऐसें त्यास मानी त्याचें बरें । नव्हे कदापि. ॥३३७॥ कीं जे जैसे भजती । त्यांस फळ तैसेंचि दे विश्वपती[3] । जे तया अजागलस्तन म्हणती । त्याचें सत्कर्म ही अजागलस्तन होतसे. ॥ ३३८ ॥ **'भोक्तारं यज्ञतपसां'** म्हणोनि । या अध्यायांतीं या श्लोकेंकरूनी । सत्कर्म भोक्तृत्व त्या ईश्वरास यावरूनी । फळ त्यास अजागलस्तनरूपें तो देतो. ॥ ३३९ ॥ त्यास आळवावें ज्या नांवें । तो फळ देतो त्याच भावें । अजागलस्तनस्वभावें । फळ त्यांस जें ईश्वरास म्हणती अजागलस्तन. ॥ ३४० ॥ सामर्थ्य तेथें सत्ता । ऐसें असोनि सम सदय अकर्ता । जे ऐसा मानिती विश्वभर्ता । दे परम समर्थ फळ तोही तयांस. ॥ ३४१ ॥ एवं अजागलस्तनलक्षण । स्थापिती तेचि अवलक्षण[4] । **'ये यथा मां प्रपद्यंते'** म्हणवूनि कमलेक्षण । या वचनीं हा अर्थ सुचवितो. ॥ ३४२ ॥ आतां सद्भाव[5] कुभाव । धरोनि कर्म करी जीव । तोही तदंश तेव्हां स्वयमेव । तोचि कर्ता हें सिद्ध. ॥ ३४३ ॥ आणि कर्मे ईश्वर न करवी । त्यांत सदयता समता बरवी । दोन्ही साधितां कोण मिरवी । अपसिद्धांत ऐसा. ॥ ३४४ ॥ आतां श्रीकृष्ण मनीं । इत्यादि भावार्थ धरूनी । हा अर्थ या श्लोकेंकरूनी । सिद्ध करितो ॥ ३४५ ॥

---

१. बोकडाच्या गळ्यांतील स्तनासारखें व्यर्थ. २. प्रसिद्ध करतील. ३. ईश्वर. ४. निरुपयोगी; निंद्य. ५. उत्तमाधम बुद्धि.

**न कर्तृत्वं न कर्माणि लोकस्य सृजति प्रभुः ।**
**न कर्मफलसंयोगं स्वभावस्तु प्रवर्तते ॥ १४ ॥**

आपण कर्ता म्हणूनी । मानी कर्मेंकरूनी । हें कर्तृत्व आणि कर्म दोन्ही । जीव लोकांचीं नसती निर्मित ईश्वरें. ॥ ३४६ ॥ जो मानितो मी कर्ता । त्यास वाटतें कीं मी भोक्ता । आणि कर्म सत्य मानितो याकरितां । सत्य भोग वाटे तयाला. ॥ ३४७ ॥ आत्मज्ञानें सकळ । मिथ्या जालें तरी कर्म-फळ । भोगितां सत्य वाटे त्याचें मूळ । कर्तृत्वकर्म सत्यत्वें मानणें. ॥ ३४८ ॥ ऐसें कर्मकर्तृत्व या दोहींचें फळ । त्याचा संयोग यथाकाळ । होतो जैसी येतां फळाची वेळ । वृक्ष फळतो. ॥ ३४९ ॥ हीं दोन्ही ईश्वर । निर्मित नाहीं कीं कर्मानुसार । फळ होतें कर्ता नर । तोचि भोग पावतो. ॥ ३५० ॥ तेव्हां ईश्वर अजागलस्तन । ऐसें म्हणतील मूर्खजन । म्हणोनि या श्लोकीं मधुसूदन । प्रभु म्हणतो ईश्वरासी. ॥ ३५१ ॥ कीं तो प्रभु म्हणजे समर्थ । तोचि देतो सकळ पुरुषार्थ । कर्मफलसंयोगीं अनर्थ । तयांस जे न भजती तयासी. ॥ ३५२ ॥ फळाची इच्छा करिती । ते दाटूनि पायीं शृंखळा भरिती । कोणी मानूनि अजागलस्तनरीती । स्वयें होती अजागलस्तन. ॥ ३५३ ॥ जे त्यास कर्में समर्पिती । आणि तूं समर्थ जगत्पती । प्रवर्तविसी स्वजनमती । सुखमार्गीं भाविती ऐसें. ॥ ३५४ ॥ या भावें भजती । त्यांस तैसाच तो विश्वपती । सन्मार्गीं प्रवर्तवूनि सद्गति । देत असे. ॥ ३५५ ॥ आतां कैसा नव्हे समर्थ । कैसा नेदी म्हणावा पुरुषार्थ । त्यावांचूनि पुरवी मनोरथ । ऐसा दुसरा असेना. ॥ ३५६ ॥ आपण कर्में करवून आपण । फळ देतां लागतें विषमपण । फळ नेदी भजलियावीण । इतुकियाचकरितां. ॥ ३५७ ॥ तथापि कर्म जड अमंगळ । कर्ता असमर्थ विस्मरणशील । यालागीं भोगवी कर्मफळ । स्वयें तोचि जगदीश्वर. ॥ ३५८ ॥ ऐसें असोनि या श्लोकीं हरी । म्हणतो कीं कर्मफळसंयोगही परी । तो ईश्वर निर्माण न करी । म्हणोनी. ॥ ३५९ ॥ हाही विरुद्ध दिसतो बोल । परी भावार्थ यामाजी खोल । त्याणें अकर्तृत्व साधूनिही होतें फोल । विरुद्धपण हें. ॥ ३६० ॥ कीं पिकाचें शेत । तें सकल फलदायक निश्चित । परंतु पेरिलें बीजचि असे फळत । तें फळ न निर्मी यापरी. ॥ ३६१ ॥ तथापि भूमीवांचूनि फळ । बीज न देऊं शके केवळ । निघोनि भूमींत सकळ । फलरूप होतीं तीं बीजें. ॥ ३६२ ॥ कर्में ईश्वराविण । फळों न शकती आपण । ईश्वरशक्तीकरूनि फळपण ।

तीं पावतीं. ॥ ३६३ ॥ तथापि अंकुराकारें । तें बीजचि होऊनि सारें । कणीस होऊनि नानाप्रकारें । यथाकाळें होतसे भोगार्ह॥३६४॥ तैसा सर्वकर्मफळदाता। कर्मफलसंयोगनिर्माणकर्ता । तथापि फळतसे तत्त्वतां । कर्मचि. ॥ ३६५ ॥ मागुती जैसी भूमि कांहीं । कोणास फळ देत नाहीं । तैसें न पडे वैषम्य-प्रवाहीं । ईश्वरत्व. ॥ ३६६ ॥ तथापि भूमीवांचूनी । फळ नाहीं म्हणोनी । मागुती प्रभुशब्देंकरूनी । सुचविला हा भाव. ॥ ३६७ ॥ एवं कर्मा-नुरूप भोग । म्हणूनि ईश्वरफलसंयोग । न करी आणि कर्तृत्वकर्म-संग । जीवांस नेदी. ॥ ३६८ ॥ तरी जीवकर्मप्रवृत्ति । प्रवर्तते कोण रीती । चतुर्थचरणीं जगत्पती । हेंही बोलतो. ॥ ३६९ ॥

**'स्वभावस्तु प्रवर्तते ।'** (अ० ५ श्लो० १४)

स्वभाव म्हणजे संस्कार । चित्तास झोंबले जे जे विकार । ते ते संस्कारप्रकार । कर्मसंकल्प करविती. ॥ ३७० ॥ तदनुरूप बुद्धीच्या निश्चयें । कर्मीं प्रवर्तती इंद्रियें । एवं संस्कारयोगें स्वयें । कर्मीं लोक प्रव-र्तती. ॥ ३७१ ॥ पाहतां ऐसियापरी । संस्कारेंचि जो तो कर्मं करी । म्हणूनि म्हणतो हरी । कीं **'स्वभावस्तु प्रवर्तते.'** ॥ ३७२ ॥ कीं प्रव-र्ततो कोण म्हणूनी । बरें विचारितां मनीं । या संस्कारावांचूनी । प्रवर्ते कोण. ॥ ३७३ ॥ चित्तसत्त्व निर्मळ । चित्प्रतिबिंबकारक जवळ । तें पीतश्वेत रक्त श्यामळ । हरिद्रादियोगें[1] जळ जैसें. ॥ ३७४ ॥ ज्यास जैसी संगती । त्याची तैसी संस्कारगती । सत्संगें भला होऊनि मागुती । दुष्ट होतो दुःसंगें. ॥ ३७५ ॥ संस्कारानुरूप आचरे । संस्कारानुरूपचि संचरे । यालागीं कर्मीं वावरे । संस्कारचि. ॥ ३७६ ॥ प्रवर्ततो जो संस्कार । त्याचेही दोन्ही प्रकार । एक नैसर्गिक निर्धार । सहज एक. ॥ ३७७ ॥ नैसर्गिकाचें मूळ । सहज स्व-भाव केवळ । सहजाचा होतो प्रबळ । नैसर्गिक[2]. ॥ ३७८ ॥ सत्संगें सन्मार्ग न धरी । जें वाईट तेंचि करी । दुष्ट संस्कार जो यापरी । तोही नैसर्गिक म्हणावा. ॥ ३७९ ॥ दुःसंगें दुर्मार्ग न धरी । जें बरें तेंचि करी । उत्तम सं-स्कार जो यापरी । तोही म्हणावा नैसर्गिक. ॥ ३८० ॥ या संस्काराचें मूळ । सहज स्वभाव केवळ । त्याहूनि हा नैसर्गिक तो प्रबळ । परि होतो सहजा-चिपासूनी. ॥ ३८१ ॥ नदी उगमीं[3] निघते । ते जिकडे नेली तिकडेचि जाते । तेचि थोर होऊनि जेव्हां वाहते । तेथें न मुरडे[4] कदापि. ॥ ३८२ ॥ जन्मांतरीं ये रीती । प्रबळ ज्यास सत्संगती । या जन्मीं ते संस्कारस्थिति ।

---

१. हळदी इत्यादिकांच्या योगानें. २. स्वाभाविक. ३. आरंभीं. ४. परते.

दुष्टसंगें मोडेना. ॥३८३॥ जन्मांतरीं येचि रीती । प्रबळ ज्याला दु:संगती । या जन्मीं ते संस्कारस्थिती । न मोडे सत्संगेंही करूनी. ॥ ३८४ ॥ प्रबळला नाहीं संस्कार । तो मोडे संगानुसार । परंतु पाहतां विचार । कर्मीं संस्कारचि प्रवर्ततो. ॥ ३८५ ॥ तदनुरूप कर्तृत्वकर्म । कर्मानुरूप फलसंगम । दोन्ही न करी समर्थ परम । सम सदय जगदात्मा जगदीश. ॥ ३८६ ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञलोक । परिसोत आधीं. ॥ ३८७ ॥ कर्में न निर्मी ईश्वर । आणि कर्मफलसंयोगाचाही प्रकार । म्हणूनि बोलिला जगदाधार । पूर्वश्लोकीं. ॥ ३८८ ॥ आतां ज्या गोष्टीनिमित्त । कर्में करवणें तया नव्हे [1]संमत । ते गोष्टी या श्लोकीं अच्युत । बोलतसे. ॥ ३८९ ॥ कर्में करवितां जो दोष । देखोनि न करवी निर्दोष । तो दोष सुचवितो परमपुरुष । या श्लोकीं. ॥ ३९० ॥

**नादत्ते कस्यचित्पापं न चैव सुकृतं विभुः ।**
**अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यंति जंतवः ॥ १५ ॥**

अगा ! विभु समर्थ कोणाचेंही । पाप आपण घेत नाहीं । अथवा पुण्य उत्तम म्हणूनि कांहीं । तेंही घेत नाहीं कोणाचें. ॥ ३९१ ॥ म्हणजे एका हातीं एक । अपराध करवूनि पाहे कौतुक । तो अपराध अभिज्ञलोक । जो करवी त्याचा मानिती. ॥ ३९२ ॥ अपराध कर्तयाचा । जो करवी त्यास लागे साचा । तेव्हां जो करवितो तयाचा । अपराध आपण घेतसे. ॥ ३९३ ॥ ऐसें येचि रीती । करवी पाप जरी जनांहातीं । तरी तें पाप घे जगत्पती । तया जनांचें. ॥ ३९४ ॥ ज्या गोष्टींत ऐसा दोष । तें कां करील निर्दोष । म्हणोनि म्हणतो परमपुरुष । कीं विभु पाप घेत नाहीं कोणाचें. ॥ ३९५ ॥ बरवेंचि केलें जें [2]सुकृत । तेंही घेत नाहीं निश्चित । म्हणजे नाहींच करवित । कोणाहातीं सुकृतही. ॥ ३९६ ॥ एथें कोणी ऐसें म्हणती । कीं सुकृतें जनांस उत्तम गती । तें न करवी जरी जगत्पती । तरी निर्दय म्हणों तयाला. ॥ ३९७ ॥ शंका ऐसी [3]पडते । परी विचार पाहतां [4]उडते । कीं सत्कर्मीं वर्तवूं जातां [5]विघडते । दयालुता तयाची. ॥ ३९८ ॥ कीं पापकर्मीं [6]रती । त्यास बळें लावितां सुप्रवृत्ती । पुढें बरें परी तत्काळ पावती । ते दुःख. ॥ ३९९ ॥ माता लेंकरांस माती । खाऊं नेदी तों तीं रडती । हितावह दूध पाजितांही पावती । कष्ट ते समयीं. ॥ ४०० ॥ पापींच रत

१. मान्य. २. पुण्य. ३. येते. ४. निवृत्त होते. ५. बिघडते. ६. आवडी.

ते ऐसे । कष्ट पावतील इतकेंही न सोसे । त्याला म्हणतां तुम्ही कैसें । निर्दय म्हणोनि. ॥ ४०१ ॥ आतां याहीवरी हरी । कोणीं म्हणती यापरी । कीं त्याचें पापफल न निवारी । निर्दय तेव्हां कां नव्हे. ॥ ४०२ ॥ पाहतां या दोन्ही परी । निर्दयत्व लागतें ईश्वरीं । परंतु पापप्रवृत्ति स्वयें ईश्वर निवारी । पापफळ पावे तो त्याच्या स्वकर्माचें. ॥ ४०३ ॥ यांत पापप्रवृत्तीतें निवारणें । ईश्वरास लागेल दुःख देणें । एथें तो जगदीश निर्दयपणें । स्वकर्तृत्वें दिसतसे. ॥ ४०४ ॥ जीवांचें कर्म जीव । भोगिती जें केलें स्वयमेव । त्यांत ईश्वरकृत लेशलव । नसतां निर्दयत्व लागेना. ॥ ४०५ ॥ या निश्चयें निश्चित । ईश्वर न करवी सुकृत । कीं कष्ट पावती पापरत । सुकृत करवणें याही कर्तृत्वें ईश्वराच्या. ॥ ४०६ ॥ आतां याहीवरी । कोणी म्हणतील या परी । कीं पापीं आवडीच कोणी न धरी । समर्थ न करी कां ऐसें. ॥ ४०७ ॥ या गोष्टीस हें उत्तर । कीं तुम्ही ऐसे पुसणार चतुर । ऐसा समर्थ ईश्वर । हें तुम्हां कळलें तरी पुसतां. ॥ ४०८ ॥ तरी आम्ही पुसतों त्याचें उत्तर । द्यावें तुम्हीं कीं ऐसा दयाळु ईश्वर । सृष्टि कां हे चराचर । निर्माण करितो. ॥४०९॥ निर्माण न करूनि कांहीं । उगाच कां तो असत नाहीं । न करूनि सद्गति आणि दुर्गति जीवही । कां उगला[1] असेना. ॥ ४१० ॥ सृष्टि केली प्रत्यक्ष दिसे । भोग जीवातें दिसतसे । दयाळू सर्व सम तो ऐसियांत गंवसे[2] । हें आतां आम्ही बोलूं तें ऐका. ॥ ४११ ॥ याचा ऐसा परिहार । कीं अनादि जीव अनादि ईश्वर । विश्वसृष्टिस्थितिसंहार । प्रवाह हाही अनादि. ॥ ४१२ ॥ ब्रह्मबीज माया अंकुर । त्या मायेचा हा सर्व पसर । बीज नासे तरी हेही प्रकार । न होतां राहती. ॥ ४१३ ॥ हा अनादिप्रवाह जैसा । पापपुण्यप्रवृत्तिमार्गही तैसा । विचार पाहतां ऐसा । आवडी ही अनादि जीवांच्या. ॥ ४१४ ॥ आवडी म्हणजे सत्त्ववृत्ति । ज्यांस आत्मत्वाची प्रीति । त्यांस आत्मरज्जू सर्पाकृति । वाटे अविद्येंकरूनी. ॥ ४१५ ॥ तो आत्मा सुखस्वरूप । सत्त्वसुखप्रीतिरूप । जाहला आत्मलाभाचा लोप । सर्पभ्रमें लोपे हार[3] जैसा. ॥ ४१६ ॥ सत्त्वसुखाकारणें झुरे । तो आत्महारीं अनात्मसर्प स्फुरे । त्यांत इंद्रियांत वासना वावरे । रजोगुणें विषयरूपा तमाची. ॥ ४१७ ॥ त्यास त्याची अविद्या जाय । विद्येनें अनात्मा मिथ्या होय । तरी आवडीचा निश्चय । आत्मस्वरूपीं होय सत्त्वाचा. ॥ ४१८ ॥ ऐसा आवडीस्वरूप । सत्त्वगुण प्री-

१. उगीच. २. सांपडे. ३. माळ.

तिरूप । पक्कज्ञान होतां त्याचा संकल्प । ब्रह्मीं ब्रह्मविद्येंकरूनी. ॥४१९॥ ऐशा सत्त्वस्वरूपा ज्या आवडी । त्या जरी ईश्वर सकळ जीवांच्या मोडी । तरी सृष्ट्यादि घडामोडी । मग न पडती कदापि. ॥ ४२० ॥ आवडीस्वरूप शुद्ध सत्त्वगुण । त्यापासूनि उपजे माया त्रिगुण । या सत्त्वें ईश्वर निपुण । आपण आवडी धरी आपली. ॥ ४२१ ॥ तेथूनि त्या मायेपासूनी । नाना जीवोपाधि होउनी । त्यांत प्रतिबिंब दृष्टांतेंकरूनी । जीवत्व पावे ईश्वर. ॥ ४२२ ॥ ते उपाधि त्रिगुणवृत्ती । संस्काररूपें प्रवर्तती । त्या तरी मोडती कीं ते गुणप्रकृती । निःशेष मोडे. ॥ ४२३ ॥ हा प्रपंचवृक्षाचा पसर । मोडे तरी जरी न उपजे मायाअंकुर । परम समर्थ जरी ईश्वर । न करूं शके नाश तिचा. ॥ ४२४ ॥ कीं ज्या सामर्थ्यें माया मोडी । तें सामर्थ्य मायेचीच उडी । तीतें प्रकाशी सत्ता उघडी । तें निर्धर्म. ॥ ४२५ ॥ तो स्वयें ब्रह्मचि साचें । परी माया सर्व सामर्थ्य त्याचें । समपण सदयपण हेंही केंचें । निर्गुणत्वीं तया ईश्वरासी. ॥ ४२६ ॥ मायाचि समत्व सदयत्वादिगुण । मायाचि त्याचें समर्थपण । स्वसामर्थ्यें स्वसामर्थ्य मोडणें। घडे कैसें. ॥ ४२७ ॥ ज्या सामर्थ्यें सामर्थ्य मोडे । तेंही सामर्थ्यपणेंचि निवडे । एवं मायेचा नाश न घडे । करीन म्हणतांही ईश्वरासी.॥ ४२८ ॥ आतां विद्येनें अविद्या नासे । परी ईश्वरोपाधि मूळ माया असे । ज्याच्या कृपासामर्थ्यें भंगली दिसे । तें तों न नासे सामर्थ्य. ॥ ४२९ ॥ एवं ऐशा एका विचारें । माया न मोडे या प्रकारें। याहूनिही पाहतां बरें । अभंग प्रवाह प्रपंचाचा. ॥ ४३० ॥ तरी प्रपंचवृक्षाचा पसर । मोडे जरी न उरे माया अंकुर । तरी अंकुर न उपजे कीं परात्पर । ब्रह्मबीज त्या मायाअंकुराचें जरी नासे. ॥ ४३१ ॥ ब्रह्म ईश्वराचें स्वस्वरूप । माया सामर्थ्याचें रूप । हीं दोन्ही नाशूं शके ऐसा प्रताप । नसे ईश्वरीं ॥ ४३२ ॥ स्वस्वरूप स्वसामर्थ्य हीं दोन्हीं । त्याचें त्याच्यानें न नाशवे म्हणोनी । या सामर्थ्याच्या न्यूनत्वें करूनि । श्रेष्ठत्व त्याच्या स्वरूपास आणि सामर्थ्यास. ॥ ४३३ ॥ कीं तो नित्य अभंग स्वरूप । आणि सामर्थ्य त्याचें नित्य अक्षय्यरूप । एवं याच लक्षणें प्रताप । अत्यंत त्याचा. ॥ ४३४ ॥ जैसा आपणास आपण । बंध करूं न शके तो निपुण । तैसा याही सामर्थ्यें अपूर्ण । तरीच परिपूर्णत्व त्याचें अत्यंत. ॥ ४३५ ॥ सूर्यमंडलीं तम नसे । म्हणूनि जरी तो उणा दिसे । तरी ईश्वरीं अपूर्णत्व वसे । न मोडूं शकतां जगत्प्रवाह. ॥ ४३६ ॥ जगत्प्रवाह जरी मोडे । तरी आवडीचा नाश घडे । आवडी न मोडितां न उपडे । अंकुर विषयप्रीतीचा. ॥ ४३७ ॥ जों न मोडे

विषयप्रीति। तों न चुके पापप्रवृत्ति । त्यास सन्मार्गीं योजी जगत्पति । तरी ते होती दुःखी जीववृंद. ॥ ४३८ ॥ दुःख देणें यापरी। हेंही न साहे ईश्वरीं। म्हणूनि सुकृतही परी। न करवी ईश्वर. ॥ ४३९ ॥ एवं जरी करविता सुकृत। सुकृत तरी कर्त्याचें घेता निश्चित । म्हणूनि या श्लोकीं म्हणतो भगवंत। कीं ईश्वर सुकृतही नेघे कोणाचें. ॥ ४४० ॥ पूर्वश्लोकीं तो प्रभु म्हणोनि। वर्णिला ज्या भावेंकरूनी । या श्लोकीं विभु म्हणूनि या वचनीं। तोचि भावार्थ सूचवी. ॥ ४४१ ॥ कीं सुकृत न करवी ईश्वर । तथापि तो विभु म्हणजे समर्थ थोर । जे भजती त्या ईशास सादर । त्या हातीं सुकृत करवीच तो. ॥ ४४२ ॥ कीं जे जैसें यास मागती। कल्पवृक्ष तैसें फळ दे त्यांप्रती। सन्मार्गीं लावीं गा जगत्पती!। म्हणूनि म्हणतां समर्थ सुकृतचि करवितो. ॥ ४४३ ॥ एवंच त्यास शरण जावें । सन्मार्ग दे म्हणूनि प्रार्थावें । जेव्हां ऐसें भजावें। तो सन्मार्ग जो असेल देतोचि त्यास. ॥ ४४४॥ पूर्वार्धीं या श्लोकीं हरी। सिद्धांत सिद्ध ऐसा करी । शंका उपजे कांहीं याहीवरी। ते परिहरील आतां उत्तरार्धें. ॥ ४४५ ॥ पूर्वश्लोकीं **पुरुषोत्तम** । म्हणे लोकांचें कर्तृत्व आणि कर्म। निर्मित नसे सर्वोत्तम । जगदीश्वर. ॥ ४४६ ॥ तरी कर्तृत्व आणि कर्म कैसें। उपजतें म्हणती कोणी ऐसें। त्यास उत्तर दीधलें जगन्निवासें। कीं **'स्वभावस्तु प्रवर्तते.'** ॥ ४४७ ॥ कीं प्रवर्तितो स्वसंस्कार। तो संस्कार संगानुसार । त्याचे दोनी प्रकार । पूर्वश्लोकीं टीकेंत वर्णिले. ॥ ४४८ ॥ येथें ऐसी शंका। कीं मनचि लिप्त या [१]संस्कारपंका। परि आत्मया निष्कलंका। लेप नसे. ॥४४९॥ संस्कार पाहतां चित्तीं। इंद्रियांस विषय कर्म प्रवृत्ती। ऐसी वस्तुता आत्मस्थिती। तरी बंध कर्मीं कां घडे. ॥ ४५० ॥ एवं घडोंच न शके बंध। तरी कां होतो फळसंबंध। कीं ज्या फलसंबंधें भयगंध। कर्तृत्वाचा लागों नेदी ईश्वर आपणासी. ॥ ४५१ ॥ जीवातेंचि कर्मकर्तृत्व न घडे। तें केंवि लागे ईश्वराकडे । ऐसें असोनिही कां बोलणें पडे। कर्तृत्वपरिहारीं ईश्वराच्या. ॥ ४५२ ॥ अकर्ता आत्मा तत्त्वतां। संस्कार चित्तीं इंद्रियादिकां कर्तृता । तेव्हां कर्मबंधाची वार्ता । समूळ खोटी. ॥ ४५३ ॥ ऐसी शंका यापरी । तरी जीवात्माही अकर्ता ही गोष्टी खरी। परी बंध मोक्ष दोन्ही शिरीं। बुद्धीचिया. ॥ ४५४ ॥ त्या बुद्धीस आत्मा न कळे। अहंप्रत्ययें वासना न जळे । ते अकर्तृतेकडे न वळे। अज्ञानेंकरूनि. ॥ ४५५ ॥ तें बुद्धीचें अज्ञान। जाऊनि होय आत्मज्ञान।

१. संस्काररूप चिखल, मळ.

तेव्हां या अनुभवें चुके बंधन। कर्माचें. ॥ ४५६ ॥ अकर्तेपणाचा विचार। आइकिला वारंवार। मनीं धरूनि तो आधार। अर्जुन ऐसा शंकला. ॥४५७॥ शंकला मनीं सव्यसाची। म्हणोनि शंकानिवृत्ती त्याची। करील उत्तरार्धें कीं हे गोष्टी साची। परी अज्ञानें केला अनर्थ. ॥ ४५८ ॥

**'अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यंति जंतवः।'** (अ० ५ श्लो० १५)

आत्मा अकर्ता आणि मिथ्या कर्म। अगा! हें ज्ञानचि परम। कीं आहे तो रज्जुच नाहीं भुजंगम। हें जाणणें जे रीती ॥ ४५९ ॥ परी अज्ञानें करूनी। हें ज्ञान वेष्टिलें असे म्हणोनी। कर्मकर्तृत्वमिथ्यात्व न कळोनी। मोहती जीव ॥ ४६० ॥ मी कर्ता म्हणोनि म्हणती। कर्म सत्य म्हणोनि जाणती। अकर्त्रात्मत्व आणि कर्ममिथ्यात्व नेणती। जंतु मोहती या प्रकारें. ॥ ४६१ ॥ मी कर्ता हें अज्ञान। येणें झांकिलें स्वअकर्तृत्वज्ञान। कीं सर्पभ्रमें झांकले नयन। स्पर्शले असोनि रज्जूसी. ॥ ४६२ ॥ रज्जूस दृष्टि स्पर्शली असे। आणि तीसचि सर्प भासे। रज्जू दिसत असोनि न दिसे। अज्ञानें वेष्टलें ज्ञान ऐसें ॥ ४६३ ॥ आत्मयास सत्ववृत्ती। स्पर्शली असोनि तीस भ्रांती। त्या भ्रांतीनें प्रतीती। रजतमरूपा इंद्रियां विषयांची ॥ ४६४ ॥ स्पर्शोनि आत्मयाला। म्हणतो मी नेणें मला। हें अज्ञानवेष्टन ज्ञानाला। सर्पभ्रमवेष्टन जैसें दृष्टीसी ॥ ४६५ ॥ वेगळें अवस्थात्रय। वेगळा आपण ऐसा निश्चय। हे तुर्या[1] जींत आत्मा अद्वय। स्फुरतसे ॥ ४६६ ॥ ते तुर्येस वेऊनी। तिन्ही[2] अवस्थांवेगळा आपण म्हणोनी। जो तो उघड बोलोनी। हे तुर्या आपण आत्मा हें कळेना ॥ ४६७ ॥ मी स्वप्न देखत निजेलों। आतां मागुती जागृति पावलों। मग कांहीं न कळेसा जालों। यावरूनि अवस्थात्रयातीत हे तुर्या ॥ ४६८ ॥ कीं तिहीं अवस्थांवेगळा। आत्मा आपण निराळा। ऐसें बोले हे तुर्या ज्ञानकळा। न कळे कीं अज्ञानें वेष्टिलें असे ज्ञान ॥ ४६९ ॥ ज्ञानदृष्टि सर्वांस आहे। परी अज्ञानसर्पें ज्ञानरज्जूतें कोणी न पाहे। अज्ञानें आवृत होऊनि राहे। ज्ञान ऐसें सर्वांचें ॥ ४७० ॥ अर्थ ऐसाचि यथार्थ। परी कोणी प्रकारांतरें बोलती अर्थ। तो या अर्थापुढें व्यर्थ। होऊनि जातो ॥ ४७१ ॥ ईश्वर कर्मं करवितो म्हणोनी। हें अज्ञान याच अज्ञानेंकरूनी। सम सदय हें ज्ञान झांकलें त्रिभुवनीं। येथें वाखाणिती ऐसें ॥ ४७२ ॥ आतां असोनि ज्ञान। वरी आवरण करी अज्ञान। ऐसें बोलतें हें गीतावचन। अर्थ न घडे या प्रकारें

१. चवथी अवस्था. २. पूर्वीच्या जागृति, स्वप्न, व सुषुप्ति या तीन.

॥ ४७३ ॥ ईश्वर कांहीं करवीत नसे । हें ज्याला कळत असे । त्यास ईश्वर करवितो ऐसें कां भासे । न करवी ऐसें श्रुत असोनी ॥ ४७४ ॥ ईश्वर न करवी ऐसें ज्याला । ठाउकें असेल त्याला । ईश्वर करवितो हें कां वाटेल बोला । अज्ञानें ज्ञान वेष्टिलें तें कैसें ॥ ४७५ ॥ ठाउकेंचि नाहीं ज्याला । ईश्वर न करवी हें ज्ञान कैचें तयाला । आतां कोणतें ज्ञान झांकलें बोला । नसतां हें ज्ञान ॥ ४७६ ॥ एवं आत्मरज्जु दिसे । ते दृष्टि जड सर्पभ्रमें वेष्टिली असे । तरी अज्ञानें वेष्टिलें ज्ञान गवसे । अर्थ अन्यथा न घडे ये स्थळीं ॥ ४७७ ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञलोक । परिसोत आधीं ॥ ४७८ ॥ ईश्वर कांहीं । कर्म करवीतचि नाहीं । ऐसें बोलतां उपजली शंका तेही । पूर्वश्लोकींच निरसली ॥ ४७९ ॥ कीं समर्थ ईश्वर परी । जीवाहातीं कर्मे करवी जरी । विषमत्व निर्दयत्व तरी । त्यास लागे ॥ ४८० ॥ एका हातीं बरें कर्म । करवूनि देतो फळ उत्तम । वाईट करवूनि फळ अधम । देतो तेव्हां विषम तो ॥ ४८१ ॥ आणि आपण करवूनि पाप । त्यास भोगवी नरकसंताप । या गोष्टीनें निर्दयस्वरूप । होणार ॥४८२॥ यालागीं कोणाचेंही दुष्कृत । तो नेघे अथवा नेघे सुकृत । कीं कर्त्याचा अपराध निश्चित । लागे त्यास जो करवितो त्याहातीं ॥ ४८३ ॥ या सर्वांस अनर्थमूळ । हेंचि कीं भोगावें लागतें कर्मफल । तें कर्मफल उपजवी केवल । कर्तृत्व कर्तयाचें ॥ ४८४ ॥ तरी जीवही शुद्ध चित्स्वरूप । त्यास नसे कधीं कर्मलेप । ऐसें असोनी फल पुण्यपाप । कां होतें ॥ ४८५ ॥ कर्तृत्व नसे जयास । भोक्तृत्व कैंचें तयास । सुखदुःखभोग जरी दिसतो यास । निमित्तांतर योजावें यावरी ॥ ४८६ ॥ एवं कर्मबंध अघटित । तें करवितां विषम आणि दयारहित । ईश्वर नव्हे हें निश्चित । सिद्ध जालें पूर्वपक्षेंकरूनी ॥ ४८७ ॥ तेव्हां ईश्वर न करवी कांहीं । या परिहाराचें अगत्य नाहीं । एवं बोलणें नलगे तेंही । कां बोलिला श्रीकृष्ण ॥ ४८८ ॥ हे अर्जुनमनीं शंका । ते कळली श्रीवत्सांका । म्हणूनि या शंकेच्या पंका । मधूनि काढिलें मन त्याचें ॥ ४८९ ॥ कीं आत्मा अकर्ता । परि बुद्धीस वाटला कर्ता । बंध मोक्ष दोन्ही वार्ता । माथां बुद्धीच्या ॥ ४९० ॥ तीस अकर्ता आत्मा न दिसे । त्या दोरीं कर्तृत्व सर्प भासे । कीं अज्ञानें ज्ञान वेष्टिलें असे । त्यानें मोहती हे जंतु ॥ ४९१ ॥ ऐसें अज्ञानें वेष्टिलें ज्ञान । त्या ज्ञानेंचि नासे तें अज्ञान । कीं काष्ठांतूनि करितां मंथन । अग्नि निघोनि जाळी त्याच काष्ठातें ॥ ४९२ ॥

तरी तें ज्ञान कैसें । म्हणूनि पुसे जों अर्जुन ऐसें । तोचि कृपासागर कृपारसें। स्वयें बोलतो या श्लोकें ॥ ४९३ ॥

**ज्ञानेन तु तदज्ञानं येषां नाशितमात्मनः ।**
**तेषामादित्यवज्ज्ञानं प्रकाशयति तत्परम् ॥ १६ ॥**

रज्जु दिसोनि न दिसे । कीं मिथ्या सर्प त्यांत भासे । रज्जूचें न कळणें हें निमित्त असे । त्या सर्पाचें ॥ ४९४ ॥ तो रज्जु कळणें हें ज्ञान । त्या ज्ञानें रज्जूविषयीं जें अज्ञान । तें नासे या भावें कमलनयन । बोलतो ऐसें ॥ ४९५ ॥ कीं आत्मयाचें होतां ज्ञान । त्या ज्ञानें आत्मविषयीं जें अज्ञान । तें ज्याचें नासलें त्याचें निजधन । प्रकाशे आदित्यासारिखें ॥ ४९६ ॥ कीं रज्जूचें जें न कळणें । सर्प उपजविला त्याणें । त्या सापें त्या रज्जूचें पाहणें । आच्छादिलें ॥ ४९७ ॥ त्या आच्छादिल्या पाहण्यास जरी रज्जु दिसे । तरीच त्यावरी तो सर्प भासे । जों रज्जूवरी दृष्टि न बसे । जों न उपजे तो सर्प ॥ ४९८ ॥ एवं आयती रज्जूस दृष्टी । स्पर्शोनि सर्पभ्रमें होय कष्टी । तो रज्जूसा कळतां ते सर्पसृष्टी । रज्जूच होय ॥ ४९९ ॥ ऐसी चिच्छक्ति बुद्धि आयती । चित्स्वरूपीं स्पर्शोनि पावली चित्स्फूर्ती । तीतें अधिष्ठानस्थिति । कळतां प्रपंचही होय तद्रूप ॥ ५०० ॥ एवं आदीं आत्मा कळे । तेव्हां जड जगभ्रम पळे । आत्मरज्जु कळतां गळे । मिथ्या सर्पत्व ॥ ५०१ ॥ यालागीं प्रथम । आत्मा न कळे हा फिटे भ्रम । तेव्हां होय अधिगम । प्रपंचब्रह्म म्हणोनी ॥ ५०२ ॥ यालागीं आच्छादिलें जें ज्ञान । त्या ज्ञानें नासलें त्याचें अज्ञान । तयास स्वप्रकाश कैवल्यघन । ज्ञानस्वरूप प्रगट होय ॥ ५०३ ॥ तें आपणा प्रकाशी आपण । आणि त्याहूनि विलक्षण जें जडपण । तें वेगळेंसें दावी लक्षण । हें स्वप्रकाश प्रकाशी त्या परासही ॥ ५०४ ॥ स्वप्रकाश सूर्यकिरण । विलक्षण मृगजलस्फुरण । त्या परासही प्रकाशितो आपण । स्वप्रकाश सूर्य ॥ ५०५ ॥ यालागीं तें आदित्यासारखें । आणि जडपण तें पैरावें पारखें । परी त्या पराव्यातेंही कोणें आणिखें । आदित्याविण प्रकाशावें ॥ ५०६ ॥ एथें पूर्वार्धीं कैमलनयन । जें अज्ञाननाशक बोलिला ज्ञान । तें वृत्तिरूपज्ञान अविद्याशमन[3] । स्वरूपज्ञान उत्तरार्धें ॥ ५०७ ॥ तें म्हणे आदित्यासारखें । त्यांत मृगजळ परावें पारखें । त्या परास तें प्रकाशी ऐसें स्वमुखें । श्रीकृष्ण म्हणे ॥ ५०८ ॥ वृत्तिरूपज्ञानें तें अज्ञान । ज्याचें नासलें त्याचें

१ दुसरें; अन्य. २ कृष्ण. ३ अज्ञाननाशक.

ज्ञान । आदित्यासारखें तें म्हणे जगज्जीवन । कीं परातें प्रकाशी ॥ ९०९ ॥ एवं तें स्वप्रकाशस्वरूप । त्यांत मायामय जडरूप । जैसा किरणांमाजी आरोप । भासे जळाचा ॥ ९१० ॥ तें परप्रकाश्य मृगजळ । न प्रकाशे स्वयें केवळ । मिथ्यात्वसाधनीं प्रबळ । हेचि युक्ती ॥ ९११ ॥ वारुळामधें[1] जो साप । तो प्रकाशे आपोआप । रज्जूवरील सर्प । रज्जु तयातें प्रकाशी ॥ ९१२ ॥ सोनें प्रकाशे आपण । त्या सुवर्णें प्रकाशे अलंकारपण । परप्रकाश्य मिथ्या याची खूण । इतकीच ॥ ९१३ ॥ जळ प्रकाशे आपण । त्या जळें प्रकाशे तरंग बुद्बुदपण[2] । परप्रकाश्य मिथ्याचि खूण । इतकीच ॥ ९१४ ॥ तंतु प्रकाशे आपण । त्या तंतूनें प्रकाशे पटपण । परप्रकाश्य मिथ्या याची खूण । इतकीच ॥ ९१५ ॥ माती प्रकाशे आपण । त्या मातीनें प्रकाशे घटपण । परप्रकाश्य मिथ्या याची खूण । इतकीच ॥ ९१६ ॥ ऐशा दृष्टांताच्या कोटी । पाहतां सिद्ध होतें हेंचि पोटीं । कीं स्वप्रकाश वस्तु साची आणि ते खोटी । जे प्रकाशे त्या स्वप्रकाशें ॥ ९१७ ॥ यालागीं एथें श्रीपति । ऐसें बोलतो अर्जुनाप्रती । कीं तें ज्ञान आदित्यासारखें ज्याणें प्रकाशती । परें जडें चराचरें ॥ ९१८ ॥ कीं तें स्वरूपज्ञान । जड प्रपंचाचें अधिष्ठान । सूर्यकिरणीं जैसें मिथ्या जळपण । प्रपंच तैसा स्वरूपीं तया ॥ ९१९ ॥ आदित्यासारखें तें त्याचें ज्ञान । ज्याचें वृत्तिरूप ज्ञानें नाशिलें अज्ञान । तें परातें प्रकाशी म्हणे जगज्जीवन । या गूढभावेंकरूनी ॥ ९२० ॥ न काढितां हा गूढ भावार्थ । आदित्यासारखें म्हणावें व्यर्थ । व्यर्थ बोलणें बोले समर्थ । हें घडेना ॥ ९२१ ॥ आदित्यासारखें ज्योतिरूप । म्हणतां इंद्रियगम्य होतें स्वरूप । ऐसें बोलतां जोडे महत्पाप । विरुद्ध अनुभवासी आणि वेदासी ॥ ९२२ ॥ लक्षवादियाचें लक्ष । आणि सूर्यादि तेज जें प्रत्यक्ष । दोन्ही समान तें पाहतां मोक्ष । म्हणती तेचि अतिमूर्ख ॥ ९२३ ॥ वेद स्थळोस्थळीं ज्योती । तेज प्रकाश इत्यादि त्याला म्हणती । न कळोनि त्या शब्दाची तात्पर्यस्थिती । तेजोरूपचि म्हणती परब्रह्म ॥ ९२४ ॥ तेजें अंधकारातें निरसती । आणि नेत्रांस रूपें दाविती । तैसी जगत्प्रकाशक स्वरूपस्थिती । परब्रह्मीं ॥ ९२५ ॥ या तात्पर्यें श्रुती । आत्मा ज्योतिरूप म्हणती । जैसें जीवेश्वरांस वर्णिती । सुपर्ण नामें ॥ ९२६ ॥ वर्णनें असे जीवेश्वरांसी । तात्पर्यें वर्णिती सुपर्णासी । सुपर्ण म्हणती पक्षियांसी । वेदवाणींत ॥ ९२७ ॥ तरी काय जीव आणि ईश्वर । दोघे म्हणावे खगाकार[3] । तैसें अतींद्रिय निराकार । तें काय तेजासारिखें ॥ ९२८ ॥ वेदवचनें अगण[4]-

---

१ विळामध्यें. २ बुडबुडेपण; फेनत्व. ३ पक्षिस्वरूप. ४ पुष्कळ.

णित । कीं तें निर्विकल्प अनंत । आणि हेतु दृष्टांतवर्जित । श्रुति ऐसें बोलती ॥ ९२९ ॥

श्रुति—**निर्विकल्पमनंतं च हेतुदृष्टांतवर्जितम् ।**

श्रुत्यर्थ—निर्विकल्प शब्दें वेद । म्हणती कीं ब्रह्मीं नसे विकल्पभेद । दृश्य भेद जो उपजवी खेद । हा अविद्याकृत मिथ्या सर्वही. ॥ ९३० ॥ आणि तें ब्रह्म अनंत । कीं देशकालादिकीं ज्यास नसे अंत । ऐसियास हेतु दृष्टांत । हेही दोन्ही न असती. ॥९३१॥ सृष्टि स्थिति संहार । या अंकुरास हेतु तें बीज निर्विकार । त्याच्या हेतूचाही करितां विचार । न सांपडे कदापी. ॥ ९३२ ॥ हेतु म्हणिजे निमित्त । तें निमित्तरहित निर्निमित्त । ब्रह्म कां आहे ऐसें अत्यंत । विचारितां निमित्त नाढळे. ॥ ९३३ ॥ आतां या वेदवचनांत । शेवटील पद हें कीं हेतु दृष्टांतवर्जित । त्यांत हेतुशब्दाचा अर्थ निमित्त । आतां दृष्टांतवर्जित अर्थ याचा. ॥ ९३४ ॥ हे श्रुतीही याचकारणें । एथें लागली प्रगट करणें । कीं दृष्टांतवर्जित जें आपण । तें तेजासारिखें केंवि होय. ॥ ९३५ ॥ प्रपंच कांहीं दृश्य । बुद्ध्यादि प्रपंच अदृश्य । वायु न दिसे तरी स्पर्श । त्वागेंद्रियासी. ॥ ९३६ ॥ प्रपंच पाहतां हा सर्वही । न असे पदार्थ ऐसा कांहीं । कीं ब्रह्म तैसें म्हणावें यालागीं नाहीं । दृष्टांत तयासी ॥ ९३७ ॥ ऐसें दृष्टांतवर्जित । वेद म्हणती निश्चित । तें ज्योतीसारिखें म्हणूनि अत्यंत । श्रद्धेनें तेज नेत्रीं लक्षिती. ॥ ९३८ ॥ आतां दृष्टांत वेदीं । तें सत्यत्व नित्यत्व अभेदीं । परि न म्हणती कोणी कीं तें अनादि । अमुकियासारिखें असे. ॥ ९३९ ॥ ब्रह्म जैसी माती । प्रपंच जैशा घटादि जाती । म्हणूनिही वेद म्हणती । तरी काय मातीसारिखें तें ब्रह्म. ॥ ९४० ॥ माती प्रकाशे आपण । माती करितां घटपण । हे सत्यत्व मिथ्यात्व खूण । मृत्तिका आणि घटदृष्टांतें वर्णिली ॥९४१॥ परंतु अमुकें एक रूप । त्यासारिखें तें स्वरूप । हें न म्हणवे तेव्हां सूर्यचंद्रदीप । या तेजासारिखें तें केंवि होय. ॥ ९४२ ॥ इतुकियासारिखें नसे । ऐसें तें ब्रह्मतेज असे । ऐसें म्हणणेंही दिसे । त्याच सारिखें. ॥ ९४३ ॥ चंद्रासारिखा दीप नसे । चंद्रसूर्यासारिखा न दिसे । सूर्यतेजही न गवसे । चंद्रदीपांसारिखें. ॥ ९४४ ॥ तथापि दीपही ज्योती । चंद्रसूर्य ताराही ज्योतिर्मूर्ति । ऐसी अद्भुत कांहीं एक स्थिती । ब्रह्म ज्योतीची जरी म्हणावी. ॥ ९४५ ॥ ज्योति म्हणतां रूप होय । रूप म्हणणें विषय । त्यास पाहेच इंद्रिय । इंद्रियगम्य तितकें नाशवंत. ॥ ९४६ ॥ जरी तें ज्यो-

तिस्वरूप । प्रपंचही दिसावा ज्योतिरूप । कीं रज्जूचा वर्ण तैसा सर्प । भासेल त्या रज्जूवरी. ॥ ५४७ ॥ दोर असेल काळा । त्यावरी सर्प काळाच दिसेल डोळां । दोर असेल उजळा । तरी सर्पही उजळाचि भासेल. ॥५४८॥ ज्योतीवरी अंधकारें । भासावें कवणिया प्रकारें । पाहतां नाना विचारें । ज्योतीसारिखें ब्रह्म अघटित. ॥ ५४९ ॥ इत्यादि स्थळीं उत्तरें । कोणी कोरूनि काढिती आदरें । तींही निषेधावीं विस्तारें । परंतु ग्रंथ वाढेल बहु फार ॥ ५५० ॥ असो आतां याच अध्यायाचे अंतीं । श्लोक दोन प्रमाण त्याला वाटती । त्या प्रसंगीं त्यांची मूढमति रीती । खंडणें असे. ॥ ५५१ ॥ प्रस्तुत या प्रकरणीं । आदित्यासारिखें तें ज्ञान म्हणे चक्रपाणी । तरी तेजासारिखें ब्रह्म म्हणती कोणी । तें न घडे. ॥५५२॥ तें आदित्यासारिखें । आणि जें परावें पारिखें । त्यासि तें प्रकाशी ऐसें स्वमुखें । श्रीकृष्ण म्हणे गूढभावें. ॥५५३॥ कोणी म्हणती सूर्यासारिखें तें । जें प्रकाशितें परातें । तरी सूर्यासारखें प्रकाशक नुसतें । कां न म्हणावें ॥ ५५४ ॥ तें परजड जैसें मृगजळ । सूर्य त्याचें अधिष्ठान निखळ । यावरूनि जग मिथ्या समूळ । ऐसें कां एथें वाखाणावें. ॥ ५५५ ॥ ऐसेंही कोणी म्हणती । तरी न वाखाणितां ये रीती । सूर्यदृष्टांतें प्रकाशकस्थिती । न साधे स्वरूपातें. ॥ ५५६ ॥ तरी सूर्य प्रकाशक हेंही । विचारितां तत्त्वतां घडत नाहीं । नेत्र आणि रूप या दोंविना कांहीं । प्रकाशित नसे तो सूर्य. ॥ ५५७ ॥ प्रपंच अवघा पंचविषय । त्यास घे पंचेंद्रियसमुदाय । अंधकारींही प्रकाश होय । शब्दस्पर्शरूपरसगंधांचा. ॥ ५५८ ॥ अंधकारीं घेतां रस । सूर्य नलगे त्यास । तैसेचि गंधाघ्राणास । सूर्य नलगे अंधारीं. ॥ ५५९ ॥ शब्द स्पर्श हेही विषय । कर्ण आणि त्वगिंद्रिय । अंधकारीं घेतां करावा काय । सूर्य तेथें. ॥ ५६० ॥ ऐसेंच नेत्ररूप या दोंहीप्रती । सूर्य प्रकाशितो हेही ख्याती । तत्त्वता नसे लोकरीती । शास्त्रही वर्णी ये स्थळीं. ॥ ५६१ ॥ कीं सूर्यावांचूनि जरी । नेत्रांस कांहीं न दिसे तरी । अंधकार निबिड अंधारीं । न दिसतां कदापि नेत्रांसीं. ॥ ५६२ ॥ अंधारीं अंधार दिसे । ज्या अंधारीं सर्व झांकलें असे । वस्त्रें आच्छादिलें तें दृष्टीस न गवसे । परी दिसे वस्त्र ज्यानें आच्छादिले पदार्थ.॥५६३॥ तें वस्त्र काढितां करें । आच्छादिलें होतें तें दिसों लागलें बरें । तैसें तमावरण भास्करकरें[1] । काढितां दिसती पदार्थ बरवे. ॥ ५६४ ॥ एवं नेत्रप्रकाशक जरी भास्कर । तरी नेत्रप्रकाशक नव्हे कां कर । वस्त्र आणि तम एकप्रकार । करें भास्करें काढितां. ॥ ५६५ ॥ काढितां आडील अंबर । नेत्रप्रकाशक

---

१ वस्त्र.

म्हणावा कर । तैसाच म्हणावा भास्कर। परी मुख्य प्रकाशकत्व न घडे सूर्यातें. ॥ ९६६ ॥ आतां नेत्रांचें दैवत । सूर्य हें शास्त्रविख्यात । तम दिसतें नेत्रांस हेंही अत्यंत । प्रकाशकत्व सूर्याचें म्हणावें. ॥ ९६७ ॥ तरी सूर्याचीं रूपें दोन्ही। जगीं दिसे तेजोरूप मंडलेंकरूनी । दुसरें नेत्रमात्र व्यापूनी । असे रूप त्याचें ॥ ९६८ ॥ अग्निही वाचेचें दैवत । आणिका इंद्रियांही एक एक असे निश्चित । ते देव स्वर्गीं असोनि वर्तत । जनांच्या इंद्रियांतही. ॥९६९॥ सहस्रनेत्र वज्रपाणी[1] । तो त्यारूपें नसे अधिष्ठूनी पाणी । यास प्रमाण न पोळे[2] वाणी। अग्नीच्या अग्निरूपेंकरूनी. ॥ ९७० ॥ दाहकरूपें अग्नीच परी । व्यापकरूपें न असे वाचेभीतरीं । तैसें तेजोमयरूप न धरी । सूर्य नेत्रीं. ॥ ९७१ ॥ ज्योतिरूपें नयनीं वसता । तरी नेत्रांसि अंधकारचि न दिसता । यालागीं नेत्रीं असे नुसता । व्यापूनि इतरां देवांसारिखा ॥ ९७२ ॥ इंद्रियें अवघीं लिंगदेहीं[3] । स्थूळदेहीं इंद्रियें नसती कांहीं । नेत्रकर्णादि अवघींही । गोलकें[4] स्थूळदेहीं म्हणावीं ॥९७३॥ जैसे घोडे रथीं । जोडोनि चालवी सारथी । तैसीं इंद्रियें गोलकां योजूनि पंथीं । विषयांच्या आधिदैवतें वर्तविती ॥ ९७४ ॥ इंद्रियां गोलकां योग । देव न करिती तेव्हां न घडे भोग । जैसा सारथि रथा घोडियां करी वियोग । तेव्हां न चाले तो रथ ॥ ९७५ ॥ तैसें चक्षु इंद्रिय आणि नयनांतें । सूर्य योजी त्या रूपातें । तेजोरूपत्व जरी असतें । तरी डोळां न दिसता अंधकार ॥९७६॥ एवं अंधकाराचा पडदा भास्कर । आडील काढी जैसा कर । गगनच्छद या नांवें अंधकार । याच भावें संस्कृतीं बोलती ॥ ९७७ ॥ छद वस्त्रातें म्हणती। आणि गगनच्छद म्हणिजे गगनाप्रती । आच्छादितो अंधकार जे रीती । वस्त्र झांकी पदार्थ भलता ॥ ९७८ ॥ गगन सर्वांवरी असे । त्यावरी अंधकाराचें वस्त्र वसे । तें न दिसतां सर्वही न दिसे । जैसे वस्त्रें झांकिले पदार्थ ॥९७९॥ तरी सूर्यास प्रकाशक । कां म्हणती वेदादिक । ऐसेंही शंकती कोणी एक । तरी प्रकाशक तोही होय ॥ ९८० ॥ कीं दिसत नव्हतें तें दावी । तेव्हां प्रकाशकता न कां वदावी ?। आतां विरुद्ध कां म्हणावी । हे गोष्टी ? ॥ ९८१ ॥ एवं प्रकाशक ब्रह्म । न म्हणावें सूर्यासम । सर्व विषय सर्व इंद्रियग्राम । अंतःकरणादिही जें प्रकाशी ॥ ९८२ ॥ नेत्र आणि अंधकार । सूर्य आणि चराचर । बाह्य आणि अभ्यंतर । प्रकाशी तें न म्हणावें सूर्यासारिखें ॥ ९८३ ॥

---

१. इंद्र. २. भाजे. ३. सूक्ष्मशरीरांत. ४. आकृति.
५ वा० यथा०

उगेंचि सूर्यासम । जरी म्हणता पुरुषोत्तम । तरी एकदेशी उपमेनें आदित्योपम । सुखें म्हणों ये ॥ ९८४ ॥ **'प्रकाशयति तत्परं'** म्हणोनी । या 'पर'-शब्दें करूनी । जगत्प्रकाशकत्व या वचनीं । सूचविलें ॥ ९८५ ॥ दृष्टांत आदित्याचा । त्यास परम मृगजळाभास जो नव्हे साचा । हा मुख्यार्थ सूचवी कृष्ण वाचा । आतां गौणार्थ अवघे यापुढें. ॥ ९८६ ॥ मुख्यार्थ न सांपडे । तोंचि गौणार्थ दृष्टी पडे । मुख्यार्थ सांपडतां उपडे । मूळ गौणार्थाचें. ॥९८७॥ एवं तें ज्ञानस्वरूप । वर्णिलें आदित्यरूप । तेव्हां परतें परावें जळारोप । जें बाह्यांतर प्रकाशितो आदित्य. ॥ ९८८ ॥ मृगजळातें अणुमात्र । न देखती त्या आदित्याविणें नेत्र । मृगजळीं आंत बाहेर सर्वत्र । असे सूर्यजळ द्वैत निरसोनी ॥ ९८९ ॥ हा गूढार्थाचा आदित्य । प्रकाशिला नव्हता तों अगत्य । खद्योतरूप अर्थ असत्य । झळकत होते. ॥ ९९० ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्तही सुज्ञलोक । परिसोत आदीं. ॥९९१॥ पूर्वश्लोकीं वर्णिलें ज्ञान । जो भाग्यें पावला तें निधान । तो न करी आवडीनें त्याचें ध्यान । तरी तें जतन होईना. ॥ ९९२ ॥ ज्यास घडतें ध्यान । त्यास कैसें अनुसंधान ? । हें सकळ सुखाचें निधान । श्रीकृष्ण बोलतो या श्लोकीं.॥९९३॥

**तद्बुद्धयस्तदात्मानस्तन्निष्ठास्तत्परायणाः ।**
**गच्छंत्यपुनरावृत्तिं ज्ञाननिर्धूतकल्मषाः ॥ १७ ॥**

त्याच ज्ञानीं बुद्धि । आणि चित्तास तन्मयत्वसिद्धी । तेथेंचि निष्ठेची समृद्धी । तेंचि परम आश्रय जयासी ॥ ९९४ ॥ ज्ञानें तयीं त्यांचें कल्मष । निर्धूत होय अशेष । ते तें पद पावती निर्दोष । पुनरावृत्ति जेथें नसे ॥ ९९५ ॥ अर्थ इतकाच परी । विशद अर्थ बोलावा याउपरी । कीं एका एका शब्दांत हरी । भावार्थ दावी विस्तारें ॥ ९९६ ॥ त्या ज्ञानीं बुद्धि ऐसें अच्युत । बोलोनि मागुती म्हणे चित्त । त्या ज्ञानीं ज्याचें ते निश्चित । अपुनरावृत्तितें पावती.॥९९७॥ तरी बुद्धि निश्चयरूपिणी । यावरूनि श्रीचक्रपाणी । मननिदिध्यासनलक्षणीं । बुद्धि त्याची ऐसें सूचवी. ॥ ९९८ ॥ तें श्रवण मनन निदिध्यास । आणि साक्षात्कार ज्यास । मनन निदिध्यास त्यास । घडे केवळ बुद्धीचकरोनी. ॥९९९॥ कीं श्रवण गुरुमुखें झालें । मनन केवळ बुद्धीच्या विभागा आलें । निदिध्यास करणेंही लागलें । बुद्धीतेंचि. ॥ १००० ॥ श्रवण गुरुमुखें घडे । अविद्येचें कवाड उघडे । अद्वैताचें बीज सांपडे । बुद्धीसी. ॥ १००१ ॥ नाना युक्तीनें

चिंतन । त्याचें करावें तें म्हणावें मनन । त्यास केवळ साधन । बुद्धीच. ॥ १०२ ॥ युक्ती करोनि सिद्ध जालें । सत्यपण असत्यपण समजलें । तेथें क्षणक्षणीं पाहिजे मन योजिलें । बुद्धीचकरूनी. ॥ १०३ ॥ पटरूप जड जग असत्य । आत्मतंतु विसरतां तें वाटे सत्य । कीं पूर्वसंस्कार अगत्य । यथापूर्व दावी प्रपंच. ॥ १०४ ॥ आत्मतंतूची स्मृती । क्षणक्षणीं धरी सन्मती । असत्य मानी जडा पटाप्रती । हा निदिध्यास.॥१०५॥ **'तद्बुद्धयः'** म्हणोनी । हा भाव सूचवी या वचनीं । **'तदात्मनः'** या शब्देंकरूनी । सूचविला साक्षात्कार. ॥ १०६ ॥ कीं जे चित्ताची वृत्ति । तीस बाणे प्रत्यक्स्थिति । जडमात्रीं स्फुरे स्फूर्ति । चित्स्वरूपाची. ॥ १०७ ॥ हा अन्वयसाक्षात्कार । कीं जळरूपेंचि पाहणें तरंगाकार । विकार नाना दिसोनि निर्विकार । चैतन्यचि वाटे जडजग सर्वेही. ॥ १०८ ॥ उदक आणि तरंगांचा आकार । हे दोन्ही एक पाहणें अन्वयप्रकार । शुद्ध उदकचि दिसे हा विचार । व्यतिरेकाचा. ॥१०९॥ ऐसा व्यतिरेकसाक्षात्कार । कीं उदकीं बुडी देऊनि नर । पाहे तों तरंगांवांचूनि नुसतें नीर । अनुभवा आलें. ॥ ११० ॥ तैसें आत्मस्वरूपीं चित्त । तदाकार होऊनि अत्यंत । मायाविकार कांहीं त्यांत । न देखे. ॥ १११ ॥ बुद्धि चित्त या दशेतें पावे । तेव्हां तें तन्निष्ठ म्हणावें । तेव्हां तें ऐसें जाणावें । कीं स्थिति बाणली तयास. ॥ ११२ ॥ तन्निष्ठत्व बाणे तरी । कीं मनन निदिध्यासन करी । तरीच मनन निदिध्यासन घडे जरी । ज्ञानचि वाटे तारक. ॥ ११३ ॥ आत्मज्ञान हेंचि एक । या भवसागरीं तारक । ऐसा विश्वास आत्यंतिक । तेव्हां मननीं निदिध्यासीं प्रवर्ते मन. ॥ ११४ ॥ यालागीं म्हणतो हरी । कीं तत्परायणातें जरी । स्थिति बाणली ऐसी तरी । तत्परायणशब्दीं सूचवी हा भाव. ॥ ११५ ॥ तें ज्ञानचि तारक म्हणोनि निश्चय । ज्यांस ज्ञानाचा ऐसा परम आश्रय । त्यांस म्हणे परमात्मा अद्वय । तत्परायण म्हणोनी. ॥ ११६ ॥ ऐसे परिपक्वयोगज्ञानी । ज्ञानें निर्धूतकल्मष होऊनी । अपुनरावृत्तीतें पावती म्हणोनि । श्रीकृष्ण म्हणे. ॥११७॥ कल्मषशब्दें पापपुण्य । संचित जन्मजन्मींचें अगण्य । सूचवी एथें श्रीकृष्ण । हा अर्थ वारंवार पूर्वी वर्णिला. ॥ ११८ ॥ संचित जळे ध्यातां स्वरूप । अकर्त्रात्मत्वबोधें नव्हे क्रियमाणलेप । भोगें सरे प्रारब्धरूप । पापपुण्यबंधकल्मष. ॥ ११९ ॥ आतां प्रारब्धभोगार्थ असणें । देह धरूनि तोंवरी त्याचें लक्षण । ऐसें म्हणोनि कमलेक्षण । बोलतो या श्लोकीं. ॥ १२० ॥

**विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि।**
**शुनि चैव श्वपाके च पंडिताः समदर्शिनः ॥ १८ ॥**

ज्यास वेदशास्त्राध्ययन । आणि जो विनीत नम्रतेंकरूनि संपन्न । ऐसा ब्राह्मण गाय आणि श्वान । आणि चांडाळ हस्ति सम पाहणें या सर्वांतें. ॥६२१॥ ऐसे समदर्शी ज्ञानवंत । तेचि म्हणावे पंडित । कीं विषमता देखोनि अत्यंत । समदर्शन जयांला. ॥ ६२२ ॥ ब्राह्मण ऐसा उत्तमोत्तम । आणि चांडाळ अत्यंत अधमाधम । हें तारतम्य कळोनिही सम । ब्रह्मदर्शन ज्याला उभयत्र. ॥ ६२३ ॥ गाय पशु उत्तमोत्तम । श्वान अत्यंत अधमाधम । हें तारतम्य कळोनि सम । ब्रह्मदर्शन ज्याला उभयत्र. ॥ ६२४ ॥ मृत्तिकेचीच भिंती । वरी गेरूचीं चित्रें ती गेरूही माती । विप्र चांडाळ गाय श्वान हस्ती । तें सर्व पाहतां मातीच. ॥ ६२५ ॥ ते सर्व माती म्हणोनि । बोलावें ज्या वाचेकरूनी । विप्र चांडाळादि विवरूनी । त्याच वाचे बोलावें तारतम्य. ॥ ६२६ ॥ ज्या बुद्धीनें सर्वेही ब्रह्म । म्हणूनि पहावें तत्त्वसम । त्याच बुद्धीनें उत्तमाधम । जाणावें तयासी. ॥ ६२७ ॥ तेव्हां सर्वत्र पाहती सम । परी वर्तती यथायोग्य ऐसें पुरुषोत्तम । सूचवी कीं कळोनि उत्तमाधम । सम पाहती म्हणे समदर्शी. ॥ ६२८ ॥ ब्रह्म सर्वत्र समान । हें पाहणें या नांव ज्ञान । त्यासी वर्तणें हें कर्म जाण । तेथें वर्तणें लागे यथायोग्य. ॥ ६२९ ॥ नवही द्वारें एक देह । हें भलता जाणे निःसंदेह । तथापि यथायोग्य स्नेह । नवही द्वारीं. ॥ ६३० ॥ मुखीं घालावा ग्रास । द्वारांतरीं न घालिती कोणी त्यास । तैसें पाहणेंचि सम आत्मनिष्ठास । यथायोग्य वर्तणें तयासी. ॥ ६३१ ॥ पाषाणाचाचि देव । देऊळ पायरिया तो पाषाणचि स्वयमेव । पादरक्षा पायरियांवरी मानव । ठेवूनि मस्तक ठेविती चरणीं देवाच्या. ॥ ६३२ ॥ जें ब्रह्मत्व पाहती ब्राह्मणीं । तेंचि ब्रह्म दिसे चांडाळपणीं । त्यास बाहेर दुरूनी घालिती अन्नपाणी । ब्राह्मण पूजिती नेऊनि गृहांत. ॥ ६३३ ॥ कांस्यधातु गंडूषपात्र[१] । भोजनपात्रही कांस्यमात्र । परि त्यांत जेविती अन्नें विचित्र । गंडूषपात्रीं थुंकती. ॥ ६३४ ॥ न करिती गंडूषपात्रीं भोजन । आणि ताटांत कोणी न थुंकती जन । एवं सम पाहणेंचि अपरोक्षज्ञान । वर्तणें यथायोग्य. ॥ ६३५ ॥ या त्यांच्या दोन्ही रीती । एथें सूचवी श्रीपती । कीं उत्तमाधम जाणोनि पाहती । समदर्शी समब्रह्म.

---

१. पिकदाणी; व जेवायचें ताट एकाच कांशाचीं.

॥ १३६ ॥ ऐसे समदर्शी पंडित । ते जितांचि मुक्त निश्चित । ऐसें आतां अच्युत । बोलतो या श्लोकीं. ॥ १३७ ॥

**इहैव तैर्जितः सर्गो येषां साम्ये स्थितं मनः ।**
**निर्दोषं हि समं ब्रह्म तस्माद्ब्रह्मणि ते स्थिताः ॥ १९ ॥**

अगा ! ऐसा समदर्शी ज्ञानी । या लोकींच हा देह जिवंत असोनी । पुन्हा जन्म होय ज्या भ्रमें करूनी । तिहीं तो जिंकिला. ॥ १३८ ॥ जो पुनः पुन्हा देह सृजितो । तो सर्ग म्हणवूनि बोलिजेतो । तो जिंकिला म्हणजे नाहींचसा तो । केला तो तिहीं. ॥ १३९ ॥ आतां सृजितो पुनर्जन्म तो सर्ग कैसा । श्रोतयांस पडेल संदेह ऐसा । तरी श्लोक द्वितीयचरणासरसा । संदेह निरसितो श्रीकृष्ण. ॥ १४० ॥ **'येषां साम्ये स्थितं मनः'** म्हणोनी । जिहीं तो सर्ग जिंकिला त्याच्या या लक्षणेंकरूनी । त्या सर्गाचें रूप ठायीं पाडोनि । अर्थ करावा सूचवी हा भाव. ॥ १४१ ॥ पूर्वश्लोकोक्त साम्य । जड ब्रह्मैक्य अनुभवैकगम्य । ज्या साम्यें जडभ्रांतिवैषम्य । नाशलें. ॥ १४२ ॥ तेव्हां त्या साम्यांत त्यांचें मन । स्थिति पावे या भावें जगज्जीवन । **'येषां साम्ये स्थितं मनः'** ऐसें मधुसूदन । म्हणे चरणीं दुसरिया. ॥ १४३ ॥ त्या साम्यांत पावले स्थिती । त्यांचें मन तिहीं म्हणे जगत्पती । सर्ग जिंकिला जो पुनर्भवाप्रति । नेणार त्यांला. ॥ १४४ ॥ नासे जेव्हां जडभ्रांति । तेव्हां समीं ब्रह्मीं बाणे स्थिती । तेव्हां जडभ्रमचि सर्ग ऐसें श्रीपती । सूचवी स्पष्ट. ॥ १४५ ॥ जलतरंग चित्सागर । भिन्न नसती मृषा[1] आकार । हा साम्यज्ञानप्रकार । बाणतां जडभ्रमसर्ग मग कैंचा ? ॥ १४६ ॥ हें अन्वयज्ञानाचें वैभव । ज्याला नसे त्याला पुनर्भव[2] । निश्चित ऐसें श्रीमाधव । सूचवी एथें. ॥ १४७ ॥ या अन्वयज्ञानीं समत्वीं स्थिती । बाणतां हेतु जो पुनर्जन्माप्रति । तो सर्ग जिंकिला संतीं । याच लोकीं याच देहीं एथें. ॥ १४८ ॥ या श्लोकाचें पूर्वार्ध । त्याचा अर्थ ऐसा जाला सिद्ध । आतां उरलें उत्तरार्ध । द्विविध अर्थ भावार्थ तयाचा. ॥ १४९ ॥ जे केवळ निर्गुणतत्पर । त्यांस सगुणीं नसे आदर । सगुण समत्व सदयत्व भजनें हें साम्यसार । प्राप्त झालें हा अर्थ कोणी न वाखाणिती. ॥ १५० ॥ उत्तरार्धीं अर्थ ऐसा बोलती कीं ब्रह्म । निर्दोष आणि तें सम । त्या कारणास्तव ते समदर्शी परम । ब्रह्मीं स्थिति पावले. ॥ १५१ ॥ तेव्हां ब्रह्म सम निर्दोष ।

---

१. मिथ्या. २. पुनर्जन्म.

नसतें तरी स्थिति न पावते ते पुरुष । ऐसा अर्थ होतो यांत काय विशेष । सिद्ध होतो भावार्थ. ॥ ६९२ ॥ ब्रह्म निर्दोष सम यास्तव । जरी हे पावले साम्यस्थैर्यवैभव । तरी सर्वही मानव । कां न पावती हे स्थिति? ॥ ६९३ ॥ निर्दोष आणि सम । काय त्यांतेंच तें ब्रह्म । आणि काय सदोष विषम । उरल्या सकळातें. ॥ ६९४ ॥ आतां उत्तम आणि अधम । पूजिले मानूनि सम । त्यांस हा दोष लागे परम । म्हणोनि म्हणावें ये रीती. ॥ ६९५ ॥ कीं ब्रह्म सम निर्दोष । त्या ब्रह्मीं ते पुरुष । तयास केंवी लागे हा दोष । म्हणोनि ऐसेंही कोणी बोलती. ॥ ६९६ ॥ तरी ब्राह्मणादि उत्तम । आणि चांडाळादि अधम । त्याविषयीं त्यांचें दर्शनचि सम । वर्णिलें विषमत्व लौकिकही सूचवुनि. ॥६९७॥ कीं ब्राह्मणादि उत्तम । चांडाळादि अधम । हें कळत असोनि सम । दर्शन ज्याचें विषम सृष्टींत. ॥ ६९८ ॥ असोनि समदर्शन । यथायोग्य करितां पूजन । दोषें लिप्त ते जन । केंवि होती. ॥ ६९९ ॥ असोनि समदर्शन । यथायोग्य न करितां पूजन । तें सदोष होणार भजन । म्हणोनि समदर्शनत्वचि त्यांचें वर्णिलें. ॥ ६६० ॥ चांडाळ पूजितां विप्रासमान । चांडाळासम होतें ब्राह्मणपूजन । तेथें क्षोभ पावतें मन । ब्राह्मणाचें. ॥ ६६१ ॥ दुसरें हा ज्ञानी श्रेष्ठ । ऐसा वर्ततां जन होती भ्रष्ट । मग ब्राह्मणास सर्वांहूनि उत्कृष्ट । जन कां मानिती? ॥ ६६२ ॥ श्रीकृष्णही मनीं । इत्यादि भाव धरूनी । ब्राह्मणादि उत्तमाधम जाणोनी । ते सम पाहती मात्र म्हणोनि बोलिला. ॥ ६६३ ॥ तथापि विप्रचांडाळादि सम । पूजावेच जरी म्हणता पुरुषोत्तम । तरी हाचि धर्म होता परम । जेंवि बळीं अंतीं वैश्वदेवाच्या. ॥ ६६४ ॥ नाहीं जेविले ब्राह्मण । तोंचि [2]श्वचांडाळादिपतितवायसांकारणें । अन्न नेऊनि बाहेर ठेवणें । हा कर्ममार्ग [3]अनादिसिद्ध. ॥६६५॥ नसोनिही ज्ञान । ब्राह्मणाआधीं श्वचांडाळादिबलिदान । देतां नव्हती सदोष जन । एथें शंकाच हे व्यर्थ. ॥ ६६६ ॥ हें तों यथायोग्य पूजन । करितां सुखी होती सर्व जन । आणि विषमीं समदर्शन । भवबंध तुटे या अनुभवें जयाचा. ॥ ६६७ ॥ चांडाळ आणि ब्राह्मण सम । पूजितां ब्राह्मण क्षोभती परम । यथायोग्य पूजितां चांडाळ अधम । तोही सुखीच होईल ॥ ६६८ ॥ इत्यादि भाव मनीं । तों श्रीकृष्ण धरूनी । ते पंडित समदर्शीच म्हणोनी । वर्णिता जाहला. ॥ ६६९ ॥ पूजा वर्णिली नसोनी । दाटूनि पूजेची

१. भेदस्वरूप. २. कुत्रीं, चांडालादि नीच मनुष्य, कुष्ठी आदि, कावळे. ३. वेदकालापासून यथाक्रम.

शंका कल्पूनी । निर्दोषी ब्रह्मीं ते आहेत म्हणोनी । निर्दोषत्व ऐसें त्यांचें कां वदावें? ॥ ६७० ॥ एवं हा एक अर्थ । कोणी बोलती तो नव्हे यथार्थ । आतां अबाधित परम समर्थ । अर्थ ऐसा या उत्तरार्धाचा. ॥ ६७१ ॥ कोणा हातीं कांहीं । ईश्वर कर्म करवीत नाहीं । कीं करवितां कर्मफळ भोगावें तेंही । तेथें विषम निर्दयत्व होणार. ॥ ६७२ ॥ तेथें शंका जाली प्राप्त । कीं जीवात्माही कर्मी अलिप्त । तेव्हां फलभोगवार्ताच जाली समाप्त । तें कर्म करवितां कैंचें वैषम्य निर्दयत्व ईश्वरातें. ॥ ६७३ ॥ तरी चिदात्मा अकर्ता हें खरें । परी बंध मोक्ष कोणाकरितां हें पाहतां बरें । लागतो विचार निर्धारें । बुद्धीसी. ॥ ६७४ ॥ आत्मा अकर्ताच असे । परी त्या बुद्धीस तो दिसोनि न दिसे । कीं दृष्टीस दोर गवसे । तथापि भासे सर्पसा. ॥ ६७५ ॥ एवं दिसोनि न दिसे आत्मा निदान । यालागीं अज्ञानें वेष्टिलें असे ज्ञान । त्या ज्ञानें ज्याचें नासलें तें अज्ञान । तें ऐसें म्हणोनि समदर्शनपर्यंत वर्णिलें. ॥ ६७६ ॥ तिहीं पुनर्जन्म करणार । सर्ग जिंकिला असतांचि शरीर । म्हणोनि पूर्वार्धी सर्वेश्वर । श्रीकृष्ण ऐसें बोलिला. ॥ ६७७ ॥ आतां एवढी जीवन्मुक्तपदवी । कोण्या हेतूस्तव लब्ध जाली म्हणावी । तें उत्तरार्धीं बोलतो गोसांवी[1] । सकळा गोसांवियांचा. ॥ ६७८ ॥

उत्तरार्ध—**'निर्दोषं हि समं ब्रह्म तस्माद्ब्रह्मणि ते स्थिताः'**

निर्दोष आणि सम । म्हणजे नव्हे निर्दय आणि जें विषम । त्यापासूनि हें जीवन्मुक्तिपद परम । कीं देह असोनि ब्रह्मींच ते राहिले. ॥ ६७९ ॥ निर्दोष आणि सम । तें म्हणावें सगुणब्रह्म । कीं निर्दय नव्हे आणि नव्हे विषम । म्हणोनि वर्णिलें जें या प्रकरणीं. ॥ ६८० ॥ कीं पाप न करवी कोणा हातीं । आणि पुण्यही न करवी जगत्पती । म्हणोनि निर्दोषत्व समत्वस्थिती । ज्याची वर्णिली या प्रस्तुतीं. ॥ ६८१ ॥ तो करवितो म्हणतां कर्म । होतो निर्दय आणि विषम । ऐसें मानिती त्यास तें सगुणब्रह्म । प्रसन्न नव्हे. ॥ ६८२ ॥ न जोडतां त्याचे पाय । करितां कोटि कोटि उपाय । मोक्ष नव्हे होती अपाय[2] । उपाय सर्व. ॥ ६८३ ॥ तें सदय आणि सम । मानूनि सेवितां शबलब्रह्म । देणार हें जीवन्मुक्तिपद परम । जें पूर्वार्धीं वर्णिलें. ॥ ६८४ ॥ उत्तरार्धीं या भावेंकरूनी । म्हणतो जें म्हणावें निर्दोष सम म्हणोनी । **'तस्मात्'** म्हणजे त्यापासूनी । **'ते ब्रह्मणि स्थिताः'** म्हणजे ब्रह्मीं थारले. ॥ ६८५ ॥

---

१. गोस्वामी—श्रेष्ठ, असें तात्पर्य. २. घात, नाश.

'इहैव' म्हणोनि पूर्वार्धीं या श्लोकीं । बोलिला कीं याच देहीं याच लोकीं । जडभेदभ्रम सर्ग जिंकिला कीं । समीं थारलें मन ज्याचें. ॥ ६८६ ॥ हें जीवन्मुक्तीचें वैभव । त्यापासूनि जो सम सदय देव । कीं मन समीं ब्रह्मीं थारलें इहैव । म्हणजे देह जिवंत असोनिही. ॥ ६८७ ॥ यालागीं सगुणब्रह्म । सदय आणि सम । निर्दय नव्हे आणि नव्हे विषम । कीं कर्म न करवी कोणा हातीं. ॥ ६८८ ॥ कर्म करवणें ईश्वरीं । न लागे हें प्रकरण एथवरी । आणोनि समाप्त करी हरी । फळ सांगोनि समत्वसदयत्वभजनाचें. ॥ ६८९ ॥ ऐसें निर्दोष आणि सम । तें सेवूनि सगुणब्रह्म । जे जाले जीवन्मुक्त परम । त्यांचें लक्षण बोलतो मंगलधाम । या श्लोकीं. ॥ ६९० ॥

**न प्रहृष्येत्प्रियं प्राप्य नोद्विजेत्प्राप्य चाप्रियम् ।**
**स्थिरबुद्धिरसंमूढो ब्रह्मविद्ब्रह्मणि स्थितः ॥ २० ॥**

प्रारब्धेंकरूनी । प्रियपदार्थ पावूनी । हर्ष न मानी मनीं । वासनारहित. ॥ ६९१ ॥ प्राप्त होतां अप्रिय । घाबरा न होय । वासनारहित निःसंशय । मन ज्याचें. ॥ ६९२ ॥ त्यास नलगे कांहीं । कीं ज्यास विषयवासनाच नाहीं । तथापि प्रारब्ध सारावयास देहीं । बुद्धि असे जों असे आयुष्य देहाचें. ॥ ६९३ ॥ पूर्वसंस्कारें विषय इंद्रियें शरीर । बुद्धि जाणे तरी ते स्थिर । प्रिय अप्रिय दोन्ही प्रकार । कळोनिही हर्ष खेद मानीना. ॥ ६९४ ॥ या भावें म्हणे हरी । कीं प्रिय पदार्थ कळे परी । त्याच्या लोभें अंतरीं । हर्ष न पावे स्थिरबुद्धि म्हणोनि. ॥ ६९५ ॥ ऐसें जाणोनिही अप्रिय । अप्रिय पावोनिही उद्विग्न न होय । कीं स्थिरबुद्धि ब्रह्मानंदमय । भाव ज्याच्या बुद्धीचा. ॥ ६९६ ॥ मीं देह ऐसी भ्रांती । येऊनि न करी मूढ त्याची मती । म्हणोनि बाणली ऐसी स्थिती । तरी हर्ष विषादरहित तो ॥ ६९७ ॥ ऐसा ब्रह्मवेत्ता । तोचि ब्रह्मीं थारला गा! तत्त्वता । कीं जडीं प्रपंचीं ब्रह्मसत्ता । उघडी दिसे ज्याच्या बुद्धीस. ॥ ६९८ ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञ लोक । परिसोत आतां. ॥ ६९९ ॥ पूर्वश्लोकीं जाला निर्णय । कीं ज्ञानी पावोनिही प्रिय अप्रिय । हर्षविषादयुक्त न होय । म्हणोनी. ॥ ७०० ॥ येथें अर्जुनास शंका वाटे । संदेह हृदयामाजीं दाटे । कीं बुद्धी ऐसी कवणिये वाटे । ब्रह्मीं स्थिर होय आपली ॥ ७०१ ॥ हा अर्जुनमनोभाव । जाणोनि सर्वसाक्षी देव । तो जों पुसे तों स्वयमेव । उत्तर देतो या श्लोकीं. ॥ ७०२ ॥

**बाह्यस्पर्शेष्वसक्तात्मा विंदत्यात्मनि यत्सुखम् ।**
**स ब्रह्मयोगयुक्तात्मा सुखमक्षय्यमश्नुते ॥ २१ ॥**

अगा! विषयइंद्रिययोग । होतां सुख दाखवी विषयभोग । परंतु भोगीं दुःखसंयोग । कधीं चुकेना. ॥ ७०३ ॥ भोग होतां गमे सुख । भोग सरतां वियोगदुःख । यालागीं विचारनिष्ठ मुख । न पाहों म्हणे भोगांचें. ॥ ७०४ ॥ तो मुमुक्षु विरक्त । बुद्धि त्याची ब्रह्मात्मयोगयुक्त । भोगीं दुःख म्हणोनि आसक्त । बाह्यविषयसुखीं नव्हे त्याची. ॥ ७०५ ॥ परंतु अगा अर्जुना! । जों स्वस्वरूपीं मना । सुख स्वानुभवें कळेना । तों वळेना मन तें बुद्धीस. ॥७०६॥ म्हणूनि पूर्वश्लोकीं जो बोलिला । त्यानें दीर्घ दृष्टि विचार केला । निधि सुखाचा त्यानें मानिला । आपला आत्मा. ॥ ७०७ ॥ कीं बाह्य विषय बहिर्मुख । तें जें सुख दाखवूनि देती दुःख । पाहतां तों तें सुख । आत्मयांतचि आपल्या. ॥ ७०८ ॥ एवं जें सुख बाह्य विषयांभीतरी । तें आत्मयांतचि आहे अंतरीं । ऐसें जाणें तो वरवियेपरी । आसक्ति टाकितो विषयाची. ॥ ७०९ ॥ ब्रह्मयोगें युक्त बुद्धी । त्यांची होऊनि ते पावति सिद्धी । ज्या सिद्धींत समृद्धी । अक्षय्य सुखाची. ॥ ७१० ॥ या श्लोकीं हे अर्थस्थिती । या वेगळे अर्थ बाधित होती । ते वर्णितां ओविया फार होती । ग्रंथ वाढेल अत्यंत. ॥ ७११ ॥ हा अर्थ अबाधित परी । श्लोकीं न दिसे झडकरी । म्हणूनि पदांची योजना यापरी । पाहावी पंडितीं. ॥ ७१२ ॥ **ओवी संस्कृत–'बाह्यस्पर्शेषु यत्सुखम् । विंदत्यात्मनि तत्सुखम् । असक्तात्मा स ब्रह्मयोगयुक्तात्मा सुखम् । अक्षय्यमश्नुते'** ॥ ७१३ ॥ एवं मग त्या अक्षय्य सुखातें भोगी । जो या प्रकारें वीतरागी । हे सिद्धि पावणें ह्यालागीं । ठायीं पडतां सुखमूलत्वें निजात्मा. ॥ ७१४ ॥ जरी विषय टाकितां सुखचि जातें । तरी वैराग्य कोणासही न येतें । एंव सुखाचें सुख आत्मत्वीं आयतें । जातें तें दुःखचि. ॥ ७१५ ॥ अगा! आत्मसुखचि विषयांत । परी स्वसुख भलें न पाहती मूत्रांत । हे भोग दुःख देती म्हणूनी विषयांत । न रमती भले म्हणूनि म्हणतो या श्लोकीं. ॥ ७१६ ॥

**ये हि संस्पर्शजा भोगा दुःखयोनय एव ते ।**
**आद्यंतवंतः कौंतेय न तेषु रमते बुधः ॥ २२ ॥**

अगा! विषय इंद्रियस्पर्शें उपजती । ते भोग दुःखचि देती । दुःखाचें जन्मस्थान होती । हेचि भोग. ॥ ७१७ ॥ ज्यांस आदि ज्यांस अंत । ते दुःखें देतीच निश्चित । आदि सदुःख कीं अत्यंत । आयासें उपजती विषय-

भोग ते. ॥ ७१८ ॥ भोग नाहीं उपजला । तोंच इच्छेनें तळमळूं लागला । भोगांतीं वियोग घडला । तेव्हां मागुती पडला कूपांत दुःखाच्या. ॥ ७१९ ॥ कुंतीसुता! ऐसा विचार । करितां होतो हाचि निर्धार । कीं सुख आत्माचि आणि विषयविकार । योनि म्हणजे उत्पत्तिस्थान दुःखाचें. ॥ ७२० ॥ यालागीं पूर्वश्लोकीं । तुज मी स्पष्ट बोलिलों कीं । हा निर्धार केला प्रबुद्धलोकीं । म्हणुनि न रमती विषयभोगांत. ॥ ७२१ ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञश्लोक । परिसोत आधीं. ॥ ७२२ ॥ पूर्वश्लोकीं विषयभोग । वर्णिले कीं करिती दुःखयोग । म्हणूनि ज्ञानी त्यांचा संग । न धरिती न रमती त्यांमाजी. ॥ ७२३ ॥ हे गोष्टी अर्जुनें । आयकोनि धरिली मनें । कीं जें उपदेशिलें कमलनयनें । हें सत्य. ॥ ७२४ ॥ या विवेकाचा दीप जळे । तोंवरी भोगीं दुःख देखती बुद्धीचे डोळे । परी जेव्हां वायु कामाचा खवळे । विझे दीप तो विवेकाचा. ॥ ७२५ ॥ पडतां अनादिवासनेचा अंधार । उठती भोगप्राप्तीस उपायतस्कर । त्यांचे पाठिराखे शस्त्रधर । क्रोधविकार नाना प्रगटती. ॥ ७२६ ॥ एवं उठतां कामविकार । नाठवे पूर्वोक्त विचार । उडे विवेक आणि निर्धार । विषयभोग तयांचा. ॥ ७२७ ॥ मग करूं लागे भोगप्राप्तीचा उपाय । तों भोगयत्नीं पदोपदीं अपाय । कांहीं विघ्न होतां हातपाय । आफळी आदळी मस्तक. ॥ ७२८ ॥ एवं भोगत्याग कैंवी घडे । त्यागूनिही पुन्हा फांसा पडे । ऐशा भावें श्रीकृष्णाकडे । पाहे अर्जुन. ॥ ७२९ ॥ प्रश्न करूं जों पाहे । तों देवचि उत्तर देत आहे । कीं बापा! जो ते कामक्रोधवेग साहे । तो सुखी म्हणोनि म्हणतो या श्लोकीं. ॥ ७३० ॥

**शक्नोतीहैव यः सोढुं प्राक्शरीरविमोक्षणात् ।**
**कामक्रोधोद्भवं वेगं स युक्तः स सुखी नरः ॥ २३ ॥**

अगा! कामक्रोधांचे वेग । त्यापुढें न थोर भोगवासनात्याग । सकळनिश्चयाचा भंग । करिती वेग कामक्रोधांचे. ॥ ७३१ ॥ यास उपाय विचार । त्या विचारीं त्यागनिर्धार । या उपायाचा पसर । परिसिला तुवां पूर्वींच. ॥७३२॥ हाणोनि विवेकाचा भाला । दुरूनीच टोंचिलें वैरियाला । तो भाला पिटूनि रेंटीत आला। आणि हात केला आपणावरी.॥ ७३३ ॥ उरीं बैसला भाला । तो पाठीवाटे फुटूनि बाहे आला । त्यास रेंटीत जो जवळी पावला । तो काय वांचूं पाहतो? ॥७३४॥ त्याच्या शस्त्रें घाय। जाला तरी होणार काय । कीं तो भाला पिटितां मृतप्राय । क्षीणबल जाहला. ॥ ७३५ ॥ स्वहस्तीं असे अमृत ।

तदर्थ आला तो भाला रेंटीत। त्यास भिऊनि तें पाजितां निश्चित। तो अमर होऊनि मारील आपणातें. ॥७३६॥ अगा! तेथें धीरपण। धरूनि तें स्वात्मत्वामृत आपण। पितां तो वैरी बलक्षीण। मरणार तत्काळ. ॥ ७३७ ॥ जो त्यास वश जाला। स्वात्मामृतें जीववी त्याला। तो निश्चयेंसी मेला। हातें तयाच्या. ॥ ७३८ ॥ अगा! कामक्रोध अचेतन। स्वजीवनें त्यासी जीववी स्वमन। त्याच्या नाशाचें साधन। विवेकवैराग्य दृढ शस्त्र. ॥ ७३९ ॥ त्या शस्त्रें क्षीणबळ। जालें कामक्रोधांचें दळ। ते मरतां मरतां वेग प्रबळ। करिती जीवावरी उठूनि आपल्या. ॥ ७४० ॥ तेथें क्षण एक धरोनि धीर। जो सोशील तोची वीर। उत्तरक्षणीं ते वेग मृगनीर। होऊनि जाती. ॥ ७४१ ॥ अगा! धीरता धरूनि जैसी। जो कामक्रोधाचे वेग सोसी। न धरी विषयभोगाची असोसी। तो सुखी तोचि जीवन्मुक्तही. ॥७४२॥ अगा! म्हणसी धराया धैर्य। कोणाचा करावा आश्रय। तरी स्वरूपीं चित्त चिन्मय। ऐसा युक्त होऊनि जो सोसूं शके सुखी तोचि.॥७४३॥ तोचि सुखी इहैव। '**इहैव**' म्हणजे याचि लोकीं पावे मुक्तिवैभव। शरीर सोडणें त्याहूनि पूर्वींच म्हणे देव। तो नर सुखी जो ऐसा. ॥७४४॥ दृष्टि या लाभावरी देऊनी। चित्त चिदाश्रित करोनी। भोगेच्छा न धरी वेग सोसोनी। कामक्रोधांचे.॥७४५॥ तो याच लोकीं नर। जों नाहीं सोडिलें शरीर। तोंचि सुखी म्हणजे मुक्त विज्वर। हा अर्थ या श्लोकाचा.॥७४६॥ एथें कोणी टीकाकार। '**प्राक्शरीरविमोक्षणात्**' याचा विचार। ऐसा बोलती कीं जैसें मृत शरीर। तैसा जितांच जो होय तो सुखी नर एक. ॥ ७४७॥ हाही अर्थ बहु बरा। परी एका गोष्टीनें नव्हे एथें खरा। कीं कामक्रोधवेग नरा। सोसणें लागतें. ॥ ७४८ ॥ कामक्रोधवेग जितके। ते जो नर सोसूं शके। त्याचें स्वसुख पिके। ऐसें बोलतो श्रीकृष्ण. ॥ ७४९ ॥ मृतशरीरा सोसणें। नलगे तेव्हां वृथा हें बोलणें। '**प्राक्शरीरविमोक्षणात्**' याचा अर्थ याकारणें। वाखाणावा ये रीती. ॥ ७५० ॥ कीं सोडिल्यावरी शरीर। मोक्षसुख पावेचि ज्ञानी नर। तें शरीर सोडण्याहूनि पूर्वींच सत्वर। सुख पावे. ॥ ७५१ ॥ हा ऐसा अर्थ अबाधित। तो अर्थ होतो बाधित। श्रोतयांस याहीवरी यांत। जो रुचेल तोचि अंगीकारोत. ॥७५२॥ वेग सोसूं शके म्हणोनी। जरी नसतें या वचनीं। तरी तोही अर्थ मनीं। रुचताच संतांच्या. ॥ ७५३ ॥ कीं मृतशरीर आलिंगिती। आणि रडती युवती। आणि पुत्रादिक जाळिती। कामक्रोध दोहींपरी नसे तयांला. ॥ ७५४ ॥ हा अर्थ अत्यंत

बरा। परी सोसणें नलगे मृतशरीरा। कामक्रोधवेग या नरा। आदळोनिही सोसावे लागती ॥७५५॥ कीं जो सोसूं शके तो नर। सुखी होय ऐसें गीताकार। म्हणतो तदनुरूप टीकाकार। बोलती तेचि टीका ॥ ७५६ ॥ आतां यानंतर श्लोक। तो कां बोले उत्तमश्लोक। त्याचें निमित्त सुज्ञ लोक। परिसोत आधीं ॥ ७५७ ॥ कामक्रोधांचे वेग। सोशी न इच्छी विषयभोग। त्यासि जितांचि होय मुक्तीचा योग। शरीरमोक्षणाहूनि पूर्वींच ॥ ७५८॥ ये रीती उत्तमश्लोक। बोलिला तो वाखाणिलाच पूर्वश्लोक। त्याच्या अनुभवाचें कौतुक। वर्णील आतां यावरी ॥ ७५९ ॥ कीं शरीरमोक्षणाहूनि पहिलें। मोक्षसुख प्राप्त जालें। जों त्याचें सत्त्व निर्वाण नाहीं पावलें। देहावसानीं परब्रह्मीं ॥ ७६० ॥ जो कामक्रोधवेग। सोसूनि ही न इच्छी बाह्य भोग। त्याचा हा मुक्तिप्रसंग। बोलेल आतां तीं श्लोकीं ॥ ७६१ ॥

**योऽन्तःसुखोऽन्तरारामस्तथांतर्ज्योतिरेव यः।**
**स योगी ब्रह्म निर्वाणं ब्रह्मभूतोऽधिगच्छति ॥ २४ ॥**

अगा! ज्याचें चित्त अंतर्मुख। त्याला अंतरींच बाणे सुख। तो म्हणावा अंत:सुख। अर्जुना गा! ॥ ७६२ ॥ तोचि कामक्रोधांचे वेग। सोसी ज्याला अंत:सुखाचा योग। आणि त्यासचि हा नित्यसुखसंयोग। जो वेग सोसूं शके नित्य कामक्रोधांचे ॥ ७६३ ॥ आणि अगा! बाह्य विषयांवरी। अंतर्दृष्टि रमेना जरी। कामक्रोधवेग तरी। सोसी ऐसा कोण असे ॥ ७६४ ॥ हा सोसितो यापरी। कीं याची दृष्टि रमे अंतरीं। जें तें ब्रह्मचि देखे परी। न मानी विषय जो कांहीं ॥ ७६५ ॥ तो म्हणावा अंतराराम। कीं अंतरींच जो रमे आत्माराम। म्हणजे विषय आणि इंद्रियग्राम। या जडतरंगीं देखे चित्समुद्र ॥ ७६६ ॥ ताटंक कंकणादि आकार। वेश्या पाहे अलंकार। हेमक्रयविक्रयकार। हेमचि पाहे अलंकार दृष्टीं दिसोनिही ॥ ७६७ ॥ वेश्या अलंकारींच मोहे। हा सोन्याकडेच पाहे। कार्यवासना सोडूनि रमताहे। कारणींच ऐसा अंतराराम ॥ ७६८ ॥ विषय इंद्रियें साच मानी। तो भोगासक्त होय अभिमानी। तो बहिराराम म्हणोनी। अगा! म्हणावा ॥ ७६९ ॥ विषय आणि इंद्रियें। देखत असे हा स्वयें। परी पटीं तंतु या निश्चयें। स्वरूपींच रमतो अंतराराम ॥ ७७० ॥ ब्रह्म बाह्य अभ्यंतरीं। ऐसें असोनि रमणें अंतरीं। अंतरारामाचें यापरी। काय हो म्हणोनि हे शंका ॥ ७७१ ॥ एथें समजावें या प्रकारीं। कीं मिथ्याभास वरिच्यावरी। यालागीं अधिष्ठान जरी बाह्यांतरीं। तरी अंतरीं म्हणावें याकरितां ॥ ७७२ ॥ कीं

विवर्त नसे अंतरीं । अधिष्ठान असे विवर्ताभीतरीं । तें असोनिही बाह्य अभ्यंतरीं । पाहणें अंतरीं विवर्ताच्या ॥ ७७३ ॥ तंतूस वरिच्यावरी । पट भासे तो नसे अंतरीं । म्हणूनि पटाभीतरीं । तंतुच म्हणावा ॥ ७७४ ॥ तसीच वरिच्यावरी । दृष्टि पडे पटाकारीं । दृष्टि तेचि निघे अंतरीं । तो तंतुमात्र ॥७७५॥ वरिच्यावरीच भास । अधिष्ठान आंत बाहेर त्यास । अंतरीं पाहतां विवर्तास । ठाव नसे ॥७७६॥ अंतरीं अधिष्ठान दिसे । यालगीं वेदीं शास्त्रीं शब्द ऐसे । एवं अंतर्दृष्टि रमतसे । अंतराराम ॥७७७॥ आतां अंतरींच सुख ज्याला । अंतरींच रमणें त्याला । ऐसें बोलतां प्राप्त जाला । भेद एथें ॥ ७७८ ॥ कीं अंतःसुखानुभवकळा । पावला परी हा वेगळा । ऐसें सहज बोलतां धरितें गळा । द्वैत एथें ॥ ७७९ ॥ म्हणूनि एथें दुसरिया चरणीं हरि । हे द्वैतशंका परिहरी । कीं तैसा हा बोलिला तरी । जरी अंतर्ज्योति स्वयें हाचि ॥ ७८० ॥

## 'तथांतर्ज्योतिरेव यः'

तथा म्हणजे तैसा । कीं अंतःसुख अंतराराम म्हणोनि वर्णिला जैसा । तैसा जाला तो अर्जुना ऐसा । कीं अंतर्ज्योतिच जो स्वयें ॥ ७८१ ॥ ज्योति म्हणजे प्रकाश । जे प्रकाशी प्रकाशा आणि अंधकारास । प्रकाश अंधकार दोन्ही मृगजलाभास । ज्या चित्प्रकाशें प्रकाशती ॥ ७८२ ॥ सूर्यें प्रकाशिले अलंकार । तरी सुवर्णावांचूनि ते ते आकार । न दिसती न असती वारंवार । हे दृष्टांत पूर्वीं सिद्ध जाले ॥ ७८३ ॥ जरी निबिड[1] अंधकार । हातीं चाचपतां[2] कळे अलंकार । परी आधीं हातास निर्विकार । सोनेंचि लागे ॥ ७८४ ॥ सूर्यावांचूनि अलंकार । असों शके धरूनि आधार । परी सोडोनि कनक[3] निर्विकार । न असे न दिसे न लागे हातासही ॥ ७८५ ॥ एवं सोनेंचि नग[4] धरी दावी । तेव्हां सोनेंचि त्याचि ज्योति म्हणावी । तैसी जगत्प्रकाशता वदावी । आत्मयातें ॥ ७८६ ॥ तरंग वरिच्यावरी भासती । उदक त्यांची प्रकाशक अंतर्ज्योती । चित्तलहरींत चित्स्फूर्ती । अंतर्ज्योति त्याची तेच कीं ॥७८७॥ जो ज्ञानी अंतर्ज्योति ऐसा । तो तथा म्हणजे तैसा । कीं अंतःसुख अंतराराम म्हणूनि ऐसा । वर्णिला तो अगा! स्वयेंचि अंतर्ज्योति ॥ ७८८ ॥ तो ह्मणावा ब्रह्मभूत । म्हणजे ब्रह्मचि जाला निश्चित । प्रारब्धें जो देह आहे जित । तोंचि शरीरमोक्षणाहूनि पूर्वींच तो ऐसा ॥ ७८९ ॥ हेंही शंकेचें स्थळ । कीं

---

१. घन, दाट. २. स्पर्शून पाहतां. ३. सोनें. ४. दागिना.

जो अंतर्ज्योतिच स्वयें केवळ । तो ब्रह्मभूत म्हणजे ब्रह्म जाला म्हणणें प्रबळ । विरोध एथें उपजवी ॥ ७९० ॥ तरी याचा ऐसा भाव । कीं नाना जळीं सूर्य तैसा देव । प्रतिबिंबत्व पावला स्वयमेव । हे श्रुत्यर्थ पूर्वींच सिद्ध जाले॥७९१॥ **'ममैवांशो जीवलोके'** म्हणोनी । पंचदशाध्यायांत स्वमुखेंकरूनी । **'भुंजानं वा गुणान्वितं'** ऐसें बोलोनी । भोक्ता स्वांश वर्णील **भगवंत** ॥७९२॥ अज्ञान बुद्धीस होतें । तोंचि भिन्नत्व त्या प्रतिबिंबांशातें । योगीं ऐक्य तयातें । ब्रह्मभूत ज्ञानी म्हणावा तो यास्तव ॥ ७९३ ॥ जगत्प्रकाशक ज्योति । तो स्वयेंचि ऐसी बाणली स्थिति । जितांच पावला जीवनमुक्ति । तो तेव्हां ॥ ७९४ ॥ ऐसा बिंबैक्य पावला । ब्रह्मभूत म्हणावें त्याला । तरी जो ब्रह्मचि केवळ जाला । देह असों नये तयासी ॥ ७९५ ॥ ब्रह्म निर्धर्म निर्गुण । देह जड त्रिगुण । तेव्हां अंतःसुख अंतरारामपण । अनुभवी कोणत्या देहीं ॥ ७९६ ॥ म्हणूनि म्हणे **य**दुपती । कीं **'ब्रह्मनिर्वाणमृच्छति'** । म्हणजे प्रारब्ध सरतां देहांतीं । तो ब्रह्मनिर्वाण तें पावे ॥७९७॥ कीं बिंबीं प्रतिबिंबैक्ययोगीं । तथापि प्रारब्धभोगार्थ जगीं । देह असे तेव्हां भोगी । सत्त्वीं प्रतिबिंबे मागुती चिदंश ॥ ७९८ ॥ कीं ज्या सत्त्वास ऐक्यानुभव । त्या सत्त्वींच प्रतिबिंबला देव । प्रतिप्रलय सृष्टीतें पावे लयसंभव । ब्रह्मैक्य पावोनि मागुती ॥ ७९९ ॥ कीं मेघ वर्षती जळ । तें सूर्यापासूनि निघे केवळ । ऐसें बोलती प्रांजळ । श्रुतीही ॥ ८०० ॥

श्रुति—**'याभिरादित्यस्तपति रश्मिभिस्ताभिः पर्जन्यो वर्षति ।'**

श्रुत्यर्थ ॥ स्पष्ट येथें श्रुत्यर्थ । मेघजळ सूर्यकिरणांतील यथार्थ । ग्रंथविस्तार कां व्यर्थ । करावा? ॥ ८०१ ॥ मेघांत कोठूनि येतें पाणी । हें तों न देखे दृष्टीं कोणी । यालागीं बोलते **वे**दवाणी । कीं आदित्य तपतो वर्षतो तया किरणीं । हेंचि सत्य ॥ ८०२ ॥ एवं सूर्याचींच नाना जळें । त्यांत दिसती त्याचीं मंडळें । सूर्येंचि जळ शोषितां तीं सकळें । सूर्याचमध्यें पावती एकत्व ॥ ८०३ ॥ पुन्हा सूर्य वृष्टि करी । प्रतिबिंबें होती नाना नीरीं । तैसें प्रतिसृष्टि प्रतिसंहारीं । ब्रह्मीं रिघणें निघणें प्रतिबिंबांसी ॥ ८०४ ॥ जळें प्रतिबिंबें सूर्यांतूनि निघती । प्रवेशती दोन्ही त्यांत मागुती । इतकीच एकदेशी दृष्टांतरीती । ब्रह्मीं उपाधि प्रतिबिंबप्रवेशनिर्गमीं वदावी ॥८०५॥ नासे ज्याची अविद्या । त्याच्या जीवोपाधींत बाणे विद्या । तो न परते पावूनि आद्या । पुनरपि ॥८०६॥ प्रस्तुतीं याची अविद्या गेली । परी बुद्धि आहे उरली ।

इंद्रियें तींत असती भरलीं । तांदूळ जैसे कोथळींत[1] ॥ ८०७ ॥ भक्षावया योग्य होतीं । परी पेरितां तांदूळ नुगवती[2] । तैसीं ज्ञानियाचीं इंद्रियें असती । योग्य प्रारब्धभोगमात्रासी ॥ ८०८ ॥ प्राप्त होतां प्रारब्धभोगकाळ । प्रतिबिंबयुक्त बुद्धि-जळ । होय त्यांत डळमळ । दिसे घडी एक प्रतिबिंबाची ॥ ८०९ ॥ राजपुत्र एकास मारी । आणि बसे पित्याचे मांडीवरी । तो गान्हाणें सांगतां उतरी । मां-डीवरूनि क्षणएक दंडार्थ ॥ ८१० ॥ यथान्यायें दंड करी । मागुती घे मांडीवरी । तैसा भोगकाळ सरतां परमेश्वरीं । पुन्हा एकत्व भोग भोगूनी ॥ ८११ ॥ ज्ञानी पावला बिंबात्मता । तरी प्रारब्ध भोगणें तत्त्वतां । बिंबास भोग न घडे आतां । प्रारब्ध कोणें भोगावें ? ॥ ८१२ ॥ जडास न घडे सुखदुःखभोग । बिंबास नसे सुखदुःखसंयोग । आतां प्रारब्धभोगाचा योग । बोलावा कवणासी ? ॥ ८१३ ॥ एवं प्रतिबिंबयोगें उपाधी । अहंकर्तृत्वभावें आधीं । कर्म करितां जाला ते प्रारब्धीं । भोग लिहिले तयाच्याच ॥ ८१४ ॥ जो जैसें कर्म करी । तो तैसें फळ भोगी यापरी । विचारणा करितां वरी । प्रारब्ध भोगणें शिरीं प्रतिबिंबाचिया ॥ ८१५ ॥ बिंबैक्य पावे तोचि ज्ञानी होऊनि । प्रारब्धभोग त्यास तेव्हांही म्हणोनी । शास्त्र बोलतें आणि चैतन्यावांचूनी । भोग न घडे ॥ ८१६ ॥ प्रारब्ध तरी भोगीं । आणि सर्वदा ब्रह्मात्मयोगीं । तरी प्रतिबिंब घडी एक भोगालागीं । होणेंचि लागे तयाला ॥ ८१७ ॥ एवं ब्रह्मभूतही[3] होऊनी । निर्वाण नाहीं पावला ज्ञानी । कीं प्रारब्धभोगार्थ उपाधि असे म्हणूनी । प्रतिबिंब होणें लागतें ॥ ८१८ ॥ जेव्हां प्रारब्ध सरे । सत्त्वोपाधि वेगळा न उरे । तेव्हां प्रतिबिंबत्व न स्फुरे । कदापिही म्हणावा तो निर्वाण ॥ ८१९ ॥ म्हणोनि म्हणे संतांचा पति । कीं **'ब्रह्मभूतो ब्रह्मनिर्वाणमृच्छति'** । ब्रह्मभूत म्हणणें हे स्थिति । शरीरमो-क्षणाहूनि पूर्वीं तयाला ॥ ८२० ॥ आधीं जितां होती ब्रह्मभूत । मागुती ब्रह्म निर्वाण पावती देहांतीं निश्चित । ऐसें स्पष्टही यानंतर अच्युत । बोलतसे या दुसरिया श्लोकीं ॥ ८२१ ॥

**लभंते ब्रह्मनिर्वाणमृषयः क्षीणकल्मषाः ।**
**छिन्नद्वैधा यतात्मानः सर्वभूतहिते रताः ॥ २५ ॥**

ब्रह्मीं निर्वाण पावती । ऋषि म्हणजे अपरोक्ष जे अनुभविती । परी जेव्हां क्षीणकल्मष होती । निर्वाण पावती ते समयीं ॥ ८२२ ॥ क्षीण होतें कल्मष ।

---

१. पिशवींत. २. उत्पन्न होत नाहींत. ३. अद्वैतानुभवसंपन्न.

म्हणजे सरतें कर्म जेव्हां अशेष । यावेगळा ज्ञानी तितका निर्दोष । होतो अपरोक्ष आत्मा देखतां बुद्धीनें ॥ ८२३ ॥

श्रुति—**'यस्तु विज्ञानवान्भवत्यमनस्कः सदा शुचिः ।'**

श्रुत्यर्थ ॥ जो होतो विज्ञानवंत । तो सदा शुचिर्भूत । कीं तो अमनस्क म्हणजे मनरहित । कीं मन कल्पितें आणि मन सर्वही ब्रह्म ॥ ८२४ ॥ ऐशा अनेक श्रुती । मागें चतुर्थाध्यायीं बोलिला **श्री**पती । कीं **अर्जुना**! तूं परम पातकी असलासि त्रिजगतीं । तरी ज्ञानेंचि होसी निष्पाप ॥ ८२५ ॥ यालागीं जे ऋषि ज्ञानी । ते ब्रह्मनिर्वाण पावती निष्कल्मष होऊनि । इतर कल्मष हे विरुद्ध गोष्टी भगवद्वचनीं । नये कदापी ॥ ८२६ ॥ यालागीं कल्मषशब्दें कर्म त्रिविध । संचित क्रियमाण प्रारब्ध । नुरतां या तिहीं कल्मषांचा गंध । प्रारब्ध सरतां पावती ब्रह्मनिर्वाण ॥ ८२७ ॥ हा अर्थ श्रीकृष्णाच्या मनीं । तो सिद्ध करूनि दाखवावा म्हणोनी । त्याचीं लक्षणें उत्तरार्धेंकरूनी । तोचि **भ**गवंत बोलतो ॥ ८२८ ॥

**'छिन्नद्वैधा यतात्मनः सर्वभूतहिते रताः ।'**

तुटोनि गेलें ज्याचें द्वैत । म्हणजे बाणलें अद्वैत । कीं गुरुमुखें ज्ञान होतां अत्यंत । यत्नशील बुद्धि ज्याची ॥ ८२९ ॥ ज्ञान जालियावरी ज्ञानियास । दृढ वैराग्य आणि दृढ अभ्यास । पाहिजे हाचि प्रयत्न त्यांस । हीं दोन्ही साधनें बरीं जयांचीं ॥ ८३० ॥ आणि सर्व भूतांचें जें हित । कीं तिहीं सन्मार्गीं वर्तावें निश्चित । या ऐशा सर्वभूतहितीं रत । म्हणजे ते जगदुद्धारक जगद्गुरु ॥ ८३१ ॥ ऐसेही जितांच जे ब्रह्मभूत । तेही ब्रह्मीं निर्वाण निश्चित । पावती होऊनि अत्यंत । क्षीणकल्मष म्हणजे क्षीण होतां प्रारब्ध ॥ ८३२ ॥ जे ऐसे ब्रह्मभूत जाले । ते जितांच ब्रह्म निर्वाणचि पावले । म्हणूनि या प्रकरणीं बोले । श्रीकृष्ण या तिसरिया श्लोकीं ॥ ८३३ ॥

**कामक्रोधवियुक्तानां यतीनां यतचेतसाम् ।**
**अभितो ब्रह्मनिर्वाणं वर्तते विदितात्मनाम् ॥ २६ ॥**

विदितात्मे म्हणिजे ज्यांला । आत्मा बरा विदित जाला । अगा **अर्जुना**! उभयत्र त्यांला । जितां मेलियाही ब्रह्म निर्वाण ॥ ८३४ ॥ जीवंत असो अथवा मरो गात्र । ब्रह्मीं निर्वाण त्यांस उभयत्र । कीं उपाधि उरला प्रारब्ध भोगायास मात्र । तोही ब्रह्मचि समजेल हा भाव ॥ ८३५ ॥ प्रारब्ध आणि त्याचा भोग ।

सुखदुःख आणि त्याचा संयोग । ब्रह्मचि सर्वेही हा अन्वयसमाधियोग । बाणणें नव्हे काय ब्रह्म निर्वाण ॥ ८३६ ॥ देह पडलियाउपरी । हेंही नसे म्हणोनि यापरी । देहत्यागाचे अवसरीं । ब्रह्मीं निर्वाण मागें बोलिलों ॥ ८३७ ॥ अगा! ब्रह्मचि आहे सकळ । परि त्यांत अविद्या दुःखमूळ । तें अज्ञान नाशलें जठरशूळ । ब्रह्मनिर्वाण त्याच समयीं ॥८३८॥ उत्तरार्ध ऐसा प्रसंगानुसार । वर्णिला आतां या प्रकरणाचा उपसंहार । म्हणजे या तीं श्लोकीं बोलिला प्रकार । जीवन्मुक्ति आणि मुक्ति दोहींचा तो संपतो. ॥ ८३९ ॥ प्रकरण आरंभतें एथूनी । कामक्रोधवेग सोसी तो वर्णिला जेथूनी । जे तैसे ते ऐसी सिद्धि पावती म्हणोनी । बोलतो आधीं या पूर्वार्धीं ॥ ८४० ॥ कीं कामक्रोधरहित । यति आणि यतचित्त । हे पूर्वार्धीं बोलोनि म्हणे अच्युत । उभयत्रही ब्रह्म निर्वाणचि असे त्याला. ॥ ८४१ ॥ कामक्रोधवर्जित । यावरूनि त्यास सुचवी अच्युत । कीं कामक्रोधवेग सोसूं शके तो सुखी अत्यंत । शरीरमोक्षणाहूनि पूर्वींच म्हणूनि जो वर्णिला. ॥ ८४२ ॥ कामक्रोध त्यागिले म्हणावें तरी । कीं त्यांचे वेग सोसूं शके जरी । कीं वेग दाविती अत्यंत परी । हा वश नव्हे तयांला. ॥ ८४३ ॥ अत एव देह सोडिल्यावरी । होणार मुक्तिसुख तें याचि शरीरीं । तो पावे म्हणूनि वर्णिला यापरी । जो सोसणार वेग कामक्रोधांचे. ॥ ८४४ ॥ त्यास मागें वर्णी अच्युत । कीं जितांचि तो ब्रह्मभूत । देहांतीं ब्रह्मनिर्वाण अत्यंत । तो पावतो सरतां प्रारब्ध. ॥ ८४५ ॥ या श्लोकीं ब्रह्म निर्वाण । म्हणे जितां मेलिया तैसियासी जाण । त्याचें आधीं वर्णिलें लक्षण । पूर्वार्धेंकरूनी. ॥ ८४६ ॥ कीं ऐसे ते कामक्रोधवर्जित । यति आणि यतचित्त । यतिशब्दें संन्यासी निश्चित । परि ते दों प्रकारींचे. ॥ ८४७ ॥ टाकूनि सर्व काम्यकर्म । होऊनि निष्काम निष्कर्म । जे अनुभवूनि निर्धर्म ब्रह्म । जाले ऐसे. ॥८४८॥ गार्हस्थ्यादि आश्रम असोनी । जो ऐसा जाला ज्ञानी । तो संन्यासी म्हणूनी । मागें वर्णिला पुढेंही वर्णील श्रीकृष्ण. ॥८४९॥ हा संन्यास नसतां । व्यर्थ भगवा संन्यास नुसता । हा अंतरीं असोनि तोही वरुता । असे तरी सोनें आणि तें सुगंध जैसें ॥८५०॥ याकारणें श्रीपती । म्हणे कीं जे ऐसे यती । त्यांस देह जितां मेलियाही मुक्ती । अगा अर्जुना! ॥ ८५१ ॥ एवं कामक्रोधवेग सोसी । न धरी विषयभोगाची असोसी । जे तैसे त्यांस सिद्धि ऐसी । हें प्रकरण एथवरी आणिलें. ॥ ८५२ ॥ एथें कोणी म्हणती । कीं ब्रह्मीं ऐसी बाणतां स्थिती । कामक्रोधवेगचि त्यास नसती । जितां मेलियाही ब्रह्म निर्वाण ज्याला. ॥८५३॥ तरी उदकरूपचित्त ।

नीच स्थळासि धांवे निश्चित । म्हणोनि म्हणे यतचित्त । ते अगा! ॥ ८९४ ॥ ऐसें आवरिलें चित्त । तें चित्त म्हणावें यत । त्यास उभयत्र ब्रह्म निर्वाण निश्चित । जे म्हणे कामक्रोधवर्जित यतचित्त. ॥८९५॥ तरीच कामक्रोधवर्जित । कीं जरी आहेत यतचित्त । यतचित्त म्हणोनि अत्यंत । वेग सोशी कामक्रोधांचे. ॥ ८९६ ॥ शस्त्रें आदळती शरीरीं । परी दृढ कवच असे त्यावरी । तो शूर तीं शस्त्रें सोसी यापरी । हे वेग सोसी जीवन्मुक्तही ॥ ८९७ ॥ जीवन्मुक्ताचें लक्षण । कीं तो वासनारहित विचक्षण । परी प्रारब्धभोगाकारणें त्रिगुण । असती कांडिल्या तांदुळासारिखे. ॥ ८९८ ॥ भोगास मात्र असती । देहांतरास कारण न होती । वासनारहित स्थिती । बाणे जयाला. ॥ ८९९ ॥ अग्नि शेकायाची वासना । उष्णकाळीं असेना । पाकार्थ ठेवितां हुताशना । करीच उष्णत्व ॥ ८६० ॥ प्रारब्धा कारणें काम । उरेच हा जरी आत्माराम । हा जरी अत्यंत निष्काम । वेग उठती तेव्हां तरी तयातें॰ ॥ ८६१ ॥ ते बाधा करूं न शकती तयास । म्हणोनि ते वेग सोसायास । न लागती जीवन्मुक्तास आयास । ब्रह्म निर्वाण उभयत्रही तयाला. ॥८६२॥ कामाचे वेग सोसिती जेथें । क्रोधाचे वेग नुठतीच तेथें । यालागीं समजावें ऐसें एथें । कीं काम सोसितां क्रोधही सोसिलाचि. ॥८६३ ॥ एवं अनादि वासना । ते ज्या ब्रह्मनिष्ठा असेना । जीवन्मुक्त त्या स्वसुखसंपन्ना । म्हणावें. ॥ ८६४ ॥ तथापि प्रारब्ध विचित्र । लिंगदेह भोगसाधन मात्र । असे भर्जित बीजरूपें सूक्ष्म गात्र । वासनेचें.॥८६५॥ यालागीं भोगूनिही भोग । सोशी कामक्रोधवेग । तो काम त्याचा मुक्तियोग । भंगूं शकेना. ॥८६६॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञ लोक । परिसोत आधीं. ॥ ८६७॥ मोक्ष नसे ज्ञानाविण । तें ज्ञान ज्यास त्यासी मुक्तपण । ऐसें वर्णी श्रीकृष्ण । एथवरी. ॥८६८॥ कोणी नसोनि आत्मज्ञान । वश करिती आपुलें मन । मोक्षाची इच्छा धरूनि साधन । करिती मनोजयाचें. ॥ ८६९ ॥ तेही मोक्षास अधिकारी । मुक्त जालेच म्हणावें परी । जाणोनि मातें मुक्ति खरी । पावतील म्हणतो या श्लोकीं. ॥ ८७० ॥

**स्पर्शान्कृत्वा बहिर्बाह्यांश्चक्षुश्चैवांतरे भ्रुवोः ।**
**प्राणापानौ समौ कृत्वा नासाभ्यंतरचारिणौ ॥ २७ ॥**
**यतेंद्रियमनोबुद्धिर्मुनिर्मोक्षपरायणः ।**
**विगतेच्छाभयक्रोधो यः सदा मुक्त एव सः ॥ २८ ॥**

या दों श्लोकीं साधनसमृद्धि । सांगोनि मागुतीं ज्ञानेंचि सिद्धी । म्हणोनि तिसऱ्या श्लोकीं ज्ञानप्रसिद्धी । बोलेल. ॥ ८७१ ॥ या श्लोकीं म्हणतो हरी । कीं

जो बाह्यविषय घालोनि बाहेरी। दृष्टि दोन्ही भोंवयांभीतरीं। स्थिर करी सम करोनि प्राणापानांतें. ॥ ८७२ ॥ आवरोनि मन बुद्धि इंद्रिय। बसे ज्यास मोक्ष परम आश्रय। इच्छा भय क्रोधादिरहित सदा होय। तोही मुक्तचि गा! ॥८७३॥ दों श्लोकीं अर्थ ऐसा। परी श्रोते म्हणती विशद कैसा। तरी बोलिजेल प्रकाश जैसा। बोलिला एथें या साधनाचा. ॥ ८७४ ॥ बाह्येंद्रियसमुदाय। बाह्यचि त्याचे विषय। परी अंतरीं आठवितां भंग होय। एकाग्रतेचा. ॥८७५॥ म्हणोनि बाह्यास घालोनि बाहेरी। म्हणजे न चिंती मनाभीतरीं। ऐसें करोनि दोन्ही डोळे अंतरीं। लावी दोहीं भोंवयांच्या. ॥ ८७६ ॥ भोंवयांवरी जें कपाळ। त्या दों भोंवयांचे अंतरीं जें मध्यस्थळ। तेथें चक्षुरिंद्रिय नेत्रयुगुल। लावूनि लक्षी आरंभ नासिकेचा तेथूनि. ॥ ८७७ ॥ तरीच तेथें थारती नयन। कीं जरी दृष्टीसवें थारे मन। तरी मन थारे कीं चिंतन। बाह्य विषयांचें घडेना. ॥८७८॥ तथापि मन असे प्राणाधीन। कीं प्राणघोषें परा उठतां चिंतन। पश्यंती सूक्ष्मरूपें करी ध्यान। विषयाचें. ॥ ८७९ ॥ यालागीं नासापुटांचे अंतरीं। प्राण अपान खालवरी। संचरती तोंवरीं। मन न थारे दृष्टीसह भ्रूयुगांत. ॥ ८८० ॥ तरी प्राणापान सम करूनी। म्हणजे पूरकरेचकावांचूनी। मूळाधारीं उगाच कुंभक धरूनी। भोंवयांत योजी दृष्टीतें. ॥ ८८१ ॥ दृष्टीसवें तेव्हां मन। थोर न करी विषयचिंतन। परी त्या मनाचें होय शोधन। तरीच थोर. ॥ ८८२ ॥ इच्छा भय क्रोध। या दोषींच मन अशुद्ध। हे टाकितां होय शुद्ध। तेव्हां थारे मन तें. ॥ ८८३ ॥ तरी हींही साधनें घडलीं तयाला। मोक्ष अपेक्षित ज्यास जाला। अतएव परम आश्रय जयाला। एकला मोक्ष वाटतो. ॥ ८८४ ॥ सदा जो कां मौनी। ऐसा मुमुक्षु मुनी। अगा! तो मुक्त म्हणोनी।. मानावा. ॥ ८८५ ॥ कीं साधनीं ऐसिया शुद्ध जाला। ज्ञान होणारचि त्याला। तो जाणोनिया मला। मुक्त पावेल. ॥ ८८६ ॥ या पुढलिया श्लोकीं हरी। बोलेल ऐशियापरी। परी या दों श्लोकांभीतरीं। लक्षवादी नाचती अत्यंत. ॥ ८८७ ॥ तें ब्रह्म नव्हे त्यांचें लक्ष। जे नेत्र देखती प्रत्यक्ष। हा त्यांचा खंडोनि पाखंड पक्ष। मग त्यापुढील श्लोक वाखाणूं. ॥ ८८८ ॥ या श्लोकीं म्हणे हरी। कीं चक्षु दों भोंवयांअंतरीं। लावूनि जो मोक्षपरायण यापरी। तो मुक्तचि. ॥८८९॥ नेत्र दोनी भोंवयांत। लावी म्हणतां हें प्रकारांतरें अत्यंत। आपल्या लक्षास मानिती विहित। प्रमाण तें. ॥ ८९० ॥ कीं ते नेत्र झांकिती। आणि बुबुळें उफराटीं करिती। ते भोंवयांचें अंतर मानिती। तेज लक्षिती बुबुळांचें.

॥ ८९१ ॥ लिंगदेहीं इंद्रियें असती । तीं स्थूळ देहीं गोळकीं वसती । त्यां चक्षुरिंद्रियास गवसती । ज्योतिविकार बुबुळांचे. ॥ ८९२ ॥ कोणास चं दिसती । कोणास नक्षत्रांचे घोंस भासती । कोणास उगीच दिसे ज्योती हिरवी पिंवळी निळी आरक्त शुभ्र. ॥८९३॥ तेंच म्हणती ब्रह्म शुद्ध । आपण ब्रह्मदर्शी प्रबुद्ध । त्या लक्षास लक्षिती मानती सिद्ध । मोक्ष आपणातें. ॥८९४॥ त्यांस चक्षु भोंवयांत । म्हणतां वाटे प्रमाण अत्यंत । आणि **'स मुक्त एव'** म्हणे अच्युत । तरी मोक्ष या लक्षें मानिती आपणा. ॥ ८९५ ॥ हेंच प्रमाण जरी । ब्रह्म इंद्रियगम्य मानावें तरी । तेव्हां आपल्या वचनास आपण हरी । विरुद्ध बोलतो म्हणावें. ॥ ८९६ ॥ बुद्धिग्राह्य तें सुख निश्चित । आणि इंद्रियां अगम्य इंद्रियातीत । ऐसें षष्ठाध्यायांत । अच्युत बोलेल. ॥ ८९७ ॥

षष्ठाध्यायश्लोकार्ध—**सुखमात्यंतिकं यत्तद्बुद्धिग्राह्यमतींद्रियम् ।**

टीका—तें बुद्धिग्राह्य सुख अर्जुना ! । अतींद्रिय म्हणजे इंद्रियातीत बुद्धीविना । सर्वथा इंद्रियां दिसेना । बुद्धीनेंच ध्यावें तें सुख. ॥ ८९८ ॥ तेज लक्ष डोळां दिसे । तें ब्रह्म संत मानिती कैसें । जे लक्षवादी ऐसे । ते चुकले पंथ मोक्षाचा. ॥ ८९९ ॥ इंद्रियांतें ब्रह्म न दिसे । तें बुद्धीसचि गम्य असे । सर्वत्र वेदीं घोष ऐसे । श्रुतीचे. ॥ ९०० ॥

श्रुति—**न संदृशे तिष्ठति रूपमस्य न चक्षुषा पश्यति कश्चिदेनम् ।**
**हृदा मनीषा मनसाभिक्लृप्तो य एनं विदुस्तेअमृता भवन्ति ॥**

श्रुत्यर्थ—दृष्टीस रूप दिसे । यास रूप न असे । चक्षू करूनि पाहात नसे । कोणी यातें ॥ ९०१ ॥ हृदयेंकरूनीच कळे । मनीषायुक्त मन त्यातेंचि आकळे । मनीषा बुद्धि तीस जें कळे । त्या मनेंचि जाणावें ब्रह्म तें. ॥९०२॥ हृदयशब्दें अंतःकरण । चित्त बुद्धि मन तीं परी त्याचें स्फुरण । या चहूंचें पाहतां विवरण । एक शुद्ध सत्त्व. ॥ ९०३ ॥ एवं सत्त्वें ब्रह्म पाहावें । त्यानें तदाकार होऊनि राहावें । अंतःकरण चित्त बुद्धि मन म्हणावें । त्याच शुद्धसत्त्वास. ॥ ९०४ ॥ म्हणूनि मनें पाहावें म्हणती । बुद्धीस दिसतें ऐशाही श्रुती । एवं शुद्ध सत्त्वास साक्षात्कारस्थिति । इंद्रियां अगम्य. ॥ ९०५ ॥ सर्वज्ञ ईश्वर अनादी । त्याचीं अनादि वचनें त्या वेदीं । डोळां तेथें न पावे ऐसें उपपादी । सर्वज्ञ ईश्वर याचिकरितां. ॥ ९०६ ॥ कीं बुबुळाचिया ज्योती । पातीं झांकूनि लक्षितां चक्षूसि दिसती । कीं चक्षुरिंद्रियाची वसती । दोहीं बुबुळांत. ॥९०७॥

तेंचि ब्रह्म ऐसें ज्ञणीं । पाखंड मार्ग काढिती कोणी । म्हणूनि सर्वज्ञ ईश्वराची ऐसी वाणी । कीं चक्षु तेथें न पावे ॥ ९०८ ॥

श्रुति—**न तत्र चक्षुर्गच्छति ।**

श्रुत्यर्थ—त्या ब्रह्मीं म्हणे श्रुती । कीं चक्षुर्न गच्छति । म्हणिजे डोळा न पावे त्या वस्तूंत ये रीती । श्रुति हांका मारिते. ॥ ९०९ ॥ कोणी ऐसेंही म्हणती । कीं ज्योतीस पाहते स्वयें तेचि ज्योती । नेत्र तेथें कोठें असती । असे तेज मात्र. ॥ ९१० ॥ तरी राजदंडबळें । ज्याचीं काढिलीं असती बुबुळें । त्यास त्या बुबुळांवेगळें । ब्रह्म तें कां हो! दिसेना? ॥९११॥ मिळोनि पाखंडी चावट । हेंचि ब्रह्म म्हणूनि आडवाट । ज्ञानमार्गीं दावूनि अचाट । गुरुत्व संतपण मिरवती. ॥ ९१२ ॥ ब्रह्म नव्हे ज्योती । ब्रह्म न दिसे डोळ्यांप्रती । असो हे पाखंडमतरीती । पुढें विश्वरूपाध्यायांत खंडेल. ॥ ९१३ ॥ सहस्र सूर्याच्या ज्योती । विश्वरूपीं अर्जुनास दिसती । तें साकाररूप त्यास म्हणती । निर्गुण ब्रह्म ज्योतिस्वरूप. ॥ ९१४ ॥ विश्वरूप एकसरें । पहावें अर्जुनें सारें । म्हणूनि दिव्यचक्षु सर्वेश्वरें । दिधले त्यास. ॥ ९१५ ॥ मग तेजोरूप चराचर । दाखवी त्यास सर्वेश्वर । त्यास म्हणती हे मूर्खतर । कीं तेज नेत्रीं तेंच दिव्य चक्षु. ॥ ९१६ ॥ तरी साकार मूर्ति । विकराळ जिव्हा मुखें ज्यांत दिसती । ते निर्गुण ब्रह्मसत्ता असती । तरी हे वेडी गोष्टीही साजती कांहीं. ॥ ९१७ ॥ आतां या प्रस्तुत दों श्लोकीं । उत्तमश्लोक बोलिला कीं । तो मुक्तचि जो भ्रूयुगुळतटाकीं । दृष्टि योजी इच्छाभयक्रोधरहित ॥ ९१८ ॥ राजद्वारा जावया योग्य । जाला तो पावलाचि भाग्य । हा भाव नेणोनि बोलती अयोग्य । कीं मुक्ति याच साधनें. ॥९१९ ॥ **'ज्ञानादेव हि कैवल्यं'** म्हणोनी । या ब्रह्मसूत्रेंकरूनी । हा सिद्धांत असतां आत्मज्ञानावांचूनी । मुक्त नव्हे ऐशा साधनाच्या कोटीनें. ॥ ९२० ॥ ऐसें असोनि लक्षवादी जन । म्हणती भोंवयांत उफराटे करितां नयन । दिसतें तेज ब्रह्म तेंचि ज्ञान । तरी तो मुक्तचि म्हणतो श्रीकृष्ण हें सत्य. ॥ ९२१ ॥ ते ऐसें बोलती । त्यांस विरुद्ध गीता पुराणें श्रुती । परी ज्ञणीं त्यांच्या बोलें मोहती । प्रमाण दावितां हें भगवद्वाक्य ॥ ९२२ ॥ यालागीं म्हणतो कमलनयन । कीं ऐसें करूनिही साधन । तदनंतर पावोनि माझें ज्ञान । मुक्ति पावेल ऐसें या श्लोकीं ॥९२३॥

**भोक्तारं यज्ञतपसां सर्वलोकमहेश्वरम् ।**
**सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शांतिमृच्छति ॥ २९ ॥**

अगा! तो आत्मत्वें जाणोनि मातें। पावेल शांतीतें। कीं जडावेगळें जाणोनि त्या जडातें। स्वात्मत्वें देखतां कैंची अशांति. ॥ ९२४ ॥ अर्जुना! शांतीस हेंचि मूळ। कीं मी जो सर्वभूतसुहृद केवळ। तोचि मी त्याचाहि आत्मा निष्कळ। या ज्ञानें शांति पावतो. ॥ ९२५ ॥ ज्याच्याठायीं सुष्ठु शोभन हृदय। तोचि सुहृद हाचि निश्चय। तरी आपलाला आत्मा अव्यय। आवडे निर्निमित्त सर्वांस. ॥ ९२६ ॥ न कळोनि आत्मा आपुला। तो देह म्हणोनि देहही प्रिय वाटला। स्त्रीधनादि पाहिजे त्याला। म्हणोनि तींही सुहृदें वाटती. ॥ ९२७ ॥ सुहृद वाटे देह। म्हणोनि देहाच्या सुहृदांचा स्नेह। तो देह अप्रिय होय निःसंदेह। त्या सुहृदा आत्मयाकारणें. ॥ ९२८ ॥ हातास घाय लागला। तो कापून तळितां वांचणें याला। तेव्हां त्या हातावरी उदार झाला। प्रीति धरूनि आत्मया सुहृदाची. ॥ ९२९ ॥ समग्रदेहीं दुःखसंयोग। तेव्हां आरंभितो देहत्याग। ऐसा काढितां माग। सुहृद एक आत्मा आपुला. ॥ ९३० ॥ मी सर्वभूतांचा सुहृद। म्हणोनि म्हणे गोविंद। त्याचा अर्थ ऐसा नव्हतां मुकुंद। सुहृद वाटतो कवणासी. ॥ ९३१ ॥ कृष्णास प्रीति सर्वभूतीं। म्हणोनि बोलावा अर्थ ये रीती। तरी सर्वभूतांचा मी सुहृद म्हणे श्रीपती। तेव्हां भूतांस याची प्रीति बोलावी. ॥ ९३२ ॥ ते आत्मत्वावेगळी। भगवत्प्रीतिच निराळी। न दिसे कोणास कोणे काळीं। भेदें अर्थ हा साधेना. ॥ ९३३ ॥ जे भेदें भजतीही तयाला। त्यांसही सुहृद आत्माच आपला। कीं आपल्या कल्याणाकारणें या घननीळा। ते भजती. ॥ ९३४ ॥ आपल्या सुखाकारणें नृपती। अतिप्रीतीनें जैसे भजती। तैसी भुक्ति मुक्ति आपणा व्हावी म्हणोनि प्रीती। भेदवादिया ईश्वराची. ॥ ९३५ ॥ एवं मुख्य सुहृद। आपला आत्मा तदर्थ मुकुंद। सुहृद वाटला तेव्हां गोविंद। नव्हे सुहृद कीं सुहृद आत्माच आपला. ॥ ९३६ ॥ तरी तोचि आत्मा गोविंद। तरीच मी सर्वभूतांचा सुहृद। म्हणोनि मुक्तिप्रद मुकुंद। स्वमुखें ऐसें बोले ये स्थळीं. ॥ ९३७ ॥ सर्वभूत सुहृद त्या मातें। जाणे म्हणजे स्व-आत्मयातें। जाणोनि मग पावतो शांतीतें। पूर्वश्लोकद्वयोक्त साधक. ॥ ९३८ ॥ एवं मुक्ति तेव्हां जेव्हां ज्ञान। ज्ञान तें कीं ज्याणें नासे अज्ञान। अज्ञान तें कीं आपणास आपण जन। न जाणती. ॥ ९३९ ॥ आपणास आपण। जाणोनि तो पूर्वोक्त साधक शांतपण। पावतो म्हणे कमलेक्षण। शांतपणेंचि मुक्ति असतां शरीर. ॥ ९४० ॥ तो सर्वभूतसुहृदा तुजला। आपल्या केवळ साधनबळेंचि पावला। किंवा तुझा प्रसाद होतां त्याला। सर्वभूतसुहृद तूं कळलासी.

॥ ९४१ ॥ ऐसें पुसेल अर्जुन । म्हणोनि कमलनयन । पूर्वार्धीं हेंचि शेष-शयन । आपल्या विशेषणीं सूचवितो. ॥ ९४२ ॥ कीं भोक्ता यज्ञतपांचा । सर्वांभूतांचा मी महेश्वर साचा । तोचि मी सुहृद आत्मा ज्याचा । त्या मातें जाणोनि शांति पावतो. ॥ ९४३ ॥ यज्ञतपाचा भोक्ता मी यावरूनी । सुचविलें कीं मत्प्रीत्यर्थ यज्ञतपेंकरूनी । मातें सुहृदा आत्मयातें जाणूनी । शांति पावतो. ॥ ९४४ ॥ मज समर्पाया कर्म केलें । तदर्थचि मन माझें भुकेलें । यज्ञतपांचें भोक्तृत्व आलें । मज यास्तव. ॥ ९४५ ॥ पत्र पुष्प फळ पाणी । भक्तीनें अर्पिलें तें मी चक्रपाणी । भक्षितों म्हणोनि स्ववाणी । पुढें ऐसी बोलेल. ॥ ९४६ ॥ आणि सर्वभूतमहेश्वर । या पदें आपण सर्वेश्वर । मुक्तिप्रद आपणाहूनि इतर । नाहीं ऐसा भावार्थ. ॥ ९४७ ॥ कीं जे देव इतर । तेही म्हणावे ईश्वर । परी त्यांसहित सर्वभूतमहेश्वर । आपण आत्मा सुहृद सर्वां भूतांचा. ॥ ९४८ ॥ एवं ज्ञानावांचूनि न घडे मुक्ति । तें तेव्हां कीं जेव्हां ईश्वरप्रसादाभिव्यक्ति । तो प्रसाद होय करितां भक्ति । सर्वेश्वराची. ॥ ९४९ ॥ त्यांत जें आत्मज्ञान । तेंचि म्हणावें जीवेश्वरैक्यज्ञान । आणि मुक्तिप्रद ईश शेषशयन । स्वयें ईश्वरेश्वर श्रीकृष्ण. ॥ ९५० ॥ या पंचमाध्यायाचे अंतीं । या श्लोकें श्रीपती । हा सिद्धांत करी त्याच्या पदाची प्रीती । वामन म्हणे मज असो अखंड. ॥ ९५१ ॥

न प्रेरकः सुकृतदुष्कृतयोर्जनस्य कृष्णः समश्च सदयश्च सखार्जुनस्य ।
बुद्धिप्रदः स च पदांबुजयोर्न तस्य कल्पद्रुमो विषमताप्युभयोर्नतस्य ॥

---

## अध्याय सहावा.

जयजय योगेश्वर । जयजयाशेषयोगकलेवर । जयजय आत्मयोगविद्यागुरुवर । जगद्गुरो ! ॥१॥ जयजय चिदात्मयोगैकमात्र । जयजय सर्वात्मयोगगात्र । जयजय शतपत्रनेत्र । पवित्रकीर्ते ! ॥२॥ जयजय कल्याणकृत्कल्याणमार्ग । जयजय सुमंगलस्वर्गापवर्ग । जयजय परिहृन्मंन उपसर्ग । त्रैलोक्यनाथ ! ॥३॥ जयजय करुणासागर । जयजय भवमूलसंहार । जयजय योगेंद्रसंमत योगेश्वर । हरे ! ॥ ४ ॥ जयजय मंगलायतन । जयजय श्रीनिकेतन । जयजय नित्यनूतन । प्रियतम परम परमप्रियात्मन् ! ॥ ५ ॥ जयजय निर्विकार । जयजय भगवद्गीताकार । जयजय टीकाकार वामनाकार । जगदलंकारकनक ब्रह्मजनक ! ॥ ६ ॥ आतां अजी शेषपर्यंका ! । स्मरोनि तूतें श्रीवत्सांका ! । षष्ठाध्यायटीका । आरंभितों.

॥ ७ ॥ पूर्वाध्यायांत आरंभींच अर्जुन । करिता जाला ऐसा प्रश्न । कीं संन्यास आणि कर्म या दोहींमधून । जें श्रेयस्कर तेंचि एक सांग मजलागीं. ॥ ८ ॥ श्रीकृष्णें दीधलें उत्तर । कीं मोक्षार्थी जो चतुर । त्या मुमुक्षूस दोन्ही श्रेयस्कर । संन्यास आणि कर्महो. ॥ ९ ॥ तत्रापि दोहींमधूनी । कर्मत्यागरूप संन्यासा-हूनी । कर्मयोग थोर म्हणोनी । बोलिला श्रीकृष्ण. ॥ १० ॥ कीं संन्यासें कर्मयोगाचें लक्षण । न सांपडे आणि कर्मयोगीं संन्यासपण । साधे म्हणोनि आपण । बोलिला श्रीकृष्ण स्ववाचा. ॥ ११ ॥ **'ज्ञेयः स नित्यं संन्यासी'** । या श्लोकीं अर्जुनासी । संन्यासत्व कर्मयोगियासी । सिद्ध करूनि बोलिला. ॥ १२ ॥ कीं संन्यासी तोचि नर । जो इच्छाद्वेषवर्जित निरंतर । आणि निर्द्वंद्व तो सत्वर । बंधापासूनि सुटतो अनायासें. ॥ १३ ॥ तो जाणावा संन्यासी । म्हणिजे संन्यासत्व कर्मयोगियासी । ये रीती साधे ऐसी । गोष्टी पोटीं हरीच्या. ॥ १४ ॥ परंतु शब्दाची इतकीच रचना । कीं संन्यासीच तो जाणावा अर्जुना! । कीं न स्पर्शती ज्याच्या मना । इच्छाद्वेषद्वंद्वें हें कांहीं. ॥ १५ ॥ परंतु कर्मयोगिया तेंचि वैभव । हा न समजला पोटांतील भाव । तों त्याचे आणीक संदेह देव । निरसिता जाला जे या प्रसंगीं उपजले. ॥ १६ ॥ कीं सांख्य योग मार्ग दोन्ही । परी एक एकावांचूनी । सिद्धि देती म्हणोनी । कर्म आणि संन्यास ऐसे न म्हणावे. ॥१७॥ संन्यास तो महाबाहो अगा! । असाध्य बहु न करितां कर्मयोगा । कर्मयोगें युक्त त्या निःसंगा । ब्रह्मप्राप्ति अतिसत्वर. ॥ १८ ॥ तो कर्मयोगाचा कर्ता । ज्ञानदृष्टीं होतो अकर्ता । या प्रसंगें अकर्तृ-त्ववार्ता । वाढली. ॥ १९ ॥ त्या प्रसंगें ईश्वर कांहीं । कोणाहातीं करवीत नाहीं । इत्यादि प्रसंग आणीक ही । अध्यायांतपर्यंत चालिले. ॥ २० ॥ परंतु कर्मयोगियास । कर्मीच साधे कर्मत्यागसंन्यास । हा भाव बरवा अर्जुनास । समजला नाहीं. ॥ २१ ॥ म्हणूनि आरंभितो षष्ठाध्याय । यांत आरंभीं हेंचि प्रमेय । बोलेल तें श्लोकद्वय । प्रथम बोलतो भगवंत. ॥ २२ ॥

श्रीभगवानुवाच—**अनाश्रितः कर्मफलं कार्यं कर्म करोति यः ।**
**स संन्यासी च योगी च न निरग्निर्न चाक्रियः ॥ १ ॥**

श्रीभगवान् षड्गुण । अर्जुनातें म्हणतो आपण । कीं तोचि संन्यासी तोचि कर्मयोगी निपुण । जो करी निष्काम नित्य कर्म. ॥ २३ ॥ कर्मफळ मज हो म्हणोनी । हा कर्मफळाश्रय नसे जयाच्या मनीं । कर्मत्याग यावरूनी । सूचवी त्याचा श्रीकृष्ण. ॥ २४ ॥ कीं ज्यास काम्यफळाचा आश्रय । तो काम्य

करीच हा निश्चय । जो न अपेक्षी फळ किमपि तो होय । काम्य टाकितां संन्यासीच. ॥ २५ ॥ यालागीं तोचि संन्यासी । काम्यकर्मत्याग घडला जयासी । आणि तोचि कर्मयोगी कीं त्यासी । साधे निष्काम कर्मयोग. ॥ २६ ॥ नसोनि आश्रमसंन्यास । संन्यास साधला कर्मयोगियास । कीं काम्यकर्मत्याग जयास । साधला. ॥ २७ ॥ न करी अग्निसाध्य कर्म । तो निरग्नि संन्यासाश्रम । अतिश्रेष्ठ परि जरि नसे काम । आणि काम्यकर्में करीना. ॥ २८ ॥ तो संन्यासाश्रम । या काम्यत्यागसंन्यासावीण वृथाश्रम । कीं न तुटे अविद्याभ्रम । त्याच संन्यासें. ॥ २९ ॥ त्या आश्रमसंन्यासाविण । काम्यत्यागी कर्मयोगी निपुण । लाधोनि संन्यासपण । ब्रह्म पावे उपदेशें गुरूच्या. ॥ ३० ॥ एवं जेथें काम्यत्याग । तेथेंचि संन्यासयोग । त्यावांचोनि निरग्निसंन्यास सोंग । न तो संन्यासी न कर्मयोगी ही. ॥ ३१ ॥ कीं मन असे सकाम । तों नव्हेचि संन्यासाश्रम । आणि कर्मयोग ही नव्हे कीं यज्ञादिकर्म । न करवे निरग्निसंन्यासियास. ॥३२॥ एवं नसे कर्मफळाश्रय । तोचि संन्यासी हा निश्चय । आणि तोचि कर्मयोगी कीं नव्हे अक्रिय । करितो क्रिया नित्य वेदोक्त. ॥ ३३ ॥ टाकूनिही काम्यकर्म । जरी न आचरे नित्यकर्मस्वधर्म । तो अक्रिय म्हणावा अधम । त्यासही नसती पदें हीं दोन्ही. ॥ ३४ ॥ कीं अंतरीं काम्यत्याग । बाहेरी आश्रमसंन्यासयोग । त्यास न घडे पापसंयोग । नित्यकर्म गार्हस्थ्यधर्म टाकितां. ॥ ३५ ॥ टाकूनि काम्य निष्काम । जाला तरी असे गृहस्थाश्रम । तो न करितां विहित नित्यकर्म । प्रत्यवायें जाय नरकातें. ॥ ३६ ॥ नरक साधे जया । कैंचा संन्यास अक्रिया तया । आणि नित्यकर्मत्यागें जया । न साधला कर्मयोगही. ॥ ३७ ॥ ऐसा जो अक्रिय । तो केंवि संन्यासी अथवा कर्मयोगी होय । म्हणोनि कृष्ण म्हणे कीं न चाक्रिय । कीं अक्रिय न संन्यासी न कर्मयोगीही. ॥ ३८ ॥ एवं काम्य टाकूनि निष्काम । आणि करी नित्य विहितकर्म । तोचि संन्यासी तोचि कर्मयोगी परम । न निरग्नि अथवा नव्हे ऐसा अक्रिय. ॥३९॥ श्लोकाचा अर्थ ये रीती । परि एथें टीकाकार जे स्वयें यती । ते आश्रमाभिमानें वाखाणिती । आश्रमसंन्यासनिंदा परिहरूनी. ॥ ४० ॥ निरग्नि आणि अक्रिय । एकाचेंचि विशेषणद्वय । वाखाणिती कीं ज्ञणीं प्रगट होय । निंदा आश्रमसंन्यासाची. ॥ ४१ ॥ निरग्नि म्हणिजे जो गृहस्थ नर । अग्निसाध्य यज्ञादिक्रियापसर । न करी आणि अग्नीवांचूनि कर्मप्रकार । तोही टाकितो तो अक्रिय म्हणावा. ॥ ४२ ॥ एवं द्विप्रकार कर्मविशेष । टाकितो जो पुरुष ।

तो न संन्यासी न कर्मयोगी ऐसा घोष । या श्लोकटीकेचा ते करिती. ॥४३॥ परंतु म्हणतां अक्रिय । कर्मत्यागप्रकारद्वय । साधतां निरग्नि कैसा न होय । त्यावेगळा. ॥ ४४ ॥ अग्निमुखीं आहुति पडती । या कर्मासही क्रियाच म्हणती । आणि अग्नीवांचूनि संध्यादिक घडती । क्रियाच म्हणावें त्यांसही. ॥ ४५ ॥ हा क्रियाप्रकारद्वय । जो टाकीतसे तो अक्रिय । जरी ऐसा अर्थ सिद्ध न होय । तरी निरग्निशब्दें संन्यासी न बोलावा.॥ ४६ ॥ निरग्निशब्दाचा अर्थ । संन्यासी म्हणूनि येथें किमर्थ । वाखाणावा म्हणाल तरी संन्यास व्यर्थ । सकामाचा होय कीं नव्हे हें सांगा. ॥ ४७ ॥ दोरी यज्ञोपवीताची तोडिली । मस्तक शिखाही बोडिली । मनीं काम्याची गोडी असे जोडिली । तो संन्यासी कैसा म्हणाल ? ॥ ४८ ॥ कर्म फळाचा आश्रित । आणि चतुर्थाश्रम घेतला निश्चित । या प्रसंगीं त्यास भगवंत । न निंदी कैसा. ॥ ४९ ॥ कीं बाह्यसंन्यासवर्जित । आणि कर्मफळीं अनाश्रित । तो तेव्हां तद्विपरीत । हा संन्यासी. ॥ ५० ॥ एवं गृहस्थही कर्मफळीं अनाश्रित । तोचि संन्यासी निश्चित । तेव्हां संन्यासी काम्यफलासक्त । निंद्य ऐसें तो संमत तुम्हांस ही. ॥ ५१ ॥ तो हरीनें निंदिला । तुम्हीं कां हो ! अंगीकारिला ? । येथें निरग्निशब्दें पाहिजे बोलिला । संन्यासी आणि सकाम जो निंद्य. ॥ ५२ ॥ येथें कोणी म्हणती । कीं जो जाला यती । तो निरग्नि त्यास कोणे रीती । काम्य घडे ? ॥ ५३ ॥ तरी वैराग्यें जिज्ञासु जाला । आणि ज्ञानाकारणें संन्यास घेतला । तो आंत बाहेर ही बोलिला । संन्यासी अतिशुद्ध. ॥ ५४ ॥ त्यास निंदील कां हरी ? । निंद्य संन्यासी तो जो यापरी । कीं संन्यास घेऊनि ही करी । इतरदेवतामंत्रजप. ॥ ५५ ॥ जाणे जारण मारण । तेचि मंत्र उपदेशूनि शिष्यगण । मेळवूनि मूढदृष्टी आपण । म्हणवी परम संन्यासी. ॥ ५६ ॥ तो निरग्नि जाला । परी काम्यमंत्र जपों लागला । इत्यादि अर्थ सूचवूनि निंदिला । निरग्नि संन्यासी ये स्थळीं. ॥ ५७ ॥ कीं तो नव्हे संन्यासी । कीं काम्य वसे मानसीं । कीं वृथा गार्हस्थ्यपणासी । त्याणें टाकिलें. ॥ ५८ ॥ जरी गृहस्थ असता । पंचयज्ञादि कर्मे करिता । ऋणत्रयापासूनि सुटता । तदभावें नव्हे कर्मयोगीही तो. ॥ ५९ ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञ लोक । परिसोत आधीं. ॥ ६० ॥ जो निष्काम कर्मयोगी । संन्यासी आणि कर्मयोगी त्याचि लागीं । म्हणावें ऐसें महायोगी । बोलिला पूर्वश्लोकीं

श्रीकृष्ण. ॥ ६१ ॥ तों अर्जुनास संदेह ऊठिले । कीं संन्यास कर्मयोग मार्ग वेगळाले । ते दोन्ही मार्ग कैसे साधले । एकासचि एके समयीं. ॥ ६२ ॥ हे शंका अर्जुनाचे मनीं । तोंचि बोलतो सर्वसाक्षी जाणोनि । संन्यास कर्मयोग एकचि म्हणोनी । बोलतो आतां या श्लोकीं. ॥ ६३ ॥

**यं संन्यासमिति प्राहुर्योगं तं विद्धि पांडव ।**
**न ह्यसंन्यस्तसंकल्पो योगी भवति कश्चन ॥ २ ॥**

अगा! संन्यास म्हणती जयास । कर्मयोगही जाण तूं तयास । कीं जो नाहीं संन्यास । तों कर्मयोगी नव्हे कोणीही. ॥ ६४ ॥ जोंवरी हृदयीं कामना । तोंवरी फळसंकल्प न तुटती मना । ते संकल्प असतां घडेना । निष्काम कर्मयोगीपण. ॥ ६५ ॥ आणि फलसंकल्पत्याग । काम्यत्यागेंचि घडे तो संन्यासयोग । संन्यासांत त्यांत करी निःसंग । नित्य कर्में तेव्हां तो कर्मयोग सिद्ध होतो. ॥६६॥ म्हणोनि जयास । अगा! म्हणावें संन्यास । कर्मयोग ही तयास । जाण तूं गा! ॥ ६७ ॥ कीं जों न सिजे अन्न । तों न घडे भोजन । हे गोष्टी तों सर्वजन । जाणतीच कीं. ॥ ६८ ॥ एक त्या अन्नाचें सिजवणें । एक त्याचें जेवणें । ऐसें असोनि ही वेगळेपणें । दोन्ही एक. ॥ ६९ ॥ कीं अन्ननिष्पत्तीविण । न घडे कदापि जेवण । तैसें न साधतां काम्यत्यागलक्षण । न घडे निष्काम कर्मयोग. ॥ ७० ॥ आणि भोजनाच्या अपेक्षेविण । न घडे अन्न सिद्ध करणें । तैसें काम्यत्याग संन्यासलक्षण । निष्काम कर्मयोगार्थ.॥७१॥ एवं काम्यही त्यागी । आणि न प्रवर्ते निष्कामकर्मयोगीं । तो अक्रिय याचि लागीं । निंदिला सकाम जैसा निरग्नी. ॥ ७२ ॥ कीं सिद्ध करुनि अन्न । जो न करी भोजन । तैसा काम्य त्यागूनि ही न करी भजन । नित्य कर्मार्पणें ईश्वराचें. ॥ ७३ ॥ भोजनाकारणें अन्न । सिद्ध करुनि करी भोजन । तैसा काम्य त्यागूनि सज्जन । नित्य कर्म आचरे. ॥७४॥ त्यासही अन्नसिद्धीविना । भोजनक्रिया घडेना । त्याच्या अन्ना आणि भोजना । नसे भिन्नत्व. ॥ ७५ ॥ या भावें म्हणे श्रीहरी । कीं संन्यास कर्मयोग भिन्न ही परी । एकचि कीं संकल्पत्यागसंन्यास जरी । तरीच कर्मयोगी तो होय. ॥ ७६ ॥ आतां कर्मयोग कोण काळवरी । करावा तो अवधि श्रीहरी । बोलों पाहतो याउपरी । या श्लोकें. ॥ ७७ ॥

**आरुरुक्षोर्मुनेर्योगं कर्म कारणमुच्यते ।**
**योगारूढस्य तस्यैव शमः कारणमुच्यते ॥ ३ ॥**

अगा! आत्मयोगावरी । आरूढ नसे जाला तोंवरी । आरूढ होऊं इच्छितो परी । आरूढ नसे तो आरुरुक्षु जाणावा ॥ ७८ ॥ ऐसा आरुरुक्षु मुनी । श्रवण करूनि जो आहे मननीं । त्याला कर्मेंचि करूनी । प्राप्त होते आरूढता. ॥ ७९ ॥ यालागीं आरुरुक्षु मुनी । त्यास कर्मचि कारण बोलिजे तें म्हणोनी । श्रीकृष्ण या पूर्वार्धेंकरूनी । बोलता जाला. ॥ ८० ॥ आतां तोचि योगारूढ जाला । तेव्हां त्याच योगारूढाला । शमचि कारण बोलिला । श्लोकाच्या उत्तरार्धेंकरूनी. ॥ ८१ ॥ इतकाच या श्लोकाचा अर्थ । परी याचा भावार्थ । न बोलतां साधनक्रम यथार्थ । न उपजे मनासी. ॥ ८२ ॥ आत्मा गुरुमुखें कळला । आणि योग नाहीं बाणला । तोंचि कर्मयोग ज्याणें टाकिला । योगसिद्धि न घडे तयासी. ॥ ८३ ॥ तो होय शब्दज्ञानी । असत असतां होतो ज्ञानाभिमानी । कीं चित्त विषयासक्त आणि मानी । मी ज्ञानी म्हणोनि जों. ॥ ८४ ॥ त्याणें करावें कर्म । कर्मीं पहावें ब्रह्म । अनुष्ठूनि यम नियम । करावा अभ्यास. ॥ ८५ ॥ व्यतिरेकें आत्मत्व कळलें जैसें । चित्तही जालें पाहिजे तैसें । सिंधु सलिल समरसें । सैंधवखडा जे रीती. ॥ ८६ ॥ चिद्रूपता चित्तास न बाणे । तोंवरी शब्दज्ञानींच तो जरी आत्मा जाणे । याकारणें मुमुक्षु शाहणे । यत्न करिती योगसिद्धींचा. ॥ ८७ ॥ योग न बाणे जोंवरी । योगारूढ न म्हणावें तोंवरी । तो आत्मज्ञ आरुरुक्षु जरी । यत्न करी योगसिद्धीचा. ॥ ८८ ॥ त्यास कारण कर्म । यमनियमादि आणि स्वधर्म । चित्त होऊं लागे ब्रह्म । तोचि योगारूढ तेव्हां बोलावा. ॥ ८९ ॥ चित्तचैतन्यसंयोग । आयता असे तोचि योग । परी चित्तास जडत्वाचा वियोग । होतां योग आयता. ॥ ९० ॥ त्यांत निर्विकल्प योग । ऐसा कीं जडवृत्तीचा सर्वथा वियोग । तेव्हां आयता चित्तचैतन्ययोग । तें चित्त चिदाकारता पावतें. ॥ ९१ ॥ तेव्हां योगारूढ तो । जो आरुरुक्षु तत्पूर्वीं बोलिजेतो । निर्विकल्पयोगीं आरूढ होतो । या प्रकारें. ॥ ९२ ॥ बाणतां निर्विशेष योग । चित्तास ऐसा जडत्वाचा वियोग । सविकल्पयोगीं जडवृत्तिसंयोग । असोनिही नाढळे जडत्व चित्तासी. ॥ ९३ ॥ कीं चैतन्यतंतु जडत्व पट । चित्स्वरूपचि हें सर्व निपट । वृत्ति निरोधाची न करितां खटपट । चराचरीं दिसे एक आत्मा. ॥ ९४ ॥ अनुभव ऐसा जयाला । योगारूढ बोलिजे त्याला । ऐशास ही जीवन्मुक्तीस हेतु जाला । शम म्हणिजे समाधी. ॥ ९५ ॥ कीं अनुभव ऐसा

जाला । तथापि समाधि बाणेना ज्याला । तो आरूढ होऊनि उतरला । योगसाक्षात्कारावरूनी. ॥ ९६ ॥ जोंवरी जडीं ब्रह्मस्फुरण । तोंवरी समाधिच म्हणावें तें स्मरण । हें विसरतां जडत्वभ्रमाचें आवरण । करी तत्काळ पूर्वसंस्कार. ॥९७॥ यालागीं जरी योगारूढ जाला । शमसमाधि पाहिजे त्याला । म्हणोनि शम कारण बोलिला । योगारूढासही श्रीकृष्ण. ॥ ९८ ॥ आतां योगारूढ केव्हां म्हणावा । जाणोनि ऐशा अर्जुनाच्या भावा । बोलणें लागलें देवाधिदेवा । लक्षण त्याचें या श्लोकीं. ॥ ९९ ॥

**यदा हि नेंद्रियार्थेषु न कर्मस्वनुषज्जते ।**
**सर्वसंकल्पसंन्यासी योगारूढस्तदोच्यते ॥ ४ ॥**

श्रोत्रादिइंद्रियांचे अर्थ । शब्दस्पर्शादि पदार्थ । आणि कर्म जें त्या विषयांच्या साधनार्थ । आसक्त नव्हे जेव्हां उभयत्र. ॥ १०० ॥ आतां टाकिले जरी विषय । आणि कर्मही टाकिलें तद्विषय । आणि भोगीं भोगसाधनीं न होय । आसक्त ही. ॥ १०१ ॥ कीं मोक्षास विघ्न हें सकळ । म्हणोनि ऐसा जाला जरी केवळ । आणि विषय गोड ऐसें वासनामूळ । जरी असे हृदयांत. ॥ १०२ ॥ तरी विषयभोग आणि भोगसाधन । यांचे संकल्प करीच मन । तेव्हां करूं लागे चिंतन । विषयभोगभोगसाधनाचें ही. ॥ १०३ ॥ नव्हे योगारूढ तोही । जों संकल्पाचा त्याग नाहीं । संकल्पत्याग तेव्हांचि जेव्हां कांहीं । शेष नसे वासनेचें. ॥ १०४ ॥ यालागीं भोग आणि भोगसाधनासी । टाकी आणि होय सर्वसंकल्पसंन्यासी । तेव्हां योगारूढ तयासी । म्हणावें अगा अर्जुना! ॥ १०५ ॥ हे अवघे मनाचेच खेळ । तेचि आवरावे केवळ । म्हणोनि येथें मेघनीळ । बोलतो त्यांत पहिला हा श्लोक. ॥ १०६ ॥

**उद्धरेदात्मनात्मानं नात्मानमवसादयेत् ।**
**आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः ॥ ५ ॥**

अगा अर्जुना ! मन । असे बुद्धीच्या आधीन । त्या मनासी आवरायाचें साधन । एकली बुद्धी. ॥ १०७ ॥ ते बुद्धि जों नसे विवेकारूढ । तोंवरीच मन होऊनि मूढ । धरूनि विषयकामना दृढ । पडिलें कूपीं वासनेच्या. ॥ १०८ ॥ वासनेच्या कूपाभीतरीं । मन पडिलें असे परी । बुद्धीच्या हातीं असे दोरी । त्या मनाची. ॥ १०९ ॥ त्या बुद्धीचा सहज गुण । कीं सुखी असावें आपण । आपण म्हणतां आत्मपण । सुखदुःखभोक्तृत्व ज्या चिदं-

शातें. ॥ ११० ॥ एवं ज्या गोष्टीनें सुख । तेंचि करी आणि दुःख । ज्याकरितां साधे त्याचें मुख । न पाहे बुद्धी. ॥ १११ ॥ सुखप्राप्ति वाटे ज्यांत । बुद्धि मनास योजी त्यांत । जें वाटे दुःखाचें निमित्त । त्यांतूनि काढी मनासी. ॥ ११२ ॥ बुद्धीस ठाउकें कीं कांहीं । विषयावांचूनि सुख नाहीं । म्हणोनि त्याच वासनेच्या प्रवाहीं । घालिते बुद्धि मनासी. ॥ ११३ ॥ जेव्हां सत्संग मिळे । विषय तितका दुःख ऐसें कळे । परमार्थीं सुख मानोनि वळे । भजनाकडे बुद्धि जेव्हां. ॥ ११४ ॥ तेव्हां विषयामधूनि मन । ते बुद्धि काढी मग चिंतन । विषयाचें टाकूनि साधन । चिंती ब्रह्मप्राप्तीचें. ॥ ११५ ॥ ब्रह्मानुभवाविना । जरी जाईना विषयवासना । तथापि बुद्धि मना । पडों नेदी विषयांत. ॥ ११६ ॥ देखोनि वाढिलें मिष्टान्न । लाळ घोटी क्षुधार्ताचें मन । परी त्यांत विष ऐसें कळतां भोजन । बुद्धि करों नेदी सर्वथा. ॥ ११७ ॥ सवें चोर मैंद मित्र जाला । तो मैंदसा जेव्हां कळला । आप्त म्हणों नेदी त्याला । सर्वथा बुद्धि. ॥११८॥ विषयवासनेनें जीवास । मरण नरक गर्भवास । कळतां न धरी बुद्धि हव्यास । विषयभोगाचा. ॥ ११९ ॥ परमार्थाची आवडी धरी । ते बुद्धि मनातें आवरी । तेव्हां उडी प्रपंचावरी । न पडे मनाची. ॥ १२० ॥ म्हणोनि बुद्धीकरूनी । मन उद्धरावें म्हणोनी । श्लोकाचिया प्रथमचरणीं । चक्रपाणी ऐसें बोलिला. ॥ १२१ ॥ श्लोकद्वितीयचरणीं हरी । म्हणतो कीं मन उद्धरावेंच परी । बुडों देऊं नये दुःखसागरीं । सर्वथा. ॥ १२२ ॥ मन आणि बुद्धी । आत्मशब्दें दोहींची सिद्धी । अहंकार देह याचीही प्रसिद्धी । आत्मशब्दें. ॥ १२३ ॥ त्यांत 'आत्मना' म्हणजे बुद्धीकरूनी । आत्मा मन तें उद्धरावें म्हणोनी । श्रीकृष्ण बोलिला यावचनीं । श्लोकाचिया पूर्वार्धीं. ॥१२४॥ उत्तरार्धें म्हणतो हरी । कीं आत्माच बंधु आत्माच वैरी । म्हणजे मनचि शत्रुमित्र ह्या दोन्ही परी । विशद बोलतो या श्लोकीं. ॥ १२५ ॥

**बंधुरात्मात्मनस्तस्य येनात्मैवात्मना जितः ।**
**अनात्मनस्तु शत्रुत्वे वर्तेतात्मैव शत्रुवत् ॥ ६ ॥**

मन त्याचें सखें सोयरें । ज्यानें बुद्धीनें तें जिंकिलें खरें । ते बुद्धि आत्म्याची हेंही बरें । जाण अगा अर्जुना! ॥१२६॥ कीं ज्या बुद्धीस आत्मा कळे । आणि जे आत्मयोगीं वळे । ते आवरील तेव्हां न खवळे । मन विषयवासनेनें. ॥ १२७ ॥ आतां जो पुरुष अनात्मा । म्हणजे ज्यास ठाउका नसे आत्मा । मन त्याचें त्यास स्वमहिमा । शत्रु होऊनि दाखवी. ॥ १२८ ॥ वर्ते शत्रुत्वें

करूनी । तें प्रसिद्धचि सांगावें काय म्हणोनी । आतां मित्रत्वें कैसें वर्ते तें येथूनी । बोलतो श्रीकृष्ण या श्लोकें. ॥ १२९ ॥

**जितात्मनः प्रशांतस्य परमात्मा समाहितः ।**
**शीतोष्णसुखदुःखेषु तथा मानापमानयोः ॥ ७ ॥**

ज्याचें मन ज्यास जित । म्हणजे स्ववश मन निश्चित । तो प्रशांत अत्यंत शांत । स्थिर मन त्याचें आत्मत्वीं. ॥ १३० ॥ कामक्रोधरहित । तो म्हणावा शांत । ज्याची बुद्धि अत्यंत । विवेकारूढ सर्वदा. ॥ १३१ ॥ त्या बुद्धीनें मन । आवरी तेव्हां तें विषयचिंतन । न करी होऊनि राहे लीन । त्या बुद्धीसहित आत्मयांत. ॥ १३२ ॥ जें आत्मस्वरूपीं होय स्थिर । तें स्थिरच निरंतर । शीतोष्णीं आणि सुखदुःखीं एक प्रकार । आणि मानापमानीं ही. ॥ १३३ ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञलोक । परिसोत आधीं. ॥ १३४ ॥ योगारूढाचें लक्षण । बोलिला तेथें कमलेक्षण । सर्वसंकल्पत्यागी तोचि निपुण । योगारूढ तेव्हां ऐसें बोलिला. ॥ १३५ ॥ त्या संकल्पाचें मूळ । तें मनचि केवळ । तें बुद्धीकरूनि करावें निश्चळ । ऐसें बोलिला. ॥ १३६ ॥ तें वश होतां स्वमित्र । तें वश न होतां अमित्र । हें एथवरी विशद पद्मनेत्र । बोलिला. ॥ १३७ ॥ जो योगारूढ नर । वर्णितां वाढला हा पसर । आणि त्याचाच बोलतां राहिला प्रकार । तो बोलतो या दों श्लोकीं. ॥ १३८ ॥

**ज्ञानविज्ञानतृप्तात्मा कूटस्थो विजितेंद्रियः ।**
**युक्त इत्युच्यते योगी समलोष्टाश्मकांचनः ॥ ८ ॥**

अगा! तो योगारूढ योगी । समशीतोष्ण मानापमानादि ज्यालागीं । परमानंदें तृप्त तरी वीतरागी । सर्वत्र ऐसा अनायासें. ॥ १३९ ॥ अगा! सकळवासनासमाप्ती । होतां निजानंदाची प्राप्ती । ते प्राप्ति तेव्हां जेव्हां तृप्ती । बुद्धि पावे ज्ञानीं आणि विज्ञानीं. ॥ १४० ॥ बुद्धि ज्याची ज्ञानीं । तृप्त आणि विज्ञानीं । आणि कूटस्थ तो म्हणोनी । लक्षण बोले त्याचें भगवंत. ॥ १४१ ॥ व्यतिरेकबोध येथें ज्ञान । अन्वयबोध विज्ञान । दोन्ही बोधीं अन्यचिंतन । बुद्धि न करी तेव्हां समाधी. ॥ १४२ ॥ तेचि बुद्धीची तृप्ती । तेचि वासनेची समाप्ती । बुद्धीस जेव्हां एकाग्रताप्राप्ती । व्यतिरेकीं आणि अन्वयांतही. ॥ १४३ ॥ या दोहीं समाधीचें लक्षण । पुढें याच अध्यायांत कमलेक्षण । बोलेल मागें ही विवरण । प्रसंगोपात्त जालें टीकेंत. ॥ १४४ ॥ व्यतिरेकीं निखळ चित्स्व-

रूप। तें ज्ञान आणि विज्ञान विश्वरूप । विघरलें थिजलें एकचि तूप। ब्रह्म उभयत्र एकचि. ॥ १४५ ॥ निखळज्ञान तें ज्ञान। मायाविशिष्ट ज्ञान तें विज्ञान। कीं नाना जडतरंगीं समान। एक उदक चित्स्वरूप. ॥ १४६ ॥ बुद्धि तृप्त ऐशा ज्ञानीं । आणि स्थिरबुद्धि ज्याची विज्ञानीं । तो कूटस्थ म्हणोनी। श्रीकृष्ण म्हणे या श्लोकीं. ॥ १४७ ॥ कूटस्थ शब्दाचा विचार । ऐसा कीं निर्विकार। स्थळांतरीं अर्थांतर। परी निर्विकार म्हणावा ये स्थळीं. ॥ १४८ ॥ आत्मा सकळांचा निर्विकार । परी बुद्धि जाली पाहिजे तदाकार । एवं जयाची बुद्धि ऐसी तो नर। कूटस्थ स्वयें म्हणावा. ॥ १४९ ॥ बुद्धीस करितां विकार। इंद्रियें रज विषय तम दोन्ही प्रकार। शुद्ध सत्त्वस्वरूपाकार। निर्विकार बुद्धि ते म्हणावी. ॥ १५० ॥ अंतरीं ऐसा आशय। तो कृष्ण त्यास म्हणतो कीं विजितेंद्रिय। कीं कूटस्थाचें रूप होय। विजितेंद्रिय म्हणतां तयातें. ॥ १५१ ॥ कीं जिंकिला इंद्रियांचा समुदाय। तेव्हां न आठवे त्या त्या इंद्रियाचा विषय। सत्त्वरजतमातीत होय। तेचि बुद्धि निर्विकार त्या कूटस्थाची. ॥ १५२ ॥ ऐसी निर्विकार बुद्धी। तेव्हां कूटस्थीं कूटस्थपणाची सिद्धी। योगारूढास तेव्हां समृद्धी। ज्ञानविज्ञान दोहीं समाधींची. ॥ १५३ ॥ या दोहीं समाधींची स्थिती। तृप्ति तेव्हां कूटस्थपदाची प्राप्ती। विषयवासनेची समाप्ती। ऐसा योगयुक्त योगी अगा! बोलिजेतो. ॥ १५४ ॥ ऐसे श्लोकाचे तीन चरण। यांत योगारूढाचें लक्षण। जें बोलिला कमलेक्षण। तें अर्जुनें ऐकिलें. ॥१५५॥ त्यांत तो ज्ञानविज्ञानतृप्त । आणि त्यास कूटस्थपद प्राप्त । हीं दोन्ही लक्षणें गुप्त। तोचि स्वयें जाणे तयाचीं. ॥ १५६ ॥ उरलें जितेंद्रियपण । प्रगट दिसे हें एक लक्षण। इतकियाच लक्षणें तो विचक्षण। योगारूढ समजावा. ॥ १५७ ॥ तरी कोणी दांभिकही जन। दाविती जितेंद्रियत्व आणि भजन। आणि कोणी योगारूढही विषयसेवन। करिती प्रारब्ध भोगितां. ॥ १५८ ॥ तो न वाटे योगारूढ। कीं जितेंद्रियत्व न दिसे दृढ । आणि योगारूढ वाटे तो मूढ। जो दंभे दावी जितेंद्रियत्व. ॥ १५९ ॥ आतां कोण बाह्यलक्षण। कीं तो योगारूढ कळे विचक्षण। अर्जुन ऐसा शंकतां कमलेक्षण। चतुर्थचरणीं हरितो हे शंका. ॥ १६० ॥

चतुर्थ चरण—'**समलोष्टाश्मकांचनः ।**'

अगा! धनाकारण। दांभिकाचें जितेंद्रियपण। जो धनीं निस्पृह निपुण। तो विषय भोगी तरी योगारूढ जाणावा. ॥ १६१ ॥ ज्यास मृत्तिकेचा भेंडा।

आणि वाटेचा अप्रयोजक धोंडा । आणि सघन कांचनाचा हांडा । तिन्ही समान. ॥ १६२ ॥ जितेंद्रिय आणि इच्छी धन । तें जितेंद्रियत्व धनसाधन । धनीं निरपेक्ष तो विषयसेवन । प्रारब्धें करी तथापि योगारूढ. ॥ १६३ ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त पुण्यश्लोक । परिसोत आधीं. ॥ १६४ ॥ योगारूढलक्षण । पूर्वश्लोकीं कमलेक्षण । बोलतां बोलिला कीं तो विचक्षण । ज्ञानविज्ञानतृप्तात्मा म्हणोनी. ॥ १६५ ॥ व्यतिरेकीं बाणे समाधी । ते तृप्ति निखळ निर्गुणात्मत्वबोधीं । अन्वयबोधीं तृप्ति साधी । तें विज्ञानीं विश्वरूपीं स्थिरत्व. ॥ १६६ ॥ दोहीं परी ब्रह्म दिसे । बुद्धि ब्रह्मीं समरसे । उभयत्रही ज्यास असे । तृप्ति बुद्धिस्थिरत्वें. ॥ १६७ ॥ म्हणोनि बोलतां हरी । शंका उपजली या परी । कीं या दोहींत एक समाधी जरी । साधे तरी नव्हे काय तो योगारूढ. ॥ १६८ ॥ आणि दोहींमधूनि एक । अन्वय अथवा व्यतिरेक । बाणतां आरूढ तेव्हां कोण अधिक । द्विविध योगारूढांत. ॥ १६९ ॥ शब्द थोडे अर्थ फार । दावूनि ऐसा चमत्कार । करितो या शंकेचा परिहार । या श्लोकें. ॥ १७० ॥

**सुहृन्मित्रार्युदासीनमध्यस्थद्वेष्यबंधुषु ।**
**साधुष्वपि च पापेषु समबुद्धिर्विशिष्यते ॥ ९ ॥**

अगा ! व्यतिरेकें निर्गुणसमाधी । चित्तवृत्तिनिरोधें साधी । तोही योगारूढ परी आधीं । न तुटती नानात्वभेदाचे. ॥ १७१ ॥ हा भाव धरूनि अंतरीं । मुखीं हा श्लोक बोले हरी । कीं अन्वयसमाधियोगावरी । आरूढ तो विशिष्ट होतो त्या परीस. ॥ १७२ ॥ कीं दिसत असोनि विषमत्व । त्या विषमत्वीं दिसे समत्व । प्रिय अप्रिया बऱ्यावाइटांतही ब्रह्मत्व । ज्याची बुद्धि पाहे तो विशिष्ट. ॥ १७३ ॥ सुहृद म्हणिजे ज्यांचें बरें हृदय । जे आपुले ठायीं सहज सदय । मायबाप इत्यादि समुदाय । सुहृद म्हणावा. ॥ १७४ ॥ स्नेहवृद्धीनें हित करी । मित्र म्हणावा यावरी । वाईट सर्वथा करी तो वैरी । दोहींवेगळा तो उदासीन. ॥ १७५ ॥ नव्हे मित्र नव्हे वैरी । बरें वाईट दोन्ही न करी । तो उदासीन यापरी । आतां मध्यस्थ. ॥ १७६ ॥ आपुला वैरी आणि आपण । इच्छी या दोघांचेंही कल्याण । त्यास घडतें मध्यस्थपण । कीं दोघांसी जो करूं पाहे एकत्व. ॥ १७७ ॥ घात करूं पाहे जो आपुला । द्वेष्य म्हणावें तयाला । कीं इतरां प्रापंचिकजनांला । युक्त वाटे द्वेष करणें तयाचा. ॥ १७८ ॥ बंधु म्हणिजे जे आपुले सोयरे । साधु जे सन्मार्गरत जे बरे । पापी म्हणावे

ज्यांची बुद्धि वावरे । कुकर्मी अखंड. ॥ १७९ ॥ ऐसे सुहृद मित्र शत्रु उदासीन । मध्यस्थ द्वेष्य बंधुजन । साधु आणि पापी कुजन । या इतुकियांचे ठायीं समबुद्धि. ॥ १८० ॥ ऐसे दिसोनि विषम । ब्रह्मभावें बुद्धि ज्याची सम । तो अन्वय समाधिनिष्ठ उत्तम । व्यतिरेकसमाधिनिष्ठापरीस. ॥ १८१ ॥ वर्णितां ऐसी समता । अन्वयसमाधि हा तत्त्वतां । हा विशिष्टयोगारूढ म्हणतां । उणा दुसरा या समानकोटीचा. ॥ १८२ ॥ अधिक म्हणतां बंधु ज्येष्ठ । उणा म्हणावा नलगे कनिष्ठ । म्हणतां हा ज्येष्ठश्रेष्ठ । उणा भाऊच कनिष्ठ समजावा. ॥ १८३ ॥ आणि **'वासुदेवः सर्वमिति । स महात्मा सुदुर्लभः'** म्हणे **श्री**पति । अन्वयसमाधिनिष्ठ भक्त अति- । श्रेष्ठ म्हणूनि वर्णिला. ॥ १८४ ॥ याच षष्ठाध्यायांत । द्विविध योगी बोलोनि भगवंत । अन्वयसमाधिनिष्ठ योगी अत्यंत । थोर म्हणेल स्वमुखें. ॥ १८५ ॥ या अध्यायांत यापरी । द्विविध योगाच्याही परी । पुढें विशद जो बोलणार हरी । त्या संक्षेपें आधींच बोलिला. ॥ १८६ ॥ त्यांत समाधि निर्गुणीं । बाणला तरी जगीं त्रिगुणीं । विषमता वाटोनि अंतःकरणीं । स्फुरेल द्वैत. ॥ १८७ ॥ जो अन्वयसमाधिनिपुण । त्यास त्रिगुणीं दिसे निर्गुण । पटतंतूच हे खूण । बाणली जयास. ॥ १८८ ॥ याकारणें समाधि जो व्यतिरेक । त्याहूनि अन्वयसमाधि अधिक । कीं अद्वैत आत्यंतिक । बिंबे जया. ॥ १८९ ॥ आतां यानंतर श्लोक । त्यापासूनि उत्तमश्लोक । अष्टांगयोग बोलेल तो सुज्ञलोक । परिसोत एथूनि. ॥ १९० ॥ आरूढ नाहीं योगावरी । त्याणें आरूढ होइजे कोणेपरी । तो अष्टांगयोग याउपरी । एथूनि बोलेल. ॥ १९१ ॥ गुरुमुखें आत्मा कळला । परंतु योगीं आरूढ नाहीं जाला । कीं चित्तास नाहीं बाणला । चित्स्वरूपीं योग. ॥१९२॥ त्यास यम आणि नियम । आसन आणि प्राणायाम । ध्यान धारणा प्रत्याहार सत्तम । तेव्हां समाधि अष्टम सिद्ध होय. ॥१९३॥ त्यांत आरंभ योगाचा । आणि प्रकार यमनियमांचा । इतुकें बोलतो स्ववाचा । श्रीकृष्ण या श्लोकीं. ॥ १९४ ॥

**योगी युंजीत सततमात्मानं रहसि स्थितः ।**
**एकाकी यतचित्तात्मा निराशीरपरिग्रहः ॥ १० ॥**

योगारूढ होऊं इच्छितो । योगीच कीं म्हणावा तो । त्यास श्रीकृष्ण म्हणतो । कीं त्याणें मनातें योजावें सर्वदा. ॥ १९५ ॥ एकांतीं त्याणें वसावें । म्हणजे जनसभादिकीं न बसावें । अत एव एकाकी होऊनि असावें । आणि अपरिग्रह. ॥ १९६ ॥ सर्वथा परिग्रहचि नसे । अथवा प्रारब्धें जरी लागला

असे । तरी परिग्रह टाकूनि सत्क्षेत्रीं वसे । योगसिद्ध्यर्थ तोही अपरिग्रह. ॥ १९७ ॥ कीं अभ्यासासि बैसला । ते समयींच एकाकी जाला । तरी परिग्रह ज्यास लागला । व्यग्र होणार मन त्याचें. ॥ १९८ ॥ यालागीं एकाकीपण वदोनी । वर्णिला अपरिग्रह म्हणोनी । आणि नियतचित्त शरीर या वचनीं । यम सूचवी तयाचा. ॥ १९९ ॥ कीं इंद्रियग्राम । आटोपतांच चित्ताचा संयम । होणार तोचि यम । यम म्हणिजे मुख्य आवरणें इंद्रियांचें. ॥ २०० ॥ यम म्हणजे नियत । चित्त आणि देह जयाचा निश्चित । ऐसा यतचित्तात्मा म्हणोनि भगवंत । यम सूचवी तयाचा. ॥ २०१ ॥ नियमही या श्लोकीं । त्याचा सुचविला असा कीं । तो अपरिग्रह एकाकी । म्हणूनि वर्णिला. ॥२०२॥ कीं योगास जें प्रतिकूळ । तें टाकावें सकळ । धरावें तें जें योगास अनुकूळ । स्वरूप नियमाचें इतुकेंचि. ॥ २०३ ॥ आणि एकांतवास । नियमचि म्हणावें त्यास । कीं जनसभादिविरुद्ध योगास । तें टाकूनि एकांत धरिला. ॥ २०४ ॥ आतां या यमास । आणि नियमास । प्रतिकूळ ते आस । धनादिविषयाची ॥ २०५ ॥ जो नसे निराश । त्यास बाधे आशापाश । मग योगास कैंचा अवकाश । यमनियम न पडती कानींही. ॥ २०६ ॥ यालागीं तो निराशी । कीं आशारहित म्हणावें त्यासी । भाव कीं आशा जयासी । कैंचे यमनियमही त्याला. ॥ २०७ ॥ एवं निराशपण । योगसिद्धीचें मुख्य लक्षण । यालागीं यमनियमपरायण । निराशी म्हणावें तयांतें. ॥ २०८ ॥ यमनियमांची स्थिती । बोलूनि ऐसी श्रीपती । आतां आसनाची रीती । बोलतसे स्पष्ट या श्लोकें. ॥२०९॥

**शुचौ देशे प्रतिष्ठाप्य स्थिरमासनमात्मनः ।**
**नात्युच्छ्रितं नातिनीचं चैलाजिनकुशोत्तरम् ॥ ११ ॥**

अगा ! योग योजावा एकांतीं । म्हणोनि बोलिलों तुजप्रती । परी तें स्थळ अती । असावें पवित्र. ॥ २१० ॥ शुचि शुद्ध भूमिवरी । आसन स्थापावें तीवरी । तें अति स्थिर कीं न करी । डळमळूनि डगमग चित्तासी. ॥२११॥ तें न बहुत उंच । अथवा न बहु नीच । कुश आंथरूनि त्यावरीच । अजिन आणि अंबर असे ऐसें. ॥ २१२ ॥ तळीं कुश वरी अजिनासन । तें कृष्णाजिन अथवा व्याघ्राजिन । तयाहीवरी वसन । एवं स्थिर मृदु आणि पवित्र. ॥ २१३ ॥ एवं यम नियम आसन । सांगूनियां गरुडासन । क्रमें आणिकही साधन । सुचवितो या श्लोकीं. ॥ २१४ ॥

**तत्रैकाग्रं मनः कृत्वा यतचित्तेंद्रियक्रियः ।**
**उपविश्यासने युंज्याद्योगमात्मविशुद्धये ॥ १२ ॥**

अगा! आसन रचूनि ऐसेपरी । बैसोनियां त्यावरी । मनाची एकाग्रता वरी। साधावी तेथें. ॥ २१५ ॥ तेथें एकाग्र मन करूनियां । आवरूनि चित्तेंद्रियक्रिया । योग योजावा आसनीं बसोनियां । बुद्धीचिया शुद्धीकारणें. ॥ २१६ ॥ मनाची एकाग्रता करावी । म्हणतां प्राणायाम सूचवी । कीं मनाची एकाग्रता व्हावी । प्राणायामें. ॥ २१७॥ करूनियां प्राणायाम । करावा चित्ताचा संयम । यालागीं मागुती पुरुषोत्तम । यतचित्तत्व बोलतो. ॥ २१८ ॥ प्राणायामाच्या आवृत्ती । होतां मनाच्या संकल्पवृत्ती । चित्तसंयम करितांच राहती। भाव ऐसा. ॥ २१९ ॥ या भावें मन एकाग्र करूनी । मागुती म्हणे यतचित्त होऊनि । इंद्रियवृत्ति आणि क्रिया आवरूनी । योग योजावा म्हणतसे. ॥ २२० ॥ योग एथें कवण । वाखाणावा तरी ते खूण । बुद्धीच्या शुद्धीचें बोलतां कारण । सगुणध्यान सूचवी. ॥ २२१ ॥ जरी म्हणावा कर्मयोग । तरी यज्ञादि कर्मे तेथें अंतरंग । तेव्हां स्त्री आणि ऋत्विगादिसंग । तो एकाकी अपरिग्रह म्हणवेना. ॥ २२२ ॥ योगशब्दें हटयोग । बोलतो म्हणावा श्रीरंग । तरी न तुटे वासनासंग । हटयोगें करूनी. ॥ २२३ ॥ देहामुळें भोग नाना । त्याच्या जीवित्वाची वासना । धरूनि करिती काळवंचना । हटयोगी. ॥ २२४ ॥ देह व्हावा अजर । देह व्हावा अमर । हटयोगें उपजे आदर । या जडा शवाची. ॥ २२५ ॥ काळास वंचूनि देह । रक्षिती धरूनि त्याचा स्नेह । ऐसियानें त्यजिलें जरी गेह । तरी तें वैराग्य म्हणवेना. ॥ २२६ ॥ कोणी स्त्री कर्कशा । म्हणूनि टाकिती गृहाशा । तरी न तोडिती स्नेहपाशा । देहाचिया. ॥ २२७ ॥ जैसें वैराग्य त्याचें । तैसेंचि याचें । एवं वैराग्य तेंचि साचें । कीं प्रीति सुटे या जडा शवाची. ॥ २२८ ॥ देहप्रीति सोडी बुद्धी । तेचि बुद्धीची अत्यंत शुद्धी । या शुद्धीची सिद्धी । ध्यानें नारायणाच्या. ॥ २२९ ॥ बुद्धिशुद्धीकारण । योग योजावा म्हणे श्रीकृष्ण । तेव्हां योगशब्दें सगुण । मूर्ति ध्यावी तयाचीच. ॥ २३० ॥ योग आत्मस्वरूपाचा । तोही न बोले भगवद्वाचा । कीं शुद्धबुद्धि तेव्हां साचा । आत्मा स्फुरे बुद्धीसी. ॥ २३१ ॥ बुद्धीच्याच शुद्ध्यर्थ । एथें योग योजावा म्हणे समर्थ । एवं सगुण ध्यावा हाचि अर्थ । बोलावा एथें. ॥ २३२ ॥ आतां जों अशुद्ध बुद्धी । तों न घडे ध्यान-

योगसिद्धी । करी त्या बुद्धीचीच शुद्धी । तेव्हां योगशब्दें घडे हें ध्यान. ॥ २३३ ॥ कोणी एथें ऐसें बोलती । तरी हे शुद्धी कोणती । तांदूळ कांडिले सडिले तरी धुती । पाकसमयीं वारंवार. ॥ २३४ ॥ कर्मयोगें शुद्धी । पावली ये जन्मीं अथवा जन्मांतरीं बुद्धी । तेव्हां आत्मानात्मविवेकसिद्धी । जाली गुरुमुखें. ॥ २३५ ॥ कांडिले बरे तांदूळ । पाकचि होणें असे केवळ । तैसा योगारूढमात्र हा निर्मळ । होऊं पाहतो. ॥ २३६ ॥ तथापि घालूनि जळ । निर्मळही जे तांदूळ । तेही करूनि अतिनिर्मळ । पाक करिती. ॥ २३७ ॥ या आरुरुक्षूची बुद्धी । जरी पावलीच आहे शुद्धी । तरी योगारूढत्वसिद्धी । घडावी ध्यानें सगुणाच्या. ॥ २३८ ॥ आणि अष्टांगयोग । त्यांत ध्यान तें सगुणध्यानयोग । स्वस्वरूपीं चित्तवृत्तीचा योग । तो समाधी. ॥ २३९ ॥ बाणे चित्तवृत्तीचा निरोध । अथवा बाणे सर्वात्मबोध । तोंवरी अभ्यास त्या अभ्यासाचा करितां शोध । तेचि धारणा. ॥ २४० ॥ सत्त्ववृत्तींत आत्मा स्फुरे । ते वृत्ति त्या स्वरूपातें स्फुरे । ते धारणा कीं जेथें नुरे । जडवृत्तीची धारणा. ॥ २४१ ॥ धारणाचि जेव्हां निश्चळ । तोचि समाधि केवळ । क्षणक्षणां वृत्ति चंचल । होतां धारणेचाच होतो अभ्यास. ॥ २४२ ॥ एवं ध्यान तें सगुण । धारणा ज्याची तें निर्गुण । चित्स्वरूपीं स्थिति तें लक्षण । समाधीचें. ॥ २४३ ॥ एवं आसनीं बैसोनि योग । योजावा तो ध्यानयोग । चित्तचैतन्यसंयोग । तो योग पुढें बोलेल. ॥ २४४ ॥ अष्टांग योग भागवतीं । कपिलमुनि देवहूतीप्रती । सांगे तेथें ध्येयमूर्ती । सविस्तर सांगे मुकुंदाची.॥२४५॥ आरंभीं कपिलमुनि। सबीजयोग सांगतों म्हणोनि । म्हणे आणि योगाचें बीज तें पायांपासूनि । ध्यान सांगे मूर्तीचें. ॥ २४६ ॥ द्वितीय स्कंधीं येचि रीती । एकादशस्कंधीं उद्धवाप्रती । जेथें अष्टांग तेथें बोलती । पुराणांतरींही ध्यान सगुणाचें. ॥ २४७ ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञलोक । परिसोत आधीं. ॥ २४८ ॥ ध्यानयोगबुद्धिशुद्धीकारण । योजितां मूर्ती सगुण । आवडे तेव्हां अन्यत्र निपुण । विरक्त होय. ॥ २४९ ॥ हेचि अत्यंत शुद्धी । कीं विषयवैराग्य सिद्धबुद्धी । एवं या शुद्धीची सिद्धी । बुद्धीस जाली. ॥ २५० ॥ परी भजन मांडलें द्वैत । मुख्य फल बाणावें अद्वैत । तो ध्यातां साकार अत्यंत । भेदसंस्कार उपजला. ॥ २५१ ॥ ध्यान म्हणतां दुसरें । ध्यावें हेंचि वाटे खरें । स्वस्वरूपध्यान एकसरें । केंवि घडे तयाला. ॥ २५२ ॥ आतां सगुण ध्यानावरी । स्वरूपधारणा सांगावी

परी । ते धारणा उत्तम जे दों प्रकारीं । न धरवे याला तेधवां. ॥ २९३ ॥ आपली धारणा आपण । धरावी हे बाणावी खूण । आणि नाना अवयवध्यानीं जें निपुण । तें चित्त थारावें एकत्र. ॥ २९४ ॥ याकारणें कमलेक्षण । सांगतो स्वनासाग्रनिरीक्षण । कीं ध्येय आपण ही खूण । बाणावी साधका. ॥ २९५॥ आणि मनास अनादि संस्कार । कीं स्मरावें नानाकार । जरी बिंबलें ध्यान साकार । तरी नानाकार अलंकार अवयव. ॥ २९६ ॥ यालागीं स्वनासिकाग्रमात्र । जरी लक्षिती स्वनेत्र । दृष्टीसवें एकत्र । चित्त थारे. ॥ २९७ ॥ आणि नासिकाग्रीं दृष्टि थारे । तरी मनाची कल्पनाही सरे । कीं दृष्टि सर्वत्र वावरे । ते थारली एकत्र. ॥ २९८ ॥ या संस्कारें चित्त । होय जेव्हां संस्कृत । निराकाराची निश्चित । धरूं शके धारणा. ॥ २९९ ॥ यालागीं नासिकाग्रनिरीक्षण । बोलों पाहतो कमलेक्षण । त्याही पुढिल्या श्लोकीं लक्षण । धारणेचें बोलेल. ॥ २६० ॥ आतां बैसोनि कोणे रीती । लक्षावें नासिकाग्राप्रती । तें बोलेल स्वयें श्रीपती । या श्लोकीं. ॥ २६१ ॥

**समं कायशिरोग्रीवं धारयन्नचलं स्थिरः ।**
**संप्रेक्ष्य नासिकाग्रं स्वं दिशश्चानवलोकयन् ॥ १३ ॥**

काय शिर आणि मान । हीं तिन्ही धरूनि समान । असती अचळ वर्तमान । शरीर असे ऐसें करावें हा भाव. ॥ २६२ ॥ कीं स्थिर होतां शरीर । अंतःकरण होतें स्थिर । तेव्हां आपण स्थिरतर । ऐसें वाटे. ॥ २६३ ॥ एवं स्थिर शरीर । करूनि होऊनि आपण स्थिर । अभ्यासीं व्हावें तत्पर । तो अभ्यास उत्तरार्धें बोलतो. ॥ २६४ ॥

उत्तरार्ध—**'संप्रेक्ष्य नासिकाग्रं स्वं दिशश्चानवलोकयन् ।'**

कीं बरविया प्रकारें । पाहूनि स्वनासिकाग्र बरें । दहा दिशा एकसरें । न पाहतां पाहावें नासिकाग्रमात्र. ॥ २६५ ॥ नासाग्र ऐसें लक्षूनि । या लक्षें मन संयमूनी । स्वरूपधारणा धरावी तेही सोडूनी । ऐसें बोलेल आतां या दुसरिया श्लोकें. ॥ २६६ ॥

**प्रशांतात्मा विगतभीर्ब्रह्मचारिव्रते स्थितः ।**
**मनः संयम्य मच्चित्तो युक्त आसीत मत्परः ॥ १४ ॥**

पूर्वोक्तरीती निश्चित । मन संयमूनि व्हावें मच्चित्त । म्हणजे चित्तीं प्रकाशक अत्यंत । जो मी स्मरावें त्या मातें. ॥ २६७ ॥ ऐसा होय तेव्हां युक्त । म्हणजे

चित्त स्वरूपीं प्रयुक्त । आणि मत्पर म्हणजे माझा भक्त । कीं मीच परसिद्धिदायक जयाचा. ॥ २६८ ॥ कीं सगुणध्यानयोगीं । प्रीति बाणली माझियालागीं । मीचि थोर ज्यास ऐसा योगी । बसे धारणा ऐसी धरूनी. ॥ २६९ ॥ सोडोनि नासाग्रनिरीक्षण । धारणा धरायाचें लक्षण । हें बोलिला कमलेक्षण । उत्तरार्धें. ॥ २७० ॥ कीं यमनियमांचीं आंगें । पूर्वार्धीं त्याचिया प्रसंगें । सूचवूनि उत्तरार्धें श्रीरंगें । धारणा त्याची वर्णिली. ॥ २७१ ॥ कीं यमनियमांविना । या साधनासि कोणी पावेना । हें सूचवावया साधकजना । आधीं यम नियम त्याचे बोलतो. ॥ २७२ ॥ तत्रापि सगुणध्यान । करितां पावला समाधान । म्हणोनि आतां यमनियमसाधन । विशेष पूर्व यमनियमांही परीस. ॥ २७३ ॥ कीं प्रशांत ज्याची बुद्धी । ते ध्यातां सगुण पावली शुद्धी । प्रशांतता ज्यास त्यास इंद्रियजयसिद्धी । दृढ यम ऐसा जयाचा. ॥ २७४ ॥ ब्रह्मचारी व्रती परम । या गोष्टींत सूचवी नियम । कीं योगास अनुकूळ तें स्वीकारी उत्तम । योगप्रतिकूळ तें टाकी. ॥२७५॥ टाकी योगप्रतिकूळ । धरी जें योगास अनुकूळ । या त्यागयोगीं भयविव्हळ । नव्हे कीं असे जो मत्पर. ॥२७६॥ सिद्धिदाता माझा हरी । ऐसा भाव ज्याच्या अंतरीं । तो मत्पर भय न धरी । योगविघ्नाचें. ॥ २७७ ॥ ऐसा पूर्वार्धेंकरूनी । साधक आधीं वर्णूनी । उत्तरार्धें मन संयमूनी । मच्चित्त असतो हें बोले. ॥ २७८ ॥ या श्लोकीं हरी । धारणा बोलिला परी । समाधि हेचि धारणा जरी । न येती लय विक्षेप. ॥ २७९ ॥ निद्रेस म्हणावें लय । विक्षेपकल्पना हा निर्णय । या दोहींकरितां होय । समाधिभंग. ॥ २८० ॥ त्यांत युक्ताहारविहार । हीं नियमांगें बोले सर्वेश्वर । निद्रालस्याचा परिहार । त्या उपायें. ॥ २८१ ॥ विक्षेप नानाकार । कल्पना उठे वारंवार । त्यास उपाय प्रत्याहार । अष्टांगाचें अंग तेंही. ॥ २८२ ॥ त्यांत जन्मांतरयोगभ्रष्ट । ज्यास साधनें पूर्वजन्मीं यथेष्ट । घडलीं त्याला विना कष्ट । योग बाणे. ॥ २८३ ॥ किंवा आत्मज्ञ आणि सगुणभक्त । सगुणीं प्रीतीविषयीं विरक्त । विक्षेपापासूनि मुक्त । चित्त त्याचें होतें अनायासें. ॥ २८४ ॥ **'तेषामहं समुद्धर्ता'** । ऐसें द्वादशीं विश्वभर्ता । म्हणेल कीं त्याच्या योगसिद्धीचा कर्ता । मी स्वयें होतसें. ॥ २८५ ॥ कीं **'अनन्येनैव योगेन । मां ध्यायंत'** ऐसें मधुसूदन । बोलेल कीं अनन्ययोगेंचि ध्यान । माझें जयां. ॥ २८६ ॥ तयांचा म्हणे मी उद्धर्ता । तेव्हां त्यांचा योगसिद्धिकर्ता । मी क्षीराब्धिकन्येचा भर्ता । सूचवी ऐसें. ॥ २८७ ॥ भक्त ऐसा धरी धारणा । तो तेचि समाधि

बाणे अंतःकरणा । न लगे त्या कृष्णशरणा । प्रत्याहाराची खटपट. ॥ २८८ ॥ प्रस्तुतीं शार्ङ्गधर । या साधकां म्हणे मत्पर । यालागीं एथें प्रत्याहार । अंग अष्टांगाचें न दावी. ॥ २८९ ॥ आणि अव्यक्तोपासक । योगभ्रष्ट जो साधक । तो पूर्वाभ्यासेंचि आत्यंतिक । समाधि पावे अनायासें. ॥ २९० ॥ या योगभ्रष्टप्रकरणीं । याच अध्यायांत चक्रपाणी । बोलेल यालागीं एथें वाणी । न बोले प्रत्याहाराची. ॥ २९१ ॥ प्रस्तुतीं योगी मत्पर । म्हणूनि बोलिला जो साधक नर । त्याचा समाधिपर्यंत सर्वेश्वर । योग बोलोनि मग प्रत्याहार बोलेल. ॥ २९२ ॥ '**संकल्पप्रभवान्कामांस्त्यक्त्वा**' म्हणोनी । प्रत्याहारलक्षण या श्लोकापासूनी । श्रीकृष्ण बोलेल बोलोनी । याचा समाधियोग तेथपर्यंत. ॥२९३॥ एवं ऐसा प्रत्याहार । तो विक्षेपाचा परिहार । लयपरिहारप्रकार । अपेक्षी तयां सर्वांसही. ॥ २९४ ॥ कीं प्रारब्धें लागला असे देह । जरी टाकिला त्याचा स्नेह । आहारनिद्रा निःसंदेह । पाहिजे त्यासी. ॥ २९५ ॥ लय निद्रा समाधींत । न एथेंही भगवंत । या पुढिलिया श्लोकापुढें अव्यवहित । त्या श्लोकांत बोलेल. ॥ २९६ ॥ या श्लोकीं धारणा । बोलिली ज्याच्या अंतःकरणा । त्याच्या प्राप्तीच्या विवरणा । बोलतो या श्लोकें. ॥ २९७ ॥

**युंजन्नेवं सदात्मानं योगी नियतमानसः ।**
**शांतिं निर्वाणपरमां मत्संस्थामधिगच्छति ॥ १५ ॥**

अर्जुना ! या प्रकारें चित्त । जो सदा योजी योगव्रत । ज्या योगियाचें नियत । मन असे. ॥ २९८ ॥ तो पावतो परम शांति । निर्वाणपरमा जीस म्हणती । परमनिर्वाण बोलती । कैवल्यातें. ॥ २९९ ॥ कैवल्य तें परम । जें शुद्ध निर्गुणब्रह्म । तें सर्वदा सर्वत्र निर्धर्म । स्फुरे स्पष्ट. ॥ ३०० ॥ कामादि अशांत ऊर्मी । लेश नसती त्या ब्रह्मीं । जेथें तूं आणि मी । भेद कांहीं दिसेना. ॥ ३०१ ॥ ज्यास बाणे हा अनुभव । त्यातें सहज शांतिवैभव । जीवन्मुक्त तो मानव । म्हणावा तेव्हां. ॥ ३०२ ॥ पावतो ऐशा शांतीतें । जो अधिष्ठूनि असे मातें । कीं माझ्या ब्रह्मानुभवातें । नसे खंडत्व. ॥ ३०३ ॥ अखंड निर्गुणाचा अनुभव । तेथें अखंड शांतीचें वैभव । हे माझी शांति ही पावती मानव । योगेंकरूनी. ॥ ३०४ ॥ एवं ऐसी धारणा । तेचि समाधि बाणे अंतःकरणा । तेव्हां या शांतीच्या खुणा । तो पावे. ॥ ३०५ ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोलेल उत्तमश्लोक । त्या दों श्लोकांचें सुश्लोक । निमित्त

आधीं परिसोत. ॥ ३०६ ॥ कीं स्वभक्त योगनिष्ठ । त्यांचें आपण पुरवितों अभीष्ट । ते सिद्ध होती न लागतां कष्ट । त्यांत हा मत्पर म्हणूनि वर्णिला. ॥ ३०७ ॥ कीं यमादि सात अंगें । समाधीपर्यंत वर्णिलीं **श्रीरंगें** । अनायासप्राप्तिप्रसंगें । प्रत्याहार नाहीं वर्णिला. ॥ ३०८ ॥ अनायासें पावे मत्पर । अथवा योगभ्रष्ट नर । कीं योगाभ्यासीं जन्मांतर । क्रमिलें ज्यानें. ॥ ३०९ ॥ एवं विक्षेपकल्पना । स्वभक्तास कीं योगभ्रष्टास असेना । परि निद्राधर्म देहाचा सुटेना । देहपातपर्यंत. ॥ ३१० ॥ त्यास निद्रा आहारविहार । नियत होतां निद्राविकार । न करूं शके बलात्कार । त्यास समाधि माजी ते निद्रा. ॥३११॥ योगाभ्यासी जन्मांतरीं । तोही नियत निद्रा आहार न करी । तरी निद्रासमाधीतें परिहरी । तयाच्याही. ॥ ३१२ ॥ आतां भक्तांचीं विघ्नें देव । परिहरी तो देवाधिदेव । तरि निद्रापरिहारही स्वयमेव । तोचि करील म्हणावा समाधींत. ॥ ३१३ ॥ धान्य भक्ताचे घरीं । तो स्वयें रांधी भोजन करी । त्यास पाहिजे कां परी । **भगवंत.** ॥ ३१४ ॥ चालायास उपाय । आपलेच दोन्ही पाय । एथें पाहिजे त्यास काय । परमगतिदाता **भगवंत.** ॥ ३१५ ॥ **पां**डवांहातीं युद्ध । करवूनि दे त्यांस राज्यसमृद्ध । त्यांस असाध्य तें स्वयें सिद्ध । कार्य करूनि दाखवी. ॥ ३१६ ॥ किंबहुना विश्वरूपीं । **कौ**रव मारूनि दावी तथापी । त्याचेच हातें ते पापी । मारविले समस्त. ॥ ३१७ ॥ स्वयें **भ**क्तांची योगसिद्धी । स्वयेंचि त्यांची साधनसमृद्धी । तथापि दावी ऐसी प्रसिद्धी । कीं तेही करिती योगप्रयत्न. ॥ ३१८ ॥ तथापि इतरां दुर्लभ । तें त्यांस करी अतिसुलभ । सोपे यत्न **श्री**वल्लभ । त्यांचे हातीं करवितो. ॥ ३१९ ॥ एवं जे स्वभक्त । आणि योगभ्रष्ट विरक्त । आणि याचि जन्मीं उपासिती अव्यक्त । योगयत्न इतुक्यांसही. ॥ ३२० ॥ त्यांत योगीं स्मरतां स्वरूप । जो नाना कल्पनारूप । तो परिहारणें विक्षेप । क्लेशसाध्य अष्टांगीं. ॥ ३२१ ॥ त्या विक्षेपाचा परिहार । होय आणि सिद्धीतें सत्वर । स्वभक्त पावेच ऐसा सर्वेश्वर । स्वभक्तियोग देतो तयासी. ॥ ३२२ ॥ श्रवणकीर्तनें जैसा जैसा । मळ मनाचा जातो तैसा तैसा । चित्तीं चित्स्वरूपाचा ठसा । स्पष्ट दिसतो. ॥ ३२३ ॥ प्रतिपदीं हें **भा**गवतीं । **शु**कादि योगी वर्णिती । अष्टांगयोगाच्या सांगतां रीती । सिद्धि ध्यानयोगें सगुणाच्या. ॥ ३२४ ॥ एवं ध्यातां सगुणरूप । विघ्न न करी विक्षेप । समाधि स्थैर्य तो प्रताप । सगुण ध्यानाचा. ॥ ३२५ ॥ सुगम नि-

द्रापरिहार । युक्तनिद्रा आहारविहार । म्हणोनि या प्रसंगें तो प्रकार । बोलतो या श्लोकें करूनी. ॥ ३२६ ॥

**नात्यश्नतस्तु योगोऽस्ति न चैकांतमनश्नतः ।**
**न चातिस्वप्नशीलस्य जाग्रतो नैव चार्जुन ॥ १६ ॥**
**युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु ।**
**युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा ॥ १७ ॥**

अर्जुना! जो अत्यंत भक्षी । तो स्वस्वरूपातें काय लक्षी । तटतटती ज्याच्या कुक्षी । बोट न रुते रोंवितां. ॥ ३२७ ॥ यालागीं जो भक्षी बहुत । त्यास योग नसे निश्चित । आणि त्यासही एकांत । न साधे जो कांहींच भक्षीना. ॥ ३२८ ॥ कीं अन्नावीण । विकळ होय अंतःकरण । तो जरी योगनिपुण । न बाणे योग ते समयीं तैशासही. ॥ ३२९ ॥ व्यतिरेक आणि अन्वय । दोन्ही योगीं हा निश्चय । योग आणि एकांत शब्दद्वय । दोंपरी योजिले या भावें. ॥ ३३० ॥ योगशब्द उभयत्रही । एकांतशब्द विशेषें कांहीं । अन्वयाकडे जैसा तैसा नाहीं । व्यतिरेकाकडे. ॥ ३३१ ॥ कीं एका चित्स्वरूपांत । दिसे सर्वा जडाचा अंत । तो योग बोलावा एकांत । जेंवि एका हेमीं नाना अलंकार. ॥ ३३२ ॥ व्यतिरेकयोगीं योगियास । एकांताचा ऐसा न दिसे विलास । एकांत बाणोनिही त्यास । एकांत ऐसा दिसेना. ॥ ३३३ ॥ कीं जडावेगळें जें स्वरूप । त्यांत सत्त्वही जालें चिद्रूप । परी तेचि सर्व हा प्रताप । न दिसे त्यांत अन्वय समाधीचा. ॥ ३३४ ॥ ज्यांत मन जालें उन्मन । तेंचि सर्वचैतन्यघन । एकांत या भावें सज्जन । निर्गुणसमाधीसही म्हणती. ॥ ३३५ ॥ परि हा वेगळाचि अनुभव । न दिसे हें तेथें वैभव । बोले हृदयीं धरूनि हा भाव । योग एकांत हीं भिन्ननांवें भगवंत. ॥ ३३६ ॥ एवं द्विविध योगही निश्चित । न साधती त्यास जो भक्षी अत्यंत । आणि जो नसे कांहीं भक्षित । योग दोन्ही न साधती तयासी. ॥ ३३७ ॥ आणि जो निजे बहुत । असाध्य त्यातेंही निश्चित । अथवा अखंड जागाच अत्यंत । योग असाध्य त्यातेंही. ॥ ३३८ ॥ यालागीं युक्त आहार । आणि युक्त ज्याचा विहार । युक्त निद्रा युक्त जागर । आणि कर्मीं चेष्टाही युक्त जयाच्या. ॥ ३३९ ॥ योगसिद्धि त्याला । कीं युक्तपण इतुकिया गोष्टींत ज्याला । ज्या योगसिद्धींत बोलिला । नाश दुःखा अनादीचा. ॥ ३४० ॥ आहारयुक्त ऐसा । कीं ज्याचा आहार जितका जैसा । त्यांत योगास अनुकूळ तितका तैसा । घेणें आहार तो युक्त. ॥ ३४१ ॥ भक्षितां अन्न फार । पासला पडों पाहे नर । डरडरां येती

ढेकर । योग कैंचा तयासी. ॥ ३४२ ॥ आणि न भरतां उदर । अल्प घेतां आहार । योगीं नव्हे चित्त स्थिर । नव्हतां शांति क्षुधेची. ॥ ३४३ ॥ जित-किया आहारें चित्त । योगीं थारे उल्हाससहित । हे खूण समजावी निश्चित । ज्याची त्यानें. ॥ ३४४ ॥ हा नव्हे हटयोग । कीं अन्न भरावें दोन भाग । एक उदकें चतुर्थ विभाग । रिता ठेवावा पोटाचा. ॥३४५॥ वायुधारणा जेथें । हा हटनियम तेथें । तोचि नियम एथें । कीं चित्त उल्हासयुक्त थारे स्वरूपीं. ॥ ३४६ ॥ एवं ज्या देशीं जो आहार । त्यांतही पवित्र प्रकार । तोचि घ्यावा कीं दृढतर । अभ्यास त्याच अन्नाचा. ॥ ३४७ ॥ अन्न टाकूनि पर्ण । खातां लागे हगवण । साधील येऊनि कवण । योग त्याचा. ॥ ३४८ ॥ शरीर पर्णाहार सोसी । तरी अन्नाची धरूं नये असोसी । होऊनि अरण्यवासी । पर्णे भक्षूनि योग साधावा. ॥ ३४९ ॥ ऐसेंचि कदन्न अथवा रूक्ष । सोसतां होऊनि सापेक्ष । सदन्नसवृतदक्ष । योगाभ्यासी न इच्छिती. ॥ ३५० ॥ एवं योगास अनुकूळ । तें भक्षावें टाकावें प्रतिकूळ । ऐसाच अगत्य केवळ । विहारही तितकाच. ॥ ३५१ ॥ विहार गमनागमन । योगार्थ करिती योगीजन । स्नान पान भोजन । गमनागमन यदर्थ. ॥ ३५२ ॥ तोही बहु विहार । करितां होय श्रांत फार । चित्त त्याचें स्वरूपाकार । नव्हे साधकाचें. ॥ ३५३ ॥ आणि विहार न करी कांहीं । एकाग्र मन नव्हे तयाचेंही । कीं दडोनि राहणें याचा नाहीं । अभ्यास ज्याला. ॥ ३५४ ॥ ज्याला फिरणेंचि नावडे । तो जरी एकेचि ठायीं दडे । त्याची योगसिद्धि घडे । तितकियानेंचि. ॥ ३५५ ॥ एवं युक्ताहार । आणि युक्त विहार । तोचि कीं जो करिता प्रकार । योगस्व-रूपीं थारे चित्त. ॥ ३५६ ॥ कर्मींही याच रीती । युक्तचि अंगचेष्टा ज्याच्या होती । कीं योगार्थ रक्षणें शरीरस्थिती । तदर्थ अगत्य अंगचेष्टा. ॥ ३५७ ॥ वेदोक्त नित्यकर्में करी । तें योगास अनुकूळ त्याचपरी । अत्यंत जपतपावरी । न धरी आदर. ॥ ३५८ ॥ गायत्रीचा जप उत्तम । तो एकसहस्र शत म-ध्यम । कनिष्ठ जपाचा नेम । दशकमात्र श्रुतिसिद्ध. ॥ ३५९ ॥

श्रुति—**'सहस्रपरमां देवीं शतमध्यां दशावराम् ।'**

श्रुत्यर्थ—स्पष्ट श्रुतीचा अर्थ । एवं शुद्धचित्तयोगाभ्यासीं कृतार्थ । अगत्यविधिपरिपालनार्थ । कर्में करी. ॥ ३६० ॥ त्यांत गायत्रीचा जप । करितां स्फुरे जरी स्वरूप । विघरलें आणि थिजलें तूप ।

भिन्न नसती. ॥ ३६१ ॥ अन्वयें आत्मा स्मरे । त्यास जडीं नगीं आत्महेम स्फुरे । एवं जप आणि योग यासी नुरे । वेगळेपण. ॥ ३६२ ॥ **'यज्ञानां जपयज्ञोऽस्मि'** । म्हणोनि कृष्ण अंतर्यामीं । पुढें बोलेल कीं जपयज्ञ मी । सर्वां यज्ञांत. ॥ ३६३ ॥ ऐसा एकाग्रतेचा जप । तो जपयज्ञ भगवत्स्वरूप । योगास अनुकूळ हें तप । तो साधकही कर्मीं युक्तचेष्ट. ॥ ३६४ ॥ ऐसा घडतां जप । परादिवाचांचें रूप । होय अवघें स्वरूप । बाणे समाधी.॥३६५॥ कीं शब्दस्फूर्ति राहे । तरी निर्विशेष योग होत आहे । आणि शब्दीं स्वरूप पाहे । तरी योग सविशेष तोही म्हणावा. ॥ ३६६ ॥ न बाणतां दोन्ही रीती। जे जपचि फार करिती । ते इतरांहूनि बरे परि योगगती । अंतरे योगियाची. ॥ ३६७ ॥ तो नव्हे कर्मीं युक्तचेष्ट । कीं हे चित्तशुद्धीनिमित्त कष्ट । हा चित्त योजूं लागला स्पष्ट । स्पष्टतर स्वस्वरूपीं. ॥ ३६८ ॥ आतां निद्रा जागृती । उभयत्र युक्त ये रीती । कीं न बहु निजे अथवा अती । जागाच नित्य न असे. ॥ ३६९ ॥ कीं जरी बहुतचि निजे । तरी तमोगुणें चित्त भिजे । भिजट फार होतां न शिजे । दाळ तुरीची जे रीती. ॥ ३७० ॥ आणि काळ वेंचूनी । निद्रेंत जाय योगावांचूनी । जों जों निजे तों तों दिनदिनीं । वाढोंच लागे निद्राही. ॥ ३७१ ॥ जागाचि असे जरी । योगीं निद्रा लागे तरी । एवं योगीं निद्रा न ये यापरी । तावन्मात्र करी निद्राही. ॥ ३७२ ॥ न बहु होय निद्रित । न बहु असे जागृत । त्यास योग बाणे जो अत्यंत । नाशी अनादि दुःखें तीं.॥ ३७३ ॥ एवं आहार विहार । आणि कर्मीं चेष्टा हे सकळ प्रकार । बोलिले कीं ऐशियास विकार । लय न करी अभ्यासी. ॥ ३७४ ॥ कीं बहुत होतां आहार । निद्राच येऊं लागे फार । केवळ राहतां निराहार । निद्राच ये रूपें मूर्छेच्या. ॥ ३७५ ॥ बहुत होतां विहार । श्रमें निद्राच ये फार । कांहींच न करितां विहार । क्षुधामांद्य. ॥ ३७६ ॥ क्षुधा मंद जेव्हां । अन्न न चले तेव्हां । निद्रा नये आणि तेधवां । योगीं न थारे चित्तही. ॥ ३७७ ॥ तथापि चित्त लागे जरी । निद्रा घाला घाली वरी । एवं ही सर्व नियमाची परी । लय परिहाराकारणें. ॥ ३७८ ॥ एवं आहारादि नियम । होतां योग बाणे परम । तो समाधि अत्युत्तम । त्याचें लक्षण आतां या श्लोकीं. ॥ ३७९ ॥

**यदा विनियतं चित्तमात्मन्येवावतिष्ठते ।**
**निःस्पृहः सर्वकामेभ्यो युक्त इत्युच्यते तदा ॥ १८ ॥**

अगा! जेव्हां विशेषें नियत। उक्तप्रकारीं नेमिलें जें अत्यंत। तें आत्मस्वरूपींच थारे चित्त। म्हणावा योगारूढ तेव्हां तो योगी. ॥ ३८० ॥ आत्मस्वरूपींच स्थिर। चित्त होय म्हणतां सर्वेश्वर। योगरहस्य चमत्कार । सूचवी एथें. ॥ ३८१ ॥ कीं जों स्फुरे आत्मप्रत्यय। तोंचिवरी चित्त चिन्मय। त्यांत कांहीं विस्मृति होय। समाधिभंग ते काळीं. ॥ ३८२ ॥ आत्मत्वें स्फुरे स्वस्वरूप। तेथें विस्मृति पडतांच विक्षेप । कल्पना उठे नानारूप । भंगे समाधी. ॥ ३८३ ॥ त्या विस्मृतीचें निमित्त । होतें तेथें तेंचि चित्त। कीं वैराग्य न असे अत्यंत। चित्तासि ज्या. ॥ ३८४ ॥ ज्याची ज्याची आवडी। त्यावरी पडे स्मृतीची उडी। एवं थिता समाधि मोडी । लेशही प्रीति विषयांची. ॥ ३८५ ॥ ते नसे जयाला । समाधिस्थैर्य बाणे तयाला। म्हणोनि कृष्ण म्हणे याला। कीं निस्पृह जो सर्व कामापासूनी. ॥ ३८६ ॥ एवं निस्पृहा न विक्षेप। कीं ज्यास आवडे एक स्वरूप । लयपरिहाराचें तें जें रूप। तें युक्ताहारविहारत्वींच बोलिलें. ॥ ३८७ ॥ एवं विक्षेप कल्पनेतें म्हणती। तेव्हां स्वप्न किंवा जागृती। कीं निद्रेंतही देखती। नानारूपें तें स्वप्न. ॥ ३८८ ॥ एवं स्वप्न आणि जागृती। कल्पनेंत अवस्था दोनी दिसती। निद्रा म्हणावी नुसती । ते सुषुप्ति अत्यंत. ॥ ३८९ ॥ एवं विक्षेप आणि लय । तेव्हां स्फुरे अवस्थात्रय । जेव्हां चित्त स्वस्वरूपमय । तेव्हां तुर्यावस्था चतुर्थी. ॥ ३९० ॥ एवं आत्मा तुर्यातीत । तेव्हां तदाकार होय चित्त। ते तुर्या म्हणावी शुद्ध अत्यंत। शबल तुर्या अन्वय समाधी. ॥३९१॥ कीं दिसे स्वदेहादि विश्व। ते जागृति तदभिमानी अत एव विश्व । तें विश्व दिसे अविश्व। शबल तुर्या ते म्हणावी. ॥ ३९२ ॥ एवं व्यतिरेकें अथवा अन्वयें। स्वचित्तीं स्फुरे आत्मा स्वयें। जोंपर्यंत तोंवरी निश्चयें । अवस्था तुर्या ते म्हणावी. ॥ ३९३ ॥ प्रस्तुतीं म्हणे अच्युत । कीं जेव्हां आत्मस्वरूपींच चित्त। थारे तेव्हां आरूढ निश्चित । ऐसें म्हणतांच हे तुर्या. ॥ ३९४ ॥ चित्ताची प्रत्येक वृत्ती। तेव्हां आत्मयास प्रत्यगात्मा म्हणती । तुर्याभिमानी अधिपती। तोचि तेव्हां तुर्येचा. ॥ ३९५ ॥ एवं लय आणि विक्षेप। निरसलें दोहींचें स्वरूप। चित्त चित्स्वरूपीं चित्स्वरूप। होऊनि जेव्हां थारलें. ॥३९६॥ तें चित्त कां होतें चंचळ। आणि कोण्या गुणें जालें निश्चळ । हें उपमारूपें घननीळ। बोलतो आतां या श्लोकीं. ॥ ३९७ ॥

**यथा दीपो निवातस्थो नेंगते सोपमा स्मृता ।**
**योगिनो यतचित्तस्य युंजतो योगमात्मनः ॥ १९ ॥**

अगा अर्जुना ! दीप । वारा लागतां पावे कंप । विषयवासनेनें ऐसें रूप । होतें पहिलें जया चित्ताचें. ॥ ३९८ ॥ ज्या स्थळीं चंचळ नसे समीर । तें स्थळ निर्वात म्हणती नर । त्या निर्वातस्थळीं स्थिर । दीप जैसा. ॥ ३९९ ॥ ऐसें योगियाचें चित्त । जें वैराग्याच्या बळें यत । यत म्हणजे नियत । नेमिलें वासनेवेगळें करूनि. ॥ ४०० ॥ तें त्या योगियाचें चित्त । जो त्यास आत्मत्वीं होता योजित । म्हणजे अभ्यासीं होता रत । समाधि बाणला तयासी. ॥ ४०१ ॥ एवं वैराग्य आणि अभ्यास । दोंचि उपायें वळवावें चित्तास । हें अर्जुनातें श्रीनिवास । प्रश्नोत्तरीं याच अध्यायांत बोलेल. ॥ ४०२ ॥ तोचि भाव एथें दावी । अर्जुनास हे कळा नसे ठावी । म्हणोनि करितां प्रश्न या भावीं । उत्तर देईल श्रीकृष्ण. ॥ ४०३ ॥ एवं ज्या आकाशीं दीप । समीरें होतां अति सकंप । निर्वात होतां स्थैर्यरूप । त्याच आकाशीं पावला. ॥ ४०४ ॥ ऐसें ज्या स्वरूपीं चित्त । वासनेनें होतें भ्रमत । वैराग्याभ्यासें अत्यंत । स्थैर्य त्याच स्वरूपीं पावलें. ॥ ४०५ ॥ आतां यानंतर श्लोक । जो कां बोलेल उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञलोक । परिसोत आधीं. ॥ ४०६ ॥ निवातशब्दें निर्वासना । आणि **'युंजतो योगम्'** म्हणतां सूचना । अभ्यासाची दाविली कीं या दों विना । न बाणे समाधी. ॥ ४०७ ॥ परि वैराग्य उपजे जयास । समाधीच बाणावा तयास । करणें लागे कां अभ्यास । स्थळ ऐसें पूर्वपक्षाचें. ॥ ४०८ ॥ कीं स्वरूपास चित्त । स्पर्शे तेव्हां अभ्यास नियत । तेथें न थारतां उचित । अभ्यास करणें. ॥ ४०९ ॥ तेथें न थारायास मूळ । विषयवासना ओंगळ । जो मुमुक्षु विरक्त प्रांजळ । न थारे चित्त कां तयाचें. ॥ ४१० ॥ अभ्यास तेव्हां निश्चित । कीं स्वरूपास लागे चित्त । कीं वाचेस लागे श्लोकार्ध सांत । अभ्यास घोषाचा तरी घडे. ॥ ४११ ॥ गुरुमुखें वेदऋचा । आयके परि उच्चारूं न शके वाचा । घोष अभ्यास पाठ करायाचा । केंवि घडे तयासी. ॥ ४१२ ॥ वासनारूप पाप । नसतां कां उठे विक्षेप । कां चित्त विसरे स्वरूप । कां समाधिभंग कां अभ्यास. ॥ ४१३ ॥ स्वस्वरूपीं न लागे चित्त । तों अभ्यास न घडे निश्चित । स्वरूपीं लागतांच अत्यंत । समाधि बाणावा विरक्तासी. ॥ ४१४ ॥ ऐसें संशयाचें स्थळ । परी येथें अभ्यासासि एक मूळ । कीं तेव्हां नव्हे चित्त चंचळ । विरक्ताचेंही. ॥ ४१५ ॥ कीं स्वरूपानंद चाखे । नि-

जानंदें चित्त माखे । तेव्हां तें आपणास राखे । स्वरूपीं स्वरूपाकार करी. ॥ ४१६ ॥ कर्दमजळांतील मासा । क्षीरसागरीं पडतां जैसा । परम सुखी होय तैसा । भाव चित्ताचा निजसुखीं. ॥ ४१७ ॥ आत्माच सुख केवळ । परि सुख न वाटे जों वृत्तीची चळवळ । वृत्ति राहतां निश्चळ । ये अनुभवास सुखरूपें. ॥ ४१८ ॥ विवेकें वैराग्य धरी । परि चित्तास अभ्यास आकारीं । तें योजितां निराकारीं । कोंडणी मानी आपणातें. ॥ ४१९ ॥ म्हणोनि योजितां चित्त । योजिलें न राहे अत्यंत । तें पुनःपुन्हा योजितां त्यांत । थारों लागे हळुहळू. ॥ ४२० ॥ जैसी राजपत्नी नवोढा मनोरमा । मातृमुखें जाणोनि भर्तृमहिमा । बैसोनि अंकीं ही परमा । जाऊंच पाहे उठूनि. ॥ ४२१ ॥ जों जों वाढे सलगी । तों तों अधिक थारे पलंगीं । गोडी घेतां अंगसंगीं । ढकलिली तरी ढकलेना. ॥ ४२२ ॥ तैसें चित्त घडीघडी । अभ्यासीं घे स्वरूपाची गोडी । स्थिरत्व बाणतां न सोडी । अनुभव तो आनंदाचा. ॥ ४२३ ॥ पोटीं इत्यादि भाव । धरूनि अभ्यास देव । विरक्तासही बोलोनि देवाधिदेव । स्थिति सुखानुभवें बोलतो दों श्लोकीं. ॥ ४२४ ॥

**यत्रोपरमते चित्तं निरुद्धं योगसेवया ।**
**यत्र चैवात्मनात्मानं पश्यन्नात्मनि तुष्यति ॥ २० ॥**
**सुखमात्यंतिकं यत्तद्बुद्धिग्राह्यमतींद्रियम् ।**
**वेत्ति यत्र न चैवायं स्थितश्चलति तत्त्वतः ॥ २१ ॥**

अगा ! जेथें निरोधिलें चित्त । उपरमातें असे पावत । म्हणजे स्वरूपीं स्वरूपमय असे होत । जडवृत्तिस्मरण टाकूनी. ॥४२५॥ जेथें आत्मयाचकरूनी । चित्त आत्माकार होऊनी । आत्मयाचमाजी आत्मयातें लक्षूनी । संतोषतें. ॥ ४२६ ॥ जैसे नेत्र दीपेंच करूनी । दीपातें पाहती ज्या सदनीं । तें सदनही दिसेना नयनीं । देहादिप्रपंच तेव्हां ये रीती. ॥ ४२७ ॥ ज्याकरितां दिसे देहादि जग । दोरीं दोराचकरितां जैसा भुजंग । त्या दोरेंच तो दोर पाहतां मग । भुजंग दृष्टीस दिसेना. ॥ ४२८ ॥ या भावें म्हणे भगवंत । कीं आत्मस्वरूपेंच आत्मयास चित्त । पाहे तेव्हां असे पावत । संतोषातें. ॥४२९॥ कीं आत्माच दिसे अन्य कांहीं । जडप्रपंच भासत नाहीं । भाव कीं वृत्तिप्रवाहीं । चित्त नसे ते समयीं. ॥ ४३० ॥ अगा ! तें म्हणावें सुख । जेथें वृत्तीचें दिसेना मुख । वृत्तिजडत्व तेथें दुःख । हें सुख तों आत्यंतिक त्या परतें. ॥४३१॥ आत्यंतिक शब्देंकरूनी । मनीं सामवेदश्रुतीतें धरूनी । आत्मसुखानुभव त्या वरूनी । सूचविला येथें. ॥ ४३२ ॥

श्रुति—'यो वै भूमा तत्सुखं नाल्पे सुखमस्ति।
अथ यदल्पं तन्मर्त्यं तद्दुःखम् ॥'

श्रुत्यर्थ—भूमा म्हणजे अनंत । सर्वथा न असे ज्यास अंत । जो ऐसा अनंत तोचि अत्यंत । सुख म्हणावा. ॥ ४३३ ॥ ज्यास म्हणावें अनंत । त्यासचि म्हणावें अत्यंत । अत्यंतातेंच निश्चित । आत्यंतिक म्हणावें. ॥ ४३४ ॥ अंत नसे त्यास संत । आणि वेद म्हणती अनंत । आणि जें अतिक्रमूनि असे अंत । तें अत्यंत अनंत तेंचि या अर्थें. ॥ ४३५ ॥ ज्यास असे अंत । सुख नसे त्यांत । वृत्ति तितकी अंतवंत । अत्यंत तें जें असे अतिक्रमूनि त्यातेंही. ॥ ४३६ ॥ श्रुतिही म्हणे कांहीं । जें अल्प त्यांत सुख नाहीं । अल्पीं त्या सुख नसोनि ही । अल्प तें दुःख आणि नश्वर. ॥ ४३७ ॥ एवं आत्मा सुखस्वरूप । चित्त जड अल्प दुःखरूप । त्यास विसरोनि सदा सकंप । कांपे वासनासमीरें. ॥ ४३८ ॥ वैराग्य आणि अभ्यास । दोहींकरूनि चित्तास । इतर वृत्तिस्मृतिनिरास । होतां समरसे आत्मत्वीं. ॥४३९॥ तेव्हां अनुभवा ये स्वरूप । तेंचि आत्मसुखानुभवरूप । जेव्हां चित्त होय निःकंप । दीप जैसा निर्वातीं. ॥ ४४० ॥ जडवृत्ति तितकी अंतवंत । अतिक्रमूनि ते सर्व अंत । असे तें सुख अनंत । अत्यंत म्हणावें या अर्थें. ॥ ४४१ ॥ तें सुख अनंत परि निर्गुण । त्यांत नसे अनुभवाची खूण । अमृत गोड परि रसनेवीण । नेणे गोडी आपुली. ॥ ४४२ ॥ एवं चित्तवृत्तीकरूनी । सुख तें जाणावें तन्मय होऊनी । तें अत्यंतचि सुख म्हणोनी । आत्यंतिक म्हणावें त्या चित्तें. ॥ ४४३ ॥ याभावें म्हणे हरी । आत्यंतिक सुख यापरी । तें योगी जाणेल जेव्हां त्या उपरी । तत्त्वापासूनि तेव्हां च्यवेना. ॥ ४४४ ॥ सुखस्वरूपाची गोडी । लागतां चित्त त्यातें न सोडी । चंचलत्वादि सर्व खोडी । सोडी गोडी सुखाची लागतां. ॥ ४४५ ॥ तें सुख अतींद्रिय । कीं बुद्धि होतां तन्मय । त्या बुद्धीनें ग्राह्यही निश्चय । अगम्य इंद्रियां सुख तें. ॥ ४४६ ॥ सुगंध पुष्पहार । परि अज्ञानें भासला सर्पाकार । निरसूनि दृष्टिभ्रमविकार । शुद्ध दृष्टीनें पहावा. ॥ ४४७ ॥ हारीं स्पर्शले नेत्र । परि भ्रमें जाले भयाचें पात्र । बुद्धि स्पर्शोनि चिन्मात्र । भी इंद्रियभ्रमें जडत्वें त्या तेंचि. ॥ ४४८ ॥ सर्प भासला जरी हार । सुगंध सुख दे वारंवार । तथापि सर्पाकार । भय मागुती उपजवी. ॥ ४४९ ॥ तैसा आत्माच विषय ।

आणि तोचि इंद्रियसमुदाय । विषयसुखही देऊनि भय । जडत्वभासें उपजवी. ॥ ४९० ॥ सुख विषयभोगीं तेंची । जडीं सुखाची वार्ता कैंची? । परि न कळतां शुद्ध खूण त्याची । दुःख उपजे जडत्वें. ॥ ४९१ ॥ भ्रम सर्पत्वाचा निरसे । तेव्हां तो हार दृष्टी दिसे । तैसा इंद्रियांस न असे । साक्षात्कार स्वरूपाचा. ॥ ४९२ ॥ दार्ष्टांतिकीं बुद्धि दृष्टांतीं दृष्टी । भ्रम इंद्रियें सर्प हे सृष्टी । भ्रमा इंद्रियांवेगळी होतां तुष्टी । अधिष्ठान हार लक्षितां ते पावे. ॥ ४९३ ॥ बुद्धिग्राह्य तें अद्वय । आणि म्हणे अतींद्रिय । त्याचा भावार्थनिर्णय । या प्रकारें. ॥ ४९४ ॥ आत्मा बुद्धीस दिसे । कोठें वेद बोलती ऐसें । कोठें मनासि कोठें चित्तास दिसतसे । ऐसेंही बोलती. ॥ ४९५ ॥ अंतःकरण सत्त्व । त्यासचि चित्तमनबुद्धित्व । कोण्या एका सत्त्ववृत्तीस तत्त्व । कळावें न असे भेद अन्योन्य. ॥ ४९६ ॥ एवं योगभ्रंशाचें कारण । तोंच जों नसे सुखस्वरूपें स्वात्मस्फुरण । सुखनिश्चयें अंतःकरण । अनुभवितां नव्हे भ्रंश योगाचा. ॥ ४९७ ॥ अंतःकरण चिन्मय । तें सुखरूपीं सुखचि होय । सुख तें हेंचि ऐसा निश्चय । करी तेव्हां त्यातेंचि बुद्धि ऐसें म्हणावें. ॥ ४९८ ॥ ऐशा सुखें जरी निवाला । प्रारब्धभोग न सुटे त्याला । तो भोग सुखदुःखरूपें बोलिला । तऱ्ही न चळे हें वदे आतां या श्लोकीं. ॥ ४९९ ॥

**यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः ।**
**यस्मिन्स्थितो न दुःखेन गुरुणापि विचाल्यते ॥ २२ ॥**



अगा ! लाधोनि स्वात्मसुख । देखे जरी विषयसुखाचें मुख । तरी स्वसुखाहूनि सुख आणिक । सुखपणें न मानी. ॥ ४६० ॥ कीं इतर सुखाचा लाभ । गाभणा ज्यांत दुःखाचा गाभ । लाभ त्याचाच कीं जें स्वयंभ । आत्मसुख आत्मत्वें अनुभवी. ॥ ४६१ ॥ सुखभोगीं यापरी । दुःखही प्राप्त जालें जरी । तें थोर दुःखही असेना कां परी । त्या सुखापासूनि तो चळेना. ॥ ४६२ ॥ कीं ज्या स्वात्मसुखीं स्थिति । पावला असे ब्रह्ममति । तो न चळे जरी अति । दुःख प्रारब्धें पावला. ॥ ४६३ ॥ ज्याचा महिमा ऐसा । त्या योगशब्दाचा अर्थ कैसा । तरी तो जाणावा ऐसा । म्हणूनि बोलतो या श्लोकीं. ४६४ ॥

**तं विद्याद्दुःखसंयोगवियोगं योगसंज्ञितम् ।**
**स निश्चयेन योक्तव्यो योगो निर्विण्णचेतसा ॥ २३ ॥**

अगा ! दोंचा जो योग । तो म्हणावा योग । आतां चित्तचैतन्यसंयोग । हा तों असे आयता. ॥ ४६५ ॥ अगा ! रज्जु स्पर्शोनि दृष्टी । आधीं जेव्हां

होत असे उष्टी । तेव्हां सर्प दावूनि कष्टी । करी द्रष्टा जो तयातें. ॥ ४६६ ॥ चित्ताची ऐसी वृत्ती । स्पर्शली आत्मयातें आयती । तरी दुःखरूपा वृत्ति स्फुरती । चित्तासि त्या. ॥ ४६७ ॥ अंतरीं चित्तचैतन्ययोग । वरी दुःखवृत्तीचा संयोग । त्या जडा दुःखवृत्तीचा वियोग । होतां योगचि आयता. ॥ ४६८ ॥ जडचैतन्यशोध । करितां चित्तास आत्मबोध । होतां करावा वृत्तिनिरोध । तोचि योग ऐसें बोले पतंजली. ॥ ४६९ ॥

पातंजलसूत्र—**'योगश्चित्तवृत्तिनिरोधः ।'**

योगशास्त्र करणार । पतंजलि शेषावतार । तो योगाचा वदे हाचि प्रकार । कीं योग म्हणजे निरोध चित्तवृत्तीचा. ॥ ४७० ॥ चेतवणें चित्ताचें लक्षण । रहस्य जाणती हें विचक्षण । कीं आत्मस्वरूपें सचेतन । आपण होऊनि चेतवी सर्व वृत्ती. ॥ ४७१ ॥ ते त्याची पराग्वृत्ती । कीं सत्त्व धांवे रजतमाप्रती । त्याचीच प्रत्यग्वृत्ती । जे परतोनि पाहे स्वप्रकाशातें. ॥ ४७२ ॥ प्रत्यग्वृत्तिस्वरूप । पाहतांचि होय तद्रूप । कीं दृष्टि पाहूं लागे दीप । अन्य न देखे ते समयीं. ॥ ४७३ ॥ ज्या दीपप्रकाशेंचि नेत्र । पाहती पदार्थ चित्रविचित्र । ते पाहूं लागतां दीपमात्र । पदार्थ तेव्हां न दीसती. ॥ ४७४ ॥ चित्त न चेतवी जोंवरी । वृत्ति न चेतती तोंवरी । ते थारे स्वरूपीं जरी । वृत्तिनिरोधें सहजचि. ॥ ४७५ ॥ विसरतां स्वरूपा । वृत्ति उठती त्या दुःखरूपा । आत्मप्रतीति स्मृति तों सोपा । योग कीं वृत्ति न असती. ॥ ४७६ ॥ एवं जडवृत्तिसंयोग । तोचि अनादि दुःखभोग । त्या वृत्तीचा होतां वियोग । योग बाणे आयताचि. ॥ ४७७ ॥ म्हणोनि जो दुःखसंयोग । त्याचा होतां वियोग । तोचि जाणावा योग । कृष्ण म्हणे. ॥ ४७८ ॥ तो योग योगसंज्ञित । तो योजावाच निश्चित । विरक्त करूनि अत्यंत । सर्वत्रही चित्तातें. ॥ ४७९ ॥ **'निर्विण्णचेतसा'** म्हणोनि । वैराग्य बोले या शब्देंकरूनि । **'अनिर्विण्णचेतसा'** ऐसें ही या वचनीं । अकारयुक्तही पद होत असे. ॥ ४८० ॥ तेव्हां अनिर्विण्ण म्हणजे अवैराग्य । तें प्रपंचीं म्हणतां अभाग्य । प्रपंचीं वैराग्य तेंचि भाग्य । मोक्षसिंहासनीं बैसवी. ॥ ४८१ ॥ आतां प्रपंचीं वैराग्य । आणि आत्मयोगीं अवैराग्य । तेव्हां अवैराग्यशब्देंही भाग्य । कीं अनुराग चित्तास योगाचा. ॥ ४८२ ॥ एवं योगाची प्रीती । असेल ज्या शुद्धचित्तीं । त्या चित्तें हे योगस्थिती । आधीं आधीं साधावी. ॥ ४८३ ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त विवेकी लोक । परिसोत आधीं. ॥ ४८४ ॥ अष्टांगाचीं अष्ट अंगें ।

त्यांत सात वर्णिलीं श्रीरंगें । अनायासप्राप्तिप्रसंगें । प्रत्याहार नाहीं बोलिला. ॥ ४८५ ॥ कीं स्वभक्त अथवा योगभ्रष्ट । त्यांस न लागती बहुत कष्ट । बाणे तयां समाधि स्पष्ट । न लागतां क्लेश अत्यंत. ॥ ४८६ ॥ आतां जे अव्यक्तोपासक । आणि योगाचे साधक । त्यांस द्वादशीं क्लेश अधिक । '**क्लेशोऽधिकतरस्तेषां**' म्हणोनि बोलेल. ॥ ४८७ ॥ त्यांस त्यांचें चित्त । अनावर अत्यंत । प्रत्याहार त्याकारणें भगवंत । बोलेल आतां एथूनी. ॥ ४८८ ॥ म्हणोनि योगमहिमा बोलोनी । योग असावाच म्हणोनि । बोलिला आतां जे संकल्प मनीं । ते आधीं टाकावे म्हणतो या श्लोकीं. ॥ ४८९ ॥

**संकल्पप्रभवान्कामांस्त्यक्त्वा सर्वानशेषतः ।**
**मनसैवेंद्रियग्रामं विनियम्य समंततः ॥ २४ ॥**

अगा! संकल्पापासूनि । जे कामसंस्कार बैसले मनीं । ते संकल्पापासूनि जाले म्हणोनि । म्हणावे काम. ॥ ४९० ॥ त्या सर्वा कामातें । टाकूनि मग त्या मनेंद्रियांतें । अत्यंत नेमावें जीं नानाविषयांतें । ध्यात होतीं मनीं निघोनी. ॥ ४९१ ॥ त्या सर्वां विषयांपासूनी । मनें त्या त्या इंद्रियांतें नेमूनी । आत्मस्वरूपीं योजूनी । कांहीं न चिंतावें म्हणे या श्लोकीं. ॥ ४९२ ॥

**शनैःशनैरुपरमेद्बुद्ध्या धृतिगृहीतया ।**
**आत्मसंस्थं मनः कृत्वा न किंचिदपि चिंतयेत् ॥ २५ ॥**

अगा! आत्मस्वरूपीं मन । योजून आणिक चिंतन । कांहींच करूं नये जतन । करावें आत्मप्रत्ययातें. ॥ ४९३ ॥ तें न सोडी विषयचिंतन । परी असे बुद्धीआधीन । बुद्धीकरूनि तें मन । आत्मतत्त्वीं थारे ऐसें करावें.॥४९४॥ परि ज्या बुद्धीस कामना । ते कां आवरील तया मना । यालागीं अगा अर्जुना! । बुद्धि वश करावी धारणेनें. ॥ ४९५ ॥ पदार्थ जो बुद्धीनें नसे देखिला । तो धारणेमध्यें न रेखिला । देखिला तेव्हां रेखिला । धारणेमाजी. ॥ ४९६ ॥ ज्याची होय ओळखी । ते धारणेनें बुद्धि रेखी । आत्मा कळतां त्यास लेखी । आत्मत्वें. ॥ ४९७ ॥ श्रवण मनन निदिध्यास । तिहीं प्रकारें बुद्धीस । दृढ वसे संस्काररस । आत्मा ऐसा म्हणोनी. ॥ ४९८ ॥ चिदात्माचि आत्मा हा निश्चय । जों जों करी तों तों तन्मय । होतां धारणा तेंचि होय । आत्मा प्रत्यगात्माच म्हणोनी. ॥ ४९९ ॥ ऐशा धारणेंकरूनी । जे बुद्धि असे निश्चय धरूनी । ते बुद्धि '**धृतिगृहीता**' म्हणोनी । म्हणावी अगा! ॥ ५०० ॥ त्या

बुद्धींकरूनि उपरमा । हळू हळू पावावें गा पांडवोत्तमा! । म्हणजे योगावांचूनि इतर कामा । मनीं न धरणें सर्वथा. ॥ ९०१ ॥ एवं आत्मयाविना । कांहींच नलगे ऐसी भावना । तेंचि उपरमणें अर्जुना । म्हणूनि सूचवी श्रीकृष्ण ॥ ९०२ ॥ कीं बुद्धि जे धृतीकरूनी । आपणाकडे ओढोनी । घेतली विषयांतूनि काढूनी । हळू हळू उपरमावें त्या बुद्धीनें. ॥ ९०३ ॥ पावोनि ऐशा उपरमातें । योगीं योजितां मनातें । आत्मस्वरूपीं बुद्धिवंतें । स्थिर करावें. ॥ ९०४ ॥ मन आत्मत्वीं करूनी स्थिर । चिंतूं नये कांहीं इतर । आत्मस्फुरण निरंतर । योगीं बाणे ऐसें करावें. ॥ ९०५ ॥ बुद्धीनें उपरमावें । आणि मन स्वरूपीं स्थिर करावें । ऐसें बोले गहन भावें । श्रीकृष्ण एथें. ॥ ९०६ ॥ बुद्धीनेंचि उपरमावें । बुद्धीतेंचि कां स्वरूपीं न योजावें । हेंही घडे परंतु देवें । गहनभाव एथें सुचविला. ॥ ९०७ ॥ कीं प्रपंचापासूनि उपरती । दुःख समजोनि भले धरिती । प्रपंच दुःख आत्माच सुख ये रीती । निश्चय करणें हेचि बुद्धी. ॥ ९०८ ॥ उपरमातें पावणें । तें ऐसें या बुद्धीच्या गुणें । तेंही सत्त्व आणि कल्पना करणें । तें मनही तेंचि सत्त्व. ॥ ९०९ ॥ सत्त्व बुद्धी करितांचि निश्चय । तेंचि मन होतां कल्पनामय । सत्त्वकल्पना करीना तेव्हां होय । योगीं मन तें उन्मन. ॥ ९१० ॥ यालागीं कमलनयन । उपरम बुद्धीनें बोलोनि मन । स्वरूपीं योजावें आणि चिंतन । म्हणे कांहीं करूं नये त्या योगीं. ॥ ९११ ॥ कीं कांहीं कल्पना उठे । तरी समाधि सिद्ध तोही तुटे । कृष्णहृदयीं हा भाव दाटे । मुखें म्हणे मन स्थिर करावें म्हणोनी. ॥ ९१२ ॥ तथापि हें मन । अभ्यासी करूंच लागे कांहीं चिंतन । तरी राहोनि सावधान । प्रत्याहारें आवरावें म्हणे या श्लोकीं. ॥ ९१३ ॥

**यतो यतो निश्चरति मनश्चंचलमस्थिरम् ।**
**ततस्ततो नियम्यैतदात्मन्येव वशं नयेत् ॥ २६ ॥**

ज्या ज्या पदार्थीं मन । निघोनि करी चिंतन । योगियानें होऊनि सावधान । तेथें तेथेंचि आत्मत्वीं योजावें. ॥ ९१४ ॥ आत्मप्रकाशाविना । कल्पना तों उठेना । तेथें तेथेंचि त्या मना । प्रत्यग्वृत्तीनें योजावें आत्मत्वींच. ॥ ९१५ ॥ ज्या आत्मस्वरूपेंकरूनी । मन न निघे कल्पना कल्पूनी । त्या आत्मस्वरूपींच योजूनी । वश करावें आत्मत्वीं. ॥ ९१६ ॥ ज्या आत्मत्वीं राहूं लागलें । मन तेथवांचि वश जालें । तोंवरी अभ्यासीं प्राप्त जालें । करणें ऐसें. ॥९१७॥

वश होतां तें मन । राहतां वृत्तीचें चिंतन । अनुभवा ये आनंदघन । जें सुख आत्यंतिक बोलिलें यामागें. ॥ ९१८ ॥ मन होतां स्थिर । पूर्वोक्त सुख योगचतुर । कैसें पावतो हें सर्वेश्वर । बोलतो आतां या श्लोकीं. ॥ ९१९ ॥

**प्रशांतमनसं ह्येनं योगिनं सुखमुत्तमम् ।**
**उपैति शांतरजसं ब्रह्मभूतमकल्मषम् ॥ २७ ॥**

अगा! मन जेव्हां प्रशांत । म्हणजे प्रकर्षें अतिशयें शांत । योगीं होतां सुख अत्यंत । अनुभवा येतें. ॥ ९२० ॥ मन ऐसें ज्याचें प्रशांत । त्यास सुखलभ्य होतें अत्यंत । लक्षणें दोन्ही या श्लोकांत । त्या सुखाचीं भगवंत बोलतो. ॥ ९२१ ॥ तें सुख म्हणोनि उत्तम । दों प्रकारें सर्वोत्तम । उत्तमत्व त्याचें पुरुषोत्तम । बोलतसे. ॥ ९२२ ॥ शांत जेथें रजोगुण । म्हणतां सुचवी हें निपुण । कीं जेथें नसे इंद्रियांचा गण । तें सुख शांतरज म्हणावें.॥९२३॥ जेथें इंद्रियें न दिसती । तेथें विषय कैंचे असती? । सुखप्रतीति नुसती । बाणे जेथें. ॥ ९२४ ॥ विषयेंद्रिययोगें । जें चित्सुख भोगावें जगें । विषयेंद्रियवृत्तिवियोगें । योगीं शांतरज सुख तेंचि. ॥ ९२५ ॥ कीं होऊनि सर्पाकार । शैत्यसुगंधें पुष्पहार । दाखवूनि भयही अपार । दावित होता. ॥ ९२६ ॥ तो मिथ्या सर्प गेला । पुष्पहारसा कळों आला । तेव्हां जो गळां घाली त्याला । भयरहित सुख होय तो हार. ॥ ९२७ ॥ रजतमवृत्तियोगें । सुखविषय इंद्रियभोगें । संसारदुःख त्या वासनासंगें । सुख तरी तें आत्मसुख. ॥ ९२८ ॥ जेथें नसे रज । तम तेथें नसे सहज । तें सुख म्हणे शांतरज । संसारचक्रापलीकडे. ॥ ९२९ ॥ अनुभविलें तें सुख । तो संसारचक्राचें न पाहे मुख । ऐसें सुचवूनि आणिक । लक्षण सांगे त्या सुखाचें. ॥९३०॥ कीं तें सुख अकल्मष । म्हणजे नसे जेथें वृत्तिकल्मष । कीं उपजे दुःखाचें किल्बिष । जडवृत्तिरूपें. ॥ ९३१ ॥ जेथें वृत्ति न दिसती । जेथें रजतम न असती । तेथें सत्त्ववृत्ति नुसती । ब्रह्ममय. ॥ ९३२ ॥ तें हें सुख म्हणोनी । बोलिलीं लक्षणें दोनी । ऐसीं सुखलक्षणें वदोनी । लक्षण बोलतो त्या योगियाचें. ॥ ९३३ ॥ कीं तो ब्रह्मभूत । म्हणजे ब्रह्मचि जाला निश्चित । ज्यास हें सुख अत्यंत । अनुभवा आलें. ॥ ९३४ ॥ तो ब्रह्मचि केवळ । परी अनुभवीं असे सत्त्व निर्मळ । तें ब्रह्मीं ब्रह्म निखळ । होतसे समाधीमध्यें. ॥ ९३५ ॥ योग बाणला केवळ । सुख पावला निष्कळ । जाला मनुष्यजन्म सफळ । तें म्हणतसे आतां या श्लोकीं. ॥ ९३६ ॥

**युंजन्नेवं सदात्मानं योगी विगतकल्मषः ।**
**सुखेन ब्रह्मसंस्पर्शमत्यंतं सुखमश्नुते ॥ २८ ॥**

टाकूनि जडचिंतन । योगीं योजी सदा ऐसें मन । त्या योगीं कल्मषाचें दहन । जालें ज्याच्या. ॥ ९३७ ॥ सकळ कल्मषाचें बीज । मूळवासना जे सहज । ते गेली ऐसें अधोक्षज । सुचवी एथें. ॥ ९३८ ॥ कीं ब्रह्मस्पर्शजनित । जें योगसुख अत्यंत । तें अनायासें त्याचें चित्त । अनुभवूं लागे. ॥ ९३९ ॥ वृत्तिनिरोध आयास । न करितां समाधि बाणे ज्यास । त्या ब्रह्मानुभवसुखें ज्यास । वासना कैंची. ॥ ९४० ॥ ऐसा व्यतिरेक योग । जेथें जडवृत्तीचा वियोग । त्यातें ऐसा श्रीरंग । वर्णिता जाला एथवरी. ॥ ९४१ ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञ लोक । परिसोत आधीं. ॥ ९४२ ॥ व्यतिरेक आणि अन्वय । ज्ञानाचें हें प्रकारद्वय । दोंहीपरी ब्रह्म अद्वय । कळे मुमुक्षूतें. ॥ ९४३ ॥ आधीं उदक ओळखावें । मग तें तरंगांत सर्वांत लक्षावें । आधीं व्यतिरेकें जाणावें । मग चराचरीं पाहावें तें सर्व. ॥ ९४४ ॥ ज्ञान दोंहीपरी आलें । तें दोंहीपरी पक्क पाहिजे जालें । याकारणें बोलणें लागलें । योगरीती. ॥ ९४५ ॥ त्यांत बोलिला हा योग एक । जों समाप्त होय पूर्वश्लोक । त्यास म्हणावें व्यतिरेक । कीं वृत्तिवियोगें योग हा वर्णिला. ॥ ९४६ ॥ परंतु उघडूनि नेत्र । देखेल जेव्हां जग विचित्र । तेव्हां प्रपंच सर्वत्र । दिसों लागे साचसा. ॥ ९४७ ॥ हें तों योगींच अद्वैत । डोळे उघडितां दिसे द्वैत । तेव्हां न म्हणवे निश्चित । जीवन्मुक्त त्यालाही. ॥ ९४८ ॥ यालागीं अन्वयसमाधी । जोंपर्यंत योगी न साधी । जीवन्मुक्त नव्हे जरी निरोधी । योगी व्यतिरेकी वृत्तीतें. ॥ ९४९ ॥ आणि पूर्वश्लोकीं श्रीपति । बोले जीवन्मुक्तस्थिति । योगाची तों बोलिला रीति । व्यतिरेक मात्र. ॥ ९५० ॥ हें संशयाचें स्थळ । कीं योगीं पावला ब्रह्म केवळ । डोळे उघडितां तोही कुशळ । प्रपंच सत्यत्वें देखेल. ॥ ९५१ ॥ जरी बाणला समाधिठसा । तरी कृतार्थ तो नव्हे ऐसा । कीं सर्वही आत्मया चिद्रसा । नाहीं चाखिलें. ॥ ९५२ ॥ या शंकेचा परिहार । हाच कीं योग द्विप्रकार । बाणला तरीच सर्वेश्वर । कृतकृत्यत्व त्याचें बोलिला. ॥ ९५३ ॥ कीं **'यतो यतो निश्चरति'** । या श्लोकीं अन्वयाचीही रीति । दाविली परि विशद स्थिती । बोलिला नाहीं. ॥ ९५४ ॥ कीं जें जें

कल्पी मन । तेथें तेथें आत्मचिंतन । करितां स्वरूपीं थारे हें साधन । वाटलें. ॥ ९५५ ॥ एवं व्यतिरेकयोग । वर्णिला जेथें वृत्तिवियोग । आतां अन्वययोग त्याचाच श्रीरंग । वर्णीतसे या श्लोकीं. ॥ ९५६ ॥

**सर्वभूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि ।**
**ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शनः ॥ २९ ॥**

एक आत्मा सर्वभूतीं । सर्व भूतें त्या आत्म्यांत असती । युक्तचित्त योगी तो ये रीती । ज्यास सर्वत्र समदर्शन. ॥ ९५७ ॥ श्लोकार्थ इतकाच रम्य । परि अन्वयज्ञानयुक्तिगम्य । कीं नाना वैषम्यांत साम्य । आत्मत्वाचें. ॥ ९५८ ॥ शब्दांत दिसतें द्वैत । परि अंतरीं असे अद्वैत । यांतही सूचवी अनंत । कीं अन्वयज्ञानही ऐसेंचि. ॥ ९५९ ॥ प्रपंच दिसे द्वैतरूप । परि असे अद्वैतमात्ररूप । कीं दृष्टीस विघरलें थिजलें तूप । रसनेस तों एकचि. ॥ ९६० ॥ आत्मा सर्वभूतीं । म्हणतां आत्मा भूतें भिन्न दिसती । सर्वभूतें आत्मयांत असती । द्वैत एथें तैसेंचि दिसतें. ॥ ९६१ ॥ कीं सर्वघटीं आकाश । त्याच आकाशीं सर्व कलश । या दृष्टांतें लवलेश । ऐक्य घटा आणि आकाशा घडेना. ॥ ९६२ ॥ तैसेंचि उदकीं घट । उदक आंत बाहेर निपट । याही दृष्टांतें उत्कट । द्वैतचि दिसे. ॥ ९६३ ॥ कीं घट जळीं अनेक । आणि घट बुडवूनि उरलें उदक । दृष्टांत पाहतां वाटे कौतुक । परि द्वैत साधलें अत्यंत. ॥ ९६४ ॥ एवं सूचवी ऐसें अच्युत । कीं जगीं द्वैतीं बाणे अद्वैत । तोचि अद्वैत वाखाणील निश्चित । द्वैतभास कीं या शब्दीं. ॥ ९६५ ॥ कीं आत्मा सचराचरीं । जळ जैसें तरंगाभीतरी । चराचर त्यांत जैशा लहरी । एका जळांत. ॥ ९६६ ॥ कीं प्रळयाचें जळ । त्यांत गारा जळचि निखळ । गारा जळीं त्या गारांत केवळ । जळचि तें. ॥ ९६७ ॥ गारांचें कठिणपण । दिसे उदकाहूनि विलक्षण । परी मृदु उदकचि आपण । असे गारांत. ॥ ९६८ ॥ कठिण होऊनि गारा । उदक न पावे विकारा । तैसा चराचराचा पसारा । सारा निर्गुण ब्रह्मचि. ॥ ९६९ ॥ प्रलयजलास नाहीं अंत । त्या जळीं गारा ही अनंत । सर्व गारांत जें जळ तयांत । त्या गारा अवघिया. ॥ ९७० ॥ आत्मा चराचरभूतीं । सर्व भूतस्थ ये रीती । आणि याचिपरि असती । सर्वभूतें आत्मयांत. ॥ ९७१ ॥ याही काळीं मेघधारा । समुद्रावरी वर्षती गारा । त्या अपारा जळीं अपारा । बुडती

जेव्हां. ॥ ९७२ ॥ तेव्हां सर्वागारांतही । नसे जळावांचूनि कांहीं । त्या समुद्रीं गारा असोनिही नाहीं । द्वैत गाराजळास. ॥ ९७३ ॥ हे अद्वैताची स्थिती । बाणे त्यास अन्वययोग म्हणती । अन्वयसमाधिनिष्ठ मती । त्या योगियाची. ॥ ९७४ ॥ द्वितीयाध्यायांत **अर्जुन** । म्हणे स्थितप्रज्ञ समाधिसंपन्न । तो काय बोले कैसा वर्ते ऐसा प्रश्न । करितां उत्तरही तैसेंचि पावला.॥९७५॥ एवं चाले बोले उठे बसे । तरी अन्वयसमाधि लागला असे । कीं जडचैतन्य-ऐक्यांत समरसे । मानस त्या योगियाचें. ॥ ९७६ ॥ या योगाविषयीं हा श्लोक । बोलिला एथें **उत्तमश्लोक** । जडचैतन्य दोन्ही एक । पाहे जेथें योगिराज. ॥ ९७७ ॥ ऐसा योगी विचक्षण । त्याच्या अनुभवाचें ईक्षण । आणि योगाचें लक्षण । **कमलेक्षण** वदे उत्तरार्धें. ॥ ९७८ ॥

उत्तरार्ध—**'ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शनः ।'**

अगा! योगीं युक्त ज्याचा आत्मा । तो म्हणावा योगयुक्तात्मा । एथें आत्मशब्दें परमात्मा । चित्त म्हणोनि सूचवी. ॥ ९७९ ॥ तंतु आणि पट । माती आणि घट । यांचा आयता योग निपट । आणि हेमालंकारांचा. ॥ ९८० ॥ दोंचा जो संयोग । तोचि म्हणावा योग । एथें योगशब्दें प्रयोग । आत्मा आणि सर्वाभूतांचा. ॥ ९८१ ॥ आत्मा सर्वभूतीं आयता । सोनें अलंकारीं तत्त्वता । न दिसती जे विना आत्मसत्ता । हेम नग जैसे. ॥ ९८२ ॥ जळ आणि तरंग । यांचा आयता असे योग । त्या योगीं होतां दृष्टिसंयोग । जळतरंगीं तरंग जळीं दिसती. ॥ ९८३ ॥ तैसा आत्माच सकळ । परी चित्त विषयभावें विकळ । तें त्या योगें निश्चळ । तो योगयुक्तात्मा म्हणावा. ॥ ९८४ ॥ युक्तात्मा म्हणजे युक्तचित्त । कीं आयत्या योगीं योजिलें चित्त । अर्थ हाचि यथार्थ निश्चित । म्हणतां सर्वत्र समदर्शन. ॥ ९८५ ॥ सर्वत्र जें सम । त्याच समत्वीं दर्शन परम । सर्वत्र सम हा योग उत्तम। तेथें दर्शन म्हणिजे युक्तचितत्त्व. ॥ ९८६ ॥ एवं व्यतिरेकयोग । ज्या योगीं वृत्तीचा वियोग । हा अन्वययोगही **श्रीरंग** । वर्णी त्याचा. ॥ ९८७ ॥ व्यतिरेक समाधींत बैसे । तरी प्रारब्धीं शरीर असे । प्रपंचीं वर्ततांही गवसे । आत्माच सर्वत्र. ॥ ९८८ ॥ तरी त्या योगाचा अभ्यास जैसा । अभ्यास याचाही करी तैसा । तरीच वर्ततांही तोचि ठसा । गवसे चित्तीं. ॥ ९८९ ॥ व्यतिरेकयोगीं प्रत्याहार । वर्णितां सूचविला हा प्रकार । मन परतायाचा चमत्कार। दाविला जेथें. ॥९९०॥

**'यतो यतो निश्चरति'** । या श्लोकीं **श्री**पति । म्हणे जें जें मन चिंती । तेथें तेथेंचि योजावें आत्मत्वीं. ॥ ९९१ ॥ एवं निरोधितां वृत्ती । अनावर होऊं लागती । तेव्हां कल्पूनि जगदाकृती । सर्वत्र आत्मा पहावा. ॥ ९९२ ॥ जरी अभ्यास ऐसा असे । तरी कल्पनेंत आत्मा गवसे । मागुती मन स्वरूपीं समरसे । निरोध वृत्तीचा मागुती. ॥ ९९३ ॥ या श्लोकीं देव । बोलिला जो सर्वात्मभाव । तो दोहीं परी देवाधिदेव । सूचवी योग. ॥ ९९४ ॥ करूनि चराचरध्यान । जडीं चित्स्वरूपाचें दर्शन । तरंगा देखूनि जीवन । पाहणें जैसें. ॥ ९९५ ॥ किंबहुना आधीं जळ दिसे । तेव्हां तरंगाकार गवसे । ऐसा अनुभवाचा ठसा बैसे । पाहतां ये रीती. ॥ ९९६ ॥ योग ऐसा बाणे । तरी जडास आत्मत्वें जाणे । जगीं योगी शहाणे । वर्तती ऐसे. ॥ ९९७ ॥ तेव्हां आत्मा सर्वभूतीं । आणि सर्वभूतें आत्मयांत दिसती । इत्यादि गहनभावें **श्री**पती । बोलिला हा श्लोक. ॥ ९९८ ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले **उत्तम**श्लोक । त्याचें निमित्त सुज्ञलोक । परिसोत आतां एथूनी. ॥ ९९९ ॥ व्यतिरेकयोगप्रसंगें । अन्वययोग वर्णिला **श्रीरंगें** । कीं जीवन्मुक्त अन्वययोगें । व्यतिरेकयोगेंही बोलावा. ॥ ६०० ॥ एवं व्यतिरेकयोग बरा । साधला तरी अन्वययोग दूसरा । न साधे तों न म्हणावें त्या नरा । जीवन्मुक्त. ॥ ६०१ ॥ जेव्हां अन्वययोगाविण । व्यतिरेकयोगेंचि नव्हे जीवन्मुक्तपण । तेव्हां अन्वययोगें निपुण । तोही तैसा म्हणावा. ॥ ६०२ ॥ कीं होतां वृत्तिनिरोध । समाधींत बाणे व्यतिरेकबोध । तो योग न बाणतां जाला सिद्ध । अन्वययोग. ॥ ६०३ ॥ यास तेव्हां जीवन्मुक्तपण । नसे म्हणावें व्यतिरेकयोगसिद्धीविण । तेव्हां दोहीं योगीं निपुण । तो जीवन्मुक्त बोलावा. ॥ ६०४ ॥ आणि पाहतां श्रुती । दोन्ही योग स्वतंत्र दिसती । जीवन्मुक्तस्थिती । दोन्ही योगीं. ॥६०५॥ **ब्रह्म**वल्ली **उ**पनिषदीं । दोन्ही योग हे **यजु**र्वेदीं । बोलिले जे वदनारविंदीं । निघाले एथें श्री**कृ**ष्णाच्या. ॥ ६०६ ॥

व्यतिरेकयोगविषयकश्रुति—**'यतो वाचो निवर्तते अप्राप्य मनसा सह । आनंदं ब्रह्मणो विद्वान्न बिभेति कुतश्चन ॥'**

*श्रुत्यर्थ*—जेथूनि वाचा परतती । जेथें न पावती मनोवृत्ति । ऐसी जे व्यतिरेकयोगस्थिति । त्या स्थितींत अनुभव निजानंदाचा. ॥ ६०७ ॥ ऐसा ब्रह्मानंद ज्याला । व्यतिरेकयोगीं अनुभवा आला । कोणापासूनिही त्याला । भय नसे. ॥ ६०८ ॥ म्हणोनि म्हणे श्रुति । कीं भिईना कोणास कोणे रीती । हे व्य-

तिरेकयोगस्थिति । ब्रह्मवल्लींत. ॥ ६०९ ॥ त्याच ब्रह्मवल्लींत । अन्वययोगही बोलिला निश्चित । ती श्रुतिही या प्रसंगांत । वाखाणावी. ॥ ६१० ॥

श्रुति—'विज्ञानं ब्रह्म चेद्वेद तस्माच्चेन्न प्रमाद्यति ।
शरीरं पाप्मनो हित्वा सर्वान्कामान्समश्नुते ॥'

ज्ञान तें शुद्ध ज्ञान । विशिष्ट ज्ञान तें विज्ञान । अलंकाररूपें विशिष्टपण । जैसें सुवर्णासी. ॥ ६११ ॥ एवं ज्ञानशब्दें ब्रह्म केवळ । जैसें उदक निश्चळ । तरंगाकार जैसें जळ । विश्वाकार ब्रह्म विज्ञान. ॥ ६१२ ॥ व्यतिरेकें ब्रह्म परम । कळलें ज्ञान तें सुगम । समजोनि उमजणें विज्ञानब्रह्म । दुर्गम अत्यंत. ॥ ६१३ ॥ कीं नित्या नश्वरा एकपण । जडा चैतन्याची ऐक्यखूण । सत्य असत्य विरुद्धलक्षण । विरळ समजे हें ऐक्य. ॥ ६१४ ॥ ब्रह्म अतींद्रिय । प्रपंच पंचेंद्रियमय । या द्वैतीं पाहे अद्वय । विरळ कोणी. ॥ ६१५ ॥ याकारणें श्रुति म्हणे । कीं विज्ञानब्रह्म जरी जाणे । तरी जाणे म्हणतां ये खुणे । विरळ पावे ऐसें तात्पर्य. ॥ ६१६ ॥ व्यतिरेकें आत्मा जाणे । त्यास तों नित्य हें सहजेंचि बाणे । कीं अनित्या जडाच्या विपरीत खुणे । पावोनि नित्यत्वें ओळखे आत्मयातें. ॥ ६१७ ॥ जडास अनित्यत्व ऐसें प्रसिद्ध । तेव्हां नित्य चैतन्यास भेद सिद्ध । भेद सिद्ध होतां असिद्ध । अद्वैत जालें. ॥ ६१८ ॥ आतां जड मिथ्या म्हणोनी । असत्य द्वैत यावरूनी । बोलावें तरी शब्देंचिकरूनी । प्रपंचमिथ्यात्व साधेना. ॥ ६१९ ॥ चोरटा आहे खरा । परि चोरी अंगीं न लावितां त्या नरा । म्हणों जातां 'अरे चोरा!' । 'तुझा बाप चोरटा' तो म्हणेल. ॥ ६२० ॥ ऐसें प्रपंचाचें जोंपर्यंत । न कळे मिथ्यात्व निश्चित । तोंवरी मिथ्या म्हणतां स्ववेदांत । मिथ्या होतो न लागतां मिथ्यात्व. ॥ ६२१ ॥ पटीं सर्वत्र तंतु दिसे । तेव्हां पटाचें मिथ्यात्व गवसे । घट तेव्हां मिथ्या भासे । कीं दृष्टि स्पर्शे मातीसी. ॥ ६२२ ॥ तंतूवेगळा न निघे पट । मातीवेगळा न निघे घट । एवं तंतु माती पाहतां निपट । पट घट होती असत्य. ॥ ६२३ ॥ एवं तंतूचि पट । मातीच घट । ब्रह्मचि ऐसें निपट । प्रपंचीं दिसे तरी मिथ्या प्रपंच. ॥ ६२४ ॥ नसोनि ऐसा अनुभव । कोणी दाविती युक्तिवैभव । कीं जडीं नश्वरत्व स्वभाव । मिथ्या म्हणावें या करितां. ॥ ६२५ ॥ नश्वरत्वें जरी । मिथ्यात्व साधे तरी । सर्पभास रज्जूवरी । तैसें मिथ्या कां म्हणावें? ॥ ६२६ ॥

प्रत्यक्षास विरुद्ध । तर्क तितुका असिद्ध । उपजला मेला म्हणतां सिद्ध । मिथ्यात्व कैसें होणार? ॥ ६२७ ॥ पिता मेला ज्याचा। पुत्र आहे जीवंत त्याचा। तेव्हां साचाच होता मेलाही साचा । तरी पुत्र साचा दिसतसे. ॥ ६२८ ॥ वांझेस पुत्र झाला । वांझेचा पुत्र मेला । ऐसें कोणी नाहीं बोलिला । धरणीवरी. ॥ ६२९ ॥ सत्य उपजला सत्य मेला । सत्य पुत्र आपला विऊनि गेला । दिसतसे प्रत्यक्ष त्याला । केंवि मिथ्या म्हणावें? ॥ ६३० ॥ प्रत्यक्षीं रज्जु सत्य । प्रत्यक्षीं सर्प असत्य । ऐसें सिद्ध होतां अगत्य । प्रपंच मिथ्या बोलावा. ॥६३१॥ आतां ज्ञान जरी जालें । प्रपंच मिथ्यात्व कळों आलें । प्रारब्धें शरीर आहे उरलें । प्रपंच तोंवरी दिसतसे. ॥ ६३२ ॥ तरी एकाच दृष्टांतें करूनी । अनुभव न साधे म्हणोनी । धातु विकल्पभेदेंकरूनी । प्रपंचमिथ्यात्व सामवेदीं बोलिलें. ॥ ६३३ ॥ कीं कळतां एक मृत्पिंड । मृण्मय पदार्थ कळती अखंड । नामें आणि विकार उदंड । सकळ मिथ्या. ॥ ६३४ ॥ ज्यास पाहिजे कनक । तो भूषणें न टाकी याचक । एक ब्रह्म भासे अनेक । जीवन्मुक्त कौतुकें हें पाहे. ॥ ६३५ ॥ रज्जु कळतां नसे भुजग । ब्रह्म कळतां नसावें जग । तरी सोनें दिसोनिही दिसे नग । हा दृष्टांत घ्यावा ये स्थळीं. ॥ ६३६ ॥ ज्या दृष्टींत येतां भ्रम । निर्माण केला भुजंगम । तोच रज्जुदर्शनें गतभ्रम । होतां परिहरी सर्पातें. ॥ ६३७ ॥ अलंकार जाला हातें । हातेंचि मोडावें त्यातें । तैसें विश्व काळेंकरूनि होतें । नासतें काळेंचिकरूनी. ॥ ६३८ ॥ जों स्थितीचा काळ असे । तोंपर्यंत विश्व भासे । सोनें दिसोनिही नग दिसे । तैसें ब्रह्म दिसोनिही दिसे सर्व. ॥ ६३९ ॥ आणि मोडती अलंकार । सोनें न मोडे निर्विकार । तैसें मोडे घडे चराचर । शाश्वत असे ब्रह्मत्व. ॥ ६४० ॥ आतां घडे आणि मोडे । हेंहीं न लागे कनकाकडे । कीं कनकत्व त्याचें न बिघडे । दधिपणें विघडे जैसें दुग्धत्व. ॥ ६४१ ॥ हे सुवर्णाची शक्ती । घडे मोडे पावे नानाव्यक्ती । दृष्टांत एकदेशी तथापि युक्ती । चढती तोंपर्यंत चढवाव्या. ॥ ६४२ ॥ एवं प्रपंच अनित्य । आणि ब्रह्म नित्य । प्रपंच मिथ्या ब्रह्म सत्य । तथापि ऐक्य दोंहींस. ॥ ६४३ ॥ कळल्या इत्यादि युक्ती । बोलका बोलिला ऐशा उक्ती । तरी न पावतो मुक्ति । जों अनुभव ऐसा होय ना. ॥ ६४४ ॥ कीं अलंकारीं उघडें हेम । तैसें चराचरीं उघडें ब्रह्म । दिसे तेव्हां ज्ञानी उत्तम । वाचाळ शब्दवादीच तोंवरी. ॥ ६४५ ॥ ऐसें ब्रह्म चित्स्वरूप । आणि जडप्रपंचरूप । या विपरीत लक्षणासही ऐक्यप्रताप । करी श्रीगुरूचा.

॥ ६४६ ॥ जेथें अधिष्ठान सत्य । आणि विवर्त असत्य । दोंहींस ऐक्य मानावें अगत्य । कीं एक असे एक असेचिना. ॥ ६४७ ॥ विवर्त आणि अधिष्ठान । इतुकेंचि दोंहींचें अनुसंधान । कीं स्वयें प्रकाशे स्वप्रकाशज्ञान । अधिष्ठान ऐसें समजावें. ॥ ६४८ ॥ सूर्यप्रभा प्रकाशे स्वयें । मृगजळ त्याकरितां भासे निश्चयें । जितकीं परप्रकाशमयें । लटिकीं विवर्तें तीं जाणावीं. ॥ ६४९ ॥ सूर्यसत्तेनें दिसे मृगजळ । रज्जुसत्तेनें दिसे मृषा व्याळ । तरंगातें प्रकाशी जळ । सुवर्ण अलंकारातें प्रकाशी. ॥ ६५० ॥ तंतूवांचूनि पट । मातीवांचूनि घट । न दिसती न असती निपट । जैसें मृगजळ तेजावांचूनी. ॥ ६५१ ॥ तैसें आत्मसत्तेविण । कोणत्या जडें जाणावें जड कवण । चिदधिष्ठानीं विवर्तपण । ऐसें जडाचें. ॥ ६५२ ॥ एवं जितकें जडाचें रूप । तितकें असे स्वात्मस्वरूप । इंद्रियदृष्टीस विघरलें थिजलें तूप । बुद्धिरसनेस रस एक. ॥ ६५३ ॥ परंतु माती घटीं उघडी । ऐसी आत्मसत्ता दिसे जडीं । तेव्हां या अनुभवीं बुडी । चित्त दे. ॥ ६५४ ॥ हें अवघें युक्तिजाळ । गुरुकृपेनेंचि होय सफळ । तोंपर्यंत अत्यंत अकळ । जडीं देखणें चित्स्वरूप. ॥ ६५५ ॥ सर्वत्र तंतु उघडा पटीं । दिसे माती उघडी घटीं । हे किल्ली असे पोटीं । गुरुकृपेच्या. ॥ ६५६ ॥ श्रुतींत **'विज्ञानं ब्रह्म चेद्वेद'** । हें या तात्पर्यें बोले वेद । कीं बहुत जाणती जडचैतन्यभेद । विरळ जाणे उभयऐक्य. ॥ ६५७ ॥ एवं विश्वरूप ब्रह्म । हें विज्ञानब्रह्म परम । **'चेद्वेद'** म्हणजे जरी जाणणें हें दुर्गम । अन्वयज्ञानविज्ञान. ॥ ६५८ ॥ ऐसें अकळही कळलें । आणि ध्यानीं चित्त नाहीं वळलें । तें कळोनिही खवळलें । जड जग यथापूर्व मानूनी. ॥ ६५९ ॥ म्हणूनि म्हणते श्रुति । कीं, **'तस्माच्चेन्न प्रमाद्यति'** । म्हणजे जरी त्यापासूनि मागुती । चित्त विस्मृतीतें पावेना. ॥ ६६० ॥ विज्ञान ब्रह्म जाणे । जरी जाणोनिही त्या खुणे । न विसरे तरी मुक्ति बाणे । शरीर असतांही जीवंत. ॥ ६६१ ॥ एवं कठिण अन्वयज्ञान । जाणणें विश्वरूप ब्रह्मविज्ञान । तैसेंचि जाणोनि करणें जतन । कठिण अत्यंत. ॥६६२॥ हेंही ऐसें जाणे । जाणोनिही जरी अखंडता बाणे । तरी शरीर असतांचि तो मुक्त म्हणे । हे श्रुति ऐसी ब्रह्मवल्लीची. ॥ ६६३ ॥ कीं अज्ञान गेलियावरी । जीवन्मुक्तीस इतुकीच उरी । कीं विषयभोगीं काम करी । भ्रमसंस्कारशेषें पहिलिया. ॥ ६६४ ॥ सकळ पापाचें बीज । न कळणें स्वस्वरूप सहज । तें कळलें असोनिही आत्मत्व निज । विरस पाडी हा काम. ॥ ६६५ ॥ एवं पापी

म्हणावें या कामा । श्रुति यास्तव यास म्हणे पाप्मा । तृतीयाध्यायीं याच अधमा । पाप्मा म्हणे श्रीकृष्णही. ॥ ६६६ ॥ **'पाप्मानं प्रजहि ह्येनं'** म्हणोनी । या कामातेंचि या **गी**तावचनीं । कृष्ण म्हणे हृदयीं धरूनी । या श्रुतीतेंची. ॥६६७॥

तृतीयाध्यायश्लोकार्ध— **'पाप्मानं प्रजहि ह्येनं ज्ञानविज्ञाननाशनम् ।'**

पाप्मा पापी हा काम । जो ज्ञानविज्ञान नाशी अधम । मारी हा पापी परम । पाप्मा म्हणोनि ज्याला श्रुति म्हणे. ॥ ६६८ ॥ एवं ज्ञान व्यतिरेक ज्ञान । अन्वयज्ञान तें विज्ञान । काम पाप्मा उभयनाशन । **गी**ता म्हणे. ॥ ६६९ ॥ ऐसी **गी**ता आणि श्रुती । पाप्मा या कामास म्हणती । श्रुति म्हणे जीवन्मुक्तीप्रती । पावे मारूनियां पापी या कामातें. ॥ ६७० ॥ तरी दुःखाची निवृत्ति । आणि नित्यसुखाची प्राप्ती । ते म्हणावी जीवन्मुक्ति । कैवल्यांतही नसे हा लाभ. ॥ ६७१ ॥ कीं आनंदमात्र ब्रह्म । परी तें निर्गुण शुद्ध निर्धर्म । तें अनुभवा येणें हाही धर्म । शुद्धसत्त्वाचा. ॥ ६७२ ॥ अमृत आपलें अमृतपण । नेणे तैसें सुख निर्गुण । सत्त्वें त्याच्या अनुभवाची खूण । जीवन्मुक्तास कीं वैकुंठवासियास. ॥ ६७३ ॥ एवं ज्ञानही जालें जयास । हा पापी काम त्यास । घेऊं नेदी विलास । जीवन्मुक्तिवैभवाचे. ॥ ६७४ ॥ परी जरी हें विज्ञानब्रह्म । जाणे आणि बाणे परम । तरी या पापिया कामातें मारूनि उत्तम । ब्रह्म सुख पावे शरीर असतांही. ॥ ६७५ ॥ काम टाकिल्याविण । अनुभवा नये ज्या सुखाची खूण । श्रुति त्या सुखाचें लक्षण । बोलतसे.॥६७६॥ **'सर्वान्कामान्समश्नुते'** म्हणोनी । श्रुति या सर्वकामशब्देंकरूनी । परमानंद सूचवूनी । बोलतसे. ॥ ६७७ ॥ कीं होती जे जे कामभोग । ते ते दाविती सुखाचे योग । परी कामतृप्त नव्हे कीं संयोग । अपेक्षी आणखी कामभोगाचा. ॥ ६७८ ॥ ज्यास हें स्थावर जंगम । अवघेंचि विज्ञानब्रह्म । कळलें बाणलें त्यास काम । कांहीं न उरला. ॥६७९॥ कीं अभ्यासबळें काम । टाकिला बाणलें विज्ञानरूप ब्रह्म । त्यास अवघें स्थावरजंगम । सुखचि जालें. ॥ ६८० ॥ यालागीं कामभोग । जे असतील त्या सर्वांचा संयोग । त्यास जाला बाणतां योग । विज्ञानब्रह्मस्वात्मतेचा. ॥ ६८१ ॥ एवं अन्वययोगेंचिकरूनी । जीवन्मुक्ति सिद्ध जाली यावरूनी । आणि **'यतो वाचो निवर्तंते'** म्हणोनी । हे श्रुति व्यतिरेकयोगें हें बोले. ॥ ६८२ ॥ **'यतो वाचो निवर्तंते'** हे श्रुती । म्हणे मन वाचा चारी जेथें परतती । जो जाणे त्या ब्रह्मानंदाप्रती । तो भीना मग कवणास. ॥ ६८३ ॥ एवं भयापासूनि मुक्त । तोही

म्हणावा जीवन्मुक्त । तेव्हां व्यतिरेक योगमात्रेंचि युक्त । तोही जीवन्मुक्त बोलावा. ॥ ६८४ ॥ या योगातेंही स्वतंत्रपण । ऐसें असोनि कमलेक्षण । पूर्वश्लोकीं अन्वययोगेंचि खूण । जीवन्मुक्ततेची कां वदे याचीही? ॥ ६८५ ॥ ऐसा हा संशय । ज्यास सहाय श्रुतिसमन्वय । या संशयनिरासें निर्णय । करूं पाहे श्रीकृष्ण. ॥ ६८६ ॥ कीं चित्तास वृत्तीचा वियोग । तो बाणला जरी व्यतिरेकयोग । भोगितां प्रारब्ध जग । जड दिसेल अन्वययोगावांचूनी. ॥ ६८७ ॥ व्यतिरेकयोग ऐसा । त्याच योगें जीवन्मुक्त कैसा । जडतरंगांत चिद्रसा । न देखे जोंवरी. ॥ ६८८ ॥ यालागीं अन्वययोगाविण । व्यतिरेकयोगेंचि न घडे जीवन्मुक्तपण । म्हणोनि व्यतिरेकयोगनिपुण । जीवन्मुक्त अन्वययोगेंचि बोलिला. ॥ ६८९ ॥ आतां **'यतो वाचो निवर्तंते'** । हे श्रुति फळ जें बोलते । तेथें पुनर्जन्मनिवृत्ति होते । परी जीवन्मुक्ति त्याचयोगें साधेना. ॥ ६९० ॥ व्यतिरेक आणि अन्वययोग दोन्ही । एकही बाणतां या दोहींमधूनी । मुक्त निश्चयें म्हणोनी । जन्ममरणास तो भीना श्रुति म्हणे. ॥ ६९१ ॥ कीं ज्ञान झालियाउपरी । चित्तनाश नोहे जोंवरी । पुन्हा गर्भवास उदरीं । होणारचि त्याला मातेच्या. ॥ ६९२ ॥ त्या चित्तनाशास हे दोन्ही । उपाय असती म्हणोनी । योगवासिष्ठीं वसिष्ठमुनी । बोले श्रीरामातें दों श्लोकीं. ॥ ६९३ ॥

योगवासिष्ठ श्लोक---**'द्वौ क्रमौ चित्तनाशाय योगो ज्ञानं च राघव ।**
**योगो वृत्तिनिरोधो हि ज्ञानं सम्यगवेक्षणम् ॥**
**असाध्यः कस्यचिद्योगो कस्यचिज्ज्ञाननिश्चयः ।**
**प्रकारौ द्वौ ततः साक्षाज्जगाद परमः शिवः ॥'**

'दोन क्रम चित्तनाशाचे । अगा राघवा! बोलिले साचे । एक योग एक ज्ञान ऐसें स्ववाचे । परम शिव वदला' म्हणे वसिष्ठ. ॥ ६९४ ॥ त्यांत योग म्हणजे वृत्तिनिरोध । ज्ञान म्हणजे अन्वयबोध । सम्यगवेक्षण शब्दाचा शोध । करितां अन्वययोग सिद्ध होतो. ॥ ६९५ ॥ कीं सम्यगवेक्षण । म्हणजे बरें निरीक्षण । बरें पाहणें याचें लक्षण । ये रीतीचें. ॥ ६९६ ॥ कीं एकास वस्त्र दाखवूनी । पुसावें काय आहे म्हणोनी । आणि म्हणावें कीं बरें अवलोकूनी । हें काय आहे तें सांग. ॥ ६९७ ॥ तो म्हणेल वस्त्रमात्र । आहे हें बरें पाहती माझे नेत्र । हें वस्त्रचि आहे संदेहमात्र । नसे अवलोकनांत या माझ्या. ॥ ६९८ ॥ तंतुच आहे हे खूण । न कळे सत्य मानी पटपण । त्यास कैंचें सम्यगवेक्षण । कीं तंतु दिसोनिही न दिसे जयाला. ॥ ६९९ ॥ वस्त्राभावें पाहणार । त्यांतही

दोन प्रकार । एक पांचा वर्षांचा कुमार । एक तरुण शाहणा. ॥ ७०० ॥ तंतूचा रचला पट । हें कुमार नेणे निपट । तंतु विसरोनि शहाणाही निपट । सम्यगवेक्षण करीना. ॥ ७०१ ॥ पटांत तंतु जैसा । सर्वभूतीं आत्मा तैसा । ज्यास नसेच बोध ऐसा । तो या ज्ञानमार्गीं म्हणावा बाळक. ॥ ७०२ ॥ गुरुमुखें समजोनिही व्यतिरेक । अन्वय समजला अनेकीं एक । आणि न पाहे हें अद्वैतकौतुक । ध्यान न करी सर्वात्मकत्वें. ॥ ७०३ ॥ तोही न म्हणवे निपुण । कीं कळोनिही न करी सम्यगवेक्षण । म्हणजे बरें न करी निरीक्षण । कीं आत्मतंतु जडपटीं पाहेना. ॥ ७०४ ॥ तंतूचा पट हें जाणे तरुण । परी पट मिथ्या ऐसी न धरी खूण । त्यासही नसे सम्यगवेक्षण । जे रीती. ॥७०५॥ वस्त्र दावूनि त्याप्रती । हें काय दिसतें म्हणोनि जे पुसती । तो त्यास म्हणेल बरविये रीती । म्यां पाहिलें परी असे हें वस्त्रचि. ॥ ७०६ ॥ तंतूवांचूनि वेगळा पट । काढितां नसेचि कांहीं निपट । तरी पट नाहीं तंतुच आहे ऐसें नीट । न सांगे कीं सम्यगवेक्षण असेना. ॥ ७०७ ॥ एवं कळोनिही अन्वय-ज्ञान । विश्वरूप ब्रह्मविज्ञान । एकाग्रचित्तें करी ध्यान । सम्यगवेक्षण त्याला म्हणावें. ॥ ७०८ ॥ एवं चित्तनाशास उपाय दोनी । प्रस्तुतीं बोलिला वसिष्ठमुनी । एक योग एक ज्ञान म्हणोनी । त्यांत हें विवरण ज्ञानशब्दाचें. ॥ ७०९ ॥ कीं ज्ञान म्हणजे सम्यगवेक्षण । सम्यगवेक्षणाचें हें निरूपण । कीं जडीं चिदात्मनिरीक्षण । बरविया प्रकारें. ॥ ७१० ॥ दोहींपरी चित्तनाश । कीं दोहींपरी स्फुरे एक आत्मप्रकाश । तोंवरी चित्त जोंपर्यंत लेश । स्फुरतसे चित्तीं जडत्वाचा. ॥७११॥ कीं चित्त चेतवी मन । तें करी जडविषयचिंतन । चित्तीं राहे अनुसंधान । जडत्वाचें. ॥ ७१२ ॥ व्यतिरेकयोगीं चित्त । मुरे आत्मस्वरूपीं अत्यंत । अन्वययोगीं सर्वत्र निश्चित । आत्मा देखे तरंगीं जैसा समुद्र. ॥ ७१३ ॥ आत्मप्रकाशेंकरूनि । जडास चेतवी म्हणूनी । चित्त म्हणावें जों असे विसरोनी । आत्मसत्ताप्रकाशातें. ॥ ७१४ ॥ व्यतिरेकयोगीं जड कांहीं । आत्मस्वरूपीं दिसत नाहीं । अन्वययोगीं चराचर ही । आत्माच वाटे. ॥ ७१५ ॥ दोहींपरी ऐसें पाहे । तों चित्त चैतन्यचि होऊनि राहे । एवं चित्त म्हणणें न साहे । दोहीं योगीं यापरी. ॥ ७१६ ॥ चित्तनाशें मुक्ति म्हणूनी । एका श्लोकें वसिष्ठमुनी । बोलिला हे प्रकार दोनी । श्रीरामचंद्रा जगद्गुरूतें. ॥ ७१७ ॥ चित्तनाश प्रकार दोनी । एकही साधे जरी दोहीं-मधूनी । तरी चित्तनाश म्हणोनी । वसिष्ठ म्हणे. ॥ ७१८ ॥ कीं स्वरूपीं

चित्तास जों वृत्तीचा वियोग । कोणास हा व्यतिरेकयोग । असाध्य आणि आत्मभावें जग । पाहणें असाध्य कोणासी. ॥ ७१९ ॥ कोणास व्यतिरेकयोग सिद्ध । त्यास अन्वययोग न असे सिद्ध । कोणी अन्वययोगीं प्रबुद्ध । व्यतिरेक-योग असाध्य त्यालागीं. ॥ ७२० ॥ एवं या दोहींमधूनी । चित्तनाश भलत्या एका योगेंकरूनी । म्हणूनि बोलिले वसिष्ठमुनि । ऐसेंच श्रुतीही बोलते. ॥ ७२१ ॥ **'यतो वाचो निवर्तंते'** म्हणोनी । श्रुति या व्यतिरेकयोगें-करूनी । या योगाचा अनुभवी कोणापासूनी । भय न पावे म्हणतसे. ॥ ७२२ ॥ व्यतिरेकयोगीं चित्त । नाश पावलें निश्चित । तेव्हां मोक्ष त्याला हस्तगत । मग तो निर्भय कां नव्हे? ॥ ७२३ ॥ परंतु विज्ञानब्रह्मयोगश्रुती । शरीर असतां जीवन्मुक्ती । अन्वययोगें बोले ऐसी उक्ती । व्यतिरेकयोग श्रुति वदेना. ॥ ७२४ ॥ कोठें व्यतिरेकयोगीं । वर्णूनीही त्यालागीं । जीवन्मुक्ति वर्णिली जगीं । तरी अन्वययोगही त्यास असेल जाणावें. ॥ ७२५ ॥ कीं तोचि जीवन्मुक्तयोगी । कीं पटीं तंतु तैसा आत्मा जगीं । देखोनी वर्ते त्याचि-लागीं । जीवन्मुक्तपदवी बोलावी. ॥ ७२६ ॥ याचि भावें भगवंत । व्यतिरेकयोग आधीं या अध्यायांत । बोलोनि शेवटीं अत्यंत । अन्वय त्यातेंचि बोलिला. ॥ ७२७ ॥ कीं अन्वययोगावांचूनी । द्वैतदर्शन घडे म्हणोनी । अन्वययोगेंचिकरूनी । जीवन्मुक्तत्व व्यतिरेकयोगियातें ही. ॥ ७२८ ॥ यालागीं **'सर्वभूतस्थमात्मानं'** म्हणोनी । या पूर्वश्लोकेंकरूनी । व्यतिरेकयोगही बोलोनी । वर्तणूक अन्वययोगें बोलिला. ॥ ७२९ ॥ तों संशय उपजला या भागीं । कीं व्यतिरेकसमाधिसंपन्न योगी । जाला तरी पाहिजे तयालागीं । अन्वययोग जीवन्मुक्तीकारणें ॥ ७३० ॥ तेव्हां अन्वययोगनिपुण । ज्यास बाणेल सर्वात्मखूण । त्यानेंही व्यतिरेकयोगप्रवीण । जालें पाहिजे. ॥ ७३१ ॥ कीं त्यास अपेक्षा याची । तेव्हां यासही अपेक्षा असेल त्याची । आणि वेदवाणी तों योगद्वयाची । प्रशंसा स्वतंत्रत्वें बोलते. ॥ ७३२ ॥ शंका ऐसी उपजली । तों वेदांची पाहतां बोली । वसिष्ठादि मुनिमतें सिद्ध जाली । मुक्ति दोहींत एका योगेंकरूनीही. ॥ ७३३ ॥ परी जीवन्मुक्तिदशा श्रुती । अन्वय-योगियातेंचि बोलती । आणि पाहतां अनुभवाची ही रीती । द्वैत न दिसे अन्वययोगियातेंचि. ॥ ७३४ ॥ श्रुति युक्ति इत्यादि कोटी । श्रीकृष्ण धरूनि आपले पोटीं । या दों श्लोकीं म्हणे अगा किरीटी! । थोर अन्वययोग

दोहींत. ॥ ७३५ ॥ पोटीं ऐसा भाव । तों दों श्लोकीं देवाधिदेव । म्हणतो व्यतिरेकयोगावांचूनिही स्वयमेव । स्वतंत्र अन्वययोग जीवन्मुक्तीस. ॥ ७३६ ॥ आणि योगीं प्रवर्तला । तो कोणी नाहीं परतला । म्हणूनि बोलतो या बोला । प्रथम या श्लोकीं. ॥ ७३७ ॥

**यो मां पश्यति सर्वत्र सर्वं च मयि पश्यति ।**
**तस्याहं न प्रणश्यामि स च मे न प्रणश्यति ॥ ३० ॥**

अगा ! मातें पाहे सर्वत्र । आणि मजमाजीं हें सर्व विचित्र । पाहे हा योगारंभमात्र । जो करी. ॥ ७३८ ॥ तो योगारूढ नसे जरी जाला । योगभ्रंश न घडे कदापि त्याला । कीं मी मग त्या योगियाला । अंतर नेदीं कदापी. ॥ ७३९ ॥ जो ऐसें पाहों लागला । मी अंतर नेदीं कदापि त्याला । आणि तो न सोडी मजला । अगा! कदापी. ॥ ७४० ॥ श्लोकार्थ इतकाचि परी । कोणी म्हणतील या उपरी । कीं आत्मा देखेल चराचरीं । तो योगारूढचि बोलावा. ॥ ७४१ ॥ तरी जेव्हां योगारूढचि जाला । अंतर न देणें काय उरलें तयाला । मग अवकाश न दिसे या बोला । कीं मी अंतर नेदीं तयातें. ॥ ७४२ ॥ कीं आत्मत्वें जगीं । जो पाहे कृष्ण जगदात्मयालागीं । तो कृष्ण जाला योगी । त्यास न सोडी हेंही अपूर्व काय? ॥ ७४३ ॥ यालागीं योगारूढ बरवा । हा योगी न वाखाणावा । कीं योगारूढ तेव्हां म्हणावा । जेव्हां अखंडता बाणे या अनुभवाची. ॥ ७४४ ॥ कीं जडत्व न दिसे कांहीं । किंबहुना जड कांहींच नाहीं । या अखंडतेनें विदेही । देह धरूनि जो वर्ते. ॥ ७४५ ॥ आणि सर्वत्र भगवंत । त्या भगवंतीं सर्वभूतें निश्चित । भूतें भगवंत ऐसें द्वैत । देखोनि अद्वैत जो पाहे. ॥ ७४६ ॥ त्यास एथें ये रीती । त्याचा अनुभव दावूनि विश्वपती । वर्णी कीं योगारूढ स्थिती । नसे अद्यापि हा भाव. ॥ ७४७ ॥ एवं योगाचा अभ्यासक । सिद्ध नव्हे हा साधक । परी अद्वैतभजन आत्यंतिक । घडों लागलें या योगीं. ॥ ७४८ ॥ आणि हा ज्ञानी । सर्वात्मयोगीही होऊनी । अभ्यास करितां लागला भजनीं । सगुणाचिया. ॥ ७४९ ॥ कीं जे निर्गुणचि ध्याती । त्यांस व्यतिरेकयोगींच अत्यंत रती । जे ज्ञानी सगुण भजती । त्यांस आवडी अन्वययोगाचीच अत्यंत. ॥ ७५० ॥ अत एव पूर्वश्लोकें करूनी । **'सर्वभूतस्थमात्मानं'** म्हणोनी । आत्मदर्शनचि बोलोनी । या श्लोकें मातें सर्वत्र जो पाहे म्हणतसे. ॥ ७५१ ॥ कीं आत्मा सर्वत्र दिसे । तोचि आत्मा सगुणपरमात्मा असे । ऐसी सर्वभूतीं समरसे । भक्ति

माझी हा भाव. ॥ ७५२ ॥ **'वासुदेवः सर्वमिति'** । सप्तमाध्यायांत श्रीपती । बोलेल, आणि अष्टादशाध्यायाचे अंतीं । भक्तिरहस्य हेंचि बोलेल. ॥ ७५३ ॥ **'ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा'** या श्लोकीं । श्रीकृष्ण अष्टादशीं बोलेल कीं । ब्रह्म जालाच तरी या लोकीं । तो सम सर्वभूतीं मद्भक्ति पावतो. ॥ ७५४ ॥ **'समः सर्वेषु भूतेषु'** म्हणोनी । **'मद्भक्तिं लभते परां'** म्हणे यावरूनी । भक्ति थोर सर्वात्मकज्ञानीं । हा सिद्धांत गीतांतीं स्थापिला.॥७५५॥ द्वादशीं **'अनन्येनैव योगेन । मां ध्यायंत उपासते'** ऐसें स्ववचन । बोलोनि **'तेषामहं समुद्धर्ता'** कमलनयन । ऐसेंही बोलेल. ॥ ७५६ ॥ तो हा अन्वययोग । कीं मातें सर्वत्र पाहे आणि सर्व जग । मजमाजि पाहे भक्तियोग । सुचवी ऐसा या श्लोकीं. ॥ ७५७ ॥ पूर्वश्लोकीं आत्मा सर्वत्र । पाहे आणि आत्मयांत जग विचित्र । पाहे म्हणे कमलनेत्र । भाव दावी निर्गुणीं. ॥ ७५८ ॥ तोही अन्वययोगी । परी जो न भजे सगुणालागीं । तो व्यतिरेकनिष्ठ त्यातें जगीं । जीवन्मुक्ति अन्वययोगें वर्णिली. ॥ ७५९ ॥ तो स्वयत्नेंचि तरणार । म्हणोनि त्याचा मी उद्धरणार । त्यास मी न अंतर देणार । ऐसें न म्हणे. ॥ ७६० ॥ कीं मी कल्पवृक्षस्वभाव । सर्वसम देवाधिदेव । जो जैसा धरी भाव । फल तैसें देतसें तयासीं. ॥ ७६१ ॥ **'ये यथा मां प्रपद्यंते'** म्हणोनी । हा निर्णय चतुर्थाध्यायांत करूनी । एकदां बोलिला त्यावरूनी । ज्ञानी सगुणभक्त सुचविला या श्लोकीं. ॥ ७६२ ॥ कीं **'तस्याहं न प्रणश्यामि'** । म्हणजे त्यास अदृश्य न होणार मी । यावरूनी सूचवी जगत्स्वामी । कीं ज्ञानी योगी सगुणोपासक. ॥ ७६३ ॥ कीं जरी तो भजे मातें । मी अदृश्य नव्हे तयातें । हें न म्हणे निर्गुणोपासकातें । कीं दयालुत्वधर्म न असती निर्गुणत्वीं. ॥ ७६४ ॥ मीच असें निर्गुण । परी तेथें नसे दयालुत्व गुण । दयेकरितां सगुणपण । अवलंबावें लागतें. ॥ ७६५ ॥ तें सगुणपण जरी । त्या निर्गुणोपासका दावूं तरी । विषमता रोकडी मजवरी । स्थापेल. ॥ ७६६ ॥ जो भजे जैसा । मी प्रगटतों त्यास तैसा । तरीच विषमत्वाचा ठसा । मजवरी बैसेना. ॥ ७६७ ॥ एवं सगुणभक्तयोगियास । न लगती योगसिद्धीआयास । इत्यादि भावें तयास । गौरवूनि बोलतो आतां या श्लोकीं. ॥ ७६८ ॥

**सर्वभूतस्थितं यो मां भजत्येकत्वमास्थितः ।**
**सर्वथा वर्तमानोऽपि स योगी मयि वर्तते ॥ ३१ ॥**

अगा ! मी सर्वभूतीं असें । सर्व कल्पूनि सर्वांत वसें । तोचि मी आत्मा आपुला ऐसें । व्यतिरेकें कळलें जयासी. ॥ ७६९ ॥ तो सकळाहूनि प्रिय ।

आपला आत्मा हा निश्चय । कीं पुत्रकलत्र इत्यादि होय । प्रिय त्याच आत्मयाकारणें. ॥ ७७० ॥ तो ऐसा आवडता अत्यंत । अर्जुना ! तोचि मी सर्वभूतीं भगवंत । सुखसमुद्र उरलों अनंत । चराचर तरंगा व्यापूनी. ॥ ७७१ ॥ एकत्व त्या मजसीं ऐसें । अनुष्ठूनि सर्वात्मभक्तिरसें । तो भजे योगी ओरसें । निवृत्तिमार्गें. ॥ ७७२ ॥ अर्जुना! तो श्रेष्ठ अत्यंत योगी । हें काय नवल सांगों तुजलागीं । कीं सर्वसंगपरित्यागी । आणि भक्त माझा. ॥ ७७३ ॥ अगा! तो सर्वांही प्रकारीं । नांदला जरी घरदारीं । आणि प्रवर्तला जरी पुत्रदारीं । तरी मजमध्येंच तो योगी वर्तता. ॥ ७७४ ॥ अगा! सर्वथा प्रपंचीं वर्तणें । आणि मजमध्येंच असणें । त्यास आश्चर्य न वाटे या लक्षणें । परी आश्चर्य तुम्हां सर्वांसी. ॥ ७७५ ॥ कीं पश्चिम दिशे असे निधान । तदर्थ पूर्वाभिमुख करी धावन । तैसा प्रपंचीं प्रवर्तोनि साधन । करणें मोक्षमार्गाचें. ॥ ७७६ ॥ परंतु प्याला अमृत । तो विष भक्षितांही नव्हे मृत । तैसा सर्वात्मभक्त अत्यंत । प्रपंचीं वर्तला परी पदच्युत होईना. ॥ ७७७ ॥ कां नव्हे पदच्युत । याचा हेतुही अच्युत । सूचवी कीं तो असे वर्तत । सहजचि मजमाजीं. ॥ ७७८ ॥ तो नव्हे पदच्युत । जो सर्वभूतीं देखे अच्युत । जरी प्रपंचीं अत्यंत । तो वर्तला. ॥ ७७९ ॥ सर्वथा प्रपंचीं वर्तला । तरी अर्जुना! ऐसें जाण त्याला । कीं मजमध्येंचि वर्तता या बोला । बोलिला गहन भावें. ॥ ७८० ॥ कीं जरी नसे माझी आवडी । तरी मजमाजीं चित्त न थारे घडी । एवंच मजमाजीं वर्तता या शब्दें गोडी । अत्यंत आपली दाखविली. ॥ ७८१ ॥ एवं सुवर्णाची प्रीति । त्यास सर्वालंकारीं तेचि स्मृति । तैसी स्त्रीपुत्रधनवाहनादि आकृति । भगवद्रूप जो पाहे.॥७८२॥ तो सर्वथा वर्तोनिही प्रपंचीं । प्रपंचवार्ता त्यास कैंची । भगवद्वाणी स्थिति तयाची । ऐसी सूचवी या भावें. ॥ ७८३ ॥ एवं ऐसा सर्वात्मभक्त । प्रपंचीं वर्तला तरी विरक्त । प्रारब्ध भोगूनि अनुरक्त । भक्तिमार्गींच. ॥ ७८४ ॥ एवं होऊनिही ज्ञानयुक्त । प्रपंचीं वर्तोनिही विरक्त । आणि सर्वात्मभावें भगवद्भक्त । अन्वययोगी होतसे. ॥ ७८५ ॥ एवं अन्वययोगाचें महत्त्व । नसे व्यतिरेकयोगीं हें तत्त्व । या दों श्लोकीं श्रेष्ठत्व । अन्वययोगाचें ये रीती. ॥ ७८६ ॥ आणि विश्व भगवद्रूप निपुण । पाहे हें परम भक्तियोगाचें लक्षण । या भावें कमलेक्षण । श्रेष्ठत्व अन्वययोगाचें बोलिला. ॥ ७८७ ॥ या योगें भगवद्भक्ति । म्हणूनि या गीतेंत भगवदुक्ति । स्थळस्थळीं त्याची अभिव्यक्ति । दाखविलीच

या टीकेंत. ॥ ७८८ ॥ गीताशास्त्र सूत्रप्राय । गूढ एथें जो भगवदभिप्राय । याच्या अर्थबोधाचा उपाय । विशद श्रीमद्भागवतीं. ॥ ७८९ ॥ श्रीभागवत महापुराण । तेथें वेदव्यासरूपी नारायण । विशद गीतार्थनिरूपण । पदोपदीं करीतसे. ॥ ७९० ॥ प्रस्तुत अन्वययोगरीति । स्वभक्तियोगीं श्रीपति । योजूनि बोलिला हेचि स्थिति । विशद भागवतीं सर्वत्र. ॥ ७९१ ॥ त्यांत प्रल्हाद पुण्यश्लोक । भक्तियोगीं हा एक । बोलिला असे हा श्लोक । सप्तम स्कंधीं. ॥ ७९२ ॥

सप्तमस्कंधश्लोक—**'एतावानेव लोकेऽस्मिन्पुंसः स्वार्थः परः स्मृतः।
एकांतभक्तिर्गोविंदे यत्सर्वत्र तदीक्षणम् ॥'**

प्रल्हाद म्हणे या श्लोकीं । स्वार्थ स्वपुरुषार्थ परम हा कीं । एकांत-भक्ति उत्तमश्लोकीं । वेदवेदांतवेद्या गोविंदीं जरी घडे. ॥ ७९३ ॥ श्लोकाचे तीन चरण । एकांतभक्तिमहत्त्वनिरूपण । आतां चतुर्थचरणीं विवरण । एकांतभक्तीचें तोचि करितो. ॥ ७९४ ॥ **'यत्सर्वत्र तदीक्षणं'** म्हणोनी । या चतुर्थचरणें करूनी । अर्थ एकांतभक्तीचा विवरूनी । बोलतसे प्रल्हाद. ॥ ७९५ ॥ कीं जें सर्वत्र तदीक्षण । म्हणजे सर्वांठायीं त्याचें निरीक्षण । हें एकांतभक्तीचें लक्षण । कीं एकामाजी अंत सर्वांचा. ॥ ७९६ ॥ सर्वांचा अंत । एका त्याच्या स्वरूपांत । त्यास म्हणावें एकांत । त्याचा अर्थ कीं सर्वत्र त्यातें पाहणें. ॥ ७९७ ॥ दृष्टांतें हा अर्थ । सिद्ध होतो ज्यांत परमार्थ । अंत समुद्रांत तों यथार्थ । सर्वां तरंगीं. ॥ ७९८ ॥ पाहतां सर्वां तरंगीं । समुद्र जळचि दिसे अंतरंगीं । चित्समुद्रीं श्रीरंगीं । हेंचि एकांतभक्ती. ॥ ७९९ ॥ कीं तरंगमात्रीं सागर । तैसा चराचरीं सर्वेश्वर । तेव्हां तरंगसागरीं तैसें चराचर । अंत पावलें एका गोविंदीं. ॥ ८०० ॥ अंत म्हणजे अभाव । कीं चराचरीं देखतां भगवद्भाव । जडत्वास न उरे ठाव । हा एकामाजि अंत सर्वांचा. ॥ ८०१ ॥ एका आत्मसुवर्णाआंत । सर्वांजडा अळंकाराचा अंत । या ज्ञानाचें नांव एकांत । भक्ति हेच भजतां सगुणत्वें. ॥ ८०२ ॥ इत्यादि दृष्टांत कोटी । प्रल्हाद आठवूनि पोटीं । अन्वययोगीं हे दाखवी गोमटी । भक्ति गोविंदाची. ॥ ८०३ ॥ हे अर्थ सूत्रप्राय । गीतेंत दाखविले अभिप्राय । कीं ब्रह्मभूत सर्वत्र सम होय । तो परम भक्ति माझी पावतो. ॥ ८०४ ॥ एवं भक्त अन्वययोगी । त्या एकांत-भक्तीस उपयोगी । आणि अव्यक्तोपासकालागीं । द्वैतनाशक हाचि योग.

॥ ८०५ ॥ म्हणऊनि वारंवार । या योगाचा अत्यंत बडिवार । प्रकरण तों पाहतां प्रकार । योगाचेंचि. ॥ ८०६ ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञलोक । परिसोत आधीं. ॥ ८०७ ॥ व्यतिरेक अन्वययोग दोन्ही । बोलोनि दोहींमधूनी । भक्तीस योग्य म्हणोनि । श्रेष्ठ अन्वययोग बोलिला. ॥ ८०८ ॥ या योगाचे अनुभवी । पावती भगवद्भक्तपदवी । सर्वात्मत्वें नित्य नवी । गोडी भक्तिरसाची जयास. ॥ ८०९ ॥ कोणी अनुभवी गाढे । त्या सुखांत जाले वेडे । ते न पाहती सुखदुःखाकडे । जनाचिया. ॥ ८१० ॥ सर्वभूतीं भगवंत । ज्यासि हेंचि पाहणें अत्यंत । जीवांच्या सुखदुःखपर्यंत । दृष्टि न देती ते भक्त. ॥ ८११ ॥ सर्वांतरंगीं सागर । सर्वभूतीं तैसा ईश्वर । सागरीं तरंग तैसें चराचर । वासुदेवांत देखती. ॥ ८१२ ॥ ऐसे सर्वात्मतेचे अनुभवी । पावले भक्तीची परम पदवी । परी चराचरदेहांचा गोसांवी । ईश्वरास नाहीं तिहीं गौरविलें. ॥ ८१३ ॥ त्याच्या अंतरीं दया । असोनीही गेली वायां । आणि परम विभूतिदर्शन तया । न घडे स्वसुखसोहळे अनुभवितां. ॥ ८१४ ॥ पुढें बोलिजेतील जेथें विभूती । तेथें परम विभूती हे कीं सर्वभूतीं । मज सुख हो ऐशा आशयांत असती । जे जीव अंश ईश्वराचे. ॥ ८१५ ॥ **'अहमात्मा गुडाकेश । सर्वभूताशयस्थितः'** ऐसें हृषीकेश । म्हणेल प्रथम उपदेश । हा विभूतीविषयीं. ॥ ८१६ ॥ विभूतिरूपें कृष्णभजन । करावें या कारणें अर्जुन । प्रश्न करील त्यास जगज्जीवन । प्रथम विभूति हेचि सांगेल. ॥ ८१७ ॥ कीं सर्व भूतांचा आशय । मज सुखचि हो दुःख न हो ऐसा निश्चय । त्यांत मीं आत्मा देहाभिमानमय । अगा! ऐसें ॥ ८१८ ॥ पाहूनि भगवद्विभूती । भजन यथायोग्य सर्वांभूतीं । सर्व भूताशयामाजीं मी जगत्पती । जीवात्मा म्हणतां हें सूचवी. ॥ ८१९ ॥ कीं आशय नसे आणखी । आशय हाचि कीं म्यां असावें सुखी । आणि कधीं नसावें दुःखी । सर्व आशयशाखा याच्याच. ॥ ८२० ॥ सुखप्राप्ति दुःखपरिहार । ज्या त्या आशयांत हाचि प्रकार । कोटिवर्षें शोधितां निर्धार । इतकाच सर्वां आशयांचा. ॥ ८२१ ॥ त्या आशयांत आत्मा । तो प्रतिबिंबांश जीवात्मा । नानाजळीं सूर्य तैसा परमात्मा । मीच असें आशयांत सर्वांच्या. ॥ ८२२ ॥ हे प्रथम विभूती । म्हणतां दया करणें सर्वभूतीं । हें अर्जुनातें जगदात्मा श्रीपती । सुचवील आशयशब्दें करूनी. ॥ ८२३ ॥ कीं मज सर्वभूतीं भाविलें । त्यास माझ्या ऐक्यें सुख फावलें । परी मज नाहीं पावलें । सुख कांहीं

भूतदयेवांचूनी. ॥ ८२४ ॥ सूर्यास उपचार दीपाचा । अमृतास नैवेद्य गुळाचा । कीं गंगेस थिल्लर जळाचा । अभिषेक. ॥ ८२५ ॥ अखंडसुखाचा अनुभव । हें जयाचें वैभव । त्या मज कोण मानव । काय सुखी करील? ॥ ८२६ ॥ प्रतिबिंबरूपें दुःख । तेथें दुःख हरूनि दे सुख । या वेगळा उपाय आणिक । नसे सुखी करावयाचा. ॥ ८२७ ॥ यालागीं सर्वभूतीं । आशयांत माझी विभूती । त्या जीवात्मयातें यथामती । सुख देतां मी सुखी होतसें. ॥ ८२८ ॥ सुख द्यावें ईश्वरातें । ऐसें वाटे जयातें । त्याणें प्रतिशरीरीं जीवात्मयातें । सुख द्यावें. ॥ ८२९ ॥ राज्यभ्रष्ट क्षितिपती । त्यास जे सुखी करिती । तो पाळितां ही सर्व जगती । स्मरे तया उपकारातें. ॥ ८३० ॥ प्रतिबिंबरूपें ईश्वर । ऐसा लक्षूनि चतुर । जे सुख करिती सादर । तिहीं बिंबरूपीं सुखी केला. ॥ ८३१ ॥ जीवास दुःख दिधलें । त्यानें ईश्वरास दुःखी केलें । हें सतराविया अध्यायांत आपलें । गुह्य सांगेल श्रीकृष्ण. ॥ ८३२ ॥ **'कर्षयंतः शरीरस्थं'** या श्लोकें करूनी । **'मां चैवांतः-शरीरस्थं'** म्हणोनी । म्हणेल कीं अशास्त्र तपें देह कष्टवूनी । दुःख देती मज अंतःशरीरस्थातें. ॥ ८३३ ॥ एवं अन्वययोगी । सर्वात्मता लाधोनि ही जगीं । भूतदयेविना एका आंगीं । उणा पडला म्हणावा. ॥ ८३४ ॥ इत्यादि भाव कोटी । श्रीकृष्ण धरूनि पोटीं । सर्वांभूतीं दया करावी हे धाटी । ज्यास तो थोर म्हणतसे या श्लोकीं. ॥ ८३५ ॥

**आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन ।**
**सुखं वा यदि वा दुःखं स योगी परमो मतः ॥ ३२ ॥**

अगा अर्जुना! योगी। मज सर्वत्र पाहोनिही जगीं । जरी दयेकरूनी जीवा-लागीं । सर्वत्र पाहे. ॥ ८३६ ॥ तरी तो योगी अत्यंत । थोर आणि मज संमत । म्हणोनि या भावें भगवंत । दयाळुत्व रीति त्याची वर्णितो. ॥ ८३७ ॥ कीं ब्रह्मात्मरसें मातला । सुखदुःख कांहीं नाठवे त्याला । तथापि स्वपूर्वानुभवें ज्याला । दया करणें सर्वभूतीं तो थोर. ॥ ८३८ ॥ कीं सर्वत्र भोक्ता जी-वात्मा । पिपीलिका हो अथवा ब्रह्मा । एका देहीं मीं जैसा हे उपमा । सुख-दुःखीं पाहे सर्वत्र. ॥ ८३९ ॥ आपणास लागे क्षुधा । तेधवां वाटे प्राणांत बाधा । जे पक्वयोगी त्याच्याही बोधा । डगमग आणी घडी एक. ॥ ८४० ॥ दुःख अत्यंत ये रीती । क्षुधा तृषादि करिती सर्वभूतीं । अन्नउदकादियोगें त्यांची शांती । होतां सुख होय अत्यंत. ॥ ८४१ ॥ एवं योगी आणि पूर्वकर्म-

बळें । पावतो धनधान्यादि फळें । त्यानें क्षुधादिनिवृत्ति मूळें । अन्नादिकें द्यावीं स्वसम पाहोनी. ॥ ८४२ ॥ अन्न द्यावें क्षुधिता । उदक द्यावें तृषिता । वस्त्र द्यावें शीतपीडिता । कन्यादिविवाहानिमित्त धन द्यावें. ॥ ८४३ ॥ ऋणी ऋणापासूनी । मुक्त करावे धन देउनी । राजदंडातें चुकवूनी । सुटत ऐसें धन द्यावें. ॥ ८४४ ॥ हरिकीर्तनादि उत्सव । करावे यथावैभव । सकळ जनकर्णद्वारा देव । त्यांच्या हृदयीं निघे ऐसें करावें. ॥ ८४५ ॥ कोणी भजनीं तत्पर। आणि कुटुंबार्थ निरंतर । श्रमती न सांपडे अवसर । भजनाकारणें. ॥८४६॥ त्याचा कुटुंबनिर्वाह । ऐसा करावा कीं इतर स्नेह । टाकूनि भजती निस्पृह । निष्काम देवाधिदेवातें. ॥ ८४७ ॥ त्यांस उपदेश परमार्थाचा । करावा दाखवावा मार्ग साचा । स्वधन आणि स्ववाचा । दोहोंकडोनि सुख द्यावें तयांस. ॥ ८४८ ॥ कीं आपणातेंही । तिसरे गोष्टींत असणें नाहीं । भजन कीं तदर्थ देहरक्षण कांहीं । अन्नउदकवस्त्रें करावें. ॥ ८४९ ॥ याच दों गोष्टींविण । दुःखी होइजे तें आपण । याच दों गोष्टींत देखे निपुण । सुख आपणातें ही. ॥ ८५० ॥ कीं जरी पक्वज्ञानी । दुःखी होतोच क्षुधादिकें करूनी । त्या प्रारब्धभोगार्थ पावोनी । जीवदशा भोगणें निःसंदेह. ॥ ८५१ ॥ येथें कोणी म्हणती । कीं ज्ञानियास क्षुधादिकेंसि नसती । आणि पुसतां तेचि बोलती । देह प्रारब्धाचा त्यांचा म्हणोनी. ॥ ८५२ ॥ प्रारब्धकर्मक्षय । भोगेंचि होय ऐसा निर्णय । भोगीं सुखदुःख हा निश्चय । सुखदुःख कीं तें स्पर्शे भोक्तयातें. ॥ ८५३ ॥ हें बोलणें वारंवार । पूर्वीं जालें पुढें होणार । प्रस्तुत भूतदया प्रकार । स्वोपमेनें ऐसा योगियातें. ॥ ८५४ ॥ त्यांत ज्ञानयोगी । दों प्रकारींच जगीं । प्रारब्धें विभव ज्यालागीं । तो योगी इत्यादि रीती दयाळू. ॥ ८५५ ॥ ज्यांस नसेल विभव । तिहीं सर्वभूतीं देवाधिदेव । धन साध्यावेगळें स्वयमेव । सुख व्हावें सर्वां भूतांचें. ॥ ८५६ ॥ काया वाचा मन । हें तों आपलें निजधन । दुःखहरण सुखकरण साधन । उदंड इतुकीं. ॥ ८५७ ॥ सर्वांसि प्रिय बोलणें । चुकवूनि कृमिकीटकांतें चालणें । स्वोपमेनें सुख पाहाणें । इत्यादिस्थळीं सम सधन निर्धन योगियां. ॥ ८५८ ॥ स्वोपमेनें स्वसम । सुखदुःख पाहणें उत्तम । यास्तव बोले श्रीकृष्ण कीं स्थावरजंगम । भूतें सुखी करावीं दुःखें हरूनी. ॥ ८५९ ॥ त्या सकळ दुःखाचें मूळ । अविद्या अनादि हृदयशूळ । तीस करूनि निर्मूळ । परममंगळ स्वसुख द्यावें जीवांतें. ॥ ८६० ॥ हृदयीं

दयेचा ठसा पडे । तरीच ब्रह्मविद्यादान घडे । जे स्वलाभेंचि जाले वेडे । ते भगवत्प्रिय न होती अत्यंत. ॥ ८६१ ॥ सर्व जगन्निवास । त्यास जे देवकीच्या गर्भी वास । ते जना दिसो नेदी कंस । बंदी घाळोनि बहिण आपुली. ॥ ८६२ ॥ तैसी ज्ञानियाची वाणी । जींत ब्रह्मसुखाची खाणी । तीस पाडिली घाणी । मौन धरोनी. ॥ ८६३ ॥ मुक्ति साधली आपणा । परी मनीं नसे करुणा । तैसा मोक्ष तो अवलक्षणा । कंसासही जाला. ॥ ८६४ ॥ आपण मिष्टान्न जेवी । जिवलगा उच्छिष्टही न दावी । तैसा म्हणावा तो मुक्त गोसावी । जो प्रकट न करी भजनमार्ग. ॥ ८६५ ॥ आपण जाला पृथ्वीपती । सखे सोयरे भिक्षा मागती । तैसा पावोनिही ब्रह्मस्थिती । जो अविद्या न नाशी जीवांची. ॥ ८६६ ॥ आपली जातां अविद्या । सुख पावला पावोनि विद्या । तरी इतरांसि ही सुखरूपा आद्या । दावितां ऐसें सुख तेही पावती. ॥ ८६७ ॥ ऐसें स्वोपमेकरूनी । सर्वत्र सुखदुःख देखोनी । जीव उद्धरी ज्ञान देऊनी । तो थोर अर्जुना! मज संमत. ॥ ८६८ ॥ सुखदुःख सर्वयोगीं । स्वसाम्यें पाहे जगीं । तो थोर याचि लागीं । कीं दुःखें हरूनि सुख दे तयातें. ॥ ८६९ ॥ सर्वांचें दुःख हरणें । आणि सर्वांस सुख करणें । लौकिकें परमार्थें याचि विवरणें । हीचि कीं यथाशक्ती. ॥ ८७० ॥ त्यांत मुख्य दुःख हरणें । आणि सर्वांस सुख करणें । त्याचें हेंचि विवरण । कीं अधिकार पाहोनि उपदेश. ॥ ८७१ ॥ आणि स्वशक्ती जरी नसे । ब्रह्मविद्या तों त्यापासीं वसे । एवं सुख देणें तें हेंचि दिसे । कीं अविद्यादुःख नाशावें. ॥ ८७२ ॥ आतां दोन यानंतर श्लोक । श्रोता पार्थ पुण्यश्लोक । अन्वययोग असाध्य मानूनि कितीएक । प्रश्न करितो अर्जुन. ॥ ८७३ ॥

अर्जुन उवाच—**योऽयं योगस्त्वया प्रोक्तः साम्येन मधुसूदन ।**
**एतस्याहं न पश्यामि चंचलत्वात्स्थितिं स्थिराम् ॥ ३३ ॥**
**चंचलं हि मनः कृष्ण प्रमाथि बलवद्दृढम् ।**
**तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करम् ॥ ३४ ॥**

अर्जुन म्हणे, 'जी मधुसूदना! । मधुकैटभादिअसुरमर्दना । अवतरोनि देवकीनंदना । उपदेश दीनास मज करिसी. ॥ ८७४ ॥ तुज नित्यमुक्ता सर्व सुगम । परी मज अत्यंत वाटे दुर्गम । जो हा अन्वययोग सर्वोत्तम । बोलियेला तुवां. ॥ ८७५ ॥ योग बोललासी दोनी । त्यांत हा आलीकडे साम्येंकरूनी । **'सर्वभूतस्थमात्मानं'** म्हणोनी । या श्लोकापासूनि वदलासि योग.

॥ ८७६ ॥ त्याहूनि पूर्वील योग । जेथें वृत्तीचा वियोग । चित्तचैतन्याकार संयोग । त्या आलीकडे साम्ययोग हा. ॥ ८७७ ॥ कीं आत्मा सर्वत्र सम । हा साम्येंकरूनि योग परम । जो वदलासि हा सुगम । न वाटे मजला. ॥ ८७८ ॥ या योगाची स्थिती । स्थिर राहों नेदी मनाची गती । त्याच्या चंचलत्वें मती । विषमत्व अवलंबील तत्काळ. ॥ ८७९ ॥ अजी कृष्णजी! हें मन । परम चंचळ आणि मथन । करूनि इंद्रियकाष्ठांचें दहन । करी विवेकाचें. ॥ ८८० ॥ हें बळवंत नावरे । धरूं जातां अधिक बावरे । मोट बांधों जातां भरे । गगनीं जैसा महावायु. ॥ ८८१ ॥ हें मन परम दुर्धर । याचा निग्रह परम दुष्कर । भावगर्भ नारायणातें नर । पुसे कीं केंवी साधे हा योग. ॥ ८८२ ॥ प्रश्न करितां अर्जुन । अंगीकारूनि त्याचें वचन । जिंकोनियां ऐसेंही मन । योग साधावाच म्हणतसे भगवंत. ॥ ८८३ ॥

श्रीभगवानुवाच—**असंशयं महाबाहो मनो दुर्निग्रहं चलम् ।**
**अभ्यासेन तु कौंतेय वैराग्येण च गृह्यते ॥ ३५ ॥**

अगा ! येविषयीं नाहीं संशय । कीं कठिण करणें मनाचा जय । हें चंचल केला न जाय । निग्रह याचा. ॥ ८८४ ॥ हें असाध्य निःसंदेह । परी याचाही करिजेतो निग्रह । कीं अजिंकही शत्रुसमूह । जिंकिले तुवां. ॥ ८८५ ॥ महाबाहो! म्हणोनी । गूढ भाव दावी या वचनीं । कीं अजिंकही या बाहूंकरूनी । जिंकिलें तुवां. ॥ ८८६ ॥ आणि तूं कौंतेय । आमची आत कुंती तिचा तनय । परम समर्थ होउनि काय । लेखा धरिसी मनाचा. ॥ ८८७ ॥ अगा! जो प्रपंचीं दक्ष । तोचि परमार्थीं साधील मोक्ष । मन जिंकवेना ऐसा हा पक्ष । तुज योग्य नव्हे हा भाव. ॥ ८८८ ॥ ज्याला असेल दक्षपण । तो जिकडे निघेल तिकडे निपुण । या प्रयत्नीं तूं आपण । प्रवर्तसी तेव्हां हेंही साधेल. ॥ ८८९ ॥ आतां दक्षही जाला । तरी साधनसंपत्ति पाहिजे त्याला । तरी मनाच्या निग्रहाचें तुजला । सांगतों वर्म. ॥ ८९० ॥ कीं मुख्य येथें अभ्यास । वैराग्यसाधन त्यास । मन जिंकणें ज्यास । हीं दोनी अगत्य त्यास असावीं. ॥ ८९१ ॥ आत्मत्व आधीं कळावें । मग मन अभ्यासीं वळावें । अभ्यासीं त्यासि कवळावें । वैराग्ययुक्त बुद्धीनें. ॥ ८९२ ॥ स्थिर कराया मना । स्थळ आत्मया विना । मायिक पदार्थीं कांहीं असेना । वावरोंच लागे अन्यत्र. ॥ ८९३ ॥ ज्यास पाहिजे सुख । तें सुख चैतन्यावांचूनि नाहीं आणिक । चित्स्वरूपीं करितां अंतर्मुख । स्थैर्य पावे. ॥ ८९४ ॥ निखळ

चैतन्य सोनें असे । अथवा चराचर अळंकाररूपें दिसे । परी सुवर्ण याचकास गवसे । सुवर्ण भलत्या प्रकारें. ॥ ८९५ ॥ तृषितास जळधारा । अथवा सांपडोत गारा । निखळ अथवा प्रपंच सारा । चिद्रूप दिसावा मनातें. ॥ ८९६ ॥ तेथें स्थिरत्व मन पावे । परी पूर्व संस्कार त्याला आठवे । म्हणूनि विषयांकडे धांवे । विषय ते जडत्वें मानूनी. ॥ ८९७ ॥ तेव्हां पाहिजे वैराग्य । त्या वैराग्यें स्वानंद सौभाग्य । जतन होय नासे अभाग्य । विषयवासना. ॥ ८९८ ॥ चित्स्वरूपीं मन । लावितांही करी विषयचिंतन । तेथें पाहिजे वैराग्यसाधन । त्या वैराग्यसंस्कारें तें परते. ॥ ८९९ ॥ स्वरूपीं लागणें अभ्यास । तेथूनि उठतां त्यास । परतवूनि योजणें यास । वैराग्य पाहिजे. ॥ ९०० ॥ एवं वैराग्य अभ्यास दोनी । उपाय या दोहींकरूनी । मनाचा निग्रह म्हणोनी । श्रीकृष्ण बोलिला. ॥ ९०१ ॥ उपाय नाहीं याविना । म्हणोनि या उपायें मना । न आवरी त्यास योग साधेना । म्हणोनि म्हणतो या श्लोकीं. ॥ ९०२ ॥

**असंयतात्मना योगो दुष्प्राप इति मे मतिः ।**
**वश्यात्मना तु यतता शक्योऽवाप्तुमुपायतः ॥ ३६ ॥**

अगा! मनास चैतन्याचा योग । तेधवां सिद्ध होतो योग । त्यास आवडती जड विषयभोग । योग तेथें मग कैंचा? ॥ ९०३ ॥ म्हणोनि जें मन नव्हे संयत । जें नसेल आवरिलें अत्यंत । त्या मनें करूनि निश्चित । अघटित सिद्धि योगाची. ॥ ९०४ ॥ हे अर्जुना! माझी मती । जें बोलिलों तुजप्रती । कोणी उपायांतर जाणती । तरी जाणोत. ॥ ९०५ ॥ एवं उपाय अत्यंत । तो हाचि निश्चित । आणि जें मन असंयत । त्या मनें योग साधेना. ॥९०६॥ दळिल्या कांडिल्या कुटिल्या विना । नुसत्या गोधूमाचे पदार्थ नाना । कोणी सुगरणी ऐसी दिसेना । कीं शेवया मालत्या सिद्ध करी ॥ ९०७ ॥ एवं मन वश आधीं करावें । या मनातें अभ्यासीं भरावें । तेव्हां यत्न करणारिया पुरुषें पावावें । योगातें उपायें करूनी. ॥ ९०८ ॥ आतां या नंतर श्लोक । त्यांत पार्थ पुण्यश्लोक । प्रश्न करील सुज्ञ लोक । निमित्त त्याचें परिसोत. ॥ ९०९ ॥ कीं योगाचीं साधनें । ऐकिलीं अर्जुनें । तीं अत्यंत कठिणें । वाटलीं तया. ॥ ९१० ॥ परी ऐकोनि योगफळा । घोटूं लागला लाळा । जरी अनावर चाळा । या मनाचा. ॥ ९११ ॥ तथापि करावा उपाय । हा उपजला निश्चय । परी म्हणे जरी योगसिद्धि होय । तरी बरेंचि अत्यंत. ॥ ९१२ ॥ तो यत्न नव्हे थोडा । कीं योग साधे रोकडा ।

जरी मध्येंचि मोडे गाडा । परम पद पावणें मग कैचें ? ॥ ९१३ ॥ तरी त्यास कोण गती । हें पुसों म्हणे महामती । म्हणोनि संतांच्या स्वामीप्रती । प्रश्न करितो अर्जुन. ॥ ९१४ ॥

अर्जुन उवाच—**अयतिः श्रद्धयोपेतो योगाच्चलितमानसः ।**
**अप्राप्य योगसंसिद्धिं कां गतिं कृष्ण गच्छति ॥ ३७ ॥**

**अर्जुन** म्हणे, 'कोणी अयती । म्हणजे यत्न योगसिद्धीप्रती । न करी आणि ज्याची मती । युक्त श्रद्धेंकरूनि पाहतां. ॥ ९१५ ॥ कीं आत्मा कळों आला । परी योग सिद्ध पाहिजे जाला । म्हणोनि श्रद्धा ज्याला । आस्तिक्य-बुद्धि ऐसी अत्यंत. ॥ ९१६ ॥ योगें निःसंदेह मोक्ष । ऐसी श्रद्धा परि नव्हे दक्ष । तोडावया संसारवृक्ष । असंगशस्त्र जों नेघे. ॥ ९१७ ॥ आणि योगही आरंभिला । परि योगापासूनि चळला । पुन्हा योगीं न लागेसाच जाला । मनोभाव ज्याचा. ॥ ९१८ ॥ योगाची सिद्धि बरवी । ते न पावला मुक्ति-पदवी । **कृष्णजी!** त्याची गति मजला सांगावी । कीं कोण्या गतीप्रति तो जातो. ॥ ९१९ ॥ **कृष्णजी!** म्हणसील मातें । कीं कां हा संदेह जाला तूतें । तरी या गोष्टीनें संदेहचित्तें । मानिला म्हणोनि म्हणतो या श्लोकीं. ॥ ९२० ॥

**कच्चिन्नोभयविभ्रष्टश्छिन्नाभ्रमिव नश्यति ।**
**अप्रतिष्ठो महाबाहो विमूढो ब्रह्मणः पथि ॥ ३८ ॥**

अजी! ऐसें वाटतें मला । कीं उभयभ्रष्टता असेल त्याला । कीं प्रतिष्ठा नाहीं पावला । ब्रह्ममार्गीं. ॥ ९२१ ॥ प्रतिष्ठा म्हणजे अत्यंत स्थिति । ते ब्रह्ममार्गीं त्याची मति । जरी निश्चयेंशीं पावती । तरी पावतांच मोक्ष. ॥ ९२२ ॥ तरी अयति यत्न न करी म्हणोनी । चळला योगापासूनी । यालागीं मोक्षातें न पावोनी । विमूढ होऊनि राहिला. ॥ ९२३ ॥ आतां स्वर्गास जावें । तरी यागादि न करी काम्यभावें । कीं ब्रह्ममार्गीं यालागीं स्वभावें । निष्काम तो. ॥ ९२४ ॥ उभयभ्रष्ट यालागीं । मज वाटतो तो योगी । अभ्राचें थिगळ आकाशमार्गीं । उभयभ्रष्ट जे रीती. ॥ ९२५ ॥ कीं वायूचें होतां बळ । तुटे अभ्राचें एक थिगळ । तें वितळोनि नासे निष्फळ । मधीं-च्यामधीं. ॥ ९२६ ॥ ज्या मेघापासूनि चळे । त्या मेघांत न मिळे । अथवा मेघांतरांतही न मिसळे । व्यर्थ जाय वितळोनी. ॥ ९२७ ॥ ऐसें मज वाटलें । म्हणूनि पोटीं होतें तें निवेदिलें । परी तुज असे सर्व कळलें । ऐसेंचि होय कीं नव्हे तें सांग. ॥ ९२८ ॥ हें मज पुसणें अगत्य । आणि सांग-

णार तूंचि सत्य। म्हणूनि उत्तर देऊनि कृतकृत्य। करी म्हणतसे या श्लोकीं. ॥ ९२९ ॥

**एतन्मे संशयं कृष्ण च्छेत्तुमर्हस्यशेषतः।**
**त्वदन्यः संशयस्यास्य च्छेत्ता न ह्युपपद्यते ॥ ३९ ॥**

**कृ**ष्णजी! या माझ्या संशया। अशेषें छेदावया। योग्य तूंचि सर्वां सर्वज्ञांचिया। शिरोमणि जगद्गुरू. ॥ ९३० ॥ तुजवांचूनि यातें। छेदी संशयातें। ऐसा न सांपडे मातें। भुवनत्रय धुंडितां.' ॥ ९३१ ॥ **ना**रायणातें **नर**। प्रश्न करितां **पार्थ** चतुर। सर्वज्ञ याचें देतो उत्तर। पूर्ण षड्गुण श्री**भ**गवान. ॥ ९३२ ॥

श्रीभगवानुवाच—**पार्थ नैवेह नामुत्र विनाशस्तस्य विद्यते।**
**नहि कल्याणकृत्कश्चिद्दुर्गतिं तात गच्छति ॥ ४० ॥**

**पृ**था **कुं**ती तिचा सुत। तो **पा**र्थ या नांवें विख्यात। त्यातें म्हणे श्री**भ**गवंत,। 'अगा **पा**र्था!' म्हणोनि. ॥ ९३३ ॥ 'अगा **पा**र्था! ज्ञानमार्गी। निघोनिही प्रवर्तला योगी। उभयभ्रष्टत्व त्याहीलागीं। बापा! घडों शके काय? ॥ ९३४ ॥ करणारे स्वकल्याण। ते या मोक्षमार्गींचे साधक जाण। त्या विषयीं बोलतों हें प्रमाण। कीं त्यांत कोणीही दुर्गतीतें नच जाय. ॥ ९३५ ॥ बापा! या कल्याणमार्गी प्रवर्तला। तो कोणीच वायां नाहीं गेला। तूं पुससी हा तों चळला। श्रद्धेनें प्रवर्तोनि योगमार्गीं. ॥ ९३६ ॥ ज्या जन्मीं योगापासूनी। तूं पुसतोसि चळला म्हणोनी। त्यानंतर इहलोक परलोक दोन्ही। कामधेनू होती तयासी. ॥ ९३७ ॥ इहलोकीं त्याचा नाश। न परलोकीं त्यातें क्लेश। दोहीं लोकीं त्याचा लेश। **पा**र्था! बापा! नाश नव्हे. ॥ ९३८ ॥ दुर्गतीतें तो नच जाय। येविषयीं आश्चर्य काय?। या कल्याणमार्गी न होय। दुर्गती कोणासही. ॥ ९३९ ॥ अगा! सत्संगें उपजली मुमुक्षा। अपेक्षूं लागला मोक्षा। अद्वैतबोधाची अपेक्षा। तो **न** पावे दुर्गति कदापि. ॥ ९४० ॥ हा तों योगीं प्रवर्तला। तेथूनि मागें घसरला। दुर्गति होणार कीं काय याला। **पा**र्था! बापा! काय पुससी? ॥ ९४१ ॥ **पा**र्था! ताता! म्हणोनि। या श्लोकीं या दों संबोधनें करूनि। कृपासमुद्र आळवी न आवरुनि। भरितें कृपेचें. ॥ ९४२ ॥ जरी प्रस्तुत भ्रंश जाला। तरी प्रिय तो **अ**धोक्षजाला। सागरकृपेचा हेलावला। गोष्टी त्याची परिसतां. ॥ ९४३ ॥ त्यांत तो उभयभ्रष्ट कीं काय। म्हणोनि शब्द कानीं जाय। त्यास उत्तर कीं, 'हाय! हाय!। काय बोलिलास?' हें म्हणोनी.

॥ ९४४ ॥ 'पार्था! बापा!' म्हणोनी । या दों शब्देंकरूनि । अंतरींचा कळवळा ऐसा सूचवूनी । बोलिला श्रीकृष्ण. ॥ ९४५ ॥ आणि तुटतां हा संशय । योग आरंभावा ऐसा निश्चय । साधक सर्व करिती म्हणोनि धनंजय । गोड वाटला या प्रश्नें. ॥ ९४६ ॥ यालागीं 'ताता! बापा!' म्हणोनी । एथें या 'तात'-शब्देंकरूनी । आवडीनें अर्जुनातें आळवूनी । हा संशय निरसितो. ॥९४७॥ अठरा अध्याय गीता । परी अन्यत्र कोठेंही 'ताता!' । म्हणोनि अर्जुनातें जगत्पिता । ऐसा गौरवूनि बोलिला नाहीं. ॥ ९४८ ॥ एथें स्वविषयीं अर्जुन मनीं । शंकला योग साधावा म्हणोनि । कीं 'चळलों जरी या योगापासूनि । क्षणीं दुर्गतीस जाईन.' ॥ ९४९ ॥ यावरूनि कृपासागर । 'ताता! बापा!' म्हणूनि उत्तर । देतो कीं मोक्षमार्गी सादर । त्यास दुर्गति हे घडेना. ॥९५०॥ कीं हे गीता योगशास्त्र । श्रद्धेनें आइके कानीं मात्र । तोही होउनि पवित्र । जाय उत्तम लोकातें. ॥ ९५१ ॥ योगाचीच श्रद्धा ज्याला । कीं योगें मुक्ति होईल मला । आणि योगीं प्रवर्तोनि चळला । बापा! तो केंवि जाय दुर्गतीतें. ॥ ९५२ ॥ आणि योगशास्त्र गीताच हे । अर्थज्ञान नसोनिही म्हणताहे । त्यासिही ज्ञानिया योगियासमान पाहे । कृपाळू हा श्रीकृष्ण. ॥ ९५३ ॥ गीतेचा अर्थ कांहीं । ज्या पुरुषास कळत नाहीं । गीतापठनमात्रें त्यानेंही । मज यजिलें ज्ञानयज्ञें म्हणतसे. ॥ ९५४ ॥ **'अध्येष्यते च य इमं'** या श्लोकीं । **'ज्ञानयज्ञेन तेनाहं'** म्हणोनि बोलेल कीं । पठनमात्रें त्याणें या लोकीं । ज्ञानयज्ञेंचि जाणों मज यजिलें. ॥ ९५५ ॥ ज्ञानाग्नि म्हणजे ब्रह्म । त्यांत दोंपरी वृत्तीचा होम । चित्त तन्मय अथवा तेंचि सम । दिसे द्विविध-योग हा ज्ञानयज्ञ. ॥ ९५६ ॥ योगशास्त्रीं या गीतेभीतरीं । ज्ञानयोगयज्ञ ऐसे-परी. । तिच्या पठनमात्रें मोक्षाधिकारी । प्रिय भगवंताचा होत असे. ॥९५७॥ या योगशास्त्रपठनें येरझारा । चुकती, पुन्हा नये संसारा, । पावतो ऐशा अधिकारा । हा तों चळला अभ्यास करितां योगाचा. ॥ ९५८ ॥ त्यास आणि दुर्गती। हे शंका आइके संतांचा पती । म्हणोनि 'बापा! पार्था!' ऐसा अर्जुनाप्रती । आळवी, दावी कळवळा. ॥ ९५९ ॥ गीता अध्याय अठरा । परी ऐशा कळवळियानें पांडुकुमारा । 'ताता! बापा!' म्हणोनि एकसरा । उचंबळला नाहीं करुणार्णव. ॥ ९६० ॥ कीं बापा! हें काय घडे । ऐसा तो कैसा दुर्गतींत पडे। अमृतपान एकदां सांपडे । तो मरेना. ॥ ९६१ ॥ असो. आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञलोक । परिसोत आधीं. ॥ ९६२ ॥ योगापासूनि भ्रष्टला । अर्जुन पुसे, 'तो काय उभयभ्रष्ट जाला?' ।

श्रीकृष्ण त्यास बोलिला । कीं, 'दोहीं लोकीं नाश त्याचा होइना.' ॥ ९६३ ॥ न स्वर्ग अथवा मुक्ति । त्या उभयभ्रष्टशंकेनें अर्जुनाची उक्ति । त्या उक्तीची प्रत्युक्ति । जाली नाहीं अद्यापि. ॥ ९६४ ॥ 'दोहीं लोकीं नाश त्याचा । न घडे' ऐसें कृष्ण स्ववाचा । पूर्वश्लोकीं बोलिला तो कृपेचा । कळवळा अत्यंत. ॥ ९६५ ॥ 'स्वर्गमोक्ष दोहींपासूनी । भ्रष्ट होणार कीं काय?' म्हणोनी । हे शंका अर्जुनाचे वचनीं । याचें उत्तर हें नव्हे. ॥ ९६६ ॥ परी एके शंकेचा परिहार । करी याच गोष्टींत परमेश्वर । कीं स्वर्ग नव्हे याचें उत्तर । जालें उभयलोकीं नाश नाहीं म्हणतां. ॥ ९६७ ॥ आतां उत्तमकुळप्रसूत । होऊनि मुक्ति पावे निश्चित । ऐसे बोलणार तेव्हां अत्यंत । होणार समाधान अर्जुनाचें. ॥ ९६८ ॥ कळवळियानें अत्यंत । दोहीं लोकीं नाश नाहीं निश्चित । म्हणोनि बोलिला भगवंत । तें विशद बोलणें या श्लोकीं. ॥ ९६९ ॥

**प्राप्य पुण्यकृतांल्लोकानुषित्वा शाश्वतीः समाः ।**
**शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभिजायते ॥ ४१ ॥**

अगा! योगभ्रंश जाला । त्यानंतर तो जेधवां मेला । तेधवां तो पावला । उत्तमोत्तम लोकांतें. ॥ ९७० ॥ राजसूय अश्वमेधादिक । पुण्य अगण्य पुण्यश्लोक । करूनि पावती जे लोक । योगभ्रष्ट त्या लोकांतें पावतो. ॥ ९७१ ॥ पृथ्वीदानादि दानें । करूनी अधिष्ठूनि दिव्य विमानें । पावती पदें सुखनिधानें । योगभ्रष्ट त्या लोकांतें पावतो. ॥ ९७२ ॥ परी अर्जुना! ते पुण्यश्लोक । जैसे पावती पुण्यलोक । तैसा त्यांत हाही एक । ह्मणी ऐसें मानिसी. ॥ ९७३ ॥ अगा! त्यांचा अवधि काळ । सरतांचि लोटिती तत्काळ । राहों न देती एक पळ । त्या लोकीं तयातें. ॥ ९७४ ॥ ते या देखतां नेणो किती । त्या लोकांस येती आणि जाती । इतकीं अगण्य वर्षें लोटती । योगभ्रष्टातें त्या लोकीं. ॥ ९७५ ॥ ऐसीं वर्षें शाश्वत । वास करूनि त्या लोकीं अत्यंत । शुचि आणि श्रीमंत । त्यांच्या घरीं योगभ्रष्ट जन्मतो. ॥९७६॥ एवं परलोक त्याचा तैसा । आणि इहलोक त्याचा ऐसा । नाश त्याचा म्हणावा कैसा । दोहीं लोकीं? ॥ ९७७ ॥ आतां योगभ्रष्ट द्विविध । कीं होतां अन्वय-व्यतिरेकबोध । योगीं प्रवर्ते करी वृत्तिनिरोध । किंवा ध्यानीं सर्वात्मत्वीं मन योजी. ॥ ९७८ ॥ दोहीं परी योग एक । अन्वय अथवा व्यतिरेक । परी योगभ्रष्ट होती साधक । ते द्विविध जाणावे. ॥ ९७९ ॥ त्यांत कोणी संग-दोषेंकरूनी । पुन्हा विषयासक्त होउनी । यत्न सोडितां योगापासूनी । भ्रष्ट

जाले. ॥ ९८० ॥ कोणी ज्ञान पावोनी । योगयत्नीं प्रवर्तोनी । न बाणतां योग मेले म्हणोनी । मुक्ति नाहीं पावले. ॥ ९८१ ॥ एथें कोणी वेदांताभिमानी । शब्दज्ञानी अनुभवी म्हणोनी । जडनिषेधमात्रें मुक्ति उपपादुनी । आत्मज्ञानी नव्हे म्हणती योगभ्रष्ट हा. ॥ ९८२ ॥ आत्मा जडनिषेधें समजला । तरी शब्दज्ञानचि म्हणावें त्याला । जों चित्तनाश नाहीं जाला । अन्वययोगें अथवा व्यतिरेकयोगें. ॥ ९८३ ॥ अगत्य पाहिजे योग । परी हे दोनीं योग नव्हती हटयोग । चित्त चिन्मय वृत्तिवियोग । अथवा चित्स्वरूप लक्षावें जडमात्र. ॥ ९८४ ॥ वेद शास्त्र पुराणें वेदांत । या सर्वांचाही सिद्धांत । कलियुगीं ज्ञानमार्गींही जे भ्रांत । ते उडविती योग आणि सगुणभजनातें. ॥ ९८५ ॥ असो. आतां योगभ्रष्ट द्विप्रकार । त्यांत कोणी दुष्टसंगें विषयविकार । गोड मानूनि योगाचा विचार । सोडोनि नेती. ॥ ९८६ ॥ कोणी योगीं प्रवर्तले । परी साधक ते सिद्ध नाहीं झाले । आयुष्य सरतां मेले । देहांतीं विस्मरण पावोनी. ॥ ९८७ ॥ जो देहांतीं आत्मा स्मरे । त्याचा देहमात्रचि मरे । तो सच्चिदानंद उरे । कीं अंतीं जें स्मरे पावे तयातें. ॥ ९८८ ॥ **'यं यं वापि स्मरन्भावं'** म्हणोनि । अष्टमाध्यायांत या वचनीं । हा सिद्धांत होणार यावरूनी । देहावसानीं आत्मस्मृतीनें कैवल्य. ॥ ९८९ ॥ परंतु अष्टमाध्यायांत । त्याच श्लोकीं **भगवंत** । म्हणेल कीं सदा जो भाव अत्यंत । भाविजे तोचि देहांतीं आठवे. ॥ ९९० ॥ योग याकारणें । **न**रास या अध्यायांत **ना**रायणें । विशद वर्णिला कीं मोक्षपरायणें । आत्मा समजोनि योग साधावा. ॥ ९९१ ॥ एवं चित्स्वरूपीं चित्त जडे । कीं सर्व आत्मा हा ठसा पडे । तरीच देहावसानीं घडे । आत्मस्मृति. ॥ ९९२ ॥ अविद्याच नाहीं गेली । जों चिन्मय बुद्धि नाहीं झाली । ज्ञानाभिमानियाची बोली । असो परती असंमत. ॥ ९९३ ॥ एवं योगभ्रष्ट दोंपरी । एक पडोनि विषयांवरी । एक वैराग्य असोनि अंतरीं । योग साधितां मृत झाला. ॥ ९९४ ॥ त्यांत **अर्जुनें** पुसिला । तो विषयासक्तीनें परतला । तरी **'विमूढो ब्रह्मणः पथि'** म्हणोनि बोलिला । विशेषण त्याचें **अर्जुन**. ॥ ९९५ ॥ कीं न होतां योगारूढ । विशेषें जाला मूढ । भावार्थ यांत गूढ । कीं तोचि विमूढ जों विषयासक्त. ॥ ९९६ ॥ दोंहीं लोकीं नाश । त्याचा नव्हे लेश । म्हणोनि बोलतां हृषीकेश । जन्म बोलिला शुचिश्रीमंतगृहीं तयाचा. ॥ ९९७ ॥ कीं देहावसानीं चित्त । विषयांकडे त्याचें होतें रत । म्हणोनि जे श्रीमंत । त्यांच्या गृहीं

तो जन्मतो. ॥ ९९८ ॥ कीं संयोग पूर्वबुद्धीचा । त्या जन्मीं त्यास होतो ऐसें स्वभावाचा । कृष्ण म्हणेल तोंपर्यंत तो सुत श्रीमंताचा । पूर्वसंस्कारें भोगितो विषयांतें. ॥ ९९९ ॥ परी ते श्रीमंत । शुचिर्भूत अत्यंत । या भावें म्हणे भगवंत । कीं प्रवृत्ति न घडे त्याची कुमार्गीं. ॥ १००० ॥ आणि जो पूर्वबुद्धिसंयोग । होय तों आरंभी सत्कर्मयोग । आणि करी विषयभोग । यथान्यायें. ॥ १००१ ॥ जो विषयासक्त होउनी । योगभ्रष्ट मेला तो येरीती करूनी । शुचिश्रीमंतगृहीं जन्मे म्हणोनी । सर्वज्ञशिखामणी बोलिला. ॥ १००२ ॥ आतां ज्यास होती विरक्ती । योगसिद्धि न होतां न पावला मुक्ती । इतकियांत मेला परंतु विषयासक्ती । नव्हती पोटीं तयाच्या. ॥ १००३ ॥ तोही पुण्यलोकांतें जातो । शाश्वत काळ तेथें राहतो । पुन्हा या लोकीं जन्मतो । योगसिद्धीकारणें. ॥ १००४ ॥ तो श्रीमंताचे गृहीं । उत्पन्न होत नाहीं । कीं विषय भोगावे हा कांहीं । संस्कार नव्हता. ॥ १००५ ॥ त्यासही प्रारब्धाच्या बळें । जरी भोगणें विषयभोग फळें । तरी तोही यथाकाळें । श्रीमंतगृहीं जन्म पावे. ॥ १००६ ॥ जरी प्रारब्धही तैसें नसे । आणि तदनुरूप संस्कारही नसती तैसे । तरी तो जन्मतां न दिसे । श्रीमंताच्या. ॥ १००७ ॥ म्हणोनि त्यास परम लोक । वर्णूनि आतां उत्तमश्लोक । इहलोकजन्मीं कांहीं एक । वैपरीत्य वदतो अथवा म्हणोनि या श्लोकीं. ॥ १००८ ॥

**अथवा योगिनामेव कुले भवति धीमताम् ।**
**एतद्धि दुर्लभतरं लोके जन्म यदीदृशम् ॥ ४२ ॥**

अथवा योगियांचें कुळ । जे योगी बुद्धिमंत प्रांजळ । कीं अपेक्षूनि मुक्ति केवळ । योगचि अनुष्ठिती जे योगी. ॥ १००९ ॥ कुळीं तयाच्या तैशिया । जन्म योगभ्रष्टा तया । कीं संस्कार नव्हता जया । विषयभोग यत्नाचा. ॥ १०१० ॥ अर्धश्लोकें करूनि । प्रकारद्वय जन्म वर्णूनि । बोलतो उत्तरार्ध वचनीं । महिमा योगभ्रष्ट जन्माचा. ॥ १०११ ॥ अगा अर्जुना! । या लोकीं बहुतां जना । जन्म होती परी येना । सरी याच्या जन्माची. ॥ १०१२ ॥ मोक्षास विलंब त्याला । होऊं नये तथापि जाला । परी हा योगभ्रष्ट जन्म पावला । तो परमदुर्लभ या लोकीं. ॥ १०१३ ॥ अनायासें धनंजया! । योगसिद्धि ऐशा जन्मीं तया । म्हणोनि बोलतसे आतां या । दों श्लोकेंकरूनी. ॥ १०१४ ॥

**तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकम् ।**
**यतते च ततो भूयः संसिद्धौ कुरुनंदन ॥ ४३ ॥**

पूर्वदेहीं मुमुक्षा । अत्यंत मोक्षाची अपेक्षा । ते विना सत्संगादि शिक्षा ।

स्फुरों लागे बुद्धीतें. ॥ १०१५ ॥ बुद्धीचे दोन प्रकार । एक सत्त्ववृत्ति निश्चयाकार । एक विवेकें विचारनिर्धार । तेही म्हणावी बुद्धि म्हणोनी. ॥१०१६॥ एकें विचार सांगीतला।ते बुद्धि म्हणती दिधली त्याला।त्याची बुद्धि गेली आली याही बोला । लोक बोलती. ॥ १०१७ ॥ निश्चय करणारी सत्त्ववृत्ती । ते तो होतीच त्याच्या चित्तीं।परी स्वहितविचारप्रवृत्ती।बुद्धि ते गेली आली म्हणावी. ॥१०१८॥ एवं मोक्षमार्गप्रवृत्ती । आणि विषयमार्गीं निवृत्ती। हे पूर्वदेहसंस्कारवृत्ती । स्वयेंचि स्फुरों लागे बुद्धीतें. ॥ १०१९ ॥ तो पूर्वदेह बुद्धीचा। संयोग म्हणे कृष्ण स्ववाचा । लाभ त्या बुद्धिसंयोगाचा । होतो त्या जन्मीं तयातें. ॥ १०२० ॥ जों जों वाढे शरीर । बुद्धी जों जों होय चतुर । तों तों उमटे पूर्वसंस्कार । हृदयामध्यें. ॥ १०२१ ॥ बाळपणींच एक । तरुणपणीं कितीएक । पूर्वदेहबुद्धिविवेक । या योगभ्रष्ट जन्मीं लाधले. ॥ १०२२ ॥ ऐसा पूर्वबुद्धिसंयोग । होतां पुन्हा आत्मयोग । आरंभितो संतसंग । अलभ्यलाभ पावोनी. ॥ १०२३ ॥ हरपलें ज्ञानरत्न । तें ईश्वरें त्या कारणें केलें होतें जतन । न करितां फारसा यत्न । गुरुरूपें त्याचें तयातें पाववी. ॥ १०२४ ॥ कोणास संत प्रसिद्ध । तेचि भेटले ज्ञानवृद्ध । कोणी जाले ज्ञानसिद्ध । ईश्वरचि भेटतां गुरुरूपें. ॥ १०२५ ॥ कोण्या एक्या प्रकारें । ज्ञान पावोनि आदरें । योग प्रयत्न पूर्वसंस्कारें । करूं लागे अत्यंत. ॥ १०२६ ॥ प्रयत्न मुक्तीलागीं । अत्यंत करितो योगी । सकळां पूर्वजालागीं । उद्धरितो आपुल्या. ॥ १०२७ ॥ भाव ऐसा ह्या वचनीं । सूचवी कुरुनंदना म्हणोनी । अर्जुनातें या नांवें करूनी । आळवितो. ॥ १०२८ ॥ कीं आनंदवी कुरुवंशातें । कुरुनंदन म्हणावें त्यातें । येथें सूचवी अर्जुनातें । कीं तूंही स्वपूर्वजांस उद्धरिसी. ॥ १०२९ ॥ ऐसा तो वंशोद्धारक । जन्मांतरींचा साधक । स्वयेंचि स्वहितीं प्रवर्ते कौतुक । आइक म्हणतो श्रीकृष्ण या श्लोकीं. ॥ १०३० ॥

**पूर्वाभ्यासेन तेनैव ह्रियते ह्यवशोऽपि सः ।**
**जिज्ञासुरपि योगस्य शब्दब्रह्मातिवर्तते ॥ ४४ ॥**

अगा! पूर्वजन्म अभ्यास । त्याचिया चित्तास । ओढूनि ने विना प्रयास । योजी मोक्षमार्गींच. ॥ १०३१ ॥ जो स्वहिताविषयीं रत । तो स्ववश म्हणावा निश्चित । कीं आपणास आपण अत्यंत । बुद्धींद्रियासहित वश असे. ॥१०३२॥ अवश म्हणावें त्याला । कीं स्वहिताचरण न घडे ज्याला । तैसा हा जरी अ-

वश जाला । पूर्वाभ्यास त्याला न सोडी. ॥ १०३३ ॥ संसारबंधापासूनी । आपणास सोडवावें म्हणोनी । हा पूर्वाभ्यास सिद्ध होऊनि । होता संस्काररूपें बुद्धींत. ॥ १०३४ ॥ प्रपंच्याचा विलास । जरी गोड लागे तयास । तरी पूर्वजन्मस्वहिताभ्यास । योजीच त्याला मोक्षमार्गीं. ॥ १०३५ ॥ आतां आपलें हित । मोक्षप्राप्तीच निश्चित । परी शुद्ध करावया चित्त । कर्मयोगही पहिल्यानें पाहिजे. ॥ १०३६ ॥ तरी काय पूर्वाभ्यास । कर्मयोगीं योजितो त्यांस । म्हणोनि वाटेल अर्जुनास । ये स्थळीं. ॥ १०३७ ॥ तरी कर्मयोगें करूनी । हा शुद्धचित्त होउनी । काम्यकर्मै सर्व टाकुनी । जन्मांतरींच ज्ञानयोगीं प्रवर्तला. ॥ १०३८ ॥ मग योगापासूनि चळला । कीं मेला अथवा कुसंगें खवळला । या जन्मीं स्वहितीं वळला । पूर्वाभ्यासें. ॥ १०३९ ॥ जन्मांतरीं शुद्धचित्त । जाला करूनि कर्मै निर्निमित्त । मग ज्ञानीं श्रद्धा उपजली अत्यंत । कर्मीं उपजली अश्रद्धा. ॥ १०४० ॥ ज्ञानचि तारक गमे ज्यास । शुद्धचित्त म्हणावें त्यास । तेव्हां कर्मीं अनादर हा अभ्यास । पूर्वजन्माचा. ॥ १०४१ ॥ तो पूर्वील अभ्यास । कर्ममार्गीं कां ओंवील त्यास ? । ज्ञानचि तारक ऐसी जयास । श्रद्धा होती पूर्वींच. ॥ १०४२ ॥ या लागीं हा अर्थ । ज्या वरूनि समजे **पार्थ** । ऐसें बोलतो आतां समर्थ । या श्लोकाच्या उत्तरार्धें करूनि. ॥ १०४३ ॥

उत्तरार्ध—**'जिज्ञासुरपि योगस्य शब्दब्रह्मातिवर्तते ।'**

अगा ! आत्मा कळोनि योगास । आरंभ करावा ऐसी पूर्वजन्मीं जिज्ञासा ज्यास । तोही अतिक्रमूनि वेदास । ये जन्मीं वर्ततो. ॥ १०४४ ॥ इतकाच वाक्याचा अर्थ । तो विशद बोलतां यथार्थ । प्रगट होतो परमार्थ । ये रीती. ॥ १०४५ ॥ कीं ज्यास आत्मानात्मविवेक । कळला अन्वयव्यतिरेक । त्यास मुक्तीस साधन उरलें एक । कीं चित्तचिद्रूपयोगीं करावें. ॥ १०४६ ॥ आत्मजिज्ञासु पूर्वी होता । तो आत्मा कळला तत्त्वतां । आतां चित्तास चिन्मयता । कैसी होय हा यत्न यानंतर. ॥ १०४७ ॥ तेव्हां योगाचें लक्षण । जाणों इच्छी विचक्षण । त्यास म्हणे **कमलेक्षण** । योगजिज्ञासु म्हणोनी. ॥ १०४८ ॥ आत्मा जाणों इच्छितो । आत्मतत्त्वजिज्ञासु बोलावा तो । मग योगरीती जाणेन ऐसें अपेक्षितो । तो आत्मज्ञ योगजिज्ञासु म्हणावा. ॥ १०४९ ॥ आणि **अर्जुनें** ज्याचा प्रश्न केला । तो योगाभ्यासीं घसरला । कीं **अर्जुन** बोलिला । **'योगाच्चलितमानसः'** म्हणोनी. ॥ १०५० ॥ वृक्षापासूनि पर्ण गळे ।

तैसें योगापासूनि मन चळे । 'योगाच्चलित' या शब्दें स्पष्ट कळे । अर्थ ऐसा. ॥ १०५१ ॥ तो शब्दब्रह्म वेदांतें अतिक्रमी । कृष्ण म्हणे हें काय सांगों मी । योगजिज्ञासु तोही कर्मीं । न प्रवर्ते, प्रवर्ते या जन्मीं योगींच. ॥ १०५२ ॥ अर्जुना! तुवां ज्याचेविषयीं प्रश्न केला । त्याहूनि नीच पायरीचा जरी असला । तोही अतिक्रमूनि वेदांला । प्रवर्तो हा भाव. ॥ १०५३ ॥ वेदांचें अतिक्रमणें । हेंचि कीं वेदोक्त कर्मादर न धरणें । काम्यकर्म तों याणें । टाकिलें पूर्वजन्मींच. ॥ १०५४ ॥ एथें ऐसें बोलिला । आणि शुचिश्रीमंतसदनीं त्याला । जन्म बोलिला तेव्हां प्राप्त जाला । विरोध कांहीं तोही परिहरिला पूर्वींच. ॥ १०५५ ॥ कीं पवित्र शुचिष्मंत । आणि ते श्रीमंत । त्यांचा पुत्र तोही अत्यंत । सादर कर्मीं होणारा. ॥ १०५६ ॥ तरी अनुभवूनि ब्रह्म । जीवन्मुक्तही करी कर्म । हें लोकसंग्रहाचें वर्म । तृतीयाध्यायांत वर्णिलें. ॥ १०५७ ॥ हाही सत्कर्मीं प्रवृत्त । परी या कर्मेंचि माझें स्वहित । ऐसें मानूनि नव्हे रत । कर्ममार्गीं. ॥ १०५८ ॥ तोही पूर्वबुद्धिसंयोग । होय तोंवरी कर्मयोग । अनुष्ठी तारक म्हणोनि मग । करी लोकसंग्रहाचिकारणें. ॥ १०५९ ॥ परंतु कर्मीं अनादर । कीं नव्हे तो विधिकिंकर । यालागीं योगींच होऊनि तत्पर । अतिक्रमी वेदांतें. ॥ १०६० ॥ एवं पूर्वाभ्यास । ज्ञानमार्गींच योजी त्यास । कर्ममार्गीं नसे ज्यास । आदर ऐसा श्लोकार्थ. ॥ १०६१ ॥ या भगवद्गीतेंत जो संक्षेप । श्रीमद्भागवतीं त्याचें विशद रूप । एकादशीं सच्चिदानंदस्वरूप । उद्धवाप्रति बोलिला हें ऐसेंचि. ॥ १०६२ ॥

भागवतश्लोक—'कुयोगिनो ये विहिताद्यंतरायै-
र्मनुष्यभूतैस्त्रिदशोपसृष्टैः ।
ते प्राक्तनाभ्यासबलेन भूयो
युंजंति योगं न तु कर्मतंत्रम् ॥'

श्रीकृष्ण म्हणे उद्धवा! । ज्ञानी होऊनि यत्न बरवा । योगाकारणें न करी तो म्हणावा । कुयोगी म्हणोनि. ॥ १०६३ ॥ ऐसे कुयोगी । यत्न न करिती आत्मयोगीं । देव घालिती विषयभोगीं । बळात्कारें तयांतें. ॥ १०६४ ॥ देव विघ्नें करिती । विषयकामना नाना रीति । देऊनियां चेवविती । होऊं न देती योगसिद्धीतें. ॥ १०६५ ॥ ते देव इंद्रियाभिमानी । त्यांच्या इंद्रियांतें खवळूनी । स्त्रीपुरुषांच्या इंद्रियांतें क्षोभवूनी । विघ्नें करिती कुयोगियांतें. ॥ १०६६ ॥

करिती प्रजाशासन । जे राजसेवक जन । अतिक्रमूनि त्यातें नृपदर्शन । प्रजांस होतां ते क्षोभती. ॥ १०६७ ॥ त्या प्रजा रायाप्रती । न पावत ऐसीं विघ्नें करिती । राजकृपा होतां न लेखिती । प्रजा त्या आपणातें. ॥ १०६८ ॥ मनुष्य यजिती देवांतें । ते वृष्ट्यादि फळ देती त्यांतें । जे मुमुक्षु त्या निष्कामांतें । उपेक्षा तयांची. ॥ १०६९ ॥ म्हणूनि देव क्षोभती । योगसिद्धि होऊं न देती । दोघांस त्यांचीं विघ्नें न बाधिती । कुयोगी ते या दोहींवेगळे. ॥ १०७० ॥ या द्विविधा ज्ञानिया योगियांत । एक सेविती सगुण भगवंत । एक निर्गुणोपासक ते अत्यंत । क्लेशें देवकृत विघ्नें परिहरिती. ॥ १०७१ ॥ **'क्लेशोऽधिकतरस्तेषां'** म्हणोनी । द्वादशाध्यायांत या भावें करूनी । श्रीकृष्ण बोलेल त्या वचनीं । समजावा हा अर्थ. ॥ १०७२ ॥ जे ज्ञानी होऊनि सगुणाची । कांस न सोडिती त्यांची । देवकृत विघ्नें हरूनि योगाची । सिद्धि अनायासें ईश्वर देतसे. ॥ १०७३ ॥ **'तेषामहं समुद्धर्ता'** म्हणोनी । द्वादशाध्यायांत या भावेंकरूनी । श्रीकृष्ण बोलेल कीं सकळ विघ्नें हरूनी । मी उद्धरणार भक्तांतें. ॥ १०७४ ॥ हाचि अर्थ भागवतीं । पुनःपुनः स्कंधस्कंधाप्रती । निरूपिला तीं प्रमाणें किती । वाखाणावीं ये स्थळीं. ॥ १०७५ ॥ ग्रंथ वाढेल फार । म्हणूनि दाविजे तो अनुकार । एवं देवकृत विघ्नें परिहार । अनायासें भगवद्भक्तां ज्ञानियांचा. ॥ १०७६ ॥ ज्ञान जालियाउपरी । सगुण सोडोनि निर्गुणाचवरी । प्रीति धरूनि बरी । अवलंबिली जिहीं असंगता. ॥ १०७७ ॥ देव त्यांस विघ्नें करिती । परी ते अतिक्लेशें परिहरिती । निःसंग होऊनि धरिती । अभ्यास आत्मयोगाचा. ॥ १०७८ ॥ तेही म्हणावे सुयोगी । देवविघ्नें तयांलागीं । न बाधती आणि जे कुयोगी । देवविघ्नें बाधकें होती तयांतें. ॥ १०७९ ॥ जे आत्मा समजोनी । आणि योगींही प्रवर्तोनी । अभ्यास बरा न करिती म्हणोनी । कुयोगी म्हणावें तयांतें. ॥ १०८० ॥ गोष्टी तयांची प्रस्तुत । कीं देव त्यांस विघ्नें अत्यंत । करिती निवोनि इंद्रियांत । त्यांच्या आणि मनुष्यांच्या. ॥ १०८१ ॥ विघ्नें मनुष्याकृती । त्यांत कांहीं पुरुष कांहीं युवती । योगास विघ्नें करिती त्या किती । प्रसिद्ध गोष्टी बोलाव्या. ॥ १०८२ ॥ एवं जे कुयोगी । देव विघ्नें करिती ज्यांलागीं । ते योगभ्रष्ट होऊनि मेले जगीं । मुक्ति नाहीं पावले त्या जन्मीं. ॥ १०८३ ॥ ते शुचिश्रीमंतसदनीं । पुन्हा उत्तम जन्म पावोनि । प्राक्तनाभ्यासबळें करूनी । आत्मयोगीं योजिती चित्तातें. ॥ १०८४ ॥ परंतु कर्माकडे न भरती । आत्मयोगींच चित्त योजिती । ऐसें उद्धवातें श्रीपती । श्रीमद्भागवतींही बोलिला. ॥ १०८५ ॥ एवं या प्रस्तुतीं ।

**गी**तेंत **अर्जु**नाप्रती । **'शब्दब्रह्मातिवर्तते'** ऐसें जगत्पती । तोचि बोलतो. ॥ १०८६ ॥ एवं बालदशेपासूनी । मोक्षाची इच्छा धरूनी । कर्ममार्गीं रत नसे तरी सज्जनीं । त्यास उपदेश मोक्षमार्गींचा करावा. ॥ १०८७ ॥ कीं तो जन्मांतरीं । ज्ञानमार्गींच होता यापरी । परीक्षा करुनि अंतरीं । अधिकारी जाणावा यज्ञाचा. ॥ १०८८ ॥ एवं या **गी**ताश्लोकीं । श्री**कृ**ष्ण ऐसें बोलिला कीं । तो जरी गुंते लौकिकीं । पूर्वाभ्यास मोक्षमार्गींच ओढी तयास. ॥१०८९॥ तो अतिक्रमूनि कर्म । धुंडूं लागे परब्रह्म । योग साधूनि उत्तम । मोक्ष पावे हें पुढें बोलिजेल. ॥ १०९० ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले **उ**त्तमश्लोक। त्याचें निमित्त सुज्ञ लोक । परिसोत आधीं. ॥ १०९१ ॥ योगभ्रष्ट या जन्मीं । स्वहित साधी परब्रह्मीं । परि न पडे कर्मीं । ऐसें बोलिला श्री**कृ**ष्ण. ॥१०९२॥ आणि त्याचा पूर्वाभ्यास । बळेंचि त्याच्या हिताकडे त्यास । ओढी ऐसेंही **ज**गन्निवास । पूर्वश्लोकीं बोलिला. ॥ १०९३ ॥ या दों गोष्टींत दोनी । संदेह उपजले **पा**र्थाच्या मनीं । कीं या जन्मीं काय म्हणोनी । यत्न करावा त्यानें योगाचा. ॥ १०९४ ॥ कीं तो पूर्वाभ्यासेंचि सिद्ध । होणार हें जालें प्रसिद्ध। तरी त्यानें विषयसमृद्ध । यथेष्ट कां न भोगावें? ॥ १०९५ ॥ आणि **'यतते च ततो भूयः'** म्हणोनी । पूर्वश्लोकीं या वचनीं । मोक्षार्थ यत्न अत्यंत त्याचा दावूनी । स्वयें बोलिला. ॥ १०९६ ॥ आणि पूर्वजन्मीं शुद्धचित्त । कर्में करूनि जाला निश्चित । तरी शुद्ध वस्त्रही असे होत । मलिन बहु काळेंकरूनी. ॥ १०९७ ॥ तरी याही जन्मीं । चित्तशुद्धि करणें कर्मीं । कां रत नसावें वेदोक्त कर्मीं । ऐसी शंका दूसरी. ॥ १०९८ ॥ शंका दोनि यापरी । उपजतां **अर्जु**नाच्या अंतरीं । तत्परिहारवाक्यें बरीं । आतां या श्लोकीं बोलतो. ॥ १०९९ ॥

**प्रयत्नाद्यतमानस्तु योगी संशुद्धकिल्बिषः ।**
**अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिम्** ॥ ४५ ॥

अगा! मुक्ति जे कां परम गती । प्रयत्नेंचि करूनीच ते गतीप्रती । पावतो ऐसें **श्री**पति । बोलोनि परिहरी एक शंका. ॥ ११०० ॥ कीं पूर्वाभ्यास त्याचा । बळेंचि त्यास ओढी हें स्ववाचा । बोलिलों अर्थ साचा । त्याचा इतकाच. ॥ ११०१ ॥ कीं ज्ञानमार्गींच सादर । त्यास करी पूर्वसंस्कार । कर्म अतिक्रमूनि निर्धार । ब्रह्मींच करिता यास्तव. ॥ ११०२ ॥ अगा! जो ग्रंथ जेथवरी । पाठ करूनि विसरे तेथवरी । पूर्वाभ्यासें झडकरी । पाठ होय त्या पुढें लागे प्रयत्न. ॥ ११०३ ॥ एवं ज्ञानमार्गेच उत्तम । इतकेंचि पूर्वाभ्यासें

सुगम । पुढें स्वरूपीं चित्तसंयम । हा यत्न करणें लागेच. ॥ ११०४ ॥ परी इतरासारिखे श्रम । त्यास न लागती करितां चित्ताचा संयम । कीं अश्रुत वेदही होती सुगम । योगाभ्यासीं पूर्वी विरूढली वाणी जयाची. ॥ ११०५ ॥ एवं सुगम रीती । प्रयत्न त्यासही लागती । शंका एक जगत्पती । परिहरी ऐशिया भावें. ॥ ११०६ ॥ आतां पूर्वजन्मीं शुद्ध चित्त । तरी काळ लोटला अत्यंत । पुन्हा त्याच्या सिद्धीनिमित्त । कर्मयोग कां न करावा? ॥ ११०७ ॥ ऐसी शंका दुसरी । **'अनेकजन्मसंसिद्धः'** या वचनें हरी । **'संशुद्धकिल्बिषः'** म्हणोनिही हरी । द्वितीय शंका. ॥ ११०८ ॥ कीं अनेक जन्म । अगा! करितां निष्काम कर्म । आत्मत्वें जाणावें ब्रह्म । हे जिज्ञासा उपजते. ॥ ११०९ ॥ ब्रह्मजिज्ञासा उपजली । तेव्हांचि शुद्धि बुद्धीची जाली । कीं भोगवासना वाईट वाटली । दोहीं लोकांची जेधवां. ॥ १११० ॥ आतां म्हणशील योगभ्रष्ट जाला । तेव्हां पुन्हा मळ लागला । कीं धौतपटही मळला । बहुतां काळें जे रीती. ॥ ११११ ॥ तरी विषयचि गोड तत्त्वतां । ते अनादि बुद्धीची मलिनता । कठिणता आणि श्यामता । लोखंडाची जे रीती. ॥ १११२ ॥ त्या लोहातें लागे परीस । मग कठिणता श्यामता न ये त्यास । ऐसा त्याचा पूर्वाभ्यास । **'योगी विगतकल्मषः'** म्हणतां सूचवी. ॥ १११३ ॥ निष्काम कर्में ईश्वरीं । अर्पितां जन्मांतरीं । परिसास लोह लागे यापरी । विगतकिल्बिष पूर्वींच हा जाला. ॥ १११४ ॥ आतां योगभ्रष्ट जाला । म्हणोनि म्हणसी मळ लागला । तों तों वरील मळ चढला । सोनें मलिन जैसें धुळीनें. ॥ १११५ ॥ त्यास लागतांच हात । शुद्ध होय निश्चित । एवं लोहत्वीं किल्बिष अत्यंत । तैसा अनादि मळ किल्बिष तें नाहीं. ॥ १११६ ॥ म्हणोनि शुद्ध किल्बिष त्याला म्हणावें । तेथें संशुद्धकिल्बिष म्हणे या भावें । संशुद्ध म्हणतां जाणावें । कीं समीचीन प्रकारें तो शुद्ध. ॥ १११७ ॥ ऐशा शंका दोन्ही हरूनी । आतां योग थोर सर्वांहुनी । तो योग तूं अनुष्ठीं म्हणोनि । योगी सर्वांत थोर म्हणतो या श्लोकीं. ॥ १११८ ॥

**तपस्विभ्योऽधिको योगी ज्ञानिभ्योऽपि मतोऽधिकः ।**
**कर्मिभ्यश्चाधिको योगी तस्माद्योगी भवार्जुन ॥ ४६ ॥**

अगा अर्जुना! तपस्वी । तपें पावती थोर पदवी । परी तीं तपें आणि फळें जाणावीं । नश्वरें दोन्ही. ॥ १११९ ॥ अगा! तैसा नव्हे योगी । जो निजानंदपदींच चित्तालागीं । योजी आणि देह जीवंत असतां जगीं । प्राप्ति निजा-

नंदपदाची ज्याला. ॥ ११२० ॥ योगी तपस्वी याहूनि । अधिक कोटिगुणें-करूनि । योगी होय म्हणे म्हणोनि । अर्जुना! तूंहि. ॥ ११२१ ॥ कोणीं कर्मेंचि करिती । नाना देवतांतें यजिती । उत्तम लोकासही जाती । शेवटीं सकळही नश्वर. ॥ ११२२ ॥ कर्मकर्त्याहूनी यालागीं । कोटिगुणें अधिक योगी । म्हणोनि होय तूंहि जगीं । योगी अगा अर्जुना! ॥ ११२३ ॥ अगा! म्हणसी तीं सकामें । वाईट तपें आणि कर्में । मी जीं करीन तीं निष्कामें । त्याणें मोक्ष पावेन. ॥ ११२४ ॥ तरी निष्कामाचें फळ । आत्मज्ञान केवळ । मागुती तेथें चित्त करणें निश्चळ । तो योग. ॥ ११२५ ॥ एवं ज्ञानियाहीहुनी । योगी अधिक म्हणोनी । यास्तव म्हणतो कृपेंकरूनी । कीं तूं योगी होईं अर्जुना! ॥ ११२६ ॥ एथें बोलिले ज्ञानी । कीं योगी थोर जयाहुनी । ते ज्ञानी शास्त्र-ज्ञानी । ऐसें कोणी बोलती. ॥ ११२७ ॥ ज्याच्या मतें आत्मा कळला । मग योग कां पाहिजे त्याला? । ते येथें बोलती या बोला । कीं आत्मज्ञानी तोचि योगी म्हणोनि. ॥ ११२८ ॥ आत्मा कळला ज्यालागीं । तितके ज्ञानेंचि तो योगी । ऐसें मत म्हणोनि या प्रसंगीं । ज्ञानी तो शास्त्रज्ञानी एथें बोलती. ॥ ११२९ ॥ एक वेदांताविणें । शास्त्रमात्र ज्याला दूषणें । योग थोर म्हणतां घेणें । लागेल योगशास्त्र. ॥ ११३० ॥ तरी योगशास्त्रींच्या इतर रीती । टा-कुनि योगचि जगत्पती । या गीतेंत बोले आणि श्रुती । वदती व्यतिरेक-अन्वय दोन योग. ॥ ११३१ ॥ योग न साधे जोंवरी । देहात्मसंस्कार न तुटे तोंवरी । म्हणोनि योग उपपादूनि यापरि । बोलती श्रुति. ॥ ११३२ ॥

श्रुति—**'यदा पंचावतिष्ठंते ज्ञानानि मनसा सह ।**
**बुद्धिश्च न विचेष्टंते तामाहुः परमां गतिम् ॥**
**तां योगमिति मन्यंते स्थिरामिंद्रियधारणाम् ।**
**अप्रमत्तस्तदा भवति योगो हि प्रभवाप्ययौ ॥'**

जेव्हां पांचां ज्ञानेंद्रियांच्या वृत्ती । मनासहित निश्चळ राहती । बुद्धीची चेष्टा गती । राहे परमगती त्या गतीतें म्हणावें. ॥ ११३३ ॥ ऐसी जे परमा गती । तीतें योग म्हणोनि म्हणती । त्या योगाची हेचि स्थिती । कीं स्थिरा इंद्रियांची धारणा. ॥ ११३४ ॥ कीं प्रपंच म्हणावें तया । जो अ-नुभवा ये पांचां इंद्रियां । शब्द स्पर्श रूप रस गंध यां । वेगळा प्रपंच काय असे? ॥ ११३५ ॥ चित्त जालें चिन्मय । तेव्हां कोण्या विषयातें कोण

कल्पी इंद्रिय? । प्रत्यगात्मस्मृतीचाच निश्चय । तन्मयत्वेंचि उरे बुद्धीचा. ॥ ११३६ ॥ ऐसी धारणास्थिती । तीस योग ऐसें म्हणती । परि अप्रमत्त तेव्हां जेव्हां ये रीती । स्थिति बाणे. ॥ ११३७ ॥ ज्यास स्वरूपाची विस्मृती । त्यास प्रमत्त म्हणती । स्मृति जातां पदच्युती । प्रमत्तातें. ॥ ११३८ ॥ ऐसा योग बाणे । श्रुति त्यातें अप्रमत्त म्हणे । कीं योगसिद्ध शाहाणे । ते स्वचिदात्मता न विसरती. ॥ ११३९ ॥ चिदात्मता आपली विस्मरे । तेव्हां देहात्मता आयती स्फुरे । मग काय ते समयीं उरे । अंतर ज्ञानिया अज्ञानियास. ॥ ११४० ॥ कोणी एथें म्हणती । कीं आपणास सौभाग्यवती । ऐसें जरी सुवासिनी न स्मरती । तरी अहेवपण गेलें काय त्यांचें? ॥ ११४१ ॥ तरी सौभाग्यातें विसरती । आणि क्षौरकातें आतळती । तरी तीस स्मृति धरणें लागती । अगत्य आपल्या सौभाग्याची. ॥ ११४२ ॥ बुद्धीस जेव्हां चिदात्मता । न स्फुरे स्फुरे तेव्हां देहात्मता । हा संस्कार व्हावी आयता । सिद्ध बैसला मुंडनातें. ॥ ११४३ ॥ कोणी म्हणती ब्राह्मण । न स्मरे कीं ब्राह्मण आपण । तरी तें काय गेलें शहाणपण । मूर्ख कोणी ऐसे दाविती. ॥ ११४४ ॥ जो भ्रष्टोनि शुद्ध जाला । मी शुद्ध जालों हें न स्मरे ज्याला । तो विसरूनी अन्न भक्षूं लागला । इतर नीच जातीचें. ॥ ११४५ ॥ पूर्वसंस्कारें देहात्मत्व । जरी न मानी ज्ञानियाचें सत्त्व । तरी चिदात्मत्व विस्मरणें पूर्णत्व । न जाय ऐसें अंगीकारूं ये. ॥ ११४६ ॥ असोत दांभिकाचे बोल । परमार्थहीन फोल । परी त्यातें मानूनि सखोल । वायां जाती उपेक्षूनी योगातें. ॥ ११४७ ॥ एवं **'अप्रमत्तस्तदा भवति'** । येथपर्यंत श्रुती । योगशब्दें हे स्थिती । विशद व्यतिरेकयोगीं बोलिली. ॥ ११४८ ॥ उरला शेवटील चरण । त्यांत अन्वययोगविवरण । ज्या योगीं मायेचे तिन्ही गुण । तेही निर्गुणचि लक्षावे. ॥ ११४९ ॥

### श्रुत्यंतिम चरण—**'योगो हि प्रभवाप्ययौ ।'**

प्रभव म्हणजे उत्पत्ती । अप्यय नाशास म्हणती । या दोहींतें म्हणे श्रुती । योग म्हणोनि. ॥ ११५० ॥ कीं सृष्टि आणि संहार जगास । ब्रह्म हेमीं जैसें नगास । नग उपजणें असणें नाशणें तिघांस । अधिष्ठान सोनें तैसें जगासही ब्रह्म. ॥ ११५१ ॥ एवंच ब्रह्मचि नहोनि विश्व जालें । ब्रह्मचि त्याचा नाश जें अंतीं उरलें । स्थितिकाळीं ही ब्रह्मचि या बोलें । सूचविलें श्रुतीनें. ॥ ११५२ ॥ कीं सोनेंचि अळंकार जो जाला । उरलें नाशूनि तेंचि नाश त्याचा बोला । होऊनि नासे तों-

पर्यंतही त्याला । सोनेंचि कीं म्हणावें. ॥ ११५३ ॥ एवं अलंकाराचें उपजणें । सोनें आणि सोनेंचि त्याचें नाशणें। तेव्हां सोनेंचि त्याचें असणें। उपजोनि नासे तोंपर्यंत. ॥ ११५४ ॥ तरंगउत्पत्ति जळ । त्याचा नाश तेंचि केवळ । तरंग आहे तोंवरीही निखळ । उदकचि असे. ॥ ११५५ ॥ कार्यांत निखळ कारण। पाहाणें यास योगनिपुण । योग म्हणती श्रुतीही खूण । हेचि दावी. ॥ ११५६ ॥ ज्याचें जें उपादान कारण । त्या कार्यास प्रत्यक्षीं कारणपण । त्याचें उपजणें नाशणेंही आपण । कारणचि दिसे. ॥ ११५७ ॥ येविषयीं प्रमाण श्रुती । आणीकही उदंड असती । परंतु पावेल विस्ताराप्रती । ग्रंथ हा. ॥ ११५८ ॥ एवं योगशास्त्ररीती । टाकूनि **गीता पुराणें श्रुती** । वाखाणावया ज्ञानस्थिती । योग बोलती तो मोक्षातें अगत्य. ॥ ११५९ ॥ हा अर्थही या प्रस्तुतीं । स्पष्ट बोलिली श्रुती । कीं, **'अप्रमत्तस्तदा भवति'** । श्रुति म्हणे. ॥ ११६० ॥ कीं देहात्मसंस्कारें प्रमत्त । नव्हे तेव्हां म्हणावा अप्रमत्त । ऐसा अप्रमत्त तेव्हां कीं जेव्हां चित्त । चिन्मययोगीं होतसे. ॥ ११६१ ॥ या गोष्टीचा प्रसंग । यावरूनि कीं योग । ज्ञानी न साधी तों नव्हे भंग । देहात्मत्वसंस्काराचा. ॥ ११६२ ॥ कोणी न मानिती हा सिद्धांत । साभिमान जाले वाचूनि वेदांत । आत्मज्ञानी म्हणवूनि भ्रांत । देहात्मभावें सर्वदा. ॥ ११६३ ॥ योग थोर बोलिला जेथें । ते आत्मज्ञानमात्र वाखाणिती तेथें । प्रस्तुतीं ज्ञानियाहूनि योगी थोर एथें । तो ज्ञानी शास्त्रज्ञानी ऐसें बोलती. ॥ ११६४ ॥ जड चैतन्य भाग दोनी । समजला तोचि योगी अनुभवी ज्ञानी । तो ज्या ज्ञानियाहूनि थोर म्हणोनी । वर्णिला तो शास्त्रज्ञानी म्हणती. ॥ ११६५ ॥ कीं आत्मत्वमात्र समजला । योगी शब्दें तोचि म्हणती एथें वर्णिला । त्याहूनि उणा ज्ञानी बोलिला । तरी तो म्हणती शास्त्रज्ञानी म्हणावा. ॥ ११६६ ॥ आत्मा कळल्यावरी । चित्त चिन्मय करावें त्याउपरी । ऐसें ते मानिते जरी । तरी आत्मज्ञानियाहूनि योगी थोर ते म्हणते. ॥ ११६७ ॥ असो आत्मज्ञानियाहुनी । योगी थोर म्हणोनी । अर्थ या भगवद्वचनीं । बोलिला पाहिजे. ॥ ११६८ ॥ एवं तपस्वी कर्मी ज्ञानी। योगी थोर या सर्वांहुनी । श्रीकृष्ण म्हणे म्हणोनी । होय तूं योगी अर्जुना! ॥ ११६९ ॥ कीं तुज आत्मज्ञान । होईल मग आपलें मन । स्वरूपरूप करूनि मोहन । मोडी देहात्मतेचें. ॥ ११७० ॥ ऐसा योगीही होउनी । मज सगुणातें भजे म्हणोनी । योगी भक्त सर्वां योगियांहुनी । थोर म्हणतो आतां या श्लोकीं. ॥ ११७१ ॥

**योगिनामपि सर्वेषां मद्गतेनांतरात्मना ।**
**श्रद्धावान्भजते यो मां स मे युक्ततमो मतः ॥ ४७॥**

अगा! सर्वांत थोर योगी । म्हणूनि पूर्वश्लोकीं बोलिलों तुजलागीं । त्याही सर्वां योगियांत जगीं । थोर जो योगी मद्भक्त. ॥ ११७२ ॥ जो श्रद्धावंत भक्त । ज्याचें अंतःकरण माझ्या स्वरूपीं अनुरक्त । त्या अंतःकरणें योगयुक्त । भजे मातें. ॥ ११७३ ॥ योगी तितुके म्हणावे युक्त । परि ज्याचें चित्त सगुणीं अनुरक्त । वरकड युक्त तो युक्ततम भक्त । मज संमत बहुत तो योगी. ॥ ११७४ ॥ युक्त योगी म्हणावा । युक्ततम तो थोर योगी गणावा । आणि मज संमत जो मनोभावा । मज सगुणीं योजी तो भक्तीनें. ॥ ११७५ ॥ ऐसेंच सप्तमाध्यायांत । ज्ञानी भक्त थोर अत्यंत । म्हणोनि म्हणेल **भ**गवंत । द्वादशीं तरी दोहींत थोर यातेंचि म्हणेल. ॥ ११७६ ॥ एथें निर्गुणोपासक । आत्मा कळतांच जे सगुणोपेक्षक । ते दाखविती पांडित्यकौतुक । जों पुसता नाहीं भेटला. ॥ ११७७ ॥ कोणी म्हणती योगियांत । भक्त थोर म्हणे **भग**वंत । ते योगी आत्मज्ञानवंत । ऐसें नव्हे. ॥ ११७८ ॥ जे यमनियमादि विचित्र । योगमार्ग अनुष्ठिती पवित्र । ते आत्मज्ञ न होती योगी मात्र । त्यांत स्वभक्त श्रेष्ठ म्हणोनी श्रीकृष्ण म्हणतो. ॥ ११७९ ॥ ज्ञानाभिमानी हो अरे । प्रसंग कोण हें विचाराना कां बरें? । ऐसी क्लिष्ट कल्पना कल्पूनि खरे । टीकाकार जगीं म्हणवितां. ॥ ११८० ॥ यामागें तिसरा श्लोक । तेथें बोलिला उत्तमश्लोक । कीं यतमान योगीं प्रयत्न अनेक । करूनि परम गतीतें पावतो. ॥ ११८१ ॥ तो तों आत्मज्ञानी म्हणावा । आतां त्या पुढिल्या श्लोकीं जो श्रेष्ठ गणावा । तो ज्ञानहीन कोठोनि आणावा । तपस्वी कर्मी तेव्हां भक्त ज्ञानियाहूनि थोर. ॥ ११८२ ॥ त्या पुढिलिया श्लोकांत । **'योगिनामपि'** सर्वेषां म्हणे **भ**गवंत । तो श्रेष्ठ ज्ञानहीना योगियांत । अरे साभिमान हो कां म्हणतां ॥ ११८३ ॥ **'योगिनामपि सर्वेषां'** या वचनीं । योगियांतही सर्वांत युक्ततम म्हणोनि । **भ**गवंत म्हणतो एथें कोठूनी । ज्ञानहीन योगी तुम्हीं आणिले? ॥ ११८४ ॥ मागें तिसरिया श्लोकीं योगी । मुक्ति बोलिली ज्यालागीं । तो ज्ञानियाहीहूनि थोर जगीं । या मागिल्या श्लोकीं वर्णिला. ॥ ११८५ ॥ तैशाही सर्वां योगियांत । माझा भक्त युक्ततम अत्यंत । ऐसें स्पष्ट बोले **भग**वंत । तें कां रे! तुम्हीं मोडितां. ॥ ११८६ ॥ हा मुख्यार्थ मानाना जरी । अभिमान स्थापला तुम्हांवरी । आणि अंगीकाराल तरी । ज्ञानियांत भक्तज्ञानी तो

थोर. ॥ ११८७ ॥ त्यांतचि अन्य टीकाकार । ते तेथें अन्य प्रकार । बोलती कीं नानादेवता इतर । त्यांचे उपासक ते योगी. ॥ ११८८ ॥ त्या सर्वां योगियांत । स्वभक्त थोर म्हणतो भगवंत । एवं च ते योगी नव्हती ज्ञानवंत । ज्यांत भक्त थोर वाखाणिती. ॥ ११८९ ॥ तरी हें उपासनाप्रकरण । नसतां क्लिष्टकल्पित विवरण । योगीशब्दाचें यांत स्फुरण । स्पष्ट दिसतें अभिमानाचें. ॥ ११९० ॥ मागिलिया तिसरिया श्लोकापासूनी । योगी थोर सर्वांहूनी । त्यांतही भक्त श्रेष्ठ म्हणोनी । या श्लोकीं म्हणे भगवंत. ॥ ११९१ ॥ हा शुद्धपक्ष अंगीकारा । टाकुनि अभिमान सर्वेश्वरा । सगुणातें भजोनि तरा । सर्वात्मत्वें. ॥ ११९२ ॥ हा अध्यायाच्या अंतींचा श्लोक । जेथें ज्यांस सर्वात्मत्व अवलोक । ते भक्त थोर ऐसा उत्तमश्लोक । स्थापिता जाला सिद्धांत. ॥ ११९३ ॥ हेचि भक्ति विशद अत्यंत । उत्तराध्यायापासूनि भगवंत । द्वादशाध्यायापर्यंत । बोलेल आतां. ॥ ११९४ ॥ आत्मज्ञानाविण । भक्ती तें अन्न अलवण । आणि अन्नावांचूनि लवणचर्वण । भक्तीवांचूनि ऐसा आत्मबोध. ॥ ११९५ ॥ ऐसी टीका वामनी । हाचि अनुभव बरवा मनीं । जे पाहती दिनयामिनी । ते भगवद्भक्ति आत्मयोगीं देखती. ॥ ११९६ ॥

गोष्ठे दधारात्मकरेण योगं षष्ठेऽर्जुनायादिशदात्मयोगम् ।
स आविरस्तु स्थिरजंगमेषु सिंधूर्मिवच्चिज्जडसंगमेषु ॥

---

## अध्याय सातवा.

जय जय विजयसूत !। जय जय गीतापीयूषजीमूत! । जय जय चराचरभूत! । परापरप्रकृत्यधिष्ठान. ॥ १ ॥ जय जय मायापते ! । जय जय प्रपन्नमायातीतगते!। जय जय जगत्कल्पनामते!। जगदात्मन् ! ॥ २ ॥ जय जयसत्त्वरजतमफणिगुण !। जय जय अशेषकल्याणगुण ! । जय जय मुक्तमुमुक्षुसेव्यसगुण । जगद्गुरो ! ॥ ३ ॥ जय जय कामाकामसेवित । जय जय अपरोक्षसंपन्न सद्भक्तसंमत ! । जय जय बुधभक्त सुप्रीत ! । परमगुरो ! श्रीहरे ! ॥४॥ जय जय बहुजन्मसिद्धोपासित ! । जय जय सर्व वासुदेवाच्युत ! । जय जय जडतरंगबोधामृत ! । देवाधिदेव ! ॥५॥ जय जय जगदावास! । जय जय जगन्निवास ! । जय जय श्रीवल्लभ ! श्रीनिवास ! । श्रीवत्सांक! शेषपर्यंक! ॥६॥ जय जय चरणशरणज्ञानप्रद ! । जय जय अनाद्यविद्याध्वंस गोविंद ! । जय जय कैवल्यदायक मुकुंद !। जगदेकनाथ ! ॥ ७ ॥ ऐशिया श्रीशेषशयना । वंदूनि तूतें कमलनयना ! ।

**गी**तासप्तमाध्यायटीकारचना । करीन तुझ्या प्रसादें. ॥ ८ ॥ तूंचि **गी**ता तूंचि **गी**ताकार । तूंचि **टी**का तूंचि **टी**काकार । **गी**तेंत हेंचि हाचि प्रकार । टीकेंतही. ॥ ९ ॥ तुजवांचूनि काय असे । तंतूचि जैसा पट दिसे । कीं मृगजळीं वसे । भानु एक. ॥ १० ॥ आतां षष्ठाध्यायावरी । सप्तमाध्याय कां परी । आरंभतो हें अजी **ह**री ! । बोलतों तुझ्या मूर्ती श्रोते त्यांप्रती. ॥ ११ ॥ षष्ठाध्यायामाजि योग । बोलतां योगभ्रष्टप्रसंग । **अ**र्जुनें पुसतां **श्री**रंग । विशद बोलिला. ॥ १२ ॥ कीं, उत्तमलोकातें जाउनी । बहु काळ तेथें राहुनी । पुन्हा उत्तम जन्म पावोनी । त्या जन्मीं मुक्ति पावतो. ॥ १३ ॥ सकळांमाजि यालागीं । श्रेष्ठत्वें वर्णिला योगी । त्या सर्वां योगियांतही जगीं । योगी अतिश्रेष्ठ जो स्वभक्त. ॥ १४ ॥ योगियांत योगी उत्तम । तो स्वभक्त युक्ततम । ऐसें बोलिला **स**र्वोत्तम । शेवटीं षष्ठाध्यायांत. ॥ १५ ॥ तरी सगुणीं भजे तो भक्त । आत्मत्वें भजे तो योगयुक्त । त्याचि योगीं केंवि अनुरक्त । सगुणा **प**रमेश्वरातें. ॥ १६ ॥ ऐसें **अ**र्जुनाच्या मनीं । तत्काळ वाटलें म्हणोनी । तो प्रश्न करी जों तों स्वयेंचि एथुनी । तेंचि सप्तमाध्यायांत उपदेशितो. ॥ १७ ॥ कीं सगुणा चौभुजांचा म्हणावा । तरी द्विभुज **रा**म निर्गुण गणावा । आतां मनुष्याकार सगुण जाणावा । तरी **म**त्स्य**कू**र्मादि हे कोण ? ॥ १८ ॥ आतां असावा आकार कांहीं । त्यावांचूनि सगुणत्व नाहीं । तरी चराचर साक्षी हाही । साकार तेव्हां लेखावा. ॥ १९ ॥ साक्षीही साकार । हाही अंगीकारावा प्रकार । म्हणूनि जरी ये विचार । एथवरी. ॥ २० ॥ तरी साक्षी एक आहे । जो सर्वत्र सर्व पाहे । तो देखिला नसोनि बुद्धि साहे । काय म्हणोनि हे गोष्टी. ॥ २१ ॥ तेव्हां **वे**दशास्त्रें बोलती । म्हणूनि अंगीकारावी हे रीती । तरी साक्षित्व वर्णिती श्रुती । सगुण आणि निराकार. ॥ २२ ॥

श्रुति—**'अपाणिपादो जवनो गृहीता पश्यत्यचक्षुः स शृणोत्यकर्णः ।**
**स एव वेद्यं न च तस्य वेत्ता तमाहुरग्र्यं पुरुषं पुराणम् ॥'**

नसोनि हस्त चरण । वेगवंत आणि करी ग्रहण । नसोनि चक्षु श्रवण । पाहे आणि आयके. ॥ २३ ॥ हाताविणें घेणें । आणि वेग पायांविणें । दोन्ही गोष्टी व्यापकपणें । घडती आकाशदृष्टांतें. ॥ २४ ॥ कीं जें असेल जेथें । तें आकाशें आपणांत घेतलें तेथें । तैसें व्यापका वेगळें एथें । काय असे आकाशांत. ॥ २५ ॥ पक्षी उडे गगनीं । तों गगन पुढें असे त्याहूनी । गगन

वेगवंत म्हणोनी । या गुणें म्हणावें. ॥ २६ ॥ तैसें हस्तावांचूनि ग्रहण[1] । आणि वेग पायांवीण । ऐसें नसोनि चक्षु श्रवण । पाहे आणि आइके. ॥ २७॥ विचारितां हें लक्षण । दिसतें शुद्ध निर्गुणपण । परि दर्शन आणि श्रवण । निर्गुणीं न घडे. ॥ २८ ॥ मायायोगें द्रष्टेपण । मायायोगेंचि श्रवण । तैसें सर्व पदार्थांचें ग्रहण । सर्व मजमाजी जो जाणे तयातें. ॥ २९ ॥ मग धांवे जेथपर्यंत । त्याहूनि पुढें आपण अनंत । ज्यास ऐसें जाणणें वेगवंत । म्हणावा तोचि. ॥ ३० ॥ एवं **'पश्यति'** आणि **'शृणोति'** । म्हणूनि बोले श्रुति । तेव्हां हेही धर्म त्यांत असती । कीं आपण गृहीता[2] आणि वेगवंत[3]. ॥ ३१ ॥ ऐसें सगुण साक्षित्वाचें रूप । माया आणि शुद्धचित्स्वरूप । ब्रह्म माया दोन्ही अरूप । उभय योगें साक्षित्वकार्य[4] मायेचें. ॥ ३२ ॥ तरीच माया आणि ब्रह्म । अव्यक्त दोहींचें नाम । ब्रह्मीं श्रवण दर्शनादि नसती धर्म । मायायोगें सधर्मत्व. ॥ ३३ ॥ त्यास म्हणावें सगुण । अवतारीं साकारपण । अवतार ज्याचे तो आपण । सगुण होउनिही निराकार. ॥ ३४ ॥ अवतार त्याची कल्पना । कल्पनाच त्याची विश्वरचना । ज्ञानदृष्टि पाहतां असेना । चराचरास अवताररूपास भिन्नत्व. ॥ ३५ ॥ त्यांत इतकेंचि अंतर । कीं ईश्वरांश जीव कर्मानुसार । हे देह पावती आणि अवतार । स्वेच्छाकल्पित तारक तया जिवांचे. ॥ ३६ ॥ तथापि माया कल्पित । अवतार आणि चराचर निश्चित । दोन्ही समान भगवंत । देह आपले मानितो. ॥ ३७ ॥ लक्षूनि जिवांचें कर्म । स्वयें होतो स्थावर जंगम । लक्षूनि त्यांचा उद्धार सर्वोत्तम । अवतरतो स्वयें तोचि. ॥ ३८ ॥ हे नेणती जीव । जैसें अविद्येस्तव । तैसेंचि नेणती अवतारविभव । परि भेद न देखे ईश्वर. ॥ ३९ ॥ राजा शिरीं भूषणें धरी । त्याच हेमें नाना परी । गज रथ अश्वादि अलंकारी । समवित्त आपलें तो पाहे. ॥ ४० ॥ या प्रकारें चराचर । ईश्वरास वाटे आपलें शरीर । आणि अनुभव हा निरंतर । कीं शुद्ध निर्गुण आपण. ॥ ४१ ॥ जैसा तंतूचि पट । आणि मातीच घट । ऐसें निर्गुणचि निपट । त्रिगुण विश्व. ॥ ४२ ॥ ऐसें पाहणें बाणे । त्यास योग म्हणती शाहणे । तो योगी दृश्य मिथ्या म्हणे । त्याचा प्रकाशक आत्मा तो सत्य. ॥४३॥ तंतु सत्य मिथ्या पट । माती सत्य मिथ्या घट । आत्माच आहे निपट । परी भास मिथ्या ते योगी मानिती. ॥ ४४ ॥ भक्त योगीही हेंचि जाणे । परी त्यास विशेष एक बाणे । कीं हे ईश्वरकल्पना तेव्हां म्हणे । चराचर अवतार

---

१. घेणें. २. ग्रहण करणारा. ३. धांवणारा. ४. साक्षिपणाचें काम.

ईश्वराचे. ॥ ४५ ॥ कीं मत्स्यकूर्मादि देह । भगवदवतार निःसंदेह । स्थिरचर तैसेंचि संदेह । काय एथें. ॥ ४६ ॥ विष्णुप्रतिमा सुवर्णाची । त्यांत सुवर्णताचि साची । तैसी स्वरूपावांचूनि कैंची । सत्ता अवतारमूर्तीतें ? ॥ ४७ ॥ ऐसें निर्गुणत्वें सगुण । तो लक्षी जैसा निपुण । तैसें निर्गुणत्वेंचि त्रिगुण । विश्वही लक्षी. ॥ ४८ ॥ अवताररूपी ही माया । लटिकीच वाटे जया । प्रपंचरूपीं तया । काय सत्य वाटेल? ॥ ४९ ॥ परंतु अवताररूपीं प्रीती । तैसीच प्रीती सर्वभूतीं । जैशा रामकृष्णादि मूर्ती । भक्त पाहे तैसें चराचर. ॥ ५० ॥ नुसता योगयुक्त । आणि योगी होऊनि भक्त । त्यांत अंतर हेंचि कीं अनुरक्त । सगुणीं म्हणूनि सगुणत्वें जग पाहे. ॥ ५१ ॥ वर्णिला षष्ठाध्यायाचे अंतीं । योगयुक्त भक्त ये रीती । हें आइकोनि मती । साशंक जाली अर्जुनाची. ॥ ५२ ॥ कीं योगीं भक्ति ये रीती । हे विदित नसे अर्जुनाप्रती । म्हणूनियां अध्यायारंभीं जगत्पती । हेंचि आईक म्हणतो. ॥ ५३ ॥ ऐश्वर्य ज्ञान वैराग्य धर्म । यश श्री हा षड्गुणांचा क्रम । साही गुण स्थावर जंगम । देह ज्याचा तो बोलतो श्रीभगवान्. ॥ ५४ ॥

श्रीभगवानुवाच—**मय्यासक्तमनाः पार्थ योगं युंजन्मदाश्रयः ।**
**असंशयं समग्रं मां यथा ज्ञास्यसि तच्छृणु ॥ १ ॥**

पार्था ! माझ्या ठायीं आसक्त । मन गुंतलें ऐसा अनुरक्त । योगही योजूनि माझा भक्त । होसील तूं जैसा आईक तें. ॥ ५५ ॥ सर्वेही मीच ईश्वर । ऐसें ज्या प्रकारें तूं चतुर । मातें जाणसील तें आईक सादर । अगा पार्था ! ॥ ५६ ॥ मी सगुण ईश्वर अद्वय । तोचि मी सर्वेही हें निःसंशय । तूंही हें जाणसील मदाश्रय । ज्या प्रकारें तें आतां आईक. ॥ ५७ ॥ चित्त सर्वात्मयोगीं योजे । तथापि मायेचे भास दिसती जे जे । ते ते मी सगुण ऐसी विराजे । भक्ति माझी योगांतही. ॥ ५८ ॥ योजित असोनि योग । घडे माझा भक्तियोग । योग भक्ति दोहींचा संयोग । एकेचि समयीं. ॥ ५९ ॥ याकारणें योग योजितां । मी सगुण ऐसें चराचर भूतां । मद्रूप पाहसी तें आतां । अगा पार्था ! आईक. ॥ ६० ॥ अर्थ उकलला ऐसे परी । भावार्थ प्रतिपदीं हरी । सुचवितो यावरी । कांहीं विशद बोलावा. ॥ ६१ ॥ योग तरी योजिसी । त्या योगीं मज समग्रत्वें पाहसी । ज्या ज्ञानें ऐसा प्रवीण होसी । तें आइक म्हणतो हा अर्थ. ॥ ६२ ॥ तरी सर्वत्र दिसे ब्रह्म । हा सर्वात्मयोग परम । याही अनु-

१. सर्वत्र ब्रह्म पहाण्यांत.

भवावरि श्रम । हा किमर्थ? ॥ ६३ ॥ किं त्रिगुणीं दिसे निर्गुण । मग तेंचि सर्वेंही ब्रह्म सगुण । पाहावें हें न जाणे जरी निपुण । तरी काय उणें अनुभवीं तयाच्या? ॥ ६४ ॥ ऐसें म्हणेल पार्थ । तरी हे गोष्टी यथार्थ । परी साधूनिही चतुर्थ पुरुषार्थ । भक्ति नाहीं साधली तयातें. ॥ ६५ ॥ योगियांतही तो योगी थोर । जो योगी होऊनि सगुणीं सादर । हें पूर्वाध्यायाच्या अंतीं सर्वेश्वर । सिद्धांतरूपें बोलिला. ॥ ६६ ॥ तरी योगीही होउनी । जरी लागे सगुणमात्र-भजनीं । तरी जतन होय जो मनीं । ठसा योगाचा. ॥ ६७ ॥ कीं भक्तिसु-खापुढें जया । मोक्षही नलगे तया । काय करावी घेऊनियां । योगसिद्धी? ॥ ६८ ॥ आणि थोरपण आलें तेथें । कीं योग असोनि भक्ति जेथें । यालागीं बोलणें लागलें एथें । ऐसें श्रीकृष्णासी. ॥ ६९ ॥ कीं माझेठायीं आसक्त मन । म्हणजे मी जो साकार कमलनयन । त्या माझेंचि भजन चिंतन । करी लंपट होउनी. ॥ ७० ॥ ऐसें माझे ठायीं । मन आसक्त लंपट माझे पायीं । त्या सं-योगीं सगुण दावूनि या उपायीं । दोन्ही साधती ऐसें करावें. ॥ ७१ ॥ कीं भक्ति नुसती ज्ञानाविण । न ठाउकी स्वात्मखूण । त्यास निर्गुण न कळतां सगुण । काय कळे. ॥ ७२ ॥ निर्निमित्त आपली प्रीती । आयता आत्मा भक्ति आयती । अविद्येनें पडली भ्रांती । हें भक्तिरहस्य न कळे तयातें. ॥ ७३ ॥ तोही आत्मा कळे । आणि चित्त योगीं न वळे । चित्स्वरूपीं न मिसळे । तोंवरि न तुटे अविद्यासंस्कार. ॥ ७४ ॥ एवं योगाचा ठसा पडे । तरीच भक्तिसुख सांपडे । ते भक्ति तरी म्हणावी कीं घडे । जरी भजन सगु-णाचें. ॥ ७५ ॥ अन्यथा निर्गुणोपासक । होतां फळीं क्लेश अधिक । ज्ञानी योगी सगुणसेवक । श्रेष्ठ सर्वांत हे पदवी. ॥ ७६ ॥ स्वयत्नें तरों हा निश्चय । क्लेशें चित्त करिती चिन्मय । भक्तांस सगुणाचा आश्रय । योगसिद्धि अनायासें यास्तव. ॥ ७७ ॥ अत एव या भावेंकरूनी । या श्लोकीं मदाश्रय म्हणोनी । योगिया भक्तांचें विशेषण वदोनी । आईक म्हणतो आपलें समग्रत्व. ॥ ७८ ॥ कीं योग योजूनि मदाश्रय । ज्यास आश्रय मी जगदाश्रय । ऐसा होऊनि तूं निःसंशय । सर्व मी ऐसें जे रीती जाणशी. ॥ ७९ ॥ तैसें सांगेन तुजला । आइक त्या माझ्या बोला । परी त्या समग्र विश्वरूपा मला । पाहाणें न घडे योगावांचूनी. ॥ ८० ॥ आणि योग भक्तीवांचुनि । तो योगी भक्त नव्हे म्हणोनी । योगातें योजित असोनी । समग्रातें मातें ये रीती जाणसी. ॥ ८१ ॥ योजीत असोनि योगातें । जे रीती जाणसी समग्र मातें । तें आइक म्हणतां

एथें । न घडे अर्थ यावेगळा आणिक. ॥ ८२ ॥ कीं सर्व ब्रह्म जाणे । योग योजणें त्यातेंचि बाणे । ऐसें असोनी श्रीकृष्ण म्हणे, । **'योगं युंजन्ज्ञास्यसि'** म्हणोनी. ॥ ८३ ॥ योग योजीत असोनी । समग्रातें मातें जाणसी म्हणोनी । म्हणतां विरोध वचनीं । प्राप्त जाला. ॥ ८४ ॥ तरी सर्वात्मत्वें योगातें । योजितां चराचरातें । माझीं सगुणरूपें म्हणोनी मातें । जे रीती जाणसी तें आईक. ॥ ८५ ॥ विरोध ऐसा परिहरे । अन्यथा वाक्यार्थ एथें विखरे । जे निर्मत्सर पाहती बरे । ते मानिती याचि अर्थातें. ॥ ८६ ॥ योगशब्दें योगव्यतिरेक । समग्रत्वें अन्वयाचें कौतुक । व्यतिरेक योजीत एकीं अनेक । हा अन्वय बोलतो जरी म्हणावा. ॥ ८७ ॥ तरी व्यतिरेक आणि अन्वय । दोंपरी अद्वैत निश्चय । करूनि होऊनि निःसंशय । मग योग योजूं तो भलता. ॥ ८८ ॥ व्यतिरेकयोगीं मन । करूं लागतां विषयचिंतन । तेथेंच आत्मत्वाचें अवलोकन । करूनि मन योजावें स्वरूपींच. ॥ ८९ ॥ हें पूर्वाध्यायांत । **'यतो यतो निश्चरति'** या श्लोकें भगवंत । बोलिला तेव्हां असावा विदित । अन्यबोध व्यतिरेक योगियातेंही. ॥ ९० ॥ व्यतिरेक आणि अन्वय । द्विविध जाणोनि अद्वय । मग योगीं करूनी चित्त तन्मय । दोहीं मधूनि योगी योजी भलतिया एकीं. ॥ ९१ ॥ विना व्यतिरेक न कळे अन्वय । विना अन्वय न कळे अद्वय । नव्हतां गुरुमुखें हे दोन्ही निश्चय । बोध कैंचा ? ॥ ९२ ॥ नाहीं अद्वैतबोध । तोंवरी वृथा वृत्तिनिरोध । कीं नाना द्वैत जडविरोध । केला असे अविद्येनें. ॥ ९३ ॥ तोंवरी अविद्याच नाहीं गेली । जों अन्वयाची न कळे किल्ली । अविद्यासंस्कारभंगार्थ लागली । साधणें योगसिद्धि अगत्य. ॥ ९४ ॥ एवं व्यतिरेक योग योजित । समग्रातें मातें जाणसी निश्चित । म्हणूनि बोलतो भगवंत । हा अर्थ न घडे सर्वथा. ॥ ९५ ॥ आतां योगातें योजित । म्हणजे योगाचा अभ्यास करित । समग्रातें मातें जाणसी तें भगवंत । आइक म्हणतो ऐसें कोणी बोलती. ॥ ९६ ॥ त्या टीकेचा भाव ये रीती । कीं तेव्हां जो साधक त्याप्रती । सगुणत्वें सांगे श्रीपती । न बोलतो सिद्धांतें. ॥ ९७ ॥ साधकास उपदेश यालागीं । न भजती सगुणातें सिद्ध योगी । म्हणूनि ते या प्रसंगीं । वाखाणी ऐसें. ॥ ९८ ॥ तरी या श्लोकामागील जो श्लोक । पूर्वाध्यायांत तेथें उत्तमश्लोक । बोलिला त्याचा बरा अर्थावलोक । करितां साधक यातें न म्हणावें. ॥ ९९ ॥ कीं योगी थोर सकळांत । तैशाही योगियांत । भक्त थोर म्हणे भगवंत । ते तों योगीं न म्हणवती साधक. ॥ १०० ॥ जो सिद्ध योगनिष्ठ ।

तोचि सर्वांत बोलिला वरिष्ठ । त्या तैशाही वरिष्ठांमध्यें श्रेष्ठ । स्वभक्त योगी बोलिला. ॥ १०१ ॥ ज्यांत हा श्रेष्ठ बोलिला । सिद्धचि म्हणावें त्याला । तैसियासही साध्यांश उरला । भक्ति अलंकार योगसिद्धीचा. ॥ १०२ ॥ म्हणूनिया पुढिलिया श्लोकांत । अर्जुनातें म्हणे भगवंत । कीं तूं योग योजित । समग्रातें मातें जाणसी तें आइक. ॥ १०३ ॥ कीं सिद्ध जरी जाला । योग योजीत असावें लागे त्याला । तैसा तूं योग योजीत मला । समग्रत्वें जाणसी जैसा तें आइक. ॥ १०४ ॥ या अर्थे पूर्वश्लोकोक्त । सिद्ध होतो कीं पक्व योगी आणि भक्त । तो योगियांत अत्यंत युक्त । आणि मज संमत म्हणे श्रीकृष्ण. ॥ १०५ ॥ पुढें आर्त जिज्ञासु अर्थार्थी ज्ञानी । ज्ञानी भक्त त्या तिघांहूनी । श्रेष्ठ माझा आत्मा म्हणोनी । याच अध्यायांत बोलेल. ॥ १०६ ॥ तेथेंही भक्त जो ज्ञानी । तो ज्ञानसिद्धचि बोलावा म्हणोनी । मागील पुढील विचार पाहोनी । तेथें सिद्ध योगीच बोलावा. ॥ १०७ ॥ कीं सर्वांत थोर ज्ञानी । तोही भक्त तरी अतिश्रेष्ठ म्हणोनी । श्रीकृष्ण म्हणे यावरूनी । एथें सिद्ध योगीच बोलावा. ॥ १०८ ॥ सर्वांत बरा मानव । त्यांत बरें रूप अभिनव । त्यांतही अलंकारादिवैभव । ज्यास तो बरा अत्यंत. ॥ १०९ ॥ तैसा ज्ञानी सर्वांमध्यें श्रेष्ठ । त्यांत थोर योगनिष्ठ । त्या योगियांत वरिष्ठ । जरी योगीं योजी सगुणभक्ती. ॥ ११० ॥ याकारणें एथें भगवंत । म्हणे कीं तूंही योगयोजित । सर्वही मी ऐसें मातें निश्चित । जाणसी जैसें तें आइक. ॥ १११ ॥ कीं **'वासुदेवः सर्वमिति । स महात्मा सुदुर्लभः'** ऐसें याचप्रती । याच अध्यायीं जगत्पती । बोलणार ऐसें पुढेंही. ॥ ११२ ॥ असो हा अति ग्रंथविस्तार । हें पुढें बोलणें असे वारंवार । प्रस्तुत **'पार्था!'** म्हणूनि यदुवीर । या श्लोकीं या नांवें आळवी. ॥ ११३ ॥ कीं पृथा कुंती आपुली आत । पार्थ म्हणजे तिचा तूं सुत । तीस असोनिही ज्ञान अत्यंत । असे ऐसीच भक्ति माझी. ॥ ११४ ॥ तुझी जननी पृथा ते । मातें भजोनिही हेंचि मागते । ऐक्यांत अद्वैतभजनीं दे म्हणते । भक्ति तुझी. ॥ ११५ ॥ तूं तिचाच सुत । आणि सखा माझा अत्यंत । म्हणोनि सर्वात्मयोगांत । भक्ति माझी देत असें हा भाव. ॥ ११६ ॥ कीं ध्यानीं कुंती सदा । ऐसी भक्ति मागे मुकुंदा । ते प्रत्यक्षही एकदां । बोलिली ऐसें भागवतीं. ॥ ११७ ॥

भागवतश्लोक—**'त्वयि मेऽनन्यविषया मतिर्मधुपतेऽसकृत् ।**
**रतिमुद्वहतादद्धा गंगेवोघमुदन्वति ॥'**

मधुकुळ माझें माहेर । मधुकुळीं तयांत सर्वेश्वर । अवतरलास या भावें

गंभीर । कुंती म्हणे, 'अगा मधुपते!' ॥ ११८ ॥ म्हणूनि म्हणे कुंती । कीं, 'अगा श्रीमधुपती!। मी मागतें ऐसी प्रीती । तुझे ठायीं दे मला. ॥ ११९ ॥ कीं अन्यत्वें कांहीं विषय । न स्फुरे, स्फुरे अद्वय । ऐसी माझी बुद्धि निःसंशय। धरो प्रीति तुझी पुनः पुनः ॥ १२० ॥ ऐसी कुंती बोलिली । परि बोलोनि मागुती शंकली । कीं विशद न बोलतां आपुली । दिसेल वाणी विरुद्ध. ॥ १२१ ॥ कीं आत्मत्वें ऐक्य जाणे । सर्वात्मत्वें अद्वैत बाणे । त्या बुद्धीस म्हणती शहाणे । अनन्यविषया म्हणोनी. ॥ १२२ ॥ ऐसी अनन्यविषया बुद्धी । जीस बाणली अद्वैतसिद्धी । वारंवार प्रीतिसमृद्धी । तीस भगवंतीं केंवि घडे. ॥ १२३ ॥ शंका ऐसी म्हणोनि । गंगासमुद्र दृष्टांत देऊनि । श्लोकाच्या चतुर्थ चरणें करूनी । हे शंका परिहरिते. ॥ १२४ ॥ कीं, 'अगा श्रीरंगा! । सागरीं ऐक्य पावोनि गंगा । मागुती आपुल्या जळाच्या तरंगा । वारंवार समुद्रीं मेळविते. ॥ १२५ ॥ वस्तुतः पाहतां उदक । समुद्र नद नद्या अनेक । त्यांत भेद हरूनिही जाली एक । सागरीं गंगा मिळोनी. ॥ १२६ ॥ तथापि वरिच्यावरी । सागरीं मिसळती लहरी । कुंती म्हणे, 'ते हरी! । भक्ति ऐसी मज देईं. ॥ १२७ ॥ एकदेशी दृष्टांत । परि भाव ऐसा यांत । कीं मेघबिंदुही समुद्रांत । होतीच ऐक्य. ॥ १२८ ॥ मुमुक्षु तैसा निर्गुणीं । मिळे परि त्या एकपणीं । भक्ति न घडे ज्ञानी सगुणीं । भक्ति अद्वैतबोधें करिती. ॥ १२९ ॥ ते गंगा समुद्ररीती । भक्ति अजी मधुपती! । दे मज म्हणूनि कुंती । प्रार्थी ऐसें. ॥ १३० ॥ ते कुंतीचें नांव पृथा । म्हणोनि तिच्या पुत्रा पार्था । तितें देऊनियां अर्था । तिच्या संततीसही देतसे. ॥ १३१ ॥ 'अगा पार्था!' म्हणोनी । या भावेंकरूनी । या श्लोकीं आळवूनी । तिनें मागितलें तें यातेंही देतसे. ॥ १३२ ॥ आतां यानंतर । जें ज्ञान सांगेन म्हणतो ईश्वर । त्याचा ऐसा विशद निर्धार । करूनि बोलतो या श्लोकीं. ॥ १३३ ॥

**ज्ञानं तेऽहं सविज्ञानमिदं वक्ष्याम्यशेषतः ।**
**यज्ज्ञात्वा नेह भूयोऽन्यज्ज्ञातव्यमवशिष्यते ॥ २ ॥**

अगा! निर्गुण निखळ एक । कळे ज्ञान तें व्यतिरेक । त्या एकीं अनेक अनेकीं तें एक । हें विज्ञानविशिष्ट ज्ञान. ॥ १३४ ॥ या विज्ञानासहित ज्ञान । पावोनि मुक्त झाले मुमुक्षु जन । परि समग्रत्वें माझें सगुणभजन । न घडे तयां. ॥ १३५ ॥ ते सर्वज्ञ विगतकिल्बिष । परि जाणण्यांत कांहीं असे विशेष । तो राहिला कीं जग अशेष । सगुणमूर्ति ईश्वराची न समजले. ॥ १३६ ॥

ज्ञानविज्ञानसहित । त्यांस होऊनि गुह्य अत्यंत । जें शेष राहिलें तेंही निश्चित । तुज मी हें आतां सांगतों. ॥ १३७ ॥ या भावें म्हणे भगवंत । कीं ज्ञानविज्ञानासहित । तें अशेष सांगेन जें अत्यंत । गुह्य शेष तेंही न ठेवितां. ॥१३८॥ या अशेषपदेंकरूनी । जें गुह्य शेष वदतों तेंही म्हणोनी । पूर्वार्धीं ऐसें वदोनी । स्पष्ट बोलतो उत्तरार्धें. ॥ १३९ ॥ अगा! जें पूर्वार्धें करूनी । बोलिलों तूतें सांगेन म्हणोनी । तें ऐसें कीं जाणोनी । या जगीं जाणणें कांहीं उरेना. ॥ १४० ॥ इह म्हणजे या जगीं । ब्रह्मचि सर्वात्मयोगीं । देखिलें जरी तरंगीं। समुद्र जैसा. ॥ १४१ ॥ तरी तरंगाचा आकार । तो नव्हे सागर । तैसें चराचरीं ब्रह्म परि चराचर । रूप माया मिथ्या ब्रह्म नव्हे. ॥ १४२ ॥ निर्गुणोपासकां निर्गुण । अपेक्षित आणि न लगती मायागुण । हा मायाविलास स्वयें आपण । सगुण ईश्वर ऐसें त्याला कळेना. ॥ १४३ ॥ ते मायेचे तिन्ही गुण । स्वयें केवळ देखती निर्गुण । कीं अलंकार तितकें सुवर्ण । ऐसें जरी जाणती. ॥ १४४ ॥ तथापि होती अलंकार । त्यांत सोनें निर्विकार । तेव्हां करणें लागला निर्धार । कीं ते शक्ति सुवर्णाची म्हणोनी. ॥ १४५ ॥ तैसें ब्रह्म चराचरीं । सोनें जैसें अलंकारीं । द्वैत कांहीं नसे परी । तें चराचराकार माया म्हणती. ॥ १४६ ॥ ते निर्गुण मात्राचे उपासक । त्यांस निर्गुणचि पाहिजे एक । मायाविलास जे अनेक । त्यांस न घडे उपासना त्याची. ॥१४७॥ हें उणेपण एक अद्वैतभजनीं । कीं मायाविलास ईश्वर म्हणोनी । हें रहस्य त्यांस न कळोनी । या जगीं अंश उरला जाणावयाचा. ॥ १४८ ॥ जरी त्याचें ज्ञान दिव्य । या जगीं उरलेंचि कांहीं ज्ञातव्य । तेथें कारण हें कीं नसे सेव्य । सगुणत्वें ईश्वर तयाला. ॥ १४९ ॥ इत्यादि भाव पोटीं । तों कृष्ण म्हणे अगा किरीटी! । मद्रूप पाहतां ब्रह्मांडकोटी । ज्ञातव्य न उरे कांहींच. ॥ १५० ॥ याकारणें सांगेन म्हणोनी । जें बोलतो प्रतिज्ञा करूनी । तें ऐसें असे जें जाणोनी । ज्ञातव्य कांहीं उरेना. ॥ १५१ ॥ आणिक जाणणें असे कांहीं । ऐसी उरी ज्यांत नाहीं । ऐसें सगुणत्वें माझें ज्ञान तेंही । तुजला आतां सांगतों. ॥ १५२ ॥ कीं उंच आणि नीच । मूढास दिसे प्रपंच । ज्यास हें ज्ञान कळलें साच । त्यास बरें वाईट सर्वही सर्वोत्तम. ॥ १५३ ॥ जीवांची जे अविद्या । तेही ईश्वराची विद्या । विश्वरूपें त्या विश्ववंद्या । पाहती तेचि धन्य. ॥१५४॥ जो पशूंचा धणी । त्या आधीन त्यांची दावणी । बांधणें सोडणें दोहीं गुणीं । तेंचि दिसे. ॥ १५५ ॥ बंद्य बांधतां करी दांवें । तेंचि पशु सोडितां मोक्ष म्हणावें । धन्याचें तों स्वभावें । दोरखंड तें. ॥ १५६ ॥ जीवांस वाटे अविद्या।

जिवास वाटे विद्या । सर्वेही मिळोनि माया आद्या । ईश्वराची. ॥ १५७ ॥ ऐसें त्याचें ज्ञान । पावूनि करूं लागे ध्यान । तोचि स्वयें जगज्जीवन । जो योग योजीत करी ये रीती भक्ती. ॥ १५८ ॥ त्यास काय जाणणें उरे । ज्यास सर्वेही निर्गुणत्वें स्फुरे । ईश्वरत्वें पाहतां झुरे । त्याज्य मायांशही जो कांहीं. ॥ १५९ ॥ अर्जुनातें हें ज्ञान । सांगों पाहतो कमलनयन । एथें निर्गुणोपासक जन । हें निर्गुणत्वेंचि वाखाणिती. ॥ १६० ॥ जों न कळे निर्गुण । तोंवरी काय कळे सगुण । परि निर्गुण ज्ञानी होऊनिही निपुण । सर्वं सगुण पाहे तो भक्त. ॥ १६१ ॥ गीतेच्या शेवटीं मुकुंद । हेंचि अर्जुनातें म्हणेल गोविंद । कीं तुझा माझा हा संवाद । म्हणावा धर्म्य कीं नव्हे निर्धर्म. ॥ १६२ ॥ **'अध्येष्यते च य इमं'** म्हणोनी । **'धर्म्यं संवादमावयोः'** या श्लोकेंकरूनी । श्रीकृष्णें धर्म्यपद योजूनी । सगुणज्ञानसंवाद सूचविला ॥ १६३ ॥ ज्ञेय निर्गुणचि नुसतें । जरी या गीतेंत असतें । तरी या संवादाचें नाम होतें । निर्धर्मसंवाद म्हणोनी. ॥ १६४ ॥ हा धर्म्यसंवाद । ऐसेंचि म्हणतो गोविंद । कीं निर्गुणज्ञान बोलोनिही मुकुंद । सगुणज्ञान बोलेल त्यावरी. ॥ १६५ ॥ द्वादशीं पुसेल अर्जुन । तेथें ज्ञानी आणि सगुणभजन । तो थोर ऐसें कमलनयन । म्हणेल म्हणूनी हा धर्म्यसंवाद. ॥ १६६ ॥ आतां धर्मही एथें बोलिला । म्हणोनि म्हणावें धर्म्य याला । तरी मुख्य निर्गुण या गीतेंत जाला । ब्रह्मविद्यायोग यांच दोहींचा. ॥ १६७ ॥ प्रति अध्यायाच्या अंतीं । **'ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे'** म्हणती । कीं ज्ञानाहूनि कर्म श्रीपती । बहुत नीच म्हणे या गीतेंत. ॥ १६८ ॥ **'दूरेण ह्यवरं कर्म'** । या श्लोकीं पुरुषोत्तम । ज्ञानापुढें अधमाधम । कर्म म्हणे. ॥ १६९ ॥ संवाद एथें धर्माचा । म्हणूनि धर्म्य म्हणे कृष्णवाचा । हा पक्षही नव्हे साचा । धर्म्य सगुणज्ञान हाचि अर्थ. ॥ १७० ॥ आतां धर्म्यपदाचा अर्थ । पांडित्यबळें अन्यथा केला तरी व्यर्थ । हें धर्म्यपद होतें समर्थ । सगुण ज्ञानाविषयींच. ॥ १७१ ॥ कीं नवमाध्यायांत । **'राजविद्या राजगुह्यं'** या श्लोकांत । हें ज्ञान धर्म्य म्हणूनि भगवंत । प्रतिज्ञा करूनि सगुणज्ञान बोलेल. ॥ १७२ ॥ **'पश्य मे योगमैश्वरं'** म्हणोनी । या ऐश्वर्यशब्देंकरूनी । हा ईश्वररूपयोग म्हणतां यावरूनी । हा सगुणज्ञानसंवाद हें सिद्ध. ॥ १७३ ॥ एथेंही क्लिष्ट कल्पना । करिती त्या साभिमानजना । द्वादशाध्यायांत या धर्म्यवचना । दाखवितां होती निरुत्तर. ॥ १७४ ॥ कीं **'ये तु धर्म्यामृतमिदं'** म्हणोनी । श्रीकृष्ण या श्लोकेंकरूनी । संपूर्ण द्वादशाध्यायार्थ यावरूनी । सगुणज्ञान परम ऐसें बोलेल. ॥ १७५ ॥ हा द्वादशाध्यायांत अंतींचा श्लोक ।

तेथें धर्म्यामृत म्हणे उत्तमश्लोक । करितां अध्यायार्थाचा अवलोक । श्रेष्ठ सगुणभक्ति ज्यांत अत्यंत. ॥ १७६ ॥ ते भक्त ज्ञानहीन । ऐसे म्हणती ते जन । तरी ज्यांस नाहीं ज्ञान । ते ज्ञानियाहूनि श्रेष्ठ केवि होती. ॥ १७७ ॥ निर्गुण सगुण उपासक । दों वर्गांतही कोण योगवेत्ता अधिक । हें अर्जुनें पुसतां श्रीवत्सांक । म्हणे सगुणोपासक श्रेष्ठ तो. ॥ १७८ ॥ हें असे पुढें बोलणें । एथें धर्म्यपदाकारणें । बोलणें लागलें कीं श्रीकृष्णें । धर्म्यामृतपदें सगुणज्ञान बोलिलें तें ऐसें. ॥ १७९ ॥ द्वादशीं ऐसें धर्म्यामृत । पाठ दुसरा धर्मामृत । दोहींचा अर्थ तोचि निश्चित । परि पाठभेदें शंकित न व्हावें श्रोतयांनीं.॥ १८०॥ तैसेंच नवमीं आरंभीं धर्म्यपद । तें ज्ञान सांगोनि गोविंद । हा ऐश्वर्ययोग पाहें म्हणे मुकुंद । आद्यंत एकवाक्यता ऐसी. ॥ १८१ ॥ याकारणें अष्टादशीं गीतांतीं । हा धर्म्यसंवाद म्हणे श्रीपती । तें या सप्तमापासूनि पार्थाप्रती । सगुणज्ञान बोलतो. ॥ १८२ ॥ अत एव होऊनिही ज्ञाननिर्गुण । विरळा हें ज्ञान सगुण । जाणतो म्हणूनि कमलनयन । बोलतो आतां या श्लोकीं.॥ १८३॥

**मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद्यतति सिद्धये ।**
**यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वतः ॥ ३ ॥**

अगा! मनुष्यांचीं सहस्रें अनेक । त्या बहु सहस्रांत कोणी एक । आत्मज्ञानाचा साधक । यत्न करी आत्मज्ञानसिद्ध्यर्थ. ॥ १८४ ॥ ज्ञानार्थ यत्न करिती। त्यांत आत्मज्ञही कोणी होती । आणि सिद्धीतेंही पावती । योगमार्गें. ॥ १८५ ॥ तैशा सिद्धांच्या सहस्रांत । कोणी एक निपुण अत्यंत । विश्व समग्र भगवंत । ऐसें मातें जाणतो. ॥ १८६ ॥ म्हणसी ऐसें कां परी । श्रेष्ठ सर्वांत हें तरी । अपरोक्ष साक्षात्काराहीवरी । अनादि भक्तिपद हें आहे. ॥ १८७ ॥ कर्मयोगावरी । जैसी ज्ञानाची पायरी । कीं चित्तशुद्धि नव्हे तोंवरी । नव्हे आत्मबोध. ॥ १८८ ॥ तो आत्मबोध घडे । तरीच हा भक्तियोग ठायीं पडे । सर्व सगुणब्रह्म ऐसा सांपडे । अनुभव तेव्हां ॥ १८९ ॥ म्हणतो या भावेंकरूनी । **'मां वेत्ति तत्त्वतः'** म्हणोनी । कीं तत्त्वज्ञानावांचूनी । मज सगुणातें नेणवे. ॥ १९० ॥ चित्तशुद्धीविना । ज्ञान जैसें होईना । तैसें मातें जाणवेना । तत्त्वज्ञानावांचूनी. ॥ १९१ ॥ एवं कर्मे चित्तशुद्धी । ज्ञान त्याहूनि थोर प्रसिद्धी । त्या ज्ञानें मग हे सगुणज्ञानसिद्धी । आत्मज्ञानाहूनि थोर यास्तव. ॥ १९२ ॥ यालागीं ज्ञानसिद्ध । त्या सिद्धांत कोणी एक ज्ञानवृद्ध । मातें सगुणातें जाणोनि समृद्ध । होतो भक्तीकरूनी. ॥ १९३ ॥ ऐसी भक्तीची पदवी । नुसती या

ज्ञानाहूनिही बरवी । हे सर्वात्मभक्ति नित्य नवी । या **गी**तेंत श्रेष्ठत्वें वर्णिली. ॥ १९४ ॥ **गी**तार्थ येच रीती । वाखाणावा ऐसें **श्री**पती । स्वयें बोलेल अर्जुनाप्रती । अध्यायांत अठराविया. ॥ १९५ ॥ **'य इदं परमं गुह्यं'** म्हणोनी । या दों श्लोकेंकरूनी । म्हणेल कीं त्याहूनी । प्रिय मज कोणी असेना. ॥ १९६ ॥ कीं हें गुह्य परम । जें मथूनि काढिलें सर्व निगम । माझे भक्त भागवतोत्तम । त्यांत जो वर्णी. ॥ १९७ ॥ प्रिय त्याहूनि या पृथ्वीवरी । कोणी नसे न होणार यापरी । भक्ति थोर करूनि जरी । वाखाणी या **गी**तेतें. ॥ १९८ ॥ **'भक्तिं मयि परां कृत्वा'** म्हणोनी । हा अर्थ या चरणेंकरूनी । दाखविला कीं सर्वांहूनी । भक्ति थोर मी बोलिलों या **गी**तेंत. ॥ १९९ ॥ सर्वज्ञ हें भविष्य जाणे समर्थ । कीं यथारुचि **गी**तार्थ । वर्णितील परि यथार्थ । भात्र आपला विरळा समजेल. ॥ २०० ॥ म्हणूनि हे अष्टादशीं खूण । स्पष्ट दावील आपण । कीं प्रिय मज तो निपुण । भक्त थोर करूनि वर्णी **गी**तेंत. ॥ २०१ ॥ ते भक्ति माझेठायीं म्हणोनी । **शे**षशायी म्हणे यावरूनी । सर्वात्मयोगीं सगुणत्वेंकरूनी । भक्ति चराचररूपीं सूचवी. ॥ २०२ ॥ जे या रहस्यातें नेणती । ते हा चरण अन्यथा वाखाणिती । **'भक्तिं मयि परां कृत्वा'** एथें म्हणती । भक्ति माझेठायीं करूनि मज पावेल. ॥ २०३ ॥ भक्ति करूनि भलता । **भ**गवंतास पावेल तत्त्वता । **गी**तार्थकथनाचा आतां । काय महिमा वर्णील? ॥ २०४ ॥ इत्यादि अर्थ अमंगळ । पुढें उडतील सकळ । एवं **गी**तेंत म्हणे **मे**घनीळ । भक्ति थोर करूनि वाखाणावी. ॥ २०५ ॥ आतां विश्व सर्वही सगुण । हें कळावया रहस्यखूण । अपरा परा प्रकृति आपल्या आपण । दोन्ही बोलतो दों श्लोकीं. ॥ २०६ ॥

**भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च ।**
**अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा ॥ ४ ॥**

पृथ्वी आप तेज वायू व्योम । हीं पंच भूतें मन षष्ठ बुद्धि सप्तम । यांसह अहंकार अष्टम । ऐसी अष्टधा भेद पावली. ॥ २०७ ॥ हे माझी प्रकृती । हे अष्टभेद जिचे दिसती । ते आठही पाहतां असती । माया मात्र. ॥ २०८ ॥ माझी शक्ति माया । तेचि प्रकृति म्हणावी **ध**नंजया! । इचें तत्त्व कळे तया । हे नाहींच मी असें. ॥ २०९ ॥ मृगजळाचे कल्लोळ । त्यांचें पाहतां मूळ । कल्लोळ अवघे मृगजळ । तेही पाहतां असे तेज मात्रचि सूर्याचें. ॥ २१० ॥ मुकुट कुंडलादि विकृती । ते सकल सुवर्णाचिच प्रकृती । ते प्रकृति आणि

नाना आकृती । सोनेंचि अवघें. ॥ २११ ॥ होऊनि नाना अलंकार । सुवर्णत्वीं नसे विकार । कनकीं सामर्थ्य एतत्प्रकार । ते शक्ति प्रकृति त्या सुवर्णाची. ॥ २१२ ॥ दुधाचें झालें दहीं । दूधपण त्या दधिपणीं नाहीं । सुवर्णासारिखें कांहीं । सामर्थ्य दुग्धास म्हणवेना. ॥ २१३ ॥ याकारणें कनकीं । अद्भुत शक्ति मानावी कीं । नानाप्रकारें मिरवूनि लोकीं । कनकत्वीं न लागे विकार. ॥ २१४ ॥ यालागीं जितके आकार । ते सुवर्णशक्तीचेचि विकार । त्या विकारीं निर्विकार । उघडेंचि सोनें. ॥ २१५ ॥ जैसी सुवर्णशक्ति प्रकृती । त्या प्रकृतीच्या विविध विकृती । तैसी माझी प्रकृति आकृती । पावली भेद अष्टधा. ॥ २१६ ॥ हेच अष्टधा प्रकृती । स्थावरजंगमाच्या आकृती । प्रकृतीच्या तेवीस विकृती । याच अष्टभेदांत. ॥ २१७ ॥ पृथिव्यादि पंचभूतें जेथें । शब्द स्पर्श रूप रस गंध तेथें । एवं दहाही इंद्रियें येथें । अहंकारांत. ॥ २१८ ॥ कीं कारण अहंकार । तेथें कार्य दश इंद्रियविकार । मीं पाहतों ऐकतों इत्यादि प्रकार । दहा भेद एका अहंकाराचे. ॥ २१९ ॥ एवं तत्त्वें एकवीस । मन बुद्धि मिळोनि तेवीस । बुद्धि तेंचि महत्तत्त्व कार्य कारणास । भेद नसे. ॥ २२० ॥ महाभूतादि तत्त्वें चोवीस । अध्यायीं त्रयोदशीं त्यांतही तेवीस । बोलेल पुढिल्या श्लोकीं श्रीनिवास । तें परतत्त्व चोविसावें अव्यक्त ॥ २२१ ॥ या चोविसांचें क्षेत्र जेथें । इच्छा द्वेषादि मनोमळ तेथें । हें त्रयोदशीं त्यांत एथें । क्षेत्र यां नवां प्रकृतींत दाविलें. ॥ २२२ ॥ त्यांत नववी परा प्रकृति ते । क्षेत्रज्ञाकडे लागते । एवं हे नवविधा प्रकृति दाविते । चोवीस तत्त्वें. ॥ २२३ ॥ जेवढीं पहावीं क्षेत्रें । त्यांत हींचि विचित्रें । किंवा पृथिव्यादि भूतमात्रें । भेद अवघे प्रकृतीचे. ॥ २२४ ॥ प्रकृतिभेद कनकाचे । ते कनकावेगळे न निघती साचे । आकार तैसे चराचराचे । स्वरूपावेगळे न निघती. ॥ २२५ ॥ इत्यादि भाव पोटीं । तों कृष्ण म्हणे, 'अगा किरीटी ! । रचल्या ब्रह्मांडाच्या कोटी । ते अष्टभेद पावली प्रकृति माझी.' ॥ २२६ ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञलोक । परिसोत आधीं. ॥ २२७ ॥ मायाशक्तीकरूनी । ब्रह्मीं उपजले भेद दोनी । त्यांत जड भेद टाकिला निषेधूनी । अष्टधा प्रकृति बोलतां ॥ २२८ ॥ आतां सत्त्वचिच्छक्ती । त्यांत चिदंशा जीवाची अभिव्यक्ती[1] । एका सूर्याच्या नाना व्यक्ती । जैशा नाना उदकांत. ॥ २२९ ॥ सूर्य गगनीं एक । प्रतिबिंबांश त्याचे अनेक । त्या अनेकत्व भेदास

---

१. चिद्रूप अंश जीव त्याचें प्रगटणें.

उदक । निमित्त जैसें. ॥ २३० ॥ तैसें सत्त्वचित्त । चिदंशभेदाचें निमित्त । ते नवमी प्रकृति अच्युत । बोलतो आतां या श्लोकीं. ॥ २३१ ॥

**अपरेयमितस्त्वन्यां प्रकृतिं विद्धि मे पराम् ।**
**जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत् ॥ ५ ॥**

पूर्वश्लोकीं पांडववीरा । प्रकृति बोललों ते अपरा । विलक्षण तीहूनि हे परा। सांगतों तेही माझी प्रकृति जाण. ॥ २३२ ॥ थोर ते परा म्हणावी । न्हे परा ते अपरा गणावी । परा थोर ऐसी जाणावी । कीं जीवत्व पावली चिदंशें. ॥ २३३ ॥ घटस्थानीं अपरा । जळस्थानीं परा । सूर्याचा प्रकाश दुसरा । ज्या जळीं. ॥ २३४ ॥ प्रकाश जैसा घटास नसे । तैसा जळासही प्रकाश न दिसे । तथापि जळ समरसे । सूर्यप्रतिबिंबप्रकाशीं. ॥ २३५ ॥ जळ प्रकाशसहित । होऊनि घटातें असे प्रकाशित । तैसें सत्त्व निर्मळ अत्यंत । परा प्रकृतीरूप जाणावें. ॥ २३६ ॥ कीं त्यांत चैतन्य प्रतिबिंबांश । निर्मळत्वें करी प्रवेश । ते त्याकरितां होऊनि सप्रकाश । प्रकाशी अपरा प्रकृतिभेदातें. ॥ २३७ ॥ म्हणूनि ते जीवभूता । परा प्रकृति गा पंडुसुता ! । म्हणे जगद्गुरु ज्ञानदाता । ऐसें जाण तूं तीतें म्हणोनी. ॥ २३८ ॥ प्रत्यक्षही पाहतां लोकीं । सूर्यप्रतिबिंब ज्या उदकीं । तो प्रतिबिंब सूर्य तें जळचि कीं । जालें प्रकाशें सूर्याच्या. ॥ २३९ ॥ यालागीं जीवभूता म्हणिजे । प्रतिबिंबांशें जीवेंचि सजीव जाली जे । तथापि तीमाजी विराजे । जीव प्रतिबिंब ईश्वराचा. ॥ २४० ॥ सूर्यप्रतिबिंबें जळ । स्वयेंचि सूर्यरूप जालें केवळ । तरी त्यांत जें असे झळझळ । तें सूर्याचें प्रतिबिंब. ॥ २४१ ॥ हें युक्तिसिद्ध । हेंचि गीतेंत पुराणीं प्रसिद्ध । **'ममैवांशो'** म्हणूनि शुद्ध । पंचदशीं वदेल भगवंत. ॥ २४२ ॥ **'ममैवांशो'** या श्लोकीं । श्रीकृष्ण म्हणेल जीवलोकीं । जीवभूत म्हणिजे जीव जाला कीं । उपाधियोगें पावला जीवत्व. ॥ २४३ ॥ जीवलोक सत्त्वोपाधि जाणावा । चिदंश त्यांत जीवभूत जीव जाला म्हणावा । प्रकृति जीवभूता हा शब्दही वाखाणावा । येचि रीती. ॥ २४४ ॥ अंश जीवभूत ईकरितां । हे जीवभूता त्यांसि मिसळतां। एवं जीवत्व पाहतां । योगें याच दोन्हींच्या. ॥ २४५ ॥ ऐसें असोनि कोणी म्हणती । कीं क्षेत्रज्ञ चिदंश त्यातें श्रीपती । म्हणतसे परा प्रकृती । तरी अर्थ ऐसा अयुक्त. ॥ २४६ ॥ पूर्वप्रकृतीतें अपरा । या प्रकृतीतें म्हणे परा । जडा प्रकृतीचा एकसरा। जीव चिदंश केंवि होय. ॥ २४७ ॥ असो तें आतां हे कां परा । आणि ते कां म्हणावी अपरा । म्हणूनि हेतु बोलतो बरा । चतुर्थ चरणीं. ॥ २४८ ॥

चतुर्थ चरण—'ययेदं धार्यते जगत् ।'

कीं जे प्रकृतीकरूनी । हें जग धरिजेतें म्हणूनी । हे परा थोर अपरेहूनी । प्रकृति माझी. ॥ २४९ ॥ अर्थ इतकाच परी । विशद बोलावा या उपरी । कीं ईकरूनि[१] म्हणतो हरी । हें जग धरिजेतें म्हणोनी. ॥ २५० ॥ तें धरणें जगाचें कैसें । तरी कल्पिलें नगर जैसें । मनें कल्पूनि मनेंचि धरिजे ऐसें । धरिजेतें परेनें ॥ २५१ ॥ तें जग सकळही अपरा । तें अपरेतें कल्पूनि धरिते परा । याप्रकारें धरिजेतें चराचरा । म्यां ईश्वरें परा प्रकृतीकरूनी. ॥ २५२ ॥ एवं ईश्वराची शुद्ध सत्त्वप्रकृती । तीपासूनि तिन्ही गुण प्रगट होती । नगर मनें कल्पिजे ये रीती । त्रिगुणसृष्टि हे समस्त. ॥ २५३ ॥ ते अष्टधा वर्णिली अपरा । त्यांत पंचभूतें तमाचा पसारा । रज इंद्रियें गुण तिसरा । तें मिश्रसत्त्व मनबुद्धि. ॥ २५४ ॥ आठवा अहंकार उरला । तो त्रिविध सृष्टींत आला । यांत पांचभौतिक शरीरीं बोलिला । तामस सृष्टींत तामस अहंकार. ॥ २५५ ॥ इंद्रियें राजसें म्हणोनी । राजस अहंकार यांस अभिमानी । बुद्धींत आणि मनीं । या सत्त्वसृष्टींत सात्विक अहंकार. ॥ २५६ ॥ मी कृश मी स्थूळ । इत्यादि तामस अहंकारकल्लोळ । मी पाहतों चाखतों हुंगतों हे खेळ । राजस अहंकाराचे. ॥ २५७ ॥ मी ऐसें कल्पितों । मी ऐसा निश्चय करितों । विलास इत्यादि पाहतों । सात्विक अहंकार. ॥ २५८ ॥ होतां गुरुकृपादृष्टी । अनात्मत्वें निषेधितां या त्रिगुणसृष्टी । आत्मानुभव ये ज्या दृष्टी । ते जीवभूता परा प्रकृति शुद्ध सत्त्व. ॥ २५९ ॥ ते त्रिगुणसृष्टीस पाहे । तोंवरी तीस जीवत्व आहे । प्रत्यग्दृष्टि पाहतां राहे । स्थिर होऊनि बिंबस्वरूपीं. ॥ २६० ॥ परतोनि पाहे जेधवां । अधिष्ठानीं मिळे तेधवां । हे परा प्रकृति मानवां । न कळे गुरुकृपेवांचूनी. ॥ २६१ ॥ ज्या परा प्रकृतीनें ईश्वरत्व । अपरेस या तिचें अंशत्व । जें त्रिगुणावेगळें शुद्ध सत्त्व । ते हे परा. ॥ २६२ ॥ हे व्यतिरेकबोधीं ये रीती । अन्वयबोधींही हेचि प्रकृती । चराचरा जडा आकृती । चिद्रूप देखे. ॥ २६३ ॥ हे ज्या परेचा अंश । त्या परेकरूनि जगदीश । प्रकृति अपरा हृषीकेश । कल्पूनि धरितो साक्षित्वें. ॥ २६४ ॥ कीं कल्पनेनेंचि सृष्टि घडी । कल्पनेनेंचि पाळी मोडी । साक्षित्वावांचूनि एकी काडी । कल्पिली दिसेना. ॥ २६५ ॥ तोंचि कल्पिला पदार्थ असे । कीं साक्षित्वदृष्टि जों दिसे । एवं विश्वकल्पना उलुसे । साक्षित्वांत. ॥ २६६ ॥ शुद्धब्रह्मीं साक्षित्व । न घडे जेथें निर्गुणत्व ।

---

१. प्रकृतीमुळें.

एवं हे परा शुद्ध सत्त्व । साक्षित्व या परा प्रकृतीकरूनी. ॥ २६७ ॥ एवं या जगाचें धरणें । घडे साक्षित्वाच्या गुणें । म्हणूनि कृष्ण म्हणे कीं जिणें । म्यां धरिजे तें हें जग. ॥ २६८ ॥ हें जग जीकरूनी । धरिजे ते परा म्हणोनि । जाण माझी प्रकृति ऐसें बोलोनी । पुढिलिया श्लोकीं हेंचि विशद वदेल. ॥ २६९ ॥ जीवभूता प्रकृती । म्हणतां सूचवी श्रीपती । कीं हे चिच्छक्ति नुसती । नव्हे द्रव्यशक्ति अथवा क्रियाशक्ति. ॥ २७० ॥ चराचर द्रव्यशक्ती । इंद्रियग्राह्य ते क्रियाशक्ती । ऐसें म्हणावें तरी युक्ती । कुंठित येथें होतसे ॥ २७१ ॥ कीं विना अंतःकरण । इंद्रियातें नव्हे स्फुरण । जग इंद्रियें या सर्वांचें धारण । अंतःकरणें घडों शके. ॥ २७२ ॥ अंतःकरण चिच्छक्ती । शुद्धसत्त्वाची अभिव्यक्ती । ते परा प्रकृति कीं भगवदुक्ती । जीवभूता म्हणे परेतें. ॥ २७३ ॥ जीवोपाधि शुद्धसत्त्व । त्यातेंचि अंतःकरणत्व । हें अंश ज्याचा ते अव्यक्ततत्त्व । ते पराप्रकृति शक्ति ईश्वराची. ॥ २७४ ॥ जीवीं जीवोपाधि हे म्हणावी । परी ते अंशरूपें गणावी । ईश्वरीं हेचि जाणावी । ईश्वरशक्ती. ॥ २७५ ॥ हें जग या प्रकृतीकरूनी । धरिजेतें म्हणतो यावरूनी । स्थिति सूचवूनि ईजपासूनी । सृष्टीही म्हणतसे या श्लोकीं. ॥ २७६॥

**एतद्योनीनि भूतानि सर्वाणीत्युपधारय ।**
**अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः प्रलयस्तथा ॥ ६ ॥**

हे सकल भूतांची योनी । सकळ भूतेंही उपजती इजपासूनी । ज्याची उत्पत्ति जेथूनी । त्याची ते योनि ऐसें म्हणावें. ॥ २७७ ॥ इजपासूनि उत्पत्ती । सर्व भूतांची ये रीती । तूं जाण म्हणे श्रीपती । गहन भावें. ॥ २७८ ॥ कीं चराचरें भूतें । तूंही कल्पूनि बहुतें । पाहे आणि प्रकृतीतें । जाण अंशरूपें पराच हे म्हणोनी. ॥ २७९ ॥ आणि **'इति उपधारय'** म्हणोनी । **'उपधारय'** या शब्देंकरूनी । गहन भाव सूचवूनी । जाण म्हणे अनुभवें. ॥ २८० ॥ 'इति' म्हणजे ऐसें । कीं म्यां जग कल्पिलें जैसें । ऐसें तूंही कल्पूनि मानसें । धरीं तें त्याचि मानसें करूनी. ॥ २८१ ॥ 'उपधारय' म्हणजे धरीं । म्यां कल्पूनि धरिलें ज्यापरी । 'उपधारय' या शब्दाअंतरीं । अनुभव ये रीती सूचवी. ॥ २८२ ॥ पूर्वश्लोकीं या प्रकृतीकरूनी । हें जग धरिजेतें म्हणोनि वदोनी । या श्लोकीं चराचराची योनी । हेचि म्हणूनि बोलिला. ॥ २८३ ॥ कीं या प्रकृतीकरूनी । भूतें धरितो या प्रकृतीनेंचि कल्पूनि । तरी तूंही कल्पूनि धरीं म्हणोनि । 'उपधारय' या शब्दें सूचवी.

॥ २८४ ॥ एवं कल्पना ते अपरा । कल्पना करणारी परा । कार्य कारण-रूप सारा । खेळ दोंहीं प्रकृतींचा. ॥ २८५ ॥ या अर्ध श्लोकापर्यंत । ऐसें बोलिला भगवंत । तों निरीश्वर सांख्य मत । सिद्ध जालें. ॥ २८६ ॥ कीं ते स्वयेंचि जग धरी । स्वयेंचि भूतें निर्माण करी । तेथें ईश्वर कां परी । पाहिजे तो. ॥ २८७ ॥ प्रकृतीच विश्व करिते । प्रकृतीच विश्व धरिते । तेव्हां ईश्वर कैंचा प्रकृतीच ते । स्वयें समर्थ. ॥ २८८ ॥ त्या मताचें निरसन । करीतसे जगज्जीवन । आणि अद्वैत सिद्धांत गहन । उत्तरार्धें बोलतसे ॥ २८९ ॥

उत्तरार्ध—**'अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः प्रलयस्तथा ।'**

अगा! सकळ जगाची उत्पत्ती । अंतीं संहार मध्यें स्थिती । हें सर्व मीच जगत्पती । स्वयें आपण. ॥ २९० ॥ कीं मजमाजि जग । सुवर्णांत जैसे नग । कीं सागरीं नाना तरंग । कीं सर्प रज्जूंत जैसा. ॥ २९१ ॥ नव्हे सोनेंचि ते नग । आणि समुद्रचि ते तरंग । रज्जूच सर्प तैसें जग । सर्वही मी. ॥ २९२ ॥ तरंगाचें उपजणें तेंही । सागरावांचूनि अन्य नाहीं । तरंग नाशही कांहीं । समुद्रावेगळा असेना. ॥ २९३ ॥ तरंग उपजती नाशती । तोंपर्यंत जे असती । त्या असणियास म्हणावें स्थिती । ते स्थितीही तो समुद्र. ॥ २९४ ॥ संहार आणि उत्पत्ती । म्हणतां स्वयेंचि प्राप्त होय स्थिती । या भावें सृष्टि संहार मात्र श्रीपती । मीच म्हणे. ॥ २९५ ॥ एवं हे सृष्टि त्रिगुण । त्रिगुण सर्वही मीच आपण । येथें शुद्ध निर्गुणपण । त्रिगुण सृष्टींत दाविलें. ॥ २९६ ॥ ऐसें बोलिला कमलनेत्र । परि निर्गुण अधिष्ठान मात्र । विकार आकार जे विचित्र । हे सर्व खेळ प्रकृतीचे. ॥ २९७ ॥ तेव्हां तेच विश्व करिते । तेचि विश्व धरिते । तेचि स्वयें संहारिते । कां नव्हे ऐसेंचि. ॥ २९८ ॥ तेव्हां प्रपंच होतां जैसा । तूं निर्गुणत्वें न होसी तैसा । एवं जे भासवी या भासा । कां स्वतंत्र नव्हे प्रकृतीच. ॥ २९९ ॥ शंका येथें मागुती । प्राप्त जाली ये रीती । तेही हरितो जगत्पती । तथा म्हणूनियां तथा शब्दें करूनी. ॥ ३०० ॥ कीं सृष्टि स्थिति संहार जैसा । भासही भासवी प्रकृति तैसा । मीच सर्व सिद्धांत ऐसा । प्रकृति शक्ति माझी यास्तव. ॥ ३०१ ॥ जो जयातें प्रवर्तवी । तो तयाचा धणी गोंसावी । प्रकृति या कारणें म्हणावी । पुरुषाआधीन. ॥ ३०२ ॥ जे ज्याच्या सत्तें करूनी । वर्तते तदधीन म्हणोनी । विश्वाभास प्रकृति होउनी ।

मज निर्गुणा आधीन. ॥ ३०३ ॥ तीवेगळा मी निर्गुण । सत्ता मात्र असतों आपण । परि मज निर्गुणाविण । ते असेना अथवा दिसेना. ॥ ३०४ ॥ सुवर्णावांचूनि जैसा । अलंकार न कळे कीं आहे कैसा । प्रपंचाचा भास ऐसा । मजवांचूनी. ॥ ३०५ ॥ होऊनि नाना अलंकार । सुवर्णास होऊं नेदी विकार। ऐसी सुवर्णशक्ति परि आधार । तीसही त्या सुवर्णाचा. ॥ ३०६ ॥ कीं सुवर्णाच्या आश्रयें असे । परि असे ऐसी कदापि न दिसे । विचार करितां गवसे । शक्ति तेही. ॥ ३०७ ॥ कीं शक्ति नसती ऐसी जरी । सोनें विकारातें पावतेंचि तरी । कीं दधि जालियावरी । शक्तीवांचूनि दुग्ध नासे. ॥३०८॥ दुग्धपण न नासे । आणि दधिपण त्यांत भासे । दुग्धांत शक्ति ऐसी असे । तरी दुग्धत्व असोनि दधि होतें. ॥ ३०९ ॥ सुवर्णीं शक्ति ऐसी परी । ते त्याविण अनुभवा येती जरी । सत्ता आहे म्हणूनी तरी । बोलिजे तें तीसही. ॥ ३१० ॥ कारण शक्ति ऐसी हेमीं । तैसीच माया निर्गुणब्रह्मीं । विश्वरूप तीकरूनि मी । कनक अलंकाररूप साकार जैसें. ॥ ३११ ॥ एवं सुवर्णशक्तींत सुवर्ण । धणी जैसें आपण । तैसें मायाशक्तीचें धणीपण । निर्गुणा मातें. ॥ ३१२ ॥ तेव्हां निर्गुणातेंचि ईश्वरपण । निर्गुणत्वेंचि मी सगुण । तोचि मी स्वयें आपण । सृष्टि स्थिति आणि संहार. ॥ ३१३ ॥ ईश्वरत्व आलें निर्गुणीं । मिथ्यात्व साधलें त्रिगुणीं । तथापि मायाभासगुणीं । न बोलवे निर्गुणत्व. ॥ ३१४ ॥ तरी सृष्टि स्थिति संहार । प्रकृती भास त्रिप्रकार । तिन्ही मिळोनि माझा आकार । जो सर्वेश्वर सगुण मी. ॥ ३१५ ॥ कीं चराचर व्यक्ती । अपरा परा माझिया शक्ति । पाहतां चाळूनि युक्ती । मीच असें. ॥ ३१६ ॥ शक्ति कार्य कारण । न निवडती वेगळेपण । जैसी सुवर्णशक्ति सुवर्ण । न सोडी ती. ॥ ३१७ ॥ जेव्हां जो जो अलंकार । सोनेंचि तो तो आकार । तैसे परा अपरा प्रकृतीविकार । मी निर्विकारचि होतसें. ॥ ३१८ ॥ तें न म्हणवे निर्गुण । तरी विश्व ईश्वररूप सगुण । 'तथा'-शब्दें ऐसी खूण । श्रीकृष्ण येथें सूचवी. ॥ ३१९ ॥ ते प्रकृतीच आपण । ईश्वर म्हणावा सगुण । तरी ते निर्गुणाविण । सांपडेचिना. ॥ ३२० ॥ जेथें सत्ता असे । धणीपण तेथेंचि गवसे । यालागीं ईश्वरत्व दिसे । निर्गुणींच. ॥ ३२१ ॥ [1]तीवांचूनि ईश्वरपण । नसे तरी असे निर्गुण । [2]त्यावांचूनि कांहींच

---

१. प्रकृतीवांचून. २. पुरुषाविना.

खूण । नये ईची. ॥ ३२२ ॥ ईकारितां ईश्वरपण । परी ईश्वर तेंचि जें निर्गुण । म्हणूनि ईश्वराचें भासतें रूपही मी आपण । सगुण जो ऐसें बोलतसे. ॥ ३२३ ॥ हें माझें कृष्णरूप । येथें ही माया आणि चित्स्वरूप । माया चित्स्वरूपचि विश्वरूप । तेव्हां चराचर रूपीं मी स्वयें. ॥ ३२४ ॥ मी किरण हें मृगजळ। मीच या मायेचें मूळ । याकारणें सर्व खेळ । मीचि असें. ॥ ३२५ ॥ यालागीं सृष्टि संहार स्थिती । तिन्ही अपरा परा दोन्ही प्रकृती । ते 'तथा' म्हणजे तसेंचि मी जगत्पती । शेवटीं ऐसें बोले श्रीकृष्ण. ॥ ३२६ ॥ एवं सर्वही निर्गुण । योगीं ऐसी बाणे खूण । तरी माया भास तोही सगुण । योग योजीत असोनि जाणे. ॥ ३२७ ॥ निर्गुणत्वीं सर्वात्मयोग । सगुणत्वीं भक्तियोग। एका समयांत संयोग । ऐसा योग भक्ति दोहींचा. ॥ ३२८ ॥ संपतां षष्ठाध्याय । श्रेष्ठत्वें ज्याचा जाला निर्णय । त्या योगियास योगद्वय । ते ऐसे दोन्ही वर्णिले. ॥ ३२९ ॥ पुढें हा अध्याय आरंभला । आरंभीं हेंचि बोलता जाला । कीं योग योजीत समग्रा मजला । जैसें जाणसी तें आईक. ॥३३०॥ तें समग्रत्व आपलें । ऐसें येथें वर्णिलें । सर्वात्मकत्व यांतचि दाविलें । योग योजावया. ॥ ३३१ ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक। त्याचें निमित्त सुज्ञ लोक । परिसोत आधीं. ॥ ३३२ ॥ अपरा परा शक्ति दोन्ही । विश्व जाहल्या ऐसें वदोनी । अंतीं ते सकळ मी म्हणूनि। पूर्वश्लोकवरी वर्णिलें. ॥ ३३३ ॥ जेथें जग आणि आपण । दोन्ही दावूनि एकपण । बोलतां सूचविली खूण । विवर्त्त अधिष्ठान एकत्वाची. ॥ ३३४ ॥ कीं सर्वज्ञाचें वचन । अनुभवा ये ऐसें मनन । करावें जे युक्तीकरूनि चिंतन । मनन म्हणावें तयातें. ॥ ३३५ ॥ तरी दृष्टांतीं जेथवरी । अधिष्ठान विवर्त्त तेथवरी । अधिष्ठान सत्य मिथ्यावरी । विवर्तसर्प दोरीं जैसा. ॥ ३३६ ॥ अनुभवी हे खूण । पाहे अनुभवीं निपुण । कीं जडीं विवर्तीं दिसे निर्गुण । सुवर्ण जैसें अलंकारीं ॥ ३३७ ॥ तरंगीं दिसे पाणी । निर्गुण ऐसें दिसे त्रिगुणीं । कीं तंतु जैसा पटपणीं । घटपणीं माती उघडी. ॥ ३३८ ॥ जोंवरी ऐसा नव्हे अनुभव । तोंवरी समजावें युक्तिवैभव । एवं मीच सृष्टि संहार म्हणतों भाव । अधिष्ठान विवर्त्त एकत्वाचा सूचिला. ॥ ३३९ ॥ कीं असोनि सत्य दोर । मिथ्या भासे सर्पाकार । त्या सर्पापलीकडे निर्विकार । दोरचि असे. ॥ ३४० ॥ तो सर्प असत्य । त्यापलीकडे दोर तो सत्य । यालागीं मानावें अगत्य । कीं दोरचि सर्प तो. ॥ ३४१ ॥ तो दोरही होतो असत्य । ब्रह्म कळतां सत्य । त्या दोरास-

हित अगत्य । जग हें ब्रह्म मानावें. ॥ ३४२ ॥ तरी त्याही ब्रह्मापलीकडे । कांहीं असिलिया तेंही उडे । कीं सर्पापलीकडे होऊनि उडे । दोर मिथ्यात्वें ॥ ३४३ ॥ हेही शंका अनादि । परिहरिली अनादि वेदीं । श्रुति जेथें उपपादी । प्रकृति पुरुषा ॥ ३४४ ॥ प्रकृति वर्णूनि अलीकडे । श्रुति म्हणे पुरुष तीपलीकडे । मागुतीं श्रुति म्हणे ऐसें न घडे । कीं पुरुषापलीकडे असे कांहीं. ॥ ३४५ ॥

श्रुति—**पुरुषान्नापरं किंचित्सा काष्ठा सा परा गतिः ।**

श्रुत्यर्थ पूर्वीं जाला असे । प्रमाण एथें स्पष्ट दिसे । एवं संदेहास अवकाश गवसे । तरी श्रुति निषेधी तयातें.॥ ३४६ ॥ कीं प्रकृति पुरुषा आलीकडे । पुरुष तीहूनि पलीकडे । परंतु ऐसें न घडे । कीं पुरुषापलीकडे असे कांहीं. ॥३४७॥ ऐशा अपरा परा प्रकृती । विवर्त्तरूपें वर्णी श्रीपती । शेवटीं म्हणे अर्जुनाप्रती । कीं मी अधिष्ठानचि असें सर्व ॥ ३४८ ॥ परी मिथ्या सर्पापलीकडे दोर । त्या दोरापलीकडे ब्रह्म निर्विकार । तैसा ब्रह्मापलीकडे त्यास आधार । आणखी असेना. ॥ ३४९ ॥ भ्रमें सर्प दृष्टी पडे । दोर असे त्यापलीकडे । तो कळतां सर्प उडे । प्रत्यक्षसिद्ध. ॥ ३५० ॥ ऐकतां वेदांत । विश्वसर्प ब्रह्मदोरांत । ऐसें परिसतां संशयांत । बुद्धि निघे. ॥ ३५१ ॥ कीं दोर कळतां सर्प उडे । तो दोरही राहे आलीकडे । ब्रह्म ऐकतां पलीकडे । तेव्हां दोरही जाला असत्य. ॥ ३५२ ॥ त्याही ब्रह्मापलीकडे । कांहीं असलिया हें आलीकडे । मिथ्या होऊनि उडे । प्रत्यक्षसिद्ध. ॥ ३५३ ॥ स्थळ संदेहाचें ये रीती । जाणोनि एथें जगत्पती । येविषयीं अर्जुनाप्रती । आधीं हेंचि बोलतो या श्लोकीं. ॥ ३५४ ॥

**मत्तः परतरं नान्यत्किंचिदस्ति धनंजय ।**
**मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव ॥ ७ ॥**

मजपलीकडे धनंजया ! । कांहीं असेल ऐसिया । झणी धरिशील संशया । मज पलीकडे कांहीं असेना. ॥ ३५५ ॥ अर्धश्लोकेंकरूनी । प्राप्त शंका परिहरूनी । आतां सर्वाश्रय आपणचि ऐसें वदोनी । स्वाश्रयत्व आपलें वदतो. ॥ ३५६ ॥ अगा ! मणि अनेक । त्यास आश्रय सूत्र एक । ते मणि सूत्र अवघें कनक । भेद मागुती असेना. ॥ ३५७ ॥ सर्वांस मी आश्रय । मी स्वाश्रय निराश्रय । सर्वथा न धरीं हा संशय । कीं मज आश्रय असेल कांहीं.

॥ ३५८ ॥ सुवर्णाचें सूत्र एक । सुवर्णाचे मणि अनेक । तैसा मी ईश आणि महदादिक । ब्रह्म असे सकळही. ॥ ३५९ ॥ तथापि ते मणिगण । मी सूत्र ईश्वर सगुण । विश्वरचनारूपें जाण । ओंविले असती मजमाजी. ॥ ३६० ॥ सूत्रावांचूनि जे रीती । मणिहार होऊं न शकती । विश्वरचनास्थिती । न ठाके महदादितत्त्वां मजविण. ॥ ३६१ ॥ ऐसें श्रीमद्भागवतीं । मैत्रेय ऋषि विदुराप्रति । बोले कीं करूं न शकती । महदादितत्त्वें ब्रह्मांड जेधवां ॥ ३६२ ॥ तेव्हां ईश्वरें आपली । शक्ती त्यामध्यें मेळविली । मग सुखें होऊं लागली । ब्रह्मांडरचना. ॥ ३६३ ॥ महदादितत्त्वांचा पसर । मणिगण भूतें चराचर । त्यांत सूत्र स्वयें ईश्वर । आश्रय तयांचा. ॥ ३६४ ॥ आणि आपणास आपण । आश्रय ब्रह्म सगुण । या अर्धश्लोकें हेही खूण । श्रीकृष्ण सांगे. ॥ ३६५ ॥ कीं सर्वेही म्हणतां आपण । उडालें सेव्यसेवकपण । म्हणूनि सर्वाश्रयत्वें श्रीकृष्ण । आपण सेव्य सकळ सेवक म्हणोनी सूचवी. ॥ ३६६॥ आतां यानंतर । विभूति बोलतो सर्वेश्वर । त्याचें निमित्त सुज्ञ चतुर । परिसोत आतां. ॥ ३६७ ॥ कीं समग्रत्व आपलें । बोलतां सेव्यसेवकत्व गेलें । तें साधलें एकाच बोलें । कीं सूत्रमणिन्यायें तथापि मी आश्रय आश्रितांचा. ॥ ३६८ ॥ हे गोष्टी देवें साधिली । तों शंका आणखी प्राप्त जाली । कीं सेव्यता एक ईश्वरासि आली । त्या वेगळे सर्व सेवक. ॥ ३६९ ॥ तेव्हां जे जे श्रेष्ठ । ते न सेवावे वरिष्ठ । आणि ज्येष्ठातें जो कनिष्ठ । त्यानें किमर्थ सेवावें. ॥ ३७० ॥ कीं जो तो माया आणि ब्रह्म । तेव्हां सकळही सम । म्हणूनि ईश्वर सर्वोत्तम । भजावें एका तयातेंचि. ॥ ३७१ ॥ या संदेहाचें स्थळ परी । सिद्धांतीं हेचि गोष्टी खरी । कीं सर्वाश्रय एक हरी । तोचि सेव्य. ॥ ३७२ ॥ इतर सर्व सम । कोण उत्तम कोण अधम । सर्वाश्रय म्हणूनि सर्वोत्तम । सेव्य तोचि सर्वां आश्रितां. ॥ ३७३ ॥ याकरितां हाचि सिद्धांत । अंगीकारूनि भगवंत । विभूतिवैभव आपलें अत्यंत । तें सांगतो. ॥ ३७४ ॥ कीं उत्तमत्व चित्रविचित्र । माझ्या उपाधीवांचूनि अन्यत्र । नसे तेंचि सर्वत्र । असे यथाविभागें या जगीं. ॥ ३७५ ॥ जें उत्तमत्व जेथें । ते माझी विभूति सेव्य तेथें । म्हणूनि विभूति आपल्या एथें । बोलतो या श्लोकापासूनी. ॥ ३७६ ॥

**रसोऽहमप्सु कौंतेय प्रभास्मि शशिसूर्ययोः ।**
**प्रणवः सर्ववेदेषु शब्दः खे पौरुषं नृषु ॥ ८ ॥**

उदकीं रस आपण । ऐसें म्हणती गोडपण । जें ज्यांत असेल त्यांत खूण। रस म्हणोनी. ॥ ३७७ ॥ गुळचट कडू तिखट क्षार । इत्यादि रसना[1] जाणे प्रकार । ते सर्व रस पाहतां विचार । उदकाचेच. ॥ ३७८ ॥ एवं ज्यांत जो गोड गुण । त्यास ईश्वराचें विभूतीपण । हे हृदयांत धरितां खूण । होय स्मरण ईश्वराचें. ॥ ३७९ ॥ श्रवणादि भक्ति नव । त्यांत स्मरणभक्ति जीव । श्रवणादि कोण भाव । घडे स्मरणावांचूनी. ॥ ३८० ॥ श्रवणादि भक्ति जे जे । तीस स्मरण आधीं पाहिजे । त्या आठांवीण स्वयें विराजे । स्मरणभक्ति स्वतंत्रत्वें. ॥ ३८१ ॥ आतां जों नव्हे श्रवण । तों न घडे म्हणावें स्मरण । तरी श्रवणांसी हेतु स्फुरण । स्वहिताचें. ॥ ३८२ ॥ स्वहितास हेतु प्रीती । त्या प्रीतीतेंचि भक्ति म्हणती । ते भक्ति कळते आयती। श्रवणादिकींकरूनी. ॥ ३८३ ॥ ईश्वर आत्मा आपला । हें रहस्य नेणे त्याला । भक्तियोग नाहीं बोलिला । जो म्हणावा अव्यभिचार. ॥ ३८४ ॥ भक्ति दों स्थळीं जाली । ते व्यभिचारिणी बोलिली । जैसी स्त्री भजों लागली । पुरुषां दोघांतें.॥३८५॥ कीं ईश्वरीं जे प्रीती । भक्ति तीतें म्हणती । परि भक्ति तेच करिती । चाड स्वहिताची जयांस. ॥ ३८६ ॥ आपणास आपण गमे गोड । तरीच आत्महिताचा निघे मोड । या गोडीपुढें जाली रोड । गोडी ईश्वराची. ॥ ३८७ ॥ आपणास पाहिजे धन मान । म्हणूनि रायातें सेविती जन । ऐसेंच आवडीनें भजन । आपणाकारणें देवाचें. ॥ ३८८ ॥ हाचि आत्मा ईश्वर । ऐसें कळतां जो जो आदर । तो तो म्हणावा अव्यभिचार । कीं प्रीति दों ठायीं असेना. ॥ ३८९ ॥ पतिव्रतेचा दृष्टांत । तोही येथें न साहे अत्यंत । कीं तेही अपेक्षूनि स्वहित । पतिसेवा करीतसे. ॥ ३९० ॥ एवं दों स्थळीं नसे प्रीती । ते अव्यभिचारिणी भक्ति म्हणती । प्रीतीसी दोन फांटे फुटती । व्यभिचारिणी ती म्हणावी. ॥ ३९१ ॥ एवं जे आपली प्रीति अत्यंत । तेच भक्ति होते निश्चित । त्या प्रीतीनें आठवे स्वहित । तें स्मरण आधीं श्रवण तेव्हां. ॥ ३९२ ॥ तेंही तरी घडे श्रवण । कीं श्रवणाचें जरी असे स्मरण । कीं स्मरण तेथें अंतःकरण । श्रवण अंतःकरणेंचि घडतें. ॥ ३९३ ॥ एवं श्रवणकाळीं पाहिजे स्मरण । परि स्मरणकाळीं नलगे श्रवण । कीर्तनादिकाची तों खूण । स्मरणाविणें सांपडेना. ॥ ३९४ ॥ आठां भक्तींची कळी । न उकले स्मरणावेगळी । ऐसी सर्वांत आगळी । स्मरणभक्ति. ॥ ३९५ ॥ सर्वां रसीं

---

१. जीभ.

जळ । तें भक्षूनिही उदक केवळ । पानार्थ[1] पाहिजे ऐसी निखळ । स्मरणभक्तीही लेखिली नवांत. ॥ ३९६ ॥ एवं पाहतां विभूती । होय ईश्वराची स्मृती । प्रस्तुतीं गोडी गोडी प्रीती प्रीती । रस विभूतियोगें हरि स्मरावा. ॥ ३९७ ॥ एवं उदकीं मी रस । येथें बोले जगन्निवास । मूळ सर्वां रसास । रस जो दिसतसे जलरूपें. ॥ ३९८ ॥ ऐसीच चंद्रसूर्यांत प्रभा । मीच माझी विभूती ते शोभा । ज्या प्रभा व्यापूनि नभा । पडदा काढिती तमाचा. ॥ ३९९ ॥ सर्वां वेदांचें मूळ । जो प्रणव ओंकार केवळ । तो मीच संन्यासी निर्मळ । ज्या बीजमात्रातेंचि जपती ॥ ४०० ॥ आतां शब्द आकाशगुण । ज्या शब्दें कळे सर्वांची खूण । तो मी सगुण निर्गुण । वाच्य अनिर्वाच्य म्हणती ज्या शब्दें. ॥ ४०१ ॥ पुरुषामाजीं पुरुषार्थ । तो मीच स्वयें समर्थ । एवं जाण तूं यथार्थ । कीं पुरुषार्थ सर्वही मी असें. ॥ ४०२ ॥

**पुण्यो गंधः पृथिव्यां च तेजश्चास्मि विभावसौ ।**
**जीवनं सर्वभूतेषु तपश्चास्मि तपस्विषु ॥ ९ ॥**

अगा ! सर्वत्र सुगंध । तो पृथ्वीचाच गुण गंध । यावेगळे जे दुर्गंध । ते विकार. ॥ ४०३ ॥ यालागीं जो पुण्यगंध । म्हणजे पृथ्वींत जो सुगंध । तो मी माझी विभूतिसंबंध । सुगंधमात्रीं तूं पाहें. ॥ ४०४ ॥ मी तेज अग्नीभीतरी । कीं माझी विभूति वैश्वानरीं । सर्वभूतीं यापरी । जीवन तें मीच ॥ ४०५ ॥ कीं लिंगदेह आणि चिदंश जीव । जोंवरी असे तोंचिवरी सजीव । म्हणावा अन्यथा शव । अमंगळ होतसे देह तो. ॥ ४०६ ॥ तें जीवन मी जगत्पती । म्हणिजे माझी विभूती । जोंवरी जीवन तोंवरी प्रीती । परम आप्ताचीही त्यावरी. ॥ ४०७ ॥ आतां तपस्वियांत तप । अत्यंत ज्याचा प्रताप । तें मी माझ्या विभूतीचें रूप । तें तपही जाण तूं. ॥ ४०८ ॥ ऐशा पाहतां विभूती । झणी आत्मतत्त्वाची पडे विस्मृती । म्हणूनि आत्मा सर्वभूतीं । पाहें कीं तें पाहणें विभूती म्हणतो या श्लोकीं. ॥ ४०९ ॥



**बीजं मां सर्वभूतानां विद्धि पार्थ सनातनम् ।**
**बुद्धिर्बुद्धिमतामस्मि तेजस्तेजस्विनामहम् ॥ १० ॥**

अगा ! मीं या माझ्या विभूती । सांगतों ज्या समस्ता भूतीं । त्या भूतांचें बीज मी जगत्पती । परि नव्हे इतरां बीजांसारिखा. ॥ ४१० ॥ कीं उपजतां अंकुर । बीज नाशे सत्वर । बीज होऊनिही मी नव्हे नश्वर । सनातन नित्य

१. पिण्यासाठीं.

शाश्वत. ॥ ४११ ॥ तरी बीजत्वें कां गणावें । शाश्वत नित्य जेव्हां म्हणावें । बीज म्हणतां कोठोनि आणावें । नित्यत्व. ॥ ४१२ ॥ कोणी ऐसें म्हणती तरी । याच्या उत्तरार्धीं हरी । बोले ऐसी वैखरी । कीं बुद्धि मी बुद्धिवंतांत. ॥ ४१३ ॥ म्हणूनि हा अर्थ । ज्या दृष्टांतें साधे यथार्थ । त्या दृष्टांतें साधाया ऐसें समर्थ । सूचवी येथें. ॥ ४१४ ॥ कीं बीजपण तरी घडे । आणि नित्यत्व तरी न विघडे । ऐशा विचारें उघडे । या वाक्यार्थाचें कवाड. ॥४१५॥ सूर्यकिरणापासूनी । मृगजळ उपजे प्रतिदिनीं । पुन्हां त्यांत लय पावूनी । बीजांत वृक्ष ऐसें असें. ॥ ४१६ ॥ बीजांत वृक्ष असे । कीं त्यांतूनि निघतां दिसे । आणि वृक्षांत बीज वसे । तरी उपजे वृक्षापासूनी. ॥ ४१७ ॥ परि बीज नाशत असे । त्यांतील अंकुर जेव्हां दिसे । मृगजळ होतां तैसा नसे । नाश किरणाचा. ॥ ४१८ ॥ आणि किरण सत्य । जळभास असत्य । स्वयें बीज सत्य तें असत्य । हें साधेल याच दृष्टांतें. ॥ ४१९ ॥ इत्यादि भाव पोटीं । तों कृष्ण म्हणे अगा किरीटी! । ऐशा ब्रह्मांडाच्या कोटी । बीज सनातन मी त्यांचें. ॥ ४२० ॥ बीज शब्द ऐसा गहन । बोलोनियां जगज्जीवन । बुद्धिमंतांत बुद्धि मी ऐसें वचन । त्यापुढेंचि बोलतसे. ॥ ४२१ ॥ कीं रहस्य अत्यंत । हें गुह्य यासही बुद्धिमंत । यथार्थ वाखाणिती त्यांत । बुद्धि ते भगवंत मी असें. ॥ ४२२ ॥ ते बुद्धिमंत तेचि बुद्धि । कीं ज्यास जे बुद्धीनें तत्त्वसिद्धी । त्या नित्य बीजाच्या अनुभवाची समृद्धी । ज्या बुद्धीनें धन्य ते. ॥ ४२३ ॥ आतां जे तेजस्वी थोर । ज्ञानी तपस्वी चतुर सुंदर । धनवंत विद्यावंत कलावंत नर । त्यांतें तेज जें जें तें तें मी असें. ॥ ४२४ ॥ इत्यादि ज्यापाशीं जो गुण । तें तेज त्यांचें हे खूण । त्या तेजें तो तेजस्वी निपुण । परि भगवद्विभूति तें तेज. ॥ ४२५ ॥

**बलं बलवतामस्मि कामरागविवर्जितम् ।**
**धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ ॥ ११ ॥**

बलवंतांत मी बळ । परंतु तें बळ जें केवळ । कामविषयप्रीति ओंगळ । तें बळ नव्हे विभूति माझी. ॥ ४२६ ॥ आणि धर्मास नव्हे विरुद्ध । स्वस्त्रीशीं यथाकाळें भोग शुद्ध । तो काम मी इतर अशुद्ध । विभूति माझी तो नव्हे. ॥ ४२७ ॥ एथवरी ज्या ज्या विभूती । बोलता जाला श्रीपती । त्यांत भाव दावी ये रीती । कीं उत्तम तितकें स्ववैभव. ॥ ४२८ ॥ प्रस्तुत धर्मास अनुकूळ । तो काम विभूति आपली निर्मळ । धर्मास विरुद्ध तो अमंगळ । वि-

भूति आपली न म्हणावी हा भाव. ॥ ४२९ ॥ तरी आपण सर्वसम । आपणास कां उत्तमाधम । या संशयें मतिभ्रम । अर्जुनादिकांचा होणार.॥४३०॥ एथें हेंचि समाधान । कीं त्रिगुणचक्रीं मन । भ्रमतसे म्हणूनि जन । गुणानुरूप फळ पावती. ॥ ४३१ ॥ त्यांत सत्त्वें उत्तम गती । तमें अत्यंत अधोगति होती । रजोगुणें मध्यें राहती । हें चतुर्दशीं स्पष्ट होणार. ॥ ४३२ ॥ प्रस्तुतीं धर्मास अविरुद्ध । तो कामसत्त्वगुणयोगें शुद्ध । सत्त्वगुणें उत्तमलोकगति सिद्ध । रजें मध्यम तमें अधोगती. ॥ ४३३ ॥ एकचि सोनें परी । त्याचे नग वेगळाल्या कूसरी । एकास एकाची सरी । येणार नाहीं ॥ ४३४ ॥ लोखंडाचीच परि बेडी । लोखंडाचाच घन घडी । किंकरी लोखंडाचीच तोडी । लोखंडाचेंच बेडीतें. ॥ ४३५ ॥ तैसे प्रकृतीचे गुण । मीच स्वयें निर्गुण । कीं गारांचें कठिणपण । पाहतां अवघें मृदु जळ. ॥ ४३६ ॥ प्रकृतीचेच गुण । जाले नरक दारुण । त्या नरकप्राप्तीस कारण । तेचि जाले. ॥ ४३७ ॥ चुकती नरक दारुण । यासही निमित्त तेच गुण । त्यांत सात्विका स्वभावाची खूण । स्वहिताचरण वेदोक्त. ॥ ४३८ ॥ एवं धर्मास तो नव्हे विरुद्ध । सात्त्विकाचा काम शुद्ध । माझें विभूतिपण सिद्ध । त्या कामास याकरितां. ॥ ४३९ ॥ ते तिन्ही गुण । आणि यांचें लक्षण । आणि गति हें निरूपण । चतुर्दशांत होणार. ॥ ४४० ॥ प्रस्तुत धर्मास अविरुद्ध । तो काम सात्त्विकांचा शुद्ध । म्हणूनि ऐसें जालें सिद्ध । कीं त्रिगुण एथें बोलावें. ॥ ४४१ ॥ त्यांत सात्त्विकभाव माझ्या विभूती । सत्त्वानुरूप उत्तम गती । तरी मीच मायाधिपती । चाळक तिन्ही गुणांचा. ॥ ४४२ ॥ तथापि ते गुण असत्य । त्यांचें अधिष्ठान आपण सत्य । हें जे रीती साधे अगत्य । तैसें बोलतो या श्लोकीं. ॥ ४४३ ॥

**ये चैव सात्त्विका भावा राजसास्तामसाश्च ये ।**
**मत्त एवेति तान्विद्धि न त्वहं तेषु ते मयि ॥ १२ ॥**

अगा! धर्मास अनुकूळ काम । म्हणूनि ऋतुकाळीं स्वस्त्रीसंगम । हा सात्त्विकभाव उत्तम । सात्त्विक इतर भाव इत्यादि. ॥ ४४४ ॥ आणि अनादि वासना । जे उपजवी भोगकामना । विषयासक्त करी मना । राजसभाव इत्यादि. ॥४४५॥ विषयभोगनिमित्तक । क्रोधशोकमोहादिक । इत्यादि भाव अनेक । तमोगुणाचे. ॥ ४४६ ॥ हे गुणाचे भाव । परि मजपासूनि यांचा उद्भव । कीं ते गुण

स्वयमेव । मजपासूनिच उपजले. ॥ ४४७ ॥ मजपासूनि त्यांची उत्पत्ती । परि त्यांत नसें मी जगत्पती । आणि ते मजमाजि असती । जाण ऐसें अर्जुना! ॥ ४४८ ॥ ऐसें जाण म्हणोनी । बोलतां या स्ववचनीं । भाव दावी कीं ज्या दृष्टांतेंकरूनी । हें घडे त्या दृष्टांतें हें जाण. ॥ ४४९ ॥ कीं दृष्टांताविना अर्थ हा साधेना । म्हणूनि जाण म्हणे अर्जुना! । तें दृष्टांतेंचि जाणा । म्हणतो म्हणावें. ॥ ४५० ॥ कीं काय ऐसें असे । ज्यांत हा सर्वव्यापक नसे । हा त्यांत नसतां ते कैसे । यामाजी असती? ॥ ४५१ ॥ आकाश जैसें सर्वगत । हा तैसा त्याहीपुढें अनंत । जें असेल त्या आकाशांत । त्यांत तो नसेल कैसा? ॥ ४५२ ॥ वायु आकाशापासूनी । तो वायु वसे त्याच गगनीं । गगन वायूंत नसे म्हणोनी । म्हणेल कोण? ॥ ४५३ ॥ एथें याकारणें । लागलें जेव्हां विचार करणें । तेव्हां अगत्य लागलें येणें । दृष्टांतावरी ॥ ४५४ ॥ सर्प ज्या रज्जूपासूनि होतसे । त्या सर्पीं रज्जु तो नसे । कीं सर्प सत्य न दिसे । दोर त्यांत न असे यालागीं. ॥ ४५५ ॥ जळास भास किरणांपासूनी । उपजे परी मिथ्या म्हणोनी । जें असत्य तें नसे यावरूनी । किरणें नसती मृगजळीं. ॥ ४५६ ॥ परी मृगजळ किरणांवांचूनि । न दिसे न असे या निमित्तेंकरूनी। किरणींच आहे म्हणोनी । म्हणावें अगत्य. ॥ ४५७ ॥ ऐसे त्रिगुणाचे भाव । मजपासूनि म्हणे देव । परी मिथ्यात्वें नसती यास्तव । म्हणे त्या त्रिगुणभावांत मी नसें. ॥ ४५८ ॥ परी ते गुणांचे भाव आणि गुण । न दिसती न असती मजविण । सागरीं तरंगांतें तरंगपण । तैसे असती मजमाजी. ॥ ४५९ ॥ इत्यादि दृष्टांत कोटी । उपजे असत्य सत्याचेच पोटीं । असत्य नाहीं यास्तव शेवटीं । सत्य नसे म्हणावें त्या असत्यांत. ॥ ४६० ॥ परी जें सत्य । त्यावांचूनि न दिसे असत्य । म्हणोनि मानावें अगत्य । सत्यांतचि असत्य आहे म्हणोनी ॥ ४६१ ॥ एवं गुण गुणाचे भाव । असत्य आणि सत्य स्वयमेव । ऐसें सूचवूनि देव । सकळ मी ऐसें दावी समग्रत्वा. ॥ ४६२ ॥ आणि मागुती गुण त्रिविध । त्या तिहींचे भाव विविध । जैसा भाव तैसाच फलसंबंध । त्रिगुण भाव कर्माचा. ॥ ४६३ ॥ त्यांत सात्त्विक शुद्ध । कामविलास त्याचे शास्त्रसिद्ध । म्हणोनि धर्मास अविरुद्ध । तो काम मी ऐसें म्हणे. ॥ ४६४ ॥ कीं कामादि शास्त्रसंमत । दिव्य फळ देती निश्चित । म्हणोनी आपली विभूति भगवंत । म्हणे त्यातें. ॥ ४६५ ॥ एवं सर्वात्मत्वस्थिती । त्यांत आपल्या विभूती । द्वैत नसोनि गती । गुणकर्मानुरूप. ॥ ४६६ ॥ हें इतकें सिद्ध

जालें । जेव्हां गुणभावास मिथ्यात्व आलें । कीं भाव विविध तेव्हां साधलें । फळविविधत्वें गतिविविधत्व. ॥ ४६७ ॥ अद्वैतामध्यें द्वैत । आणि द्वैतांत अद्वैत । प्रसंगें ऐसें भगवंत । तत्त्व सर्वांचें बोलिला. ॥ ४६८ ॥ कीं देखिलें ऐकिलें जें कांहीं । आणि देखिलें ऐकिलें जें नाहीं । जें जेथें जैसें असेल सर्वही । तेंचि तत्त्व सकळाचें. ॥ ४६९ ॥ कीं सर्व या गुणांचेच भाव । त्यांचा प्रकाशक एक देव । परी हें तत्त्व नेणती जीव । याच गुणभावेंकरूनी. ॥ ४७० ॥ हे गुणभाव ऐसे अनेक । यापलीकडे यांचा प्रकाशक । जीव नेणती हा विवेक । या गुणाचिकरितां म्हणतसे या श्लोकीं. ॥ ४७१ ॥

**त्रिभिर्गुणमयैर्भावैरेभिः सर्वमिदं जगत् ।**
**मोहितं नाभिजानाति मामेभ्यः परमव्ययम् ॥ १३ ॥**

अगा! हे त्रिगुणमय भाव । याचकरितां जगीं जीव । मोहोनि जो यापरता मी देव । त्या मातें कोणी नेणती. ॥ ४७२ ॥ त्यांत जो सत्त्वगुण । त्यासही रजतममिश्रितपण । अनादि अविद्येंकरूनि खुण । नेणे माझी. ॥ ४७३ ॥ ज्यांस सत्त्वीं उत्तम गती । तेही गर्भवासा येती मागुती । न चुकती यातायाती । जो गुणापलीकडे मज नेणे. ॥ ४७४ ॥ चित्त बुद्धि मन सत्त्वगुण । इंद्रियें रज देह तमोगुण । अहंकारीं याचें एकपण । हाचि मोह. ॥ ४७५ ॥ मोह म्हणजे अविवेक । हा वेगळा द्रष्टा वेगळा हा विवेक । त्या अनेकीं आत्मा एक । अव्यय अविनाशी मी असें. ॥ ४७६ ॥ परंतु या तिहीं गुणांचे भाव । त्या भावीं मोहले जीव । त्यांचा आत्मा मी देवाधिदेव । त्या मातें न जाणती. ॥ ४७७ ॥ गुण हे कां ऐसे बलवंत । आणि ऐसियांसही तरूनि जाती संत । त्यास काय कारण हें भगवंत । गुह्य सांगतसे या श्लोकीं. ॥ ४७८ ॥

**दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया ।**
**मामेव ये प्रपद्यंते मायामेतां तरंति ते ॥ १४ ॥**

आइकें अगा धनंजया ! । गुण तिन्ही हे म्हणावी माया । ते माया अति दुरत्यया । म्हणजे जे न तरवे दुःखेंही. ॥ ४७९ ॥ 'मा' म्हणजे नसे । 'या' म्हणजे जें नसोनि भासे । या दों शब्दींचे दोन्ही ऐसे । अर्थ कीं ऐसेंचि तत्त्व तिचें. ॥ ४८० ॥ मृगजळ वस्तुतः नसे । नाहीं म्हणतां आहेसें दिसे । दों अक्षरांचे भाव ऐसे । माया म्हणावी याकरितां. ॥ ४८१ ॥ नाहींच म्हणावी ते । तरी विश्वरूपें दिसते । आहे म्हणावी तरी होते । दूर कळतां जैसा सर्प. ॥ ४८२ ॥ तरंग जळीं दिसती । जळावेगळे कांहींच नसती ।

नाहीं म्हणावे तरी भासती । नानारूपें. ॥ ४८३ ॥ 'माया' म्हणूनि हीं दोनी अक्षरें । या भावें या प्रकारें । योजूनि म्यां अनादि चतुरें । नांव ठेविलें या शक्तीचें. ॥ ४८४ ॥ कार्यरूपी माया । ऐसी म्हणावी धनंजया ! । कारणत्वीं ही आपुलिया । शब्दद्वयार्थातें न सोडी. ॥ ४८५ ॥ मध्यान्ह टळतां किरणीं । जैसें दिसेना असत्य पाणी । तैसीं प्रलयकालीं निर्गुणीं । कार्यरूपी माया दिसेना. ॥ ४८६ ॥ तेव्हां म्हणावी नाहीं म्हणूनी । तरी प्रकटते पुन्हा त्या-पासूनी । मृगजळ जैसें प्रतिदिनीं । किरणीं प्रकट होतसे. ॥ ४८७ ॥ जळा-भास किरणीं नसे । कारणरूपें त्यांत तेव्हांही वसे । कीं कार्यरूपें दिसे । दुसरिये दिवसीं. ॥ ४८८ ॥ कीं बीजांत वृक्ष न दिसे । तरी म्हणावाच कीं असे । नसेचि तो कोठोनि गवसे । जेव्हां निघतो त्यांतूनी. ॥ ४८९ ॥ प्र-पंच लय पावोनि । पुन्हा उपजे निर्गुणापासूनी । तेव्हां कारणरूपें असेच म्हणोनी । प्रलयकाळीं ब्रह्मीं हे माया. ॥ ४९० ॥ 'मा'शब्दें तेव्हां माया नसे । कीं ब्रह्मीं इतर कांहींच न दिसे । 'या'शब्दें तथापि तेव्हां ब्रह्मीं वसे । तरी निघतसे मागुतीं. ॥ ४९१ ॥ नसोनि इच्छा किरणीं । जळाभास उपजे ऐसी निर्गुणीं । इच्छा नसोनि कारणरूपिणी । कार्याभिमुख माया प्रकटते. ॥ ४९२ ॥ ते समयीं निर्गुण । असोनिही निर्गुणपण । त्या मायेक-रूनिही होतें सगुण । त्रिगुण तेव्हां प्रकटती. ॥ ४९३ ॥ गुण तिन्ही आणि त्यांचे भाव । या कार्यरूपीं ते माया स्वयमेव । कारणरूपिणी यास्तव । समूळ मिथ्या खेळ इचे. ॥ ४९४ ॥ याकारणें धनंजया! । हे म्हणावी माया । त्रि-गुणभावरूपें दुरत्यया । कधीं न तरवे ऐसी जाली. ॥ ४९५ ॥ गोंवी गुण-त्रयाच्या भावीं । गुणमयी याकारणें म्हणावी । शक्ति 'गुण'शब्दाची पहावी। तो दोर म्हणूनी अर्थ 'गुण'शब्दाचा. ॥ ४९६ ॥ बंधनाचे प्रकार । फांसे दांवीं जाळीं इत्यादि इतर । यास साधन दोर । ते दोर संस्कृतीं 'गुण' म्हणावे. ॥ ४९७ ॥ त्रिगुणाचिया भावीं । जीवां संसारीं गोंवी । माया गुणमयी म्हणावी । याकरितां. ॥ ४९८ ॥ ऐसी गुणमयी माया । आणि अत्यंत दु-रत्यया । दुरत्यया ऐसी कीं ईस तराया । शक्त नव्हे कोणीही. ॥ ४९९ ॥ कीं जरी हे सत्य असती । तरी नावा घालूनि तरली जाती । प्रलयसूर्यें शुष्क होती । सांपडती पायवाट. ॥ ५०० ॥ धरूं जातां न सांपडे । धरणार अधिक फांसीं पडे । जों जों पोंहेल तों तों बुडे । प्रवाहीं ईच्या. ॥ ५०१ ॥

ईमाजी जो बुडाला । बुडालों न वाटे त्याला । तरलों म्हणे याही बोला । बोले बुडाला तोही दिसे. ॥ ५०२ ॥ सत्यलोकादिपर्यंत । बुडोनि सेवाळले अत्यंत । तरले म्हणूनि तेथपर्यंत । चढले घसरले तेही तोंडघसीं. ॥ ५०३ ॥ वासनासमीरें चंचळ । उठती कामनेचे कल्लोळ । धार अहंकाराची लोळ । अत्यंत करी. ॥ ५०४ ॥ काम क्रोध तिमिंगिल[1] । गिळिती चघळिती प्रबळ । लोभ नक्र अमंगळ । मिठी घाली न सोडी सर्वथा. ॥ ५०५ ॥ मद मत्सर भुजंग । डसती वेष्टूनि सर्वांग । सर्व विषयझेंडू लागतां श्रीरंग । वाचे नये जो तारणार इजपासूनी ॥ ५०६ ॥ हे नदी तराया उपाय । जरी अर्जुना! म्हणसी काय । तरी हेचि माझे दोन्ही पाय । इतर उपाय ते अपाय अवघेही. ॥५०७॥ 'मामेव ये प्रपद्यंते' म्हणोनी । यांत या 'एव'शब्दें करूनी । इतर कोणी आपणावांचूनी । तारक नाहीं हें सूचवी. ॥ ५०८ ॥ ऐसें कां म्हणसी धनंजया! । तरी दैवी आणि मम माया । या दों गोष्टींकरूनियां । निमित्त येविषयीं बोलतो. ॥ ५०९ ॥ कीं सर्वांत थोर देव। तो अर्जुना! मी स्वयमेव । त्या माझी शक्ति यास्तव । दैवी म्हणावी. ॥ ५१० ॥ मी देव माझी दैवी । हे माया दैवी म्हणावी । यावरूनि हे जाणावी । कीं असे मजआधीन. ॥ ५११ ॥ मजआधीन माझी माया । या कारणें धनंजया! । इच्या पाशापासूनि सोडावया । समर्थ मी एक. ॥ ५१२ ॥ यालागीं मातेंचि भजती । ते मायानदीतें तरती । ज्यास पाय माझे नाव होती । ते बुडती हें घडेना. ॥ ५१३ ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञ लोक । परिसोत आधीं. ॥ ५१४ ॥ पूर्वश्लोकीं माया-। नदी वर्णूनि दुरत्यया । बोलिला तीतें तरावया । उपाय एक. ॥ ५१५ ॥ कीं आपण जगज्जीवन । धणी इचा आपण हे आपले आधीन । म्हणूनि मातेंचि भजती जन । तेचि तरती या मायानदीतें. ॥ ५१६ ॥ ऐसें बोलतां भवभंजन । संतुष्ट जाला अर्जुन । कीं आतां सर्वजन । तरतील या मायानदीतें. ॥५१७॥ कीं हे गोष्टी आजिवरी । ऐसी कळली नव्हती बरी । यातें भजोनि याउपरी । तरतील सर्व. ॥ ५१८ ॥ हा त्याचा मनोभाव । समजोनि साक्षी देवाधिदेव । हें खरें परी पापी मानव । न भजती मज म्हणे या श्लोकीं. ॥ ५१९ ॥

**न मां दुष्कृतिनो मूढाः प्रपद्यंते नराधमाः ।**
**माययापहृतज्ञाना आसुरं भावमाश्रिताः ॥ १५ ॥**

---

१. मोठे मासे.

अगा! मातें भजते। तरी सर्व जन निश्चयेंचि तरते । हें प्रकट परी अंध होते। दृष्टि रविमंडळीं दिवांधाची. ॥ ५२० ॥ अगा! हे दुष्कृती पापी । ते हें ऐकती जाणती तथापी। माझें नाम सोपें तेंही कदापी। न आणिती वाचे. ॥ ५२१ ॥ गोड अत्यंत शर्करा। ते कडू लागे पित्तातुरा । तैसा मूढा पापिया पामरा। गोड न वाटें मी सेव्य. ॥ ५२२ ॥ दुष्कृता पापाचिया कोटी। ज्या पापियाच्या पोटीं। त्याचिया हृदयांत अगा किरीटी !। वास माझा केंवि घडे? ॥ ५२३ ॥ सर्वत्र मी व्यापक असें। ते नाहींच जेथें मी नसें। परी सेव्य होऊनि हृदयीं वसें । पुण्यें अगण्येंकरूनी. ॥ ५२४ ॥ अग्नि असे काष्ठमात्रीं। परी मथिता आयता अग्निहोत्री। तैसा व्यापक हृदयशतपत्रीं । भजती त्यांचिया वसतसें. ॥ ५२५ ॥ परी पुण्य अगण्य ज्यांचिया पदरीं। भजनेच्छा वसे त्यांच्या अंतरीं। जे दुष्कृति पापी कोणे परी। माझें भजन त्यांला नावडे. ॥ ५२६ ॥ हृदयांत इत्यादि भाव । तो म्हणे देवाधिदेव । कीं जे दुष्कृति अधम मानव। ते पापी मातें न भजती. ॥ ५२७ ॥ जे केवळ पशुसम। त्यांतें एथें पुरुषोत्तम । न निंदी कीं ते नराधम । म्हणूनि न म्हणे तयांतें. ॥ ५२८ ॥ आणि **'माययापहृतज्ञाना'**। आणि **'आसुरं भावमाश्रिताः'** म्हणे ज्या जनां। या शब्दीं सूचवी अर्जुना!। कीं केवळ पशुही ते नव्हती. ॥ ५२९ ॥ कीं स्वहिताविषयीं तरी तत्पर । म्हणूनि म्हणावे ते नर । परी नरांत अधम कीं सादर। माझिया भजनीं न होती. ॥ ५३० ॥ मुख्य फळ मोक्ष। मोक्षप्रद अंबुजनाभ अंबुजाक्ष । ऐसें कळोनिही काम्य पक्ष। धरिती धरूनि भाव असुरांचा. ॥ ५३१ ॥ करितां मुकुंदभजन । मुक्ति निश्चय ऐसें ज्ञान। असोनि झाले अज्ञान। कीं तें ज्ञान हरिलें मायेनें. ॥ ५३२ ॥ मोक्ष विषयापलीकडे । तो मोक्ष त्यांतें नावडे। ज्यांच्या मनाची उडी पडे । विषयांचि वरी. ॥ ५३३ ॥ दृष्टि देऊनि विषयावरी । मोक्ष आणि मोक्षप्रद हरी। टाकूनि काम्यकर्माच्या कुसरी। काम्यफळें श्रेष्ठ बोलती. ॥ ५३४ ॥ ऐसें असोनि हरिलें ज्ञान। मायेकरूनि जालें अज्ञान। दिवांधा असोनि नयन। सूर्य न दिसे. ॥ ५३५ ॥ देह मी ऐसा भ्रम । मायेंकरूनि प्रथम । मग आवडे विषयसंभ्रम। म्हणोनि मुक्तिप्रदातें न भजती. ॥ ५३६ ॥ 'मा' म्हणजे नसे। 'या' म्हणजे जे नसोनि गवसे । ते प्रत्यक्ष एथें दिसे । देह मी ऐसें वाटतां. ॥ ५३७ ॥ देहावेगळा देहास जाणे। तो देह आपण ऐसें म्हणे। न शिकतां न करितां अभ्यास बाणे। देहचि मी म्हणोनी. ॥ ५३८ ॥ स्वप्नीं

दिसे ऐसाच देह । तोही आपण निःसंदेह । वाटे आणि ऐसाच स्नेह । त्या देहाचाही आत्मत्वें. ॥ ५३९ ॥ जागा होतां तो नसे । तैसा आत्मत्वेंचि हा देह दिसे । स्नेह तैसाच असे । याही देहीं. ॥ ५४० ॥ मी काय तें शरीर । किंवा हेंचि कलेवर । ऐसा विचार कोणी चतुर । करितां दिसेना. ॥ ५४१ ॥ हा देह वाटे जैसा । तोही आपणचि म्हणोनि वाटे तैसा । परी एथें विचार न कळे ऐसा । कीं दोन्ही नव्हे आपण. ॥ ५४२ ॥ जरी जागृति देह आपण । तरी तो आपण ही न बाणती खूण । तेव्हां दोन्ही आपण नव्हे ऐसी खूण । न कळे मोह हा मायेचा. ॥ ५४३ ॥ देह मी ऐसें म्हणे । तो काय देहास देहचि जाणे । तरी शव कां आपणातें नेणे । मी देह म्हणोनी. ॥ ५४४ ॥ एवं देहावेगळा आपण । ऐसी विवेकें जो धरी आठवण । तोंपर्यंत देहात्मपण । विश्व धुंडितां न सांपडे. ॥ ५४५ ॥ दोर जोंवरी दिसे । सर्प तोंपर्यंत नसे । एवं मी देह ऐसा प्रत्यय वसे । सर्प दोरीं जे रीती. ॥ ५४६ ॥ देह तों आपण नसे । आणि देह मी प्रत्यक्ष ऐसें दिसे । प्रत्यक्ष हे माया वसे । प्रतिशरीरीं. ॥ ५४७ ॥ मनुष्य पक्षी पशु कृमी । सर्वांस वाटे देह मी । विषयवासना या मायाभ्रमीं । वसतसे. ॥ ५४८ ॥ वेदशास्त्रें वाचूनी । मोक्षप्रद हरि ऐसें कळोनी । विषयसुखलालसा धरूनी । सकाम जाले. ॥ ५४९ ॥ इतर देवतांतें भजती । काम्यफलार्थ त्यांतें यजिती । ज्ञान असोनि अज्ञान होती । मायेंकरूनि ते ऐसे. ॥ ५५० ॥ अत एव मूढ जाले । शास्त्रें वाचून मोहले । सहज मूढ ते भले । हे मायाहृतज्ञान पढतमूर्ख. ॥ ५५१ ॥ टाकूनि विष्णुभजन । करिती क्षुद्रदेवतायजन । असुररीतिपूजन । ते करिती. ॥ ५५२ ॥ वेद वेदोक्त कर्म । असुरांतें असे आणि स्वधर्म । परि भूतदयेचें वर्म । नसे तयां ठाउकें. ॥ ५५३ ॥ या भावें म्हणे देव । कीं ते धरोनि असुरभाव । मी जो देवाधिदेव । त्या मातें न भजती. ॥ ५५४ ॥ कीं असुरभाव ज्याला । हिंसात्मका क्रिया घडे त्याला । शास्त्रबोध ज्यांचा व्यर्थ गेला । मायेंकरूनी. ॥ ५५५ ॥ कारण यास सुकृत । कीं जे दुष्कृति पापी अत्यंत । त्यांचेंचि ऐसें सूचवूनि वर्णी भगवंत । हृतज्ञानत्व असुरत्व. ॥ ५५६ ॥ **'येषां त्वंतगतं पापं'** म्हणोनी । पुढें इत्यादि भगवद्वचनीं । याच अध्यायांत याच प्रकरणीं । होईल निर्णय. ॥ ५५७ ॥ कीं नाशिलें ज्यांचें पाप । जे पुण्यवंत निष्पाप । ते गुरु देव मायबाप । मातेंचि मानिती. ॥ ५५८ ॥ गर्भवास जरा मरण । यापासूनि सुटावया माझे चरण । दृढ धरोनि श्रवण कीर्तन स्मरण । ते निष्पाप माझेंचि करिती. ॥ ५५९ ॥ ते

ब्रह्म अध्यात्म कर्म । सर्व मीच असें सधर्म निर्धर्म । माझें ज्ञान पांवतील हें वर्म । याच प्रकरणीं याच अध्यायांत बोलेल. ॥ ९६० ॥ कीं अभक्ताचें ज्ञान । जया मायेनें हरोनि केलें अज्ञान । ते माया असोनिही पुण्यवंत जन । मातेंचि भजती. ॥ ९६१ ॥ माझ्या भजनाच्या प्रतापें । तरोनि मायानदी त-पती तपें । प्रस्तुतीं म्हणे बहुजन्मपापें । ज्यांच्या ग्रंथीस पापी मातें न भजती. ॥ ९६२ ॥ एवं भगवद्भजन । न करिती ते पापीजन । ते ज्ञान असोनि मायाहृतज्ञान । मूढ नराधम असें स्पष्ट या श्लोकीं. ॥ ९६३ ॥ आतां या श्लोकानंतर । चतुर्विध भक्त सर्वेश्वर । वदेल त्याचें निमित्त सुज्ञ चतुर । परि-सोत आधीं. ॥ ९६४ ॥ कोणी म्हणती हरी । मोक्षचि देतो परी । का-म्यफलसिद्धि न करी । म्हणोनि इतरांतें भजावें. ॥ ९६५ ॥ कोणी म्हणती नसे द्वैत । हें भल्याच्या मुखें कळलें निश्चित । जो तें जाणे न म्हणे अद्वैत । त्यास विष्णुभजनचि मुख्य कां? ॥ ९६६ ॥ कीं जाणों इच्छितो अद्वैत । त्याणें कां आरंभींच अवलंबावें द्वैत । विष्णुच थोर म्हणतां अत्यंत । द्वैत करणें लागतें. ॥ ९६७ ॥ जें भजावें दैवत । तें ब्रह्मचि निश्चित । विष्णुच काय अत्यंत । थोर जाला. ॥ ९६८ ॥ कळावया निर्गुण । वेद बोलती भजावें सगुण । तें निर्गुणचि सर्व म्हणती निपुण । जरी जें दैवत तें सगुण कां नव्हे? ॥ ९६९ ॥ यालागीं जिज्ञासु जन । त्यांसही नलगे विष्णुभजन । कोणी म्हणती जालिया ज्ञान । किमर्थ भजन विष्णूचें. ॥ ९७० ॥ ऐसे तिन्ही पूर्वपक्ष । हरावया अंबुजाक्ष । त्रिविधही स्वभक्त आहेत हा पक्ष । बोलतो आतां या श्लोकीं. ॥ ९७१ ॥

**चतुर्विधा भजंते मां जनाः सुकृतिनोऽर्जुन ।**
**आर्तो जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ ॥ १६ ॥**

अगा ! जे पापी जन । त्यांतेंचि नसे माझें भजन । वरकड अज्ञान सज्ञान । सकाम निष्काम मज भजती. ॥ ९७२ ॥ न भजतीच दुष्कृती । वरकड जेथवरी सुकृती । ते त्रिविधही मातें भजती । त्रिविध तेचि हे चतुर्विध. ॥ ९७३ ॥ आर्त अर्थार्थी दोघे सकाम । जिज्ञासु मुमुक्षु निष्काम । तिसरा ज्ञानी आत्माराम । त्रिविधांत ऐसे चतुर्विध. ॥ ९७४ ॥ सकामांत भेद दोनी । एक आर्त एक अर्थार्थी म्हणोनी । हे द्विविधही सकामभजनीं । द्विविध फळेंही पावती. ॥ ९७५ ॥ परि सकामही भजती मातें । अत्यंत सुकृती म्हणावें त्यांतें । कीं भजन माझें घडेना ज्यांतें । ते दुष्कृती पूर्वश्लोकीं निषेधिले. ॥ ९७६ ॥ त्या पुढिलिया श्लोकीं । सुकृती म्हणोनी बोलिलों कीं । सकाम

तेही सुकृती या लोकीं । जे भजती आपणातें. ॥ ९७७ ॥ आतां चतुर्विधांचा अर्थ । क्रमेंचि बोलिला यथार्थ । द्विविध सकामही कृतार्थ । भगवद्भक्त चौंमाजी. ॥ ९७८ ॥ पीडेस म्हणती आर्ती । ज्यास पीडा त्यास आर्त म्हणती । रोगादि पीडा ज्यास होती । आर्त म्हणावें तयाला. ॥ ९७९ ॥ 'आर्त'शब्द प्राकृतीं । उत्कंठेतें लोक बोलती । ज्यास उत्कंठा त्यास म्हणती । आर्त म्हणोनी. ॥ ९८० ॥ हा शब्द जाणावा प्राकृत । गीता वेदवाणी संस्कृत । संस्कृतें आर्त तो निश्चित । रोगादि पीडा जयाला. ॥ ९८१ ॥ गीतेंत म्हणतो भगवंत । जो रोगादि पीडेनें पीडिला अत्यंत । तो रोगादि पीडा हरू अनंत । म्हणूनि आर्त मज भजतो. ॥ ९८२ ॥ जिज्ञासु म्हणावें त्याला । कीं तत्त्व जाणावयाची इच्छा ज्याला । तो भजतो भक्तीनें मला । कीं मुकुंदा ! कळों दे हें तुझें तत्त्व. ॥ ९८३ ॥ हा तत्त्वजिज्ञासु निष्काम । आर्त बोलिला तो सकाम । आतां अर्थार्थी तो धनकाम । अर्थ धन अर्थी अपेक्षी जो त्यातें. ॥ ९८४ ॥ आर्त अर्थार्थी दोघे सकाम । अनिष्टनिवृत्ति इष्टप्राप्ति दोनी सकाम । आतां चतुर्थ आत्माराम । अपरोक्षानुभवसंपन्न. ॥ ९८५ ॥ भरत अर्जुनाचा पूर्वज । अर्जुन ज्याचा वंशज । 'भरतर्षभा !' म्हणूनि अधोक्षज । म्हणे त्यातें. ॥ ९८६ ॥ कीं भरतकुळ तुझें श्रेष्ठ । परि त्यांतही तूं वरिष्ठ । कीं भीष्मादि झाले मद्भक्तिनिष्ठ । परि गीता तुवांचि आइकिली. ॥ ९८७ ॥ गीतेंत हें निर्गुण गुह्य । मद्भक्ताचा श्रेष्ठत्वनिश्चय । हें आइकोनि मद्भक्त होय । धन्य तो स्ववंशांत. ॥ ९८८ ॥ तें गीतारहस्य तुजकारणें । मज लागलें प्रकट करणें । पुढें बहुतांतें तारणें । असे श्रवण पठण इचें करवूनी. ॥ ९८९ ॥ ऐसे चतुर्विध भक्त वर्णिले । त्रिविध पूर्वपक्ष हरिले । त्यांत भाव जे जे दाखविले । समजावे ते ते ये रीती. ॥ ९९० ॥ अगा ! मी मोक्षाचाच दाता निश्चित । कीं कांजी न पाजी जो पाजी अमृत । परि कांजीचाच याचक अत्यंत । त्यास काम्यफळ कांजीही पाजितों. ॥ ९९१ ॥ परंतु कांजीच ज्यापाशीं । तो मागितल्याही अमृत त्यासी । पाजूं शकेना ऐसियासी । ओळखी पडली कांजीनिमित्त. ॥ ९९२ ॥ मजपासूनी कांजी सांपडे । तरी ओळखी अमृतदातयासी पडे । मग मागतांचि प्राप्ति घडे । अन्यत्र अलभ्य अमृताचीही. ॥ ९९३ ॥ याकारणें पुण्य । जरी पदरीं असे अगण्य । सोडोनि इतर देवता कंटकारण्य । काम्यही कल्पतरूस मज जाण मागे. ॥ ९९४ ॥ काम्य नेदी हरी । म्हणूनि बोलते वैखरी । ते खरी नव्हे कीं ते खरी । मी सर्व देणार कल्पवृक्ष. ॥ ९९५ ॥ जाणों इच्छितो अद्वैत । त्याणें भजावें

भलतें दैवत । आणि मज थोर म्हणतां लागतें द्वैत । हेंही बोलणें मूर्खांचें. ॥ ५९६ ॥ जें भजावें दैवत । तें ब्रह्मचि निश्चित । तरी पशु पक्षी चांडाळपर्यंत । ब्रह्मत्व सम सर्वत्रही. ॥ ५९७ ॥ न भजोनि ऐसियातें । उत्तमत्वें भजावें देवातें । तेव्हां अंगीकारणें लागलेंचि यातें । उत्तम मध्यम कनिष्ठत्व. ॥ ५९८ ॥ तेव्हां टाकूनि सर्व देव । कां न सेवावा देवाधिदेव ? । तो थोर म्हणतां द्वैतभाव । कैसा लागतो ? ॥ ५९९ ॥ ब्रह्म सर्वत्र सम । परि उपाधि उत्तम मध्यमाधम । ईश्वरोपाधि एकचि सगुण ब्रह्म । जीवोपाधि इतर सर्वेही. ॥ ६०० ॥ लोखंडाची बेडी । लोखंडाचेच शस्त्रें तोडी । सर्व ब्रह्म परि माझीच गोडी । तत्त्व जाणों इच्छिती तयातें. ॥ ६०१ ॥ सर्वांहूनि उत्तमत्वें मातें । भजे आणि मज आधीं न देवतांतें । उपाधिभेदें मानी तयातें । द्वैतावलंब कां घडे ? ॥ ६०२ ॥ याकारणें सकाम । आणि जिज्ञासु निष्काम । मातें भजती आणि आत्माराम । ज्ञानीही मज सेविती. ॥ ६०३ ॥ ज्ञान जालियावरी । मज भजों नये तरी । गुरूसही त्याउपरी । भजों नये. ॥ ६०४ ॥ गुरूतें ईश्वरातें । ज्ञान जालिया भजे त्यातें । कांहीं प्रत्यवाय कीं त्याच्या मोक्षातें । विघ्न होणार. ॥ ६०५ ॥ इत्यादि मूर्खांचे पक्ष । छेदी एथें अंबुजाक्ष । चतुर्विध भक्त आपले दक्ष । जेव्हां वर्णिले या श्लोकीं. ॥ ६०६ ॥ आणि ज्ञानियाचें ज्ञान । तेंचि कोणी म्हणती भजन । ज्ञान असोनि येथें सगुणसेवन । गोफाटोनि नेती हा अर्थ. ॥ ६०७ ॥ तरी आर्तांचें आर्तपण । जिज्ञासूचें जिज्ञासुलक्षण । तैसें ज्ञानियाचें ज्ञान निर्गुण । सगुण भजन इतकियांसही. ॥ ६०८ ॥ एवं निर्गुणाचें ज्ञान । ज्यांस त्या पुरुषांसही सगुणभजन । हा सिद्धांत कमलनयन । बोलिला एथें. ॥ ६०९ ॥ चतुर्विध म्हणजे चौं प्रकारींचे । मातें भजती ऐसें स्ववाचे । बोलोनि विध चारीही त्यांचे । बोले त्यांत ज्ञानविध चतुर्थ. ॥ ६१० ॥ जे आत्माराम सिद्ध मुनी । साध्यांश कांहीं नसोनी । निर्निमित्त सगुणभजनीं । वर्तती हें श्रीभागवतीं सर्वत्र. ॥ ६११ ॥ हीं मागें जालीं निरूपणें । पुढें ऐसींच प्रकरणें । तेथें असेच हें बोलणें । असो ग्रंथ वाढेल बहु फार. ॥ ६१२ ॥ भक्त वर्णिले चतुर्विध । त्यांत ज्यास सर्वात्मबोध । तो ज्ञानी श्रेष्ठ ऐसा प्रबंध । श्लोकत्रयाचा एथूनी. ॥ ६१३ ॥ चतुर्विधांतही उत्तमपण । कां ज्ञानियास तरी त्यांचें लक्षण । आधीं बोलतो कमलेक्षण । या श्लोकीं. ॥ ६१४ ॥

**तेषां ज्ञानी नित्ययुक्त एकभक्तिर्विशिष्यते ।**
**प्रियो हि ज्ञानिनोऽत्यर्थमहं स च मम प्रियः ॥ १७ ॥**

अर्जुना! त्या इतकियांत । ज्ञानी श्रेष्ठ चतुर्विधांत । कीं भक्तिरहस्य गुह्य अत्यंत । ज्ञान त्या रहस्याचें तया असे. ॥ ६१५ ॥ भक्ति म्हणजे आवडी । ते खंडों नये एक घडी । ऐसी अत्यंत जे गोडी । ते कळली तयातें. ॥ ६१६ ॥ आवडी माझी तोच भक्त । जेंव्हां नावडी तेंव्हां अभक्त । ऐसा भक्त तो नित्य युक्त । कधीं न म्हणवे. ॥६१७॥ करितां ऐसा शोध । ज्यास सर्वात्मकत्वबोध । तो हें जाणे उरलें त्रिविध । ते या भक्तिरहस्यातें नेणती. ॥ ६१८ ॥ एक नित्ययुक्तत्व स्मृतीनें । एक नित्ययुक्तत्व प्रीतीनें । एथें नित्ययुक्तत्व मधुसूदनें । बोलिलें भक्तीकरूनि. ॥६१९॥ सर्वांहूनि आवडी । ते आवडी तुटेना एके घडी । आणि ज्याकरितां सर्वांची गोडी । तो प्रिय एक आत्माच आपला. ॥ ६२० ॥ पुत्र दारा आणि इतर । अथवा मी सर्वेश्वर । आवडी इतकी यांचीही नर । धरी एका आपणाचकारणें. ॥ ६२१ ॥ अपेक्षूनि आपलें कल्याण । ईश्वरातें भजे निपुण । मूर्ख तोही प्रयोजनावीण । कोणासही भजेना. ॥ ६२२ ॥ एवं ईश्वराहूनि । आपली आवडी म्हणोनि । भक्तिच न घडे भेदेंकरोनि । ईश्वराची. ॥ ६२३ ॥ आधीं म्हणावा भक्त । तेंव्हां तोचि नित्ययुक्त । अन्यथा अयुक्त युक्त हा विचार होतो प्रस्तुत । तें भक्तपणचि भेदें घडेना. ॥ ६२४ ॥ तोही आवडीकरोनी । तसा तरी भजतसे म्हणोनी । भक्त म्हणावा तरी मनीं । जोंवरी स्मृति तोंचि भक्त भलतसा. ॥ ६२५ ॥ देव न स्मरे जे क्षणीं । तेंव्हां प्रीति आपुलीच अंतःकरणीं । जे स्वप्रीति सप्रेम स्मरणीं । देवाचियाही. ॥ ६२६ ॥ कीं त्या देवाच्या प्रीतीचें कारण । हेंच कीं हो आपुलें कल्याण । तेंव्हां आवडीनें त्याचें स्मरण । आपल्याच आवडीनिमित्त. ॥ ६२७॥ तैसी स्फुरतां आपुली आवडी । न पडे त्याच्या प्रीतीची उडी । आवडीनें न स्मरे ते घडी । भक्तियुक्त नव्हे तो म्हणावा. ॥ ६२८ ॥ ज्ञानी आणि भक्त । तो कोणे क्षणीं न अयुक्त । ज्ञानी या चौघांत नित्ययुक्त । म्हणे श्रीकृष्ण या भावें. ॥ ६२९ ॥ निर्निमित्त आत्मा आपला प्रिय । तोचि परमात्मा निःसंशय । ऐसिया अनुभवें त्यासि होय । सिद्ध नित्ययुक्तत्व. ॥ ६३० ॥ नित्ययुक्तत्व भक्तीचें । घडों शके ज्ञानिया भक्तास साचें । नुसतिया ज्ञानियांसकैंचें । नित्ययुक्तत्व. ॥६३१॥ नुसत्या निर्गुणींच आसक्त । त्यास तों न म्हणवेच भक्त । तोही स्मृतीनें होऊं शके नित्ययुक्त । परी नित्यस्मृतियुक्तत्व साधेना. ॥ ६३२ ॥ उपासिती जे अव्यक्त । द्वादशी त्यांस न म्हणे भक्त । तेथें भक्तातेंचि नित्ययुक्त सततयुक्त । कृष्णार्जुन दोघेही बोलती. ॥ ६३३ ॥ तोंपर्यंत युक्तपण । कीं जों असे स्मरण । ज्ञानी झाला तरी खूण । न साधे तया.

॥ ६३४ ॥ कीं पक्क योगी जाला । तरी देहप्रारब्धाचा असे उरला । एके क्षणीं तरी त्याला । पडेलचि विस्मरण. ॥ ६३५ ॥ जों देह तों अवस्था । निद्रा न सुटे सर्वथा । ज्या क्षणीं सुषुप्ति तेव्हां कथा । आत्मस्मृतीची हे कैंची? ॥ ६३६ ॥ सुषुप्ति पडतां तत्काळ । बुद्धीस विस्मृति तितका काळ । नित्ययुक्तत्व फटकाळ । ज्ञानियास भक्तीवांचूनी. ॥ ६३७ ॥ ज्ञानी सगुणीं नसे अनुरक्त । तथापि आत्मप्रीतींत नित्ययुक्त । परी सगुणभक्ति उपेक्षितां नव्हे भक्त । नित्ययुक्तत्व मग कैंचें? ॥ ६३८ ॥ आतां आत्माच आपला । जरी ज्ञानी न स्मरे त्याला । तरी तो बोलिला । नित्ययुक्त. ॥ ६३९ ॥ ऐसें बोलती तेही वेडे । कीं चित्तेंचि आत्मप्रत्यय घडे । स्मृति घडे विस्मृति पडे । चित्तेंचिकरूनी. ॥ ६४० ॥ सुखदुःखांचा भोग । न चुके जों प्रारब्धयोग । क्षणभरी तरी वियोग । होय चिदात्मत्वस्मृतीचा. ॥ ६४१ ॥ प्रस्तुतीं भक्तिप्रकरण । भक्ति-प्रीति हेंचि भक्तीचें लक्षण । जों अप्रीतीचें नाहीं उठाण । तों प्रीति विघडली न म्हणवे. ॥६४२॥ जरी पडे विस्मृती । तरी नव्हे जों अप्रीति । तों विघडली न म्हणवे प्रीती । अप्रीतिखंडत्व प्रीतीचें. ॥ ६४३ ॥ स्मृतीचें खंडत्व विस्मृती । प्रीतीचें खंडत्व अप्रीती । अप्रियाची जों असे स्मृती । तोंवरी प्रिय तो तेंही न म्हणवे. ॥ ६४४ ॥ तैसी ज्याची प्रीती । त्याची पडली जरी विस्मृती । त्या विस्मृतीनें जाली अप्रीती । ऐसें न म्हणवे. ॥ ६४५ ॥ एवं या प्रकरणीं नित्ययुक्त । म्हणजे नित्य प्रीतियुक्त । आत्मत्वें भजतां नव्हे अयुक्त । कीं प्रीतिखंडत्व अप्रीति नसे आत्मत्वीं. ॥ ६४६ ॥ हे ज्ञानियाविना । खूण या तिघांतें कळेना । याकारणें अर्जुना ! । त्या चतुर्विधांत ज्ञानी नित्ययुक्त. ॥ ६४७ ॥ चतुर्विधांत याकारणें । ज्ञानी विशेषें बोलावा या गुणें । कीं खंडभक्तिदोष त्या निपुणें । टाकिला कळतां आत्मत्व. ॥ ६४८ ॥ भक्ति करूनि सर्वदा युक्त । तो या प्रसंगीं नित्ययुक्त । अत एव एकभक्तियुक्त । तो म्हणे ऐसें याचिपुढें. ॥ ६४९ ॥ कीं चराचर समूळ । जो परमात्मा सकळ । तो स्वआत्माच केवळ । जो प्रिय सदा कधीं विटेना. ॥ ६५० ॥ ऐशा भक्तीनें युक्त । तो भक्त म्हणावा नित्ययुक्त । याकारणें ज्ञानी आणि भक्त । विशिष्ट होतो तो चतुर्विधांत. ॥ ६५१ ॥ चौघांसही माझें भजन । परंतु ज्ञानियावेगळे त्रिविधजन । त्यांस नाहीं आत्मज्ञान । रहस्य नेणती भक्तीचें. ॥ ६५२ ॥ कीं मातें तयांचें चित्त । प्रिय मानी त्याच्या जीवानिमित्त । कीं आरोग्य मोक्ष अथवा वित्त । तिन्ही सुखाकारणें जिवांच्या. ॥ ६५३ ॥ आवडी आपली

आर्धीं । मग माझी तेही कधीं । नावडी होय जधीं । विलंब लागे फलप्राप्तीतें. ॥ १५४ ॥ क्षणांत रोग जावा । आर्त भजे धरूनि या भावा । विलंब होतां म्हणे अहा देवा! । कां न पावसी अद्यापि. ॥ १५५ ॥ देवांस भजलों उदंड । परि गळत चालिला पिंड । आरोग्याचें दिसेना तोंड। काय करूं? ॥ १५६ ॥ जेव्हां ऐसा तळमळी । तेव्हां अप्रीतीची उकले कळी । पुन्हा प्रीतीच्या लतेची मुळी । वाळों नेदी जळें भजनाचिया. ॥ १५७ ॥ इत्यादि करितां शोध । नसतां एक निजात्मबोध । नित्ययुक्तत्व एकभक्तित्व तें त्रिविध । आर्त जिज्ञासु अर्थार्थी नेणती. ॥ १५८ ॥ ज्ञानी जाणे ह्या कळा । यालागीं त्याहूनि आगळा । कीं आत्मज्ञानें जिव्हाळा । सांपडला माझ्या भक्तीचा. ॥ १५९ ॥ अगा! सर्वही मातें भजती । त्यांसही असेच माझी प्रीती । परि जैसी त्यांची तेचि रीती । प्रीति माझी त्यांवरी. ॥ १६० ॥ कीं कल्पवृक्षस्वभाव । मी देवाधिदेव । ज्यांचा जैसा आणि जितका भाव । तैसा तितका माझा त्यांवरी. ॥ १६१ ॥ ज्ञानियास अत्यंत मी प्रिय । कीं सर्वभूतीं आवडें मी अद्वय । आणि मी अनंत अव्यय । म्हणोनि प्रेमें मज अनुभवी. ॥ १६२ ॥ म्हणोनि अर्जुना! अत्यंत । प्रिय मज भक्त ज्ञानवंत। त्यावरी माझी प्रीति तीसही अंत । असेचिना. ॥ १६३ ॥ प्रेमदृष्टि त्याच्या अनंत । मी जेव्हां दिसतसें भगवंत । मग त्याची प्रीति तीस अंत । कैंवी दिसेल मजलाही? ॥ १६४ ॥ सर्वही मी म्हणोनी । भक्त मज पाहे ज्ञानी । उतराई होऊं काय देऊनी । भक्ता तया? ॥ १६५ ॥ इत्यादि भाव पोटीं । तों श्रीकृष्ण म्हणे शेवटीं । कीं त्यास अत्यर्थ प्रिय मी किरीटी! । प्रिय अत्यर्थ मज तो. ॥ १६६ ॥ ऐसी परस्पर प्रीती । वदतां हे भक्ति सगुणाचीच हे रीती । सूचवी येथें श्रीपती । कीं प्रीतिधर्म निर्धर्मीं असेचिना. ॥ १६७ ॥ आणि ध्यावेंचि निर्गुण । भक्तिप्रियत्व जेथें तें सगुण । यालागीं भक्तिनिपुण । सगुणाचीच करिती. ॥१६८॥ परंतु सगुणाचें तत्त्व । न कळे जों न जाणे निर्गुणत्व । यालागीं ज्ञानवंता भक्ताचें महत्त्व । विशेषें एथें वर्णिलें. ॥ १६९ ॥ आतां परस्परें प्रियत्व अत्यर्थ। म्हणे या अत्यर्थाचा अर्थ । विचारील त्यास समर्थ । उत्तीर्ण नव्हें मी ऐसें सूचवी. ॥ १७० ॥ प्रयोजनातें म्हणावें अर्थ । प्रयोजन अतिक्रमणें अत्यर्थ । हा शब्द दोंपरी समर्थ । दोहींकडे सूचवी. ॥ १७१ ॥ नसोनि कांहीं प्रयोजन । प्रीतियुक्त मजवरी मन । प्रिय अत्यर्थ मी जगजीवन । ऐशा भक्ता ज्ञानियातें. ॥ १७२ ॥ कीं नापेक्षीं भुक्ती । तेव्हां काय इच्छील तुच्छ मुक्ती । आत्मत्वें ऐसी माझी भक्ती । प्रिय अत्यर्थ मी ऐसा. ॥ १७३ ॥ आत्मा कळे

तोंचिवरी । मुक्तीच्या इच्छेनें भक्ति करी । मग ओंवाळूनि टाकी दुरी । मुमुक्षा मोक्षेच्छा मजवरूनी. ॥ ६७४ ॥ भक्तिरसीं चित्त लावी । तो मोक्षसुखास वांकुल्या दावी । आतां कोण्या निमित्तें वदावी । भक्ति त्याची ? ॥ ६७५ ॥ माझीच लागली गोडी । माझेचिठायीं आवडी । आत्मत्वें भजे न सोडी । पाय माझे. ॥ ६७६ ॥ प्रिय अत्यर्थ मी ऐसा । निर्निमित्त भक्तीचा ठसा । परि येऊं देऊं मी कैसा । गर्भवासास ऐसियातें ? ॥ ६७७ ॥ कैवल्य देऊं जरी । आवडी त्याची भक्तीवरी । म्हणूनि वैकुंठनगरीं । स्वयें मी होतों त्याकारणें. ॥ ६७८ ॥ प्रलयकालीं ह्या मूर्ति नसती । तैसी मुक्तांसह वैकुंठाकृती । जैशा ह्या मूर्ति उमटती । प्रगटे मुक्तांसहित वैकुंठ. ॥ ६७९ ॥ देऊनि अपुनरावृत्तिगती[1] । ऋणी त्याचा मी मागुती । देऊनि वैकुंठीं स्वसंगती । उत्तीर्ण नव्हें. ॥ ६८० ॥ अगा ! मज मारावया आली । ते मुक्तिपदास पूतना नेली, । अघाबकादिकांस गति दिधली । सगळेंचि गिळिलें जिहीं मज. ॥ ६८१ ॥ द्वेषें भयें मत्सरें कितीएक । शिशुपाळ कंस पौंड्रक । वैरें मारिले अनेक । मुक्ति त्यांसही म्यां दिधली. ॥ ६८२ ॥ ज्ञानी भक्त ऐसा । मोक्ष त्यासही देऊनि तैसा । उत्तीर्ण होऊं मी कैसा । भक्तवत्सल ? ॥ ६८३ ॥ पाहतां परम पुरुषार्थ । तो त्यास देऊनिही अर्थ । उत्तीर्ण नव्हे मी समर्थ । प्रिय अत्यर्थ मज ऐसा. ॥ ६८४ ॥ कीं परम पुरुषार्थ दिधला । परि तो अर्थ देऊनिही मला । अर्थ दिधलासा नाहीं वाटला । प्रिय अत्यर्थ मज ऐसा. ॥ ६८५ ॥ भक्त ऐसा ज्ञानी । वर्णितां अर्जुन कांहीं मनीं । झणीं शंकेल म्हणोनी । यापुढें श्लोक प्रवर्तला. ॥ ६८६ ॥ कीं प्रिय ऐसा अत्यर्थ । तेव्हां ते तिघे काय व्यर्थ । ऐसें झणीं मनीं मानील पार्थ । म्हणूनि बोलतो हा श्लोक. ॥ ६८७ ॥

**उदाराः सर्व एवैते ज्ञानी त्वात्मैव मे मतम् ।**
**आस्थितः स हि युक्तात्मा मामेवानुत्तमां गतिम् ॥ १८ ॥**

अगा ! हे सर्वही उदार । उदार म्हणजे उत्कृष्ट फार । कीं होतां सुकृतें अपार । मातें भजों लागले. ॥ ६८८ ॥ मी चंद्र ते चकोर । मी मेघ ते मयूर । सर्वांहूनि थोर । कीं सर्वोत्तमातें भजती. ॥ ६८९ ॥ त्यांत कोणी सकाम । ते क्षण न लगतां होती अकाम । ज्ञान पावोनि आत्माराम । मोक्ष निश्चयें तेही पावती. ॥ ६९० ॥ आर्त गजेंद्र नक्रें धरिला । त्याणें धांवा माझाच केला । म्यां त्यांस मोक्षही दिधला । सोडवूनि नक्रातें. ॥ ६९१ ॥ मज गो-

१. पुनर्जन्म नाहीं अशी गति देऊन.

पिका कामेंचि भजल्या । माझ्या सौंदर्यावरीच रिझल्या । सुरतलालसेनेंचि भिजल्या । माझिया प्रेमरसें. ॥ ६९२ ॥ रासक्रीडाप्रसंगीं । मज लंपट मानोनि रतिरंगीं । गोपिकांहीं कांहीं अंतरंगीं । गर्व केला. ॥ ६९३ ॥ म्हणोनि पावलों अंतर्धान । तों वियोगें अतिशय घडलें ध्यान । मद्रूप जालिया नृत्य गायन । करूनि खेळोनि लीला माझिया. ॥ ६९४ ॥ मी अक्रूरसंगें । मथुरेस गेलों त्या प्रसंगें । विरहें ध्यातां अंतरंगें । वेड्याच जाल्या. ॥ ६९५ ॥ त्या मजकारणें सकामा । परंतु मज वाटल्या निष्कामा । कीं मूर्ति माझ्या विश्वाभिरामा । परमहंसासही आवडती. ॥ ६९६ ॥ म्हणोनि आत्मज्ञानकळा । आणि आत्मयोगरीती सकळा । मी उद्धवमुखें बोधोनि अबळा । कुरुक्षेत्रीं स्वमुखेंही बोधिल्या. ॥ ६९७ ॥ बाळ होऊनि मजला । पदाकारणें शरण आला। ध्रुवपद दिधलें मी त्याला । परम पदचि ज्यातें याउपरी. ॥ ६९८ ॥ एवं अर्जुना! जो मजला । कोण्या निमित्तें जरी भजला । तो मोक्षातेंचि पावला । सहज महिमा हाचि माझा. ॥ ६९९ ॥ रांधावया अन्न नर । पेटवी जरी वैश्वानर । तरी सीततमभयहर । होणार निश्चयें तो. ॥ ७०० ॥ शाक रांधूनि पाला । दिव्य औषधीचा भक्षिला । तोही दावीच गुण आपुला । मी तों सर्वोत्तम सर्वेश देवाधिदेव. ॥ ७०१ ॥ जरी सकाम भजती । तरी मोक्षातें पावती । कीं क्षण न लगतां होती । निष्कामही. ॥ ७०२ ॥ अमृतफळाचा वेल । लावूनि निघतांच तोडी फूल । तें न तोडी तेव्हांच अमोल । अमृतफळ तो वेल दे तयातें. ॥ ७०३ ॥ विषवल्लीचें पुष्पफल । सर्वही अनर्थमूळ। अंगणीं अमृतफलवेल केवळ । धन्य तो होय न तोडितांच पुष्पातें. ॥ ७०४ ॥ मोक्षफल काम्य फूल । दोन्ही देणार मद्भजनवेल । काम्यफळ न इच्छितांच होईल । मोक्ष मद्भजनशीळातें. ॥ ७०५ ॥ रायाचे पोटीं उपजला । बाळपणीं राज्य न लगे त्याला । तरुणपणीं न अपेक्षितां जाला । आयता सार्वभौम. ॥ ७०६ ॥ दरिद्र्याचा बाळ । बाळपणींही फटकाळ । आला तरुणपणाचा काळ । तरी काय देणार तो बाप त्या पुत्रातें. ॥ ७०७ ॥ एवं सकामही भजे मला । तरी मनीं धरितांचि मोक्ष त्याला । इतर देवतोपासकाला । मुक्ति नसेच मुक्तिही फटकाळ. ॥ ७०८ ॥ अनेक रीति मृत्युपरिहार । हिरण्यकशिपु मागे वर । चुकवूनि तितके प्रकार । नृसिंहें नखें सांजे द्वारीं अंकीं विदारिला. ॥ ७०९ ॥ ऐसे ब्रह्मादिकांचे वर । आणि सकामही जे मत्पर । अढळपद पावूनि परात्पर । कैवल्यपदही पावले. ॥ ७१० ॥ एवं सकामही मत्पर । ते सर्वही उदार । म्हणूनि इत्यादि भावें सर्वेश्वर । ते त्रिविधही श्रेष्ठ

बोलिला. ॥ ७११ ॥ ते त्रिविधही उदार । परंतु ज्ञानियाचा बडिवार । अत्यंत तो वारंवार । बोलावासाच वाटे अगणितत्वें. ॥ ७१२ ॥ म्हणूनि म्हणे हरी । कीं ते त्रिविधही उदार परी । नये ज्ञानिया भक्ताची सरी । कीं तो आत्माच केवळ. ॥ ७१३ ॥ लोकांसारिखा तोही । प्रारब्धें वर्ततां दिसे देहीं । म्हणूनि महिमा त्याचा कांहीं । नेणती लोक नेणते. ॥ ७१४ ॥ परी आईक माझें मत । कीं माझिया मतें निश्चित । तो आत्माच अद्वय सर्वगत । अगा अर्जुना! ॥ ७१५ ॥ जन आपणासारिखा । ते मानिती यालागीं आणिका । महिमा त्याचा न कळे एका । मजवांचूनीं. ॥ ७१६ ॥ म्हणूनि म्हणे माझें मत । कीं तो आत्माच निश्चित । ज्ञानी भक्त यालागीं अत्यंत । त्या सर्वश्रेष्ठा त्रिविधापरीसही. ॥ ७१७ ॥ ऐसा ज्ञानी आत्माच निखळ । म्हणतां वाटलें शंकास्थळ । कीं आत्मा नेणें तोही केवळ । आत्माच असे. ॥ ७१८ ॥ अज्ञानें आत्मा नव्हे साच केला । ज्ञान होतांच आत्माच जाला । ह्मणीं अर्जुनादिकां श्रोतयांला । वाटे ऐसें. ॥ ७१९ ॥ आतां अविवेंकरूनी । देहास जो तो आत्माच मानी । यानें आत्मा ओळखिला म्हणोनी । आत्मा म्हणावा. ॥ ७२० ॥ तरी आत्मा कळोनिही । चित्त आत्मत्वीं योजिलें नाहीं । त्यास वाटेच देहीं । आत्मता पूर्वसंस्कारें. ॥ ७२१ ॥ तोही आत्मा म्हणोनि । न म्हणवे जरी आत्मज्ञानी । सदा दृढ अभ्यासेंकरूनी । मोडी देहात्मता तोचि आत्मा. ॥ ७२२ ॥ चित्त सर्वदा स्मरे आत्मा । तो म्हणावा युक्तात्मा । म्हणूनि म्हणे श्रीकृष्ण परमात्मा । कीं तो युक्तात्मा आत्मा म्हणतो यास्तव. ॥ ७२३ ॥ युक्तात्मा म्हणतां ये रीती । असे निर्गुणोपासकातेंही हे स्थिती । ज्ञानी आणि सगुणभक्त असती । महिमा त्यांचा ये स्थळीं. ॥ ७२४ ॥ म्हणूनि म्हणतो देव । कीं **'आस्थितः स हि युक्तात्मा मामेव'** । म्हणजे मी जो देवाधिदेव । तो युक्तात्मा या मातेंचि भजतो ॥ ७२५ ॥ निर्गुणयोगींही युक्त । तो युक्तात्मा आणि अनुरक्त । मज सगुणीं म्हणूनि मद्भक्त । दाखवूनि ऐसीं दोन्हीं बोलिला. ॥ ७२६ ॥ कीं योग योजीत असोनी । भक्त सगुणातें समग्रत्वें जाणे म्हणोनी । तूंही जाण ऐसें अध्यायादिश्लोकें करूनी । अर्जुनातें अपरा प्रकृति बोलिला. ॥ ७२७ ॥ ये स्थळीं ते दोन्ही प्रकार । भक्ताचे सांगे सर्वेश्वर । कीं जो मी सगुण साकार । त्या मातें युक्तात्मा तो भजतसे. ॥ ७२८ ॥ एवं युक्तात्मा होऊनी । मातेंचि भजे म्हणोनी । ते त्रिविध थोर परि त्यांहूनी । हा थोर कीं आत्माच हा. ॥ ७२९ ॥ चतुर्विंधांत हा ज्ञानी । केवळ आत्माच युक्तात्मा म्हणोनी । थोरपण तेव्हां इतकियाचवरूनी । आतां सगुणभजनीं

विशेष काय? ॥ ७३० ॥ ऐसें पुसेल येथें श्रोता। म्हणूनि थोरपण जें तत्त्वता। तें स्पष्ट येथें अनंता । बोलणें लागलें. ॥ ७३१ ॥ कीं भक्तीचेंचि त्यास कोड । भक्तीपुढें मुक्तीही न वाटे गोड । ऐसें निर्निमित्त प्रेम अवघड । नसे निर्गुणोपासकां. ॥ ७३२ ॥ पूर्वीं भक्तमहिमा देव । बोलतां निघाला जरी हा भाव । तें स्पष्ट आतां देवाधिदेव । येथें चतुर्थचरणीं बोलतो. ॥ ७३३ ॥

चतुर्थचरण—**'मामेवानुत्तमां गतिम् ।'**

येथें **'मामेव'** म्हणोनी । या **'एव'**शब्दें करूनी । मातेंचि भजतो यावरूनी । न भजे इतरां हें दिसे. ॥ ७३४ ॥ तरी हे निपट पलीकडे । या वेगळें त्रिविध त्यांसही घडे । कीं न पाहोनि इतरांकडे । मज भजती उदार यालागीं. ॥ ७३५ ॥ येथें **'एव'**शब्दाचा हा अर्थ । कीं मोक्षानिमित्तही तो कृतार्थ । मज न भजे यथार्थ । मातेंचि भजे म्हणतो म्हणोनी. ॥ ७३६ ॥ बंध मिथ्या जैसा । मोक्षही लटिकाचि तैसा । मजहूनि तो त्यास कैसा । आवडेल. ॥ ७३७ ॥ आवडी मुख्य मोक्षाकडे । तदर्थ ईश्वर आवडे । त्यास भक्त म्हणती ते वेडे । तो भक्त आपुल्या मोक्षाचा. ॥ ७३८ ॥ उदरार्थ सेवा नृपाची । ते उदरसेवा राजसेवा नव्हे साची । एवं मोक्षार्थ नव्हे सेवा याची । केवळ मातेंचि हा भजतो. ॥ ७३९ ॥ हा अर्थ न दिसे विशद । म्हणूनि **'अनुत्तमां गतिम्'** ऐसें गोविंद । म्हणे कीं माझ्या भक्तीचाच त्यास आनंद । गति उत्तम न मानी मजहूनी. ॥ ७४० ॥ न परते जेथूनि मागुती । तेचि एक म्हणावी गती । इतर गति तितक्या दुर्गती । कीं च्यवतां दुःख तें चुकेना. ॥ ७४१ ॥ परम गति मुक्ति ऐसी । तेही मजहूनि उत्तम तयासी । न वाटे कीं जयासी । गोड त्याहूनि मी वाटें. ॥ ७४२ ॥ ज्या मजहूनि उत्तम गती । वस्तुता नाहीं तो मी अनुत्तमगती । त्या मातेंचि तो भजे सुमती । त्याचें थोरपण त्या करितां. ॥ ७४३ ॥ पहिली होती जरी मुमुक्षा । सर्वात्मभक्ति त्या दक्षा । गोड वाटतां मग मोक्षा । न अपेक्षी ऐसा जो थोर. ॥ ७४४ ॥ मोक्षाकारणेंच तोंड वासी । न भजे मज सगुण सर्वेश्वरासी । त्या निर्गुणमात्र उपासकासी । सरी कैसी याची येणार? ॥ ७४५ ॥ प्रथम दोघांसही मुमुक्षा । दोघे भजती अंबुजाक्षा । ज्ञान होतां सगुणभजनपक्षा । एकें सोडिलें. ॥ ७४६ ॥ एकें ज्ञान होऊनिही । सगुणभजन सोडिलें नाहीं । तो भक्ति गोड लागतां कांहीं । चाड मोक्षाचीही धरीना. ॥ ७४७ ॥ दोघांसही

मोक्ष । परि निर्गुणोपासका बहुत सापेक्ष । यास गोड अंबुजाक्ष । नलगे म्हणे मोक्षसिद्धी. ॥ ७४८ ॥ काकुळतीनें दरिद्री जन । दातया मागती भोजन । प्रार्थूनि आणिले महाजन । तेंचि तेही जेविती. ॥ ७४९ ॥ अन्न दोघांचें समान । परि महाजनां अधिक सन्मान । ऐसा मोक्षसुखनिधान । सम निर्गुणोपासकां आणि भक्तां ॥ ७५० ॥ एवं चतुर्विध भक्तही थोर । त्यांत ज्ञानी भक्त थोर फार । तो कां तरी ऐसा विचार । त्याच्या थोरपणाचा वर्णिला. ॥७५१॥ ज्ञान होऊनि केवळ । सगुणभक्ति ऐसी प्रांजळ । तो दुर्लभ कीं बहुत जन्मफळ । ऐसें म्हणतसे या श्लोकीं. ॥ ७५२ ॥

**बहूनां जन्मनामंते ज्ञानवान्मां प्रपद्यते ।**
**वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः ॥ १९ ॥**

पुण्यें करितां जन्म कोटी । ज्ञानेच्छा उपजे पोटीं । त्या ज्ञानसाधनीं अगा किरीटी ! । लोटती बहुत जन्म. ॥ ७५३ ॥ ऐशाही बहुत जन्माचिया । अंतीं अगा धनंजया ! । ज्ञान होऊनि जया । भक्ति माझी ॥ ७५४ ॥ तो दुर्लभ अत्यंत । कीं मी ईश्वरेश्वर भगवंत । त्या मज भजतो ज्ञानवंत । सर्व मी वासुदेव म्हणोनि. ॥ ७५५ ॥ सर्वभूतीं माझा वास । तो मी वासुदेव जगन्निवास । इतका अनुभव जयास । तोचि तो ज्ञानी दुर्लभ. ॥ ७५६ ॥ ज्यामाजी सर्व भूतांचा वास । ज्यांत सर्व भूतें तो जगन्निवास । वासुदेव परि भूताकार भास । ते तों माया. ॥ ७५७ ॥ तेव्हां वासुदेव सकळ । हें नेणे जो ज्ञानीच केवळ । ज्ञानी आणि भक्ति पुष्कळ । तो वासुदेव सर्व हें जाणे. ॥ ७५८ ॥ कीं माया आणि निर्गुण । दोन्ही मिळोनि सगुण । तो साक्षी सर्वज्ञ निपुण । विश्वरूपें आपणातें कल्पितो. ॥ ७५९ ॥ हें नुसता ज्ञानी तोही जाणे । परि सगुण भजनावीण हें न बाणे । ईश्वररूपें भक्त शहाणे । पाहती विश्व. ॥ ७६० ॥ यांत काय भजावें काय न भजावें । काय ध्यावें काय त्यजावें । भास मिथ्यात्व कां वर्जावें । सर्वेही वासुदेव. ॥ ७६१ ॥ होऊनि नाना आकार । निर्गुणीं न लागे कांहीं विकार । इतकियाच कारणें विचार । कळला असावा मायेचा. ॥ ७६२ ॥ तथापि तो शक्त ते शक्ती । तो अव्यक्त ते त्याची व्यक्ती । ऐसें चित्तीं धरोनि भक्ती । करी सर्व वासुदेव म्हणोनी. ॥ ७६३ ॥ आपण आणि भजन आपलें । देखिलें आणि न देखिलें न ऐकिलें । सगुण निर्गुण सकळ एकलें ।

**वा**सुदेवाख्य तत्त्व जो पाहे. ॥ ७६४ ॥ आणि **वा**सुदेवचि सर्व म्हणे । कीं जगत्कारण **वा**सुदेवचि ऐसें जाणे । कीं ज्याच्या प्रसादें बाणे । सर्वेही तो म्हणोनी. ॥ ७६५ ॥ निर्गुणोपासकाचा भाव । **'सर्व खलु ब्रह्मैव'** । हा म्हणे सर्व **वा**सुदेव । जो सर्वसाक्षी सर्व कल्पितो. ॥ ७६६ ॥ निर्गुण आणि सगुण । दोन्ही जगत्कारण । इतर देवतांस कार्यपण । कारणत्व नसे. ॥७६७॥ म्हणतां सर्व कनक । अलंकार न उरे कोणी एक । मुद्रिका नव्हे मुकुटकुंडलादिक । सर्व मुद्रिका म्हणतांही. ॥ ७६८ ॥ ऐसा भजो तो महात्मा । म्हणोनि म्हणे **कृ**ष्ण परमात्मा । कीं महाथोर त्याचा आत्मा । आत्मा म्हणावें चित्तातें. ॥ ७६९ ॥ महाथोर साक्षी परमेश्वर । चित्त तन्मय ज्याचें तो नर । महात्मा म्हणावा कीं सविस्तर । विश्व **वा**सुदेवरूपें जो पाहे. ॥ ७७० ॥ ज्याच्या मतें जगत्कारण । एक **श्री**कांत **ना**रायण । इतर देवतांतें कार्यपण । जाणे जरी कार्यें पाहे कारणत्वें. ॥ ७७१ ॥ जो भजे जें दैवत । तो तेंचि म्हणे सर्व निश्चित । शाब्दिकत्व त्याचें अद्वैत । महात्मा सुदुर्लभ तो न म्हणवे. ॥ ७७२ ॥ सर्व देवता एक । कीं सकळ अलंकार कनक । परि मुद्रिका मागतां किरीटादिक । न ये हाता तयाच्या. ॥ ७७३ ॥ जो मागे एक कनक । तो पावे मुकुटकुंडलादिक । भजतां **वा**सुदेव एक । सर्वेही देव **वा**सुदेव. ॥ ७७४ ॥ तोचि जगत्कारण **वा**सुदेव । बाप ज्याचा **व**सुदेव । तो उपदेशितो स्वयमेव । विश्ववंद्य हे **गी**ता. ॥ ७७५ ॥ असो तें आतां ऐसा तो दुर्लभ । म्हणोनि म्हणे **श्री**वल्लभ । कीं भाग्यें ज्यांस जाला सुलभ । ते त्यावेगळे न उरती. ॥ ७७६ ॥ तो दुर्लभचि मागुती । कीं कोणास न कळे ज्याची स्थिती । त्यास त्यांची कळली गती । कीं तोचि जे जाले. ॥ ७७७ ॥ भेटी त्यांच्या शरीराची न घडे । हें बोलणें अलीकडे । कीं **ज**नकादिकीं पर्वतकडे । सेविले नसती. ॥ ७७८ ॥ कोणीं प्रारब्धें वनीं । कोणी प्रारब्धें जनीं । एवं देह न दिसे नयनीं । दुर्लभत्व ऐसें न म्हणवे. ॥ ७७९ ॥ सुशब्दें शोभनपण । म्हणिजे दुर्लभत्वाचा चांगला गुण । कीं सुलभ ज्यास त्यास आपण । करूनि मागुती दुर्लभ. ॥ ७८० ॥ कीं तो कोणास भेटलाच नाहीं । देह भेटला तरी तितकाही । साडेतीन हातांच्या देही देहीं । अगा! तो नव्हे कीं तो अनंत जगदात्मा. ॥ ७८१ ॥ तो स्वयें सर्वेही परी । कळे तरी जरी अनुग्रह करी । अनुग्रह करितां नुरे उरी । वेगळेपणाची. ॥ ७८२ ॥ एवं जो त्या सुखांत मिळाला । तोही स्वयें तोचि जाला । पुन्हा दुर्लभ होऊनि उरला । तो जगीं. ॥ ७८३ ॥ ऐसें जें दुर्लभत्व । त्यास ऐसें सुदुर्लभत्व । कीं दुर्लभत्व

देऊनिही सुलभत्व । परि तें दुर्लभत्व बहु बरें. ॥७८४॥ सुदुर्लभत्वीं हा भाव । येथें दावी देवाधिदेव । कीं त्याचें हें वैभव । संत शिष्य त्याचेचि जाणती. ॥ ७८५ ॥ एवं ज्ञानाविण । न कळे भक्तीची खूण । आणि तैशा भक्तांस जें थोरपण । तें नसे नुसतिया ज्ञानियातें. ॥ ७८६ ॥ आणि इतर उपासक जन । त्यांत ज्यांस हरीचेंचि भजन । ते थोर त्यांतही सर्वात्मकज्ञान । ते भक्त थोर अत्यंत. ॥ ७८७ ॥ आणि जे दुष्कृती । ते हरीतें न भजती । जे अनेक जन्म सुकृती । तेचि भजती मुकुंदातें. ॥ ७८८ ॥ ऐसा सिद्धांत जाला । कीं भगवंत ते दुष्कृती म्हणोनि बोलिला । आणि सुकृति म्हणोनि बोलता जाला । आपणास भजती तयातें. ॥ ७८९ ॥ आणि हरिभजनहीन जो मानव । तो बोलिला कीं असुरभाव । तेव्हां उपास्य ज्यांस देवाधिदेव । ते दैवी संपत्तीचे हें सूचविलें. ॥ ७९० ॥ स्पष्ट ऐसें बोलिला । तों संदेह कांहीं प्राप्त जाला । म्हणूनि येथें आरंभिला । आणखी श्लोक. ॥ ७९१ ॥ तो संदेह ये रीती । कीं जरी दुष्कृती हरीतें भजती । तरी वेद शास्त्र पुराणें होती । सर्वेही निरर्थक. ॥ ७९२ ॥ कीं वेद शास्त्रें पुराणें । प्रवर्तलीं याच कारणें । कीं स्वहित इच्छिती तिहीं करणें । भजन मुक्तिप्रदा मुकुंदाचें. ॥ ७९३ ॥ शुद्ध होऊनि सज्जनीं । नित्य नैमित्तिक सावधानी । संध्योपासना प्रतिदिनीं । करा म्हणोनि वेद म्हणे. ॥ ७९४ ॥

**श्रुति—त्रीणि पदा विचक्रमे विष्णुर्गोपा अदाभ्यः ।**
**अतो धर्माणि धारयन् । विष्णोः कर्माणि पश्यत ।**

श्रुति म्हणे तीन्ही भुवनें स्वचरणें । श्रीविष्णूनें आक्रमिलीं याकारणें । या विष्णूचे धर्म धरणें । धर्म धरूनि पाहणें कर्में तयाचीं. ॥७९५॥ 'गोपा' म्हणूनि श्रुती । म्हणते येथें जनांप्रती । 'गो' शब्दें इंद्रियें जे पाळिती । 'गोप' शब्दें ते घ्यावे. ॥ ७९६ ॥ कीं इंद्रियांचविण । न भजवे ब्रह्म सगुण । इतर साधन गुण । न लगती कांहीं. ॥ ७९७ ॥ असलिया वित्त । वित्तशाठ्य लागेल या निमित्त । वेंचावें मुख्य इंद्रियें चित्त । यावांचूनि न घडे सगुणभजन. ॥ ७९८ ॥ म्हणूनि इंद्रियवंतांप्रती । अरे गोप हो! म्हणे श्रुती । कीं भजनसाधनें ज्यांस असती । ते तुम्ही हे आज्ञा वेदाची आइका. ॥ ७९९ ॥ कीं जे बधिर असती । काय हें सांगोनि त्यांप्रती । एवं जे हें न आयकती । बधिरही तेचि जाणावे. ॥ ८०० ॥ असो ते अरे गोप हो धर्म । विष्णुचे धरूनि विष्णूचें कर्म ।

पाहा म्हणूनि सांगे वर्म । वेद हिताचें जनाचिया. ॥ ८०१ ॥ **विष्णूचे** धर्म धरा । म्हणजे त्याची उपासना करा । कीं त्याचीं कर्में त्याच्या उपासनापरा । गोड वाटती तैसीं इतर न वाटती. ॥ ८०२ ॥ असो श्रुत्यर्थाचे चमत्कार । हें विधिवाक्य एतत्प्रकार । यावरूनि जाला निर्धार । कीं **विष्णुच** हा भजावा. ॥ ८०३ ॥ इतरदेवताभजन । करा म्हणूनि वेदवचन । न देखती नेत्र अथवा कान । न आइकती जनांचे. ॥ ८०४ ॥ कोठें वेदीं **'यजामहे'** । कोठें वेदीं **'भजामहे'** । पाहतां यजन भजन शब्द हे । उपासकांचे. ॥ ८०५ ॥ कोठें **'विद्महे, धीमही'** । जप करणारांचे बोलतेही । एवं वेद आपणाहूनि कांहीं । कोणास भजा ऐसें न म्हणती. ॥ ८०६ ॥ **'यजामहे'** म्हणजे यजूं आम्हीं । **'भजामहे'** म्हणजे भजों आम्हीं । परि अरे गोप हो तुम्ही । भजा ऐसें येथेंचि वेद बोले. ॥ ८०७ ॥ भजा म्हणे श्रुती । त्यास विधिवाक्य म्हणती । एवं च वेदाज्ञा नसे ये रीती । भजा आणिका अमकियातें म्हणूनी. ॥ ८०८ ॥ आज्ञा वेदांची ये रीती । स्मरतां श्रुत्यर्थ जाल्या स्मृती । आणि श्रुतिविरुद्ध स्मृति दिसती । तेथें श्रुति प्रमाण स्मृति म्हणे. ॥ ८०९ ॥

स्मृति—**'श्रुतिस्मृतिविरोधे तु श्रुतिरेव बलीयसी ।'**

एक पक्ष बोले श्रुती । त्यासी विरुद्ध असली स्मृती । तेथें ऋषी बलवंत बोलती । श्रुतीतें. ॥ ८१० ॥ याकारणें श्रुती । **विष्णुभजन** जैसें बोलती । ऐशाच बोलती स्मृती । विरुद्धपक्षीं श्रुति बोले तें साच. ॥ ८११ ॥ हा भजनविषयीं श्रुतिस्मृतिविचार । वरकड महिमा वर्णोत अपार । आकारमात्रीं जें निराकार । त्यास लक्षूनि महिमा बोलती. ॥ ८१२ ॥ सद्वस्तु एक निर्विकार । तेचि कल्पूनि नानाकार । श्रुति ऋषि बोलती ऐसा निर्धार । श्रुतिच बोलती. ॥ ८१३ ॥

श्रुति—**'एकं संतं बहुधा कल्पयंति ।'**

आणखी श्रुति—**'एकं सद्विप्रा बहुधा वदंति ।**
**यमं अग्निं मातरिश्वानमाहुः ।'**

सद्वस्तु एक । नानारूपीं नामें अनेक । विप्र बोलती **व्या**सादिक । अग्नि यम वायु इत्यादि. ॥ ८१४ ॥ हा श्रुतिस्मृतिनिर्णय । परी भजनविधीचा निश्चय । **विष्णु**भजनींच सिद्धांत होय । श्रेष्ठ सत्त्वोपाधि मुक्तिप्रद म्हणोनी. ॥ ८१५ ॥ हा श्रुतिस्मृतिविचार सारा । आतां इतिहासपुराणांचा पसारा ।

ज्या पुराणाच्या अंगीं जो वारा । तें पुराण सांगे भजन त्याचेंचि. ॥ ८१६ ॥ शेवटीं पुराणें सकळ । विचार हाचि वदती प्रांजळ । कीं सत्त्वोपाधि निर्मळ । मोक्ष भजनें तयाच्या. ॥ ८१७ ॥ आणि या इतिहासपुराणांत । वेद पांचवा महाभारत । तेथें व्यास सत्यवतीसुत । ऐसें बोले. ॥ ८१८ ॥ कीं जें येथें भारताभीतरी । तेंचि असे पुराणांतरीं । येथें न वदे जे वैखरी । तें कोठेंचि नाहीं. ॥ ८१९ ॥

**व्यासवाक्य—'यदिहास्ति तदन्यत्र यन्नेहास्ति न तत्क्वचित् ।'**

कीं जें येथें असे । तेंचि सर्वत्र वसे । आणि जें येथें नसे । तें नसे कोठेंही. ॥ ८२० ॥ त्या या महाभारतीं । सर्वत्र ऐसीच व्यासभारती । या विष्णुमहिमाश्रवणें उभारती । रोमांच देहीं संतांच्या. ॥ ८२१ ॥ तत्रापि उपनिषद्वाणी । मथूनि आपण चक्रपाणी । परमहंसाच्या सुखाची खाणी । ते परमहंससंहिता गीता बोलतो. ॥ ८२२ ॥ जो सिद्धांत एथें समर्थ । बोलेल तोचि अर्थ । वेदीं भारतीं पुराणीं यथार्थ । अन्यथा असेल तो अन्यथाचि. ॥ ८२३ ॥ सकळ शास्त्रें ये रीतीं । भगवद्भजन मुख्यत्वें बोलती । ऐसें असोनि जे दुष्कृती । ते न भजती मुकुंदातें. ॥ ८२४ ॥ म्हणूनि एथें संशय । कीं तरी शास्त्रांचा प्रताप काय । कीं तें वाचूनि आइकोनिही पाय । न धरीती जगद्गुरू श्रीपतीचे. ॥ ८२५ ॥ आतां म्हणावें ये रीती । कीं जे वेद शास्त्र पुराणें नेणती । ते हा महिमा काय जाणती । तरी वाचिलें पढलें तेंही असे. ॥ ८२६ ॥ ते पंडित म्हणावे दुष्कृती । तरी वेद शास्त्र पुराणें वांया जाती । तेव्हां जे असतील सुकृती । ते सुकृतेंच भजतील कां शास्त्र? ॥ ८२७ ॥ कीं शास्त्र असे तें समर्थ । तरी दुष्कृतियांसही मानतां अर्थ । सुकृतचि समर्थ तरी किमर्थ । प्रवृत्ति वेदशास्त्रादिकांची. ॥ ८२८ ॥ अथवा पुण्याचकारणें । प्रवर्तोत वेद शास्त्र पुराणें । विष्णुभक्ति सर्वाधिक्यपणें । व्यर्थ बोलती ॥ ८२९ ॥ या संशयाचें हें स्थळ । तत्परिहारार्थ मेघनीळ । शास्त्र समर्थूनि प्रांजळ । हेतु बोलतो अभजनीं या श्लोकीं. ॥ ८३० ॥

**कामैस्तैस्तैर्हृतज्ञानाः प्रपद्यंतेऽन्यदेवताः ।**
**तं तं नियममास्थाय प्रकृत्या नियताः स्वया ॥ २० ॥**

अगा! वेदशास्त्रांचें प्रयोजन । कीं श्रवणपठणें द्यावें ज्ञान । मग सुकृती होती सज्ञान । हृतज्ञान होती दुष्कृती. ॥ ८३१ ॥ म्हणूनि जे हृतज्ञान जन । ते न करिती माझें भजन । जो मी एक भवभंजन । आत्मा दैवत परमहंसांचें.

॥ ८३२ ॥ शास्त्र जनांचा मायबाप । ज्ञान देणें हा त्याचा प्रताप । परी उभें राहोनि पाप । करी हृतज्ञान. ॥ ८३३ ॥ पाहोनि बरवा पती । मायबापें कन्या उजविती । परी ते वंध्या सुत तीतें न होती । पूर्वपापें. ॥ ८३४ ॥ दाता देऊं जाणे धन । मूर्ख करूं नेणे जतन । कोणी तें धनसाधन । करिती नरकदुर्गतीचें. ॥ ८३५ ॥ करी किंबहुना पर्जन्य । सर्वा जगासही धन्य । परि ऊखर भूमीस धान्य । अथवा तृणही कोठें उपजेना. ॥ ८३६ ॥ आतां शास्त्रें दिधलें ज्ञान । आणि पूर्वपापें केलें हृतज्ञान । ऐसें म्हणतांही मन । साशंक होतें श्रोतया जनाचें. ॥ ८३७ ॥ कीं वेदीं शास्त्रीं भरले । आणि ते अध्ययन नाहीं विसरले । तेही कैसे घसरले । श्रुतिशिखरापासूनी. ॥ ८३८ ॥ ऐशा शंकेचें स्थळ । म्हणूनि म्हणे मेघनीळ । कीं ज्ञान असोनिही खळ । हृतज्ञान ते जाले. ॥ ८३९ ॥ कीं अन्यदेवतांच्या कामना । गोड लागल्या ज्याच्या मना । त्या त्या कामीं त्यांच्या ज्ञाना । हरूनि नेलें. ॥ ८४० ॥ त्या देवतांचें भजन । त्या भजनाचें विधिविधान । कळों लागलें तेंचि ज्ञान । सार सर्व विद्यांचें मानिती. ॥ ८४१ ॥ नियम जे जे ज्या ज्या भजनीं । फलप्रद ते ते मानूनी । उक्त प्रकारें अनुष्ठूनी । भजती अन्य देवतांतें. ॥ ८४२ ॥ असोनिही ज्ञान । जाले कैसे हृतज्ञान । तरी ते ऐसें म्हणूनि समाधान । केलें जरी. ॥ ८४३ ॥ तरी उरलीच शंका कांहीं । कीं मोक्षासमान फळ नाहीं । आणि ऐसा मोक्ष तोही । न दे कोणी विना मुकुंद. ॥ ८४४ ॥ वेद वेदांत वाखाणिती । ते तों हे गोष्टी जाणती । ऐसें असोनी बुद्धि नेणती । कैसी जाली म्हणावी. ॥ ८४५ ॥ ऐसेंही असोनी ज्ञान । कैसें जालें हृतज्ञान । तरी ऐसें म्हणूनि समाधान । चतुर्थचरणीं करीतसे. ॥ ८४६ ॥

चतुर्थ चरण—**'प्रकृत्या नियताः स्वया ।'**

अगा ! ज्याची जे नैसर्गिक मती । ती त्याची म्हणावी स्वप्रकृती । कीं सोडितांही न सुटती । सहज स्वभाव. ॥ ८४७ ॥ धुतां वस्त्रांचा मळ सुटे । परी बिबव्याचा डाग न फिटे । तैसा नैसर्गिक स्वभाव न सुटे । सच्छास्त्र सत्संगें करूनिही. ॥ ८४८ ॥ ऐशिया नैसर्गिका मती । त्या म्हणाव्या स्वप्रकृती । कीं आत्मा वाटे अहंकृती । ते त्या रंगें रंगले अत्यंत. ॥ ८४९ ॥ जो ज्याचा स्वभाव । त्यास तो मी म्हणोन वाटे भाव । यालागीं म्हणे देवाधिदेव । **'प्रकृत्या नियताः स्वया'** म्हणोनी ॥ ८५० ॥ कीं जे नैसर्गिक मती । ते त्याची स्वप्रकृती । त्या प्रकृतीनें नियोजिले असती । सकामभजनीं इतर दे-

वांच्या. ॥ ८५१ ॥ त्या देवतांचे नियम । नाना व्रतें उद्यापनें संभ्रम । करितां गोड वाटती परम । बळें नैसर्गिक स्वभावाच्या. ॥ ८५२ ॥ कामचि वाटे पुरुषार्थ । मोक्षप्रसंग म्हणती व्यर्थ । कीं विषयभोगाचे पदार्थ । मोक्षांत कैंचे ? ॥ ८५३ ॥ कोणी म्हणती मोक्ष । एक शुक पावला दक्ष । **'शुको मुक्तः'** म्हणोनि प्रत्यक्ष । प्रमाण दाविती येविषयीं. ॥ ८५४ ॥ अरे! शुकचि जाला मुक्त । तरी जनक काय अमुक्त । वेदांत वाचूनि क्षुद्र देवतासक्त । गोष्टी ऐशा बोलती. ॥ ८५५ ॥ प्रारब्ध जनकाचें विचित्र । शुक प्रारब्धदेह मात्र । म्हणोनि बोले कोठें शास्त्र । **'शुको मुक्तः'** म्हणोनी. ॥ ८५६ ॥ घड कापिला केळाचा । निष्फळ वृक्ष कदलीचा । भोग सरोनि तैसा शुकाचा । देह उरला भक्तीकारणें. ॥ ८५७ ॥ मुक्त जनकही देही विदेही । परी सुखदुःख भोगी देहीं । मुक्त होऊनि कांहीं । जीवदशेतें जो स्पर्शे. ॥ ८५८ ॥ पूर्वी बोलिला हा विचार । याच टीकेंत वारंवार । एवं **'शुको मुक्तः'** याचा प्रकार । ऐसा ते काय जाणती ? ॥ ८५९ ॥ कोणी म्हणती वेद । उगाच बोलतो अर्थवाद । वेदांतवाचा वाच्य परी अभेद । कैंचा कोणीं देखिला ? ॥ ८६० ॥ स्वभाव नैसर्गिक ऐसे । मुक्तिपदास ते भजती कैसे ? । शास्त्रें वाचूनिही न दिसे । विष्णुभजन मुख्यत्वें. ॥ ८६१ ॥ बाईल वाटे गोड । तो सासूचें पुरवी कोड । मुक्तीची नलगे ते झोड । कां भजती मातें मुकुंदातें ? ॥ ८६२ ॥ एवं शास्त्रें दिलें ज्ञान । परी कामें केलें हृतज्ञान । या श्लोकीं समाधान । हें करी. ॥ ८६३ ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञ लोक । परिसोत आधीं. ॥ ८६४ ॥ शास्त्रज्ञही जाले मूढ । कां म्हणोनि हे शंका गूढ । ते हरूनि केलें दृढ । समाधान आम्हां अर्जुनादिकांचें. ॥ ८६५ ॥ तों आणीक उठली शंका । कीं या जगदात्मया शेषपर्यंका । इतर देवता श्रीवत्सांका । कां वेगळ्या वाटती. ॥ ८६६ ॥ आणि कोण्या एका प्रसंगें । जरी वेगळीं मानिलीं आपलीं अंगें । तरी सर्वां जनांतें या श्रीरंगें । कां स्वभजनींच योजूं नये ? ॥८६७॥ ऐसें संदेहाचें स्थळ । जाणोनियां नवमेघनीळ । समाधान याचें प्रांजळ । करीतसे आतां या श्लोकीं. ॥ ८६८ ॥

**यो यो यां यां तनुं भक्तः श्रद्धयार्चितुमिच्छति ।**
**तस्य तस्याचलां श्रद्धां तामेव विदधाम्यहम् ॥ २१ ॥**

अगा! देवतांतरें । माझींच सर्वेही शरीरें । परी ज्या तनूतें जो आदरें । भक्त

होऊनि पूजूं इच्छितो. ॥ ८६९ ॥ त्या त्यास श्रद्धा अचळ । त्या त्या तनूच्या ठायीं केवळ । तेंचि देतों मी जगन्मंगल । अगा अर्जुना! ॥ ८७० ॥ कीं कल्पवृक्षस्वभाव । मी स्वयें देवाधिदेव । जो सद्बुद्धि मागेल मानव । त्यातेंचि देतों. ॥ ८७१ ॥ जे ऐसें न प्रार्थिती । जरी मी वर्तवीत असतों त्यांच्या मती । तरी विषमफलप्राप्ति कां होती । सर्वां जनां ? ॥ ८७२ ॥ विषमफळें तों दिसती । एक दरिद्री एक भूपती । जरी कर्मीं मी प्रेरित असतों जगत्पती । तरी हे विषमता लागतीच मजलाही. ॥ ८७३ ॥ पंचमाध्यायांत मी चक्रपाणी । बोलिलों कीं, **'न कर्तृत्वं न कर्माणि । लोकस्य सृजति प्रभुः'** इत्यादि वाणी । कीं कर्म करविता मी नव्हें. ॥ ८७४ ॥ परि माझ्या सत्तेंकरूनी । बुद्धींद्रियें चळती म्हणोनी । तेच अचळ श्रद्धा देतों ऐसें यावरूनी । मी बोलतों. ॥ ८७५ ॥ कीं ज्याचा जैसा भाव । त्याचा प्रकाशक मी स्वयमेव । म्हणोनि ज्यास जो आवडे देव । ते श्रद्धा मीच देतों म्हणतसें. ॥ ८७६ ॥ बरें वाईट फळ । हे तों प्रारब्धाचेच खेळ । त्याची श्रद्धा अचळ । त्या प्रसंगें ते होते. ॥ ८७७ ॥ कांहीं होतां कल्याण । त्या भजनाचा मानी सफळ गुण । वाईट होतां आपण । कांहीं चुकला तें स्मरे. ॥ ८७८ ॥ दोहितां दुभतें लात हाणे । तें त्या देवें केलें हेंचि जाणे । आतां धरूं अनसूट[1] म्हणे । त्याच्या वारीं आणि नवरात्रीं. ॥ ८७९ ॥ तो त्याच्या नांवें करी नवस । परि मीच तेथें असें जगन्निवास । प्रारब्ध त्याचें फळतां त्यास । देवपण मी कां न दाखवूं ? ॥ ८८० ॥ जे वारीं तो चुके भक्त । दूध दिसे आरक्त । अहो! पहा दुधाचें रक्त । देवें केलें तो म्हणे. ॥ ८८१ ॥ देव वाटे हा खरा । आतां नलगे म्हणे देव दुसरा । शरण मी महिषासुरा । जो सद्यः प्रचीत दावितो. ॥ ८८२ ॥ तों तों श्रद्धा अचळ । ते अवघे माझेच खेळ । त्याच्या प्रारब्धाचें त्यास फळ । देऊनि वाढवी ते श्रद्धा. ॥ ८८३ ॥ कीं तेंचि दुभतें मरों बैसे जयीं । लोळे त्याच देवतेचे पायीं । न वांचे तरी त्याचे ठायीं । अभक्ति न धरी म्हणे कपाळ. ॥ ८८४ ॥ प्रतीति येतां कांहीं । तेथून मन विटत नाहीं । मी अचळ श्रद्धा देतों तेही । इत्यादि रीती. ॥ ८८५ ॥ एवं देवतांतरें । तींही अगा! माझींच शरीरें । आणि जें जयाच्या अंगीं वारें । तेंचि अचळ मी करितों. ॥ ८८६ ॥ तेंचि त्यास वाटे परम । मी बुद्धिभेद न करीं सम । त्यातें मुरडितां मी विषम । होतों म्हणोनि हें न करीं. ॥ ८८७ ॥ परि त्या

---

१. देवासाठीं वगैरे काढून बाजूस ठेवलेलें, उपयोगांत न आणलेलें.

रूपें भजन । माझें आणि फलप्रदान । मीच करितों ऐसें कमलनयन । बोल-तसे या श्लोकीं. ॥ ८८८ ॥

**स तया श्रद्धया युक्तस्तस्याराधनमीहते ।**
**लभते च ततः कामान्मयैव विहितान्हितान् ॥ २२ ॥**

त्या देवतांचा भक्त । त्या माझ्याच रूपीं जो आसक्त । तो ते श्रद्धेंकरूनि युक्त । जे मीच अचळ करितों बोलिलों. ॥ ८८९ ॥ त्या श्रद्धेंकरूनि तो । आराधन त्याचें करितो । आणि त्यापासूनि फळ पावतो । तेंही मीच देतसें. ॥ ८९० ॥ कृष्णसंग अपेक्षित । म्हणूनि देवी कात्यायनीचें व्रत । गोपी क-रिती अत्यंत । श्रद्धेंकरूनी. ॥ ८९१ ॥ शेवटीं द्यावया वर । शुद्ध सत्त्वोपाधि सर्वेश्वर । आपण येऊनि हा विचार । स्पष्ट तेव्हां दाखवी. ॥ ८९२ ॥ कीं करितां देवताभजन । फलप्रद मीच भवभंजन । म्हणूनि वर दे जगज्जीवन । आपण स्वयें गोपीतें. ॥ ८९३ ॥ परि मागुती अत्यंत । त्यांतें विरहदुःख दे भगवंत । कीं अन्यरूपीं मी अनंत । नश्वर फळेंचि देतसें. ॥ ८९४ ॥ या कारणें भगवंत । मी पूज्य फलप्रद ऐसें येथपर्यंत । तत्त्व बोलोनि तें फळ अंतवंत । म्हणूनि म्हणतो आतां या श्लोकीं. ॥ ८९५ ॥

**अंतवत्तु फलं तेषां तद्भवत्यल्पमेधसाम् ।**
**देवान्देवयजो यांति मद्भक्ता यांति मामपि ॥ २३ ॥**

अन्यदेवतारूपें मातें । जे भजती तयांतें । मीच देतसें फळातें । सकळ-फलदाता सर्वेश्वर. ॥ ८९६ ॥ परि तें फल अंतवंत । त्यास होतें नाशवंत । कीं विष्णुरूपेंचि मी भगवंत । नित्य फळ मोक्ष देतसें. ॥ ८९७ ॥ अगा! ते अल्पबुद्धी । कीं ज्यांपासूनि न घडे मोक्षसिद्धी । काम्यफलाची तेही समृद्धी । जे न करिती भजती ते तयातें. ॥ ८९८ ॥ माझेच ते रूपभेद । श्रेष्ठत्वेंही वर्णिती वेद । परि त्यास भजतां संसारखेद । न तुटे कधीं. ॥८९९॥ कीं एकाच पुरुषाचा देह । कर चरण नेत्र कर्ण निःसंदेह । परि साधकें त्याचा धरावा स्नेह । साधे स्वकार्य ज्या अंगें. ॥ ९०० ॥ जें घडावें करेंकरूनी । तो गुडघा करील म्हणोनी । राहे गुडघाच धरूनी । तरि हस्तसाध्य कार्य केंवि घडे? ॥ ९०१ ॥ या लागीं अल्पबुद्धी । कीं सत्त्वो-पाधि भजनें सत्त्वशुद्धी । रजतमाचीच होते वृद्धी । रजतमप्रधाना जो भजे. ॥ ९०२ ॥ आत्मत्वें मीच सारा । मीच गुणत्रयाचा पसारा । परि मीच ना-शितों दुःखसंसारा । स्वसत्त्वोपाधींकरूनी. ॥ ९०३ ॥ लोखंडाचीच बेडी ।

लोखंडाचेंच शस्त्र तोडी। अल्पबुद्धि ते न धरी आवडी। मुक्तिप्रदा माझ्या सत्त्वरूपाची. ॥ ९०४ ॥ मीचि स्वयें निर्गुण । आणि जरी मीच त्रिगुण। परि मुक्ति देणें हें समर्थपण। शुद्ध सत्त्वीं. ॥ ९०५ ॥ एकचि असता गुण। तरि समान असतें समर्थपण। भेद नसोनिही विलक्षण। सामर्थ्यें जालीं गुणत्रयांचीं. ॥ ९०६ ॥ मीच जालों सर्व देव। मीच जालों देवाधिदेव। परि ज्या रूपीं ज्याचा भाव। तो तदनुरूप फळ पावे. ॥ ९०७ ॥ म्हणूनि ज्या देवातें यजिती। ते त्याचि देवातें पावती। मद्भक्तही मजप्रती येती। तैसेच. ॥ ९०८ ॥ मीच स्वयें देव। आणि मीच स्वयें देवाधिदेव। द्विविध गति ही स्वयमेव। मीच असें. ॥ ९०९ ॥ देवास पावोनि पुनरावृत्ती। मातें पावती ते न परतती। पाहतां दोन्ही गती। मागुती मीच असें. ॥ ९१० ॥ परंतु नाशवंत। ते देव ते लोक पावती अंत। मी अनंत प्राप्तीही अनंत। माझी अगा! ॥ ९११ ॥ या लागीं अंतवंत। फळ त्यांस कीं अत्यंत। अल्पबुद्धि कीं जो मी अनंत। त्या मातेंचि ते न भजती. ॥ ९१२ ॥ आतां यानंतर श्लोक। तो कां बोले उत्तमश्लोक। त्याचें निमित्त सुज्ञलोक। परिसोत आधीं. ॥९१३॥ इतर देवतातें भजती। ते मूढ अल्पमती। कीं अंतवंत फळें पावती। हें पूर्वश्लोकीं बोलिला. ॥ ९१४ ॥ कीं आपण अनंत। फळ देतों त्यासही नसे अंत। इत्यादि पूर्वश्लोकपर्यंत। सिद्ध जालें. ॥ ९१५ ॥ कितीएकांस एथें संदेह। कीं देवासारिखा यासही देह। देह तेथें समूह। गुणत्रयाचा. ॥९१६॥ कीं तमोगुणावांचूनी। आकार न दिसे लोचनीं। आणि इंद्रियें रजोगुण म्हणोनी। रजोगुणग्राह्यत्वही दिसतें. ॥ ९१७ ॥ जेव्हां हा देह पावला। इतर देवांसमान जाला। श्रेष्ठ देवांहूनि याला। कोण्या गुणें मानावें? ॥ ९१८ ॥ आतां ईश्वर जो श्रेष्ठ अत्यंत। त्याचे अवतार स्वेच्छाकल्पित। ऐसें म्हणावें तरी निश्चित। त्रिगुणही तोचि कल्पितो. ॥ ९१९ ॥ एवं जो देह पावला। तो सर्वांसमान जाला। थोर तोच कीं ज्याला। देह नसे असे निराकार. ॥९२०॥ ऐसें संदेहाचें स्थळ। ऐशा गोष्टी बोलती खळ। हा पूर्वपक्षही मेघनीळ। हरितो आतां या श्लोकें. ॥ ९२१ ॥

**अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यंते मामबुद्धयः।**
**परं भावमजानंतो ममाव्ययमनुत्तमम्॥ २४॥**

मी जो अव्यक्त निराकार। तो व्यक्ति पावलों म्हणजे पावलों शरीर। म्हणूनि जे बुद्धिहीन नर। ते मज ऐसें मानिती. ॥ ९२२ ॥ इतकाच पूर्वा-

र्थाचा अर्थ । परि आकार पावला हें तों यथार्थ । ऐसें बोलती त्यांतें व्यर्थ । बुद्धिहीन कां म्हणावें? ॥ ९२३ ॥ व्यक्ती नाहीं पावला । तरी कोण ऐसें बोलिला । वदन वाणी नसे ज्याला । तो कैसा गीता हे उपदेशितो? ॥ ९२४ ॥ आतां कर्मानुबद्धजीव । त्यासारिखा नव्हे हा देहभाव । अर्थ ऐसा करावा तरी देव । तैसेंचि बोलता. ॥ ९२५ ॥ कीं जीवासारिखी व्यक्ति पावला । बुद्धिहीन ऐसें म्हणती मला । ऐसें श्रीकृष्ण असता बोलिला । तरी घडता अर्थ ऐसाही. ॥ ९२६ ॥ मी अव्यक्त त्या मला । अबुद्धि म्हणती व्यक्ति पावला । श्रीकृष्ण ये रीती वदला । अर्थ याचा तो नव्हे. ॥ ९२७ ॥ आतां व्यक्ति पावला तें असत्य । तरी जीवांचे देह काय सत्य । ते कर्मे देह पावले अगत्य । हा लीलाविग्रह पावला. ॥ ९२८ ॥ अव्यक्त पावला व्यक्तीतें । काय दोष या गोष्टीतें । अबुद्धि म्हणोनी भगवंतें । ते कां निंदिले? ॥ ९२९ ॥ आपला प्रभाव नेणती । आणि व्यक्ति पावला ऐसें म्हणती । उत्तरार्धावरोनी ये रीती । जरी अर्थ याचा बोलावा. ॥ ९३० ॥ कीं जे नेणती प्रभाव । त्यांचे दृष्टी प्राकृत मानव । तरी मानव भलता देहभाव । पावलाच असे. ॥ ९३१ ॥ हा परमात्मा ऐसें नेणती । आणि मनुष्य साधारण ऐसें म्हणती । या दोषासि नसे गणती । गान्हाणें काय याच गोष्टीचें. ॥ ९३२ ॥ कीं अव्यक्ता मला । अबुद्धि म्हणती व्यक्ति पावला । हा परमेश्वर असें कळेना ज्यांला । ते व्यक्ति पावला म्हणती हेंही घडेना. ॥ ९३३ ॥ व्यक्ति पावला अर्जुन, । व्यक्ति पावला धर्मनंदन, । व्यक्ति पावला दुर्योधन । ऐसें कोणी न म्हणती. ॥ ९३४॥ ज्यांच्या दृष्टीस माधव । दिसे प्राकृत मानव । ते हा कृष्ण एक यादव । इतकेंचि म्हणती. ॥ ९३५ ॥ व्यक्ति पावला वसुदेव । हेंही कोणी न म्हणती मानव । ते व्यक्ति पावला वासुदेव । कां म्हणती? ॥ ९३६ ॥ या कारणें भलतसा । अर्थ करितां अनर्थ ऐसा । आतां अर्थ बोलावा कैसा । तो आयका श्रोते हो! ॥ ९३७ ॥ व्यक्ति पावती जीव । व्यक्तिच पावतो देव । मत्स्यादिरूपें देवदेव । जो अवतरतो प्रतियुगीं. ॥ ९३८ ॥ द्विविध देहही असत्य । ज्या प्रकाशें प्रकाशती तो सत्य । प्रत्यक्षीं अगत्य । परप्रकाश्य मिथ्या मानावें. ॥ ९३९ ॥ तंतु सत्य मिथ्या पट । माती सत्य मिथ्या घट । तंतु माती यांकडे पाहतां निपट । पट घट धुंडितां न सांपडे. ॥ ९४० ॥ तंतु असोनि बाळ नेणे । परि पासोडी म्हणोनि जाणे । तैसा देह सत्य म्हणे । जीव अज्ञानें करूनी. ॥ ९४१ ॥ शुद्धसत्त्व विद्यामय । मत्स्यकूर्मादि अवतार ऐसा निर्णय । देह दिसोनिही त्या सत्त्वीं निश्चय । चित्स्वरूपें आत्माचि म्हणूनि. ॥ ९४२ ॥

जीवांचे कर्मज देह तेही । देह न वाटती ज्यास कांहीं । त्यास अवतारीं देहाची भावनाही । नसे हें म्हणावेंचि लागेना. ॥ ९४३ ॥ एवं मत्स्यादिअवतार । हे देह ऐसें नेणे ईश्वर। अज्ञानें जीव पामर। देह म्हणूनि देहातें जाणती. ॥ ९४४ ॥ जे देह म्हणूनि जाणती । तेचि म्हणावे कीं देहातें पावती । देह म्हणोनि नेणे तो कोणे रीती । देहातें पावला म्हणावा. ॥ ९४५ ॥ जो हार म्हणोनि जाणे । तो काय त्यास सर्प म्हणे । सर्पत्व ज्यांच्या दृष्टीस बाणे । ते आपणासम त्यातें मानिती. ॥ ९४६ ॥ हारास सर्पत्वें नयन । देखती तेचि दृष्टिहीन । हारचि देखे तो स्वसमान । ते मानिती. ॥ ९४७ ॥ तैसे बुद्धिहीन नर । सत्य जाणोनि पावले शरीर । तैसेच मत्स्यादि अवतार । मी देह पावलों ते म्हणती. ॥ ९४८ ॥ जे समयीं कृष्णावतार । त्याकाळीं जे पामर नर । ते ऐसें म्हणूनि सर्वेश्वर । न निंदी तयांतें. ॥ ९४९ ॥ जे कृष्ण मनुष्य ऐसें जाणती । ते हा अव्यक्त व्यक्ति पावला म्हणती । व्यक्ति पावोनी सर्व असती। तैसाच कृष्ण वाटे तयांतें. ॥ ९५० ॥ एवं जे दुष्कृती हीं शास्त्रें पाहती । तेथें सर्वा देवांसही श्रुती । ब्रह्मभावें थोर म्हणती । व्यक्ति चतुर्मुखादिक त्याचिया. ॥ ९५१ ॥ त्यांत ज्याचे नानावतार । तोही क्षीराब्धिकन्येचा वर । देह धरितो तेव्हां ब्रह्मादि सुर । तैसाच हा. ॥ ९५२ ॥ आणि आपणास देह जैसे । साच वाटती मजही तैसे । वाटत असतील म्हणूनि ऐसें । मीं व्यक्तीतें पावलों ते म्हणती. ॥ ९५३ ॥ इंद्रादिकांचें शरीर । तैसे माझे अवतार । मानूनि बुद्धिहीन नर । भजती इतर देवतांतें. ॥ ९५४ ॥ म्हणती जें निराकार। तेंचि सर्वांत थोर । तो विष्णु म्हणावा तरी अवतार । व्यक्ति नाना तो पावतो. ॥ ९५५ ॥ व्यक्ति पावतो म्हणती । त्यांस अबुद्धि म्हणे श्रीपती । कीं माझी देहप्राप्ति ते पाहती । आपणासमान. ॥ ९५६ ॥ सत्य वाटे शरीर । तरी शरीर पावलों म्हणे नर । तैसे मी पावतों आकार । ऐसें मानिती. ॥ ९५७ ॥ आणि अवलंबूनि सर्वज्ञपण । म्हणती आकार तितुका त्रिगुण । द्रव्यशक्ति तमोगुण । तीवीण खूण शुद्धसत्त्वीं न दिसे आकृतीची ? ॥ ९५८ ॥ हे शुद्धसत्त्वाची कल्पना । अवतारमूर्ति नाना । ऐसें बोलतां त्रिगुणरचना । काय कल्पना त्याची न म्हणावी. ॥ ९५९ ॥ एवं च जैसी त्रिगुणरचना । तैसीच अवतारशरीरकल्पना । ऐसें साधूनि नाना । कुयुक्ति बोलती. ॥ ९६० ॥ पूर्वपक्षसीमा येथवरी । सिद्धांत तयाचा याउपरी । पूर्वपक्ष हरूनि श्रीहरी । बोलतो उत्तरार्धें श्लोकाचिया. ॥ ९६१ ॥

उत्तरार्ध—**परंभावमजानंतो ममाव्ययमनुत्तमम् ।**

माझा परमभाव । जो अत्यंत थोर प्रभाव । अवघा हरि ऐसें वैभव । ते नेणती. ॥ ९६२ ॥ अव्यय म्हणजे ज्यास नाश नसे । अनुत्तम म्हणजे उत्तम ज्यापरीस न दिसे । ऐसा प्रभाव माझा समरसे । अवतारव्यक्तिरूपें करूनी. ॥ ९६३ ॥ ऐसा माझा परंभाव । म्हणजे थोर प्रभाव । जो अविद्या नासोनि जीव । ब्रह्मचि करी. ॥ ९६४ ॥ ते त्या प्रभावातें नेणती । त्रिगुण व्यक्ति पावला म्हणती । त्रिगुण कल्पनेसमान गणिती । दिव्य अवतार व्यक्ति माझिया. ॥ ९६५ ॥ प्रभाव नेणती म्हणे । यांत सुज्ञ याचें समाधान जाणे । कीं निंदेनेंचि तोंड त्याचें घाणे । प्रभाव विष्णुव्यक्तीचा नेणतां. ॥ ९६६ ॥ कीं त्रिगुण ही ईश्वरकल्पना । आणि कल्पनाच अवतार नाना । महिमा नेणोनि हा [१]नाना । ते करिती. ॥ ९६७ ॥ कीं कल्पनाच जीवांची अविद्या । आणि कल्पनाच अविद्यानाशिनी विद्या । भवरोगा आणि भवरोगवैद्या । सम मानिती प्रभाव न कळोनी. ॥ ९६८ ॥ कल्पनाच दुःख । आणि कल्पनाच दुःखनाशक सुख । दोन्ही सम म्हणती मूर्ख । महिमा ऐसा न कळोनी. ॥ ९६९ ॥ कल्पिली त्रिगुणसृष्टी । कीं हे सत्य वाटावी जीवदृष्टी । कांहीं सुखी कांहीं कष्टी । कर्मानुरूप होती ते जीव. ॥ ९७० ॥ जीवदृष्टी अनुसरोनी । हे सृष्टि कल्पिली म्हणोनी । अहंकार भूतें इंद्रियें होऊनी । त्रिगुण मोहिती जीवातें. ॥ ९७१ ॥ त्रिगुणें जीव मोहती । त्रिविध कर्में आचरती । त्रिविध गति पावती । अनादि गुणप्रवाह हा ऐसा. ॥ ९७२ ॥ हे अनादि माया । तिच्या पोटीं कल्पना या । ते शुद्धसत्त्वरूपिणी गुणत्रया । जीवांकारणें कल्पिती. ॥ ९७३ ॥ तिचींच रूपें दोनी । आपण ब्रह्म म्हणोनी । असे अखंडानंदानुभवें करूनी । तो ईश्वरोपाधि सर्वसाक्षी सर्वज्ञ. ॥ ९७४ ॥ परंतु तीस सत्ता नसे । ब्रह्मींच ईश्वरत्व दिसे । आपणास आपण अनुभवीतसे । मायें करूनि म्हणावें. ॥ ९७५ ॥ काष्ठादियोगें अग्नि दिसे । मायायोगें ब्रह्म उल्लसे । एवं च ईश्वरत्व ब्रह्मीं असे । परंतु मायायोगें करूनी. ॥ ९७६ ॥ ते सृष्टि स्थिति संहार । ब्रह्मीं प्रवेशे प्रलयानंतर । तेव्हां योगनिद्रा करी ईश्वर । वेद ऐसें बोलती. ॥ ९७७ ॥ प्रतिदिनीं असत्य पाणी । [२]दिसे असे प्रवेशे किरणीं । तैसी माया निघे असे प्रवेशे निर्गुणीं । अनादि मायाप्रवाह ये रीतीचा. ॥ ९७८ ॥ जरी नाशतेंचि निर्गुण । तरी मोडता प्रवाह न होते गुण । यालागीं सृष्टि कल्पूनि आपण । सम सदय

१. गाणें, वाग्जल्प. २. दृष्ट होई.

सगुण नव्हे विषम निर्दय. ॥ ९७९ ॥ हे मायाकल्पना समूळ । परी आपण ब्रह्म हा अनुभव केवळ । ज्या मायेंकरूनी ते निखळ । शुद्ध माया म्हणावी. ॥ ९८० ॥ जेथूनि उठे कल्पना । ते हे त्रिगुणसृष्टिरचना। तेथें संकल्प ऐसा कीं हें विश्व नाना । जीव कर्मफळ भोगावया. ॥ ९८१ ॥ अविद्याबंधप्रवाह जैसा । अनादि विद्याप्रवाहही तैसा । कळे विचार ज्यांस ऐसा । ते अवतार त्रिगुण कां म्हणती? ॥ ९८२ ॥ जीवास मोह करीती । म्हणूनि त्रिगुण कल्पिले ये रीती । ते त्रिगुणचि होती। पंचभूतें आणि इंद्रियें अहंकार. ॥९८३॥ त्यांत कल्पिला सत्त्वगुण । सहज त्याचें निर्मळपण । परि रज तम सहज आपण । मलिन तत्संगें मलिन सत्त्वही. ॥ ९८४ ॥ ईश्वरें त्या सत्त्वाचें करावें शुद्ध । तेव्हां ब्रह्मविद्येनें होय प्रबुद्ध । कल्पूनियां संकल्पें प्रसिद्ध । केले अवतार आपले. ॥ ९८५ ॥ कल्पनाच जरी अवतार । तो न म्हणवे त्रिगुणविकार। प्रभाव अव्यय अनुत्तम याचा विचार । तो ऐसा नेणती. ॥ ९८६ ॥ जे म्हणती हरी। मत्स्यादि व्यक्ति पावला तरी । देवांस त्यास समता सरी । देह साम्यें करूनी. ॥ ९८७ ॥ जोचि मी निराकार । तोचि मी साकार । सोनें आणि अलंकार । कोण वेगळे म्हणों शके? ॥ ९८८ ॥ ऐसीच सर्वही सृष्टी । परि कल्पिली लक्षूनि जीवदृष्टी । ते देह साच मानूनि कष्टी । होती पावती देह ऐसें. ॥ ९८९ ॥ व्यक्ति पावले म्हणावें त्याला । तैसें न म्हणवे अर्जुना! मला । आणि व्यक्ति पावला । अबुद्धि बुद्धिहीन ऐसें म्हणती. ॥ ९९० ॥ थोर मानूनि निराकार । उपेक्षिती माझे आकार । दिव्य माझे जे अवतार । ते त्रिगुण पांचभौतिक मानिती. ॥ ९९१ ॥ श्लोकार्थ ऐसा सिद्ध जाला । तों प्रश्नावकाश येथें देखिला । कीं अवतार दिव्यत्वें ऐसें जनाला । कां न कळे? ॥ ९९२ ॥ जे गुणत्रयावेगळे । अवतार सर्वांहूनि आगळे । त्या सर्वांचे देखती डोळे । आणि कां न कळे हा महिमा? ॥ ९९३ ॥ या प्रश्नाचें हें स्थळ । जों अर्जुन पुसे तों प्रांजळ। स्वयें आपण घननीळ। बोलतो या श्लोकीं.॥९९४॥

**नाहं प्रकाशः सर्वस्य योगमायासमावृतः ।**
**मूढोऽयं नाभिजानाति लोको मामजमव्ययम् ॥ २५ ॥**

ज्या सामर्थ्यें मी जगीं वसें । तैसाच अवताररूपी असें । परी जनदृष्टी प्रगट न दिसें । झांकलों योगमायेंकरूनी. ॥ ९९५ ॥ ज्या युक्तिरचनेनें जग । मी निर्मितों तो म्हणावा योग । त्या योगमायेंकरूनि सोंग । अवतारांचें दावितों. ॥ ९९६ ॥ अविद्यासृष्टि कल्पिली। ती त्रिगुणसृष्टि योगशब्दें बोलिली।

तो योग कल्पूनि शुद्धसत्त्वें उरली । ते योगमाया. ॥ ९९७ ॥ ते योगमायें-करूनी । मी वेष्टित म्हणोनी । दिसें अवताररूपें नयनीं । परी नव्हें प्रगट सर्वांतें. ॥ ९९८ ॥ आतां म्हणसी अर्जुना ! । कीं सूर्य उगवला झांकेना । तरी प्रगट परि दिसेना । डोळां दिवांधाच्चिया. ॥ ९९९ ॥ तैसा अविद्येंकरूनी । लोक हा मूढ होऊनी । मज देखोनीही नयनीं । हा अज अव्यय म्हणोनी न जाणे. ॥ १००० ॥ अज म्हणजे जन्मरहित । अव्यय म्हणजे नाशवर्जित । ऐसियास मज मूढ अत्यंत । म्हणती उपजतो नाशतो. ॥ १००१ ॥ मी अज मी अव्यय परम । त्या मज मानिती आपणासम । नेणती कीं हा पुरुषोत्तम । अज अव्यय अनंतशक्ती. ॥ १००२ ॥ हें न जाणायाचें मूळ । अविद्या त्रिगुण ओंगळ । आणि आपण सर्वज्ञ केवळ । विद्याशक्ति शुद्धसत्त्वें करोनी. ॥ १००३ ॥ तो त्रिगुणोपाधि जीवसमुदाय । जरी पुण्यें अगण्यें निष्पाप होय । आणि शास्त्रदृष्टीं दृढ धरी माझे पाय । तरी ज्ञानदृष्टीं ओळखे मजलागीं. ॥ १००४ ॥ ऐसें अध्यायपर्यंत । आतां बोलेल भगवंत । त्यांत आपण सर्वज्ञ जीव भ्रांत । आधीं बोलतो या श्लोकीं. ॥ १००५ ॥

**वेदाहं समतीतानि वर्तमानानि चार्जुन ।**
**भविष्याणि च भूतानि मां तु वेद न कश्चन ॥ २६ ॥**

जीं होऊनि गेलीं तीं हीं सारीं । आणि आहेत भूतें ज्या ज्या प्रकारीं । आणि पुढें जीं भूतें होणारीं । हीं सर्व मी जाणें. ॥ १००६ ॥ पंचभूतांश मिळती । त्या देहास भूतें म्हणती । ब्रह्मयाच्या शरीराची गणती । यांत कीं ब्रह्मादि स्तंबवरी[1] भूतेंचि. ॥ १००७ ॥ ब्रह्मांड ब्रह्मयाची मूर्ती । चतुर्मुख त्या मूर्तीपुढील भोगमूर्ती । आवरणरूपें ब्रह्मांडाहि वरती । भूतें तीहीं भूतें म्हणावीं. ॥ १००८ ॥ भूत भविष्य वर्तमान भूतें । जाणतो म्हणतां भगवंतें । बोलिलीं ब्रह्मांडें अनंतें । भूतशब्देंकरूनी. ॥ १००९ ॥ ऐसा स्वयें सर्वज्ञ । परि मज नेणती जीव अज्ञ । तेहि होती अभिज्ञ । बहुपुण्यें मातें जे भजती. ॥ १०१० ॥ हें पुढें बोलेल निवडूनी । परि या चतुर्थचरणापासूनी । मज नेणती अविद्यें-करूनी । ऐसें पुढिल्या श्लोकवरी बोलतो. ॥ १०११ ॥ **'मां तु वेद न कश्चन'** । म्हणजे ते तो मज नेणती कोण्ही जन । कां म्हणसी तरी भ्रांत मन । त्रिगुणभ्रमें म्हणतसे या श्लोकीं. ॥ १०१२ ॥

**इच्छाद्वेषसमुत्थेन द्वंद्वमोहेन भारत ।**
**सर्वभूतानि संमोहं सर्गे यांति परंतप ॥ २७॥**

---

१. स्तंब=दाट लहान झुडपें.

गोडां विषयांवरी प्रीति । वाइटांवरी अप्रीति । इच्छा आणि द्वेष म्हणती । याच दोहीं गोष्टींतें. ॥ १०१३ ॥ या इच्छाद्वेषापासूनी । जीं द्वंद्वें उपजलीं तिहीं-करूनी । मोह जाला म्हणोनी । या त्रिगुणीं वाढविला संसार. ॥ १०१४ ॥ कीं जेव्हां जीवोपाधि प्रगटती । त्यास एक सृष्टिकाळ म्हणती । किंवा नवा देह धरूनी उपजती । तोहि सृष्टिकाळ. ॥ १०१५ ॥ एवं जेव्हां जसे जन्मती । तेव्हां संमोह पावती । कीं देह जड तो आपण मानिती । पूर्विल्या द्वंद्वमोहें-करूनी. ॥ १०१६ ॥ दों दों गोष्टींचें जोडें । द्वंद्व नाम त्यातें घडे । त्यांत एक आवडे एक नावडे । मानापमान लाभहानि इत्यादि. ॥ १०१७ ॥ एक आवडे एक नावडे । तदर्थ कर्म करणें घडे । त्या कर्मेंकरूनि जोडे । देहांतर सुखदुःखभोग. ॥ १०१८ ॥ तेथें अत्यंत जो मोह । तो म्हणावा संमोह । आपण कोण हा संदेह । ते जाणती मज काय. ॥ १०१९ ॥ आपणास आपण नेणे । तो भ्रांत मज काय जाणे? । ज्यास आपला बोध बाणे । तोच जाणे मजलागीं. ॥ १०२० ॥ पूर्वश्लोकीं मी सर्व जाणें । आणि मज ऐसिया कोण्हीच नेणे । म्हणतां नेणती ज्यांस म्हणे । ते ऐसे वर्णिले. ॥ १०२१ ॥ एवं विद्योपाधि आपण सर्वज्ञ । आणि अविद्योपाधि जीव वर्णिले अज्ञ । आतां स्वभजनें होती अभिज्ञ । ते ऐसे म्हणूनी वर्णील. ॥ १०२२ ॥ ते कैसे हो-उनी । कोणे रीतीकरूनी । भजती तरी ऐसें म्हणोनी । बोलतसे या श्लोकीं. ॥ १०२३ ॥

**येषां त्वंतगतं पापं जनानां पुण्यकर्मणाम् ।**
**ते द्वंद्वमोहनिर्मुक्ता भजंते मां दृढव्रताः ॥ २८ ॥**

ज्या पापेंकरूनी मला । जन न भजतां वायां गेला । त्या पापाचा नाश जाला । पुण्यकर्में आचरतां. ॥ १०२४ ॥ अनेक पुण्यकर्मेंकरूनी । द्वंद्वें मानापमान इत्यादि त्यांपासूनी । सुटोनि दृढव्रत होउनी । भजती मातें. ॥१०२५॥ जे परम दुष्कृती । ते आपणातें न भजती । म्हणूनी मागें बोलिला श्रीपती । कीं पाप तेथें भजन आपलें घडेना. ॥ १०२६ ॥ येथें चतुर्मुखाचा बाप । म्हणतो ज्याचें सकळ गेलें पाप । आणि पुण्यकर्में पुण्याचा प्रताप । वाढला भजती तेचि मातें. ॥ १०२७ ॥ ते मज भजतां अत्यंत । होउनियां दृढव्रत । द्वंद्वापासूनि सुटोनि निश्चित । मग मज भजती ऐसेही. ॥ १०२८ ॥ अनेक जन्म पुण्यकोटी । तेव्हां मज भजायाची इच्छा पोटीं । भजतां भजतां शेवटीं । सुटती द्वंद्वाहीपासूनी. ॥ १०२९ ॥ भजतां चित्तशुद्धि अत्यंत । होतां धरिती

दृढ व्रत । कीं भजनींच सर्वदा रत । इतर कांहीं न इच्छिती. ॥ १०३० ॥ दृढ होतां ऐसें व्रत । होऊं लागती द्वंद्वातीत । जे पिऊं लागती अमृत । ते आंबिलीनिमित्त कां लाळ घोटिती ? ॥ १०३१ ॥ ते लाभ धनलाभें न मानिती । ते हानि धनहानीनें न जाणती । ते मानें सुखी न होती । दुःखी न होती अपमानें. ॥ १०३२ ॥ धनमानादिलाभें सुख । इत्यादि हानि करूनि दुःख । या निश्चयाहूनि आणिक । मोह कोणता ? ॥ १०३३ ॥ ज्यासी गोडी हरिभजनीं । भजनींच लोटे दिवसरजनी । चित्त लागलें भगवद्भजनीं । त्या दृढव्रतास कैंचा हा मोह ? ॥ १०३४ ॥ पाप गेलीया माझें भजन । मग ते दृढव्रत होती पुण्यकर्मे जन । मग द्वंद्वमोहापासूनि मोचन । पावोनि मातें भजती. ॥१०३५॥ श्लोकार्थ ऐसा जाला । परि पदांचा अन्वय नाहीं दाविला । म्हणूनि संशय श्रोतयांला । पडेल तरी पदें हीं ऐसीं योजावीं. ॥ १०३६ ॥ **'पुण्यकर्मणा-मंतगतं पापं ते' । 'दृढव्रता मां भजंते'** । आधीं ऐसें वदे ते । भग-वद्वाणी. ॥ १०३७ ॥ **'ते तु द्वंद्वमोहनिर्मुक्ताः' । 'मां भजंते मुक्ताः'** । कीं विना भजन मुक्तता । घडेचि ना. ॥ १०३८ ॥ आतां या-नंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञ लोक । परिसोत आधीं. ॥ १०३९ ॥ जे आपणास भजती । ते ऐसे निष्पाप सुकृती । म्हणूनि अर्जुनाप्रती । श्रीकृष्ण ऐसें बोलिला. ॥ १०४० ॥ ते दृढव्रत भक्त । द्वंद्वमो-हापासूनि मुक्त । हें आयकोनि संशययुक्त । चित्त जालें अर्जुनाचें. ॥१०४१॥ कीं यातें न भजती दुष्कृती । आणि भजती भले सुकृती । परि सकामा ज्यांच्या प्रकृती । ते द्वंद्वमोहातीत होती हें घडेना. ॥ १०४२ ॥ मागें वर्णिले चतुर्विध भक्त । त्यांत आर्त अर्थार्थी कामनायुक्त । जो कामनायुक्त तो द्वंद्वमो-हनिर्मुक्त । कोणी न होय. ॥ १०४३ ॥ विचार ऐसा असोनी । सगट हे द्वंद्वमोहरहित म्हणोनी । कृष्ण बोलिला पूर्वपदेंकरूनी । येथें अर्जुन शंकला. ॥ १०४४ ॥ तरी हें जिज्ञासुप्रकरण । याचें पूर्वी राहिलें विवरण । त्रिविधाचें सगट श्रेष्ठपण । **'उदाराः सर्व एवैते'** म्हणोनि वर्णिलें. ॥ १०४५ ॥ परि ते दोघे सकाम । जिज्ञासु हा अत्यंत निष्काम । ज्ञान होतांच सिद्ध आत्मा-राम । होणार हाही. ॥ १०४६ ॥ ते दोघे निष्काम होती । तेव्हां जिज्ञासुप-दवी पावती । इतर देवताभक्ताहूनि अति । श्रेष्ठ सुकृती जरी अत्यंत.॥१०४७॥ तत्त्वज्ञानेच्छा जयाला । आत्मबोधाकारणें भुकेला । जिज्ञासु म्हणावें त्याला । प्रकरण हें तयाचें. ॥ १०४८ ॥ पूर्वश्लोकीं हा अर्थ । समजला नाहीं पार्थ । म्हणूनि त्याचें जिज्ञासूपण समर्थ । स्पष्ट अर्धश्लोकें दाखवितो. ॥ १०४९ ॥

उत्तरार्धापासूनी । स्वप्रसादें तो होतसे ज्ञानी । आणि सातां प्रकारेंकरूनी । तो आपणातें जाणतो. ॥ १०५० ॥ ऐसें अध्यायपर्यंत । बोलेल आतां भगवंत । तिन्हीं प्रकारें त्या सातांत । बोलतसे श्रीभगवान् या श्लोकीं. ॥१०५१॥

**जरामरणमोक्षाय मामाश्रित्य यतंति ये ।**
**ते ब्रह्म तद्विदुः कृत्स्नमध्यात्मं कर्म चाखिलम् ॥ २९ ॥**

अगा! पूर्वश्लोकीं भक्त । जे वर्णिले द्वंद्वमोहनिर्मुक्त । जे आर्थी जिज्ञासु बुद्धीनें युक्त । कीं सुटावें अविद्यापाशापासूनी. ॥ १०५२ ॥ ज्या अविद्येंकरूनी । जें नश्वर जड वाटे आपण म्हणोनी । दुःख तितकें सुख मानूनी । दुःखींच पचती. ॥ १०५३ ॥ आजन्म मानिलें सुख । तें सर्वही वाटे दुःख । जेव्हां म्हातरपणीं मुख । देखे जरेचें. ॥ १०५४ ॥ तेव्हांही केवळ । जो सुखी ज्याचें सुकृताचेंचि फळ । त्यासही मरणाची तळमळ । सर्वदा चुकेना. ॥ १०५५ ॥ खांदियावरी सूळ । त्यास चारिती खोबरें गूळ । सुळीं घालायाचें स्थळ । जवळी होतसे पदोपदीं. ॥ १०५६ ॥ पुण्यफळें सदा सुख । तरी न चुके जरामरणदुःख । गर्भवासादि दुःखें आणिक । न स्मरती तरी हीं ठाउकीं सर्वांसी. ॥ १०५७ ॥ एवं पाहतां जरामरण । होतें सकळ दुःखांचें स्मरण । कीं मरण आणि म्हातारपण । विदित असे सकळांसही. ॥ १०५८ ॥ विचार ऐसा म्हणोनी । कृष्ण म्हणे जरामरणापासूनी । सुटावया माझा आश्रय धरूनी । यत्न करिती जिज्ञासु जे. ॥ १०५९ ॥ ते ब्रह्मकर्मादि सात । जाणती म्हणे भगवंत । जाणणें म्हणजे विद्या निश्चित । अविद्यानाशें हे जाणावी. ॥१०६०॥ तेव्हां जरामरणादी । दुःखमूळ अविद्या अनादी । एवं येथें भजन उपपादी । अविद्या नाशाकारणें. ॥ १०६१ ॥ अविद्येस विद्या संहरी । त्या ब्रह्मविद्येचा धनी हरी । या कारणें नव्हे अविद्या दूरी । हरिभजनावांचूनी. ॥ १०६२ ॥ या भावें म्हणे श्रीपती, । 'कीं जे सुकृती मजला भजती । त्या भजनें पावती । ब्रह्मविद्या. ॥ १०६३ ॥ माझा आश्रय धरोनी । माझ्या प्रसादें ज्ञान होईल म्हणोनी । दृढनिश्चय ऐसा करोनी । करिती प्रयत्न. ॥ १०६४ ॥ उपनिषद्भाग ऐकती । ईश्वरभावें गुरूतें भजती । यत्न इत्यादि करिती । जिज्ञासु ब्रह्म कळावया. ॥ १०६५ ॥ ते जाणती ब्रह्म । हें व्यतिरेकज्ञान परम । तेंचि सर्व स्थावरजंगम । हें अन्वयज्ञान त्याउपरी. ॥ १०६६ ॥ तें ब्रह्म आत्मत्वें जाणावें । मग सर्व तेंचि हें अद्वैत बाणावें । अध्यात्म ऐसें म्हणावें । त्या ज्ञानातें. ॥ १०६७ ॥ तरी अध्यात्महीं ते जाणती । **'स्वभावोऽध्यात्ममुच्यते'** ऐसें

श्रीपती । पुढील अध्यायांत अर्जुनाप्रती । स्वयेंचि बोलेल. ॥ १०६८ ॥ सर्व आपण हा भाव । यास म्हणावें स्वभाव । अध्यात्मशब्दार्थ देव । बोलेल ऐसा. ॥ १०६९ ॥ आणि ते जाणती कर्म । कीं निर्माण होती स्थावरजंगम । हें कर्म तेंहि ब्रह्म । सर्व कर्म ज्या कर्मीं आटतें. ॥ १०७० ॥ म्हणोनि कर्म अखिल । ते जाणती म्हणे मेघनीळ । अखिल म्हणजे अशेष सकल । गहन भाव हा पुढें विशदही होणार. ॥ १०७१ ॥ सातांत तीन जालीं । जीं ब्रह्म अध्यात्मकर्में बोलिलीं । आतां चार जीं उरलीं । तीं बोलतसे या श्लोकीं.॥१०७२॥

**साधिभूताधिदैवं मां साधियज्ञं च ये विदुः ।**
**प्रयाणकालेऽपि च मां ते विदुर्युक्तचेतसः ॥ ३० ॥**

अधिभूत हें दृश्य नश्वर स्वभाव । जीव पुरुष तो अधिदैव । अधियज्ञ तो साक्षी स्वयें देव । हें पुढें देवाधिदेव बोलेल. ॥ १०७३ ॥ परि यांत जीव अधि-दैवत । त्यातें ऐसें जाणती म्हणे अच्युत । कीं अधिभूता नश्वरा जडांसहित । आणि मी जो अधियज्ञ त्यासह. ॥ १०७४ ॥ साधिभूत आणि साधियज्ञ । अधिदैव मी जो त्यातें जाणे अभिज्ञ । म्हणोनि म्हणे सर्वज्ञ । गीतार्थ येथें विरळ जाणती. ॥ १०७५ ॥ बहुतीं हा अर्थ टाकिला । नेणोनि टीकाशब्दें झांकिला । विचार येथें नाहीं केला । कीं या दों पदींच कां सकार सह शब्द ? ॥ १०७६ ॥ या सह शब्दीं तत्त्व खोल । तें स्फुरे तरी हे समजती बोल । सगर्भ शब्द मानिले फोल । दृष्टी तत्त्वीं न पडतां. ॥ १०७७ ॥ या अधिभूतादि शब्दांचे अर्थ । पुढें बोलेल जे समर्थ । त्याच अर्थीं अर्थ यथार्थ। होती या सकारासह शब्दांचे. ॥ १०७८ ॥ पुढिल्या अध्यायांत देव । अधि-भूत म्हणेल क्षरभाव । क्षरभाव म्हणजे नश्वर स्वभाव । चराचर स्थूल देह जी-वांचे. ॥ १०७९ ॥ या अधिभूतांसहित । अधिदैवातें जाणती म्हणे अच्युत । अधिदैवाचा अर्थ भगवंत । म्हणेल पुरुष म्हणोनी. ॥ १०८० ॥ पुर देह अधिभूत त्यांत । अविद्येनें जो निद्रित । तो पुरुषांश प्रतिबिंब निश्चित । अधि-यज्ञा ईश्वराचा. ॥ १०८१ ॥ त्या अधियज्ञासहित । अधिदैव जाणती म्हणे भगवंत । कीं बिंबावांचूनि न कळे निश्चित । अंश प्रतिबिंबरूपत्वें. ॥१०८२॥ प्रतिबिंबांश ईश्वराचा । जीव म्हणोनि बोलती वेदवाचा । निर्णय मागें जाला पुढेंही याचा । होणार निर्णय. ॥ १०८३ ॥ ज्यांत प्रतिबिंब तें निर्मळ । सत्त्व जैसें निवळ जळ । प्रतिबिंबयोगें तेंचि केवळ । जीव जालें म्हणावें. ॥ १०८४ ॥ कीं

ज्या उदकीं दिसे प्रतिमुख। तें उदकचि तें मुख। कीं उदकावांचूनि आणिक । न सांपडे कांहीं तयांत. ॥ १०८५ ॥ म्हणोनि परा प्रकृती। जीवत्वें वर्णितो **श्री**पती। आणि **'ममैवांशो जीव'** हेंही जगत्पती । पंचदशीं बोलेल. ॥ १०८६ ॥ एवं पुरुष म्हणतां अधिदेव । तदर्थे सत्त्व जळही सूचवी देव । परि जळास घट तैसा स्थूलदेहभाव। अधिभूत चराचर क्षरभाव. ॥ १०८७ ॥ आणि सत्त्वाचे वृत्तिभेद । बुद्धि अव्यक्त म्हणती वेद । त्या वृत्तिभेदातें **गो**विंद । त्रयोदशीं वर्णील क्षेत्र म्हणोनी. ॥ १०८८ ॥ **'महाभूतान्यहंकारो बुद्धिरव्यक्त'** । इत्यादि पंचभूतां क्षरांसंयुक्त । क्षेत्र बोलेल जें क्षरत्वें उक्त । **'अधिभूतं क्षरो भावः'** म्हणोनि या प्रसंगीं. ॥ १०८९ ॥ लिंगदेहासहित । क्षेत्र नश्वर निश्चित । कीं अंतीं ज्ञान परिपाकीं अंत। होतसे जयाचा. ॥ १०९० ॥ एवं जीवोपाधि निश्चित । अधिभूत क्षरभाव त्यासहित । प्रतिबिंब पुरुष अधिदैवत। अधियज्ञ बिंबासहित जाणावा. ॥ १०९१ ॥ कीं दर्पण आणि बिंब । तरीच दिसे प्रतिबिंब । नसतां हे दोन्ही अवलंब । तें नसे. ॥ १०९२ ॥ याकारणें साधिभूत । म्हणजे अधिभूत स्थूल सूक्ष्म त्यांसहित । आणि साधियज्ञशब्दें बिंब स्वयें **अ**च्युत । त्यासहित प्रतिबिंबा अधिदैवातें जाणती. ॥ १०९३ ॥ अधियज्ञाचा अर्थ देव । बोलेल कीं **'अधियज्ञोऽहमेव'** । **'अहमेव'** म्हणजे मीच देवाधिदेव । बिंब स्वयें त्या प्रतिबिंबाचा. ॥ १०९४ ॥ कीं अधिदैव जैसा प्रतिबिंब । तैसा नव्हे मी बिंब । मीच त्याचा अवलंब । अंशा अधिदैवा आणि अधिभूता उपाधीचा. ॥ १०९५ ॥ कीं प्रतिबिंबयुक्त नीर । घट पाहिजे त्यास आधार । तैसें जीवा सत्त्वास शरीर । स्थूल अधिभूत क्षरभाव पाहिजे. ॥ १०९६ ॥ आणि जडनिषेधाविण । न कळे तयाची खूण । हेंही सर्वज्ञ सगुण । सूचवी एथें. ॥ १०९७ ॥ म्हणोनी साधिभूत । अधिदैव जाणे म्हणे **अ**च्युत । आणि बिंबाविणें न दिसे निश्चित । प्रतिबिंब तें. ॥ १०९८ ॥ या कारणें साधियज्ञ । कीं अधियज्ञासह ते अभिज्ञ । अधिदैव जाणती म्हणे सर्वज्ञ । एवं प्रतिबिंब अधिदैव हें बोले. ॥ १०९९ ॥ आतां तेंचि प्रयाणकाळीं । मातें जाणती म्हणे **व**नमाळी । तरी आपण सकळ सकळीं । हें जाणती तिहीं हेंचि प्राणप्रयाणीं स्मरावें. ॥ ११०० ॥ ऐशा प्रकारीं जे जाणती । तेचि प्रयाणकाळीं स्मरती । जेव्हां धरूनि आत्मस्मृती । सोडिती शरीर. ॥ ११०१ ॥ एवं स्मरती म्हणावें ये स्थळीं । ऐसें असोनिही **व**नमाळी । जा-

णती म्हणे प्रयाणकाळीं । हें कां एथें विचारावें ? ॥ ११०२ ॥ कीं जें नसेल विदित । त्यास जाणती म्हणों नये निश्चित । विदित असेल जें अत्यंत । तें स्मरती ऐसें म्हणावें. ॥ ११०३ ॥ स्मरती म्हणावें जेथें । जाणती म्हणों नये कां तेथें ? । ऐसे विचार एथें । करितां तत्त्वार्थ सांपडे. ॥ ११०४ ॥ आतां जाणणियानें स्मरावें । या भावें जाणती म्हणे म्हणावें । तरी जाणणियानेंचि विसरावें । सर्वही त्याणेंचि होतसे. ॥ ११०५ ॥ जाणती म्हणजे स्मरती । अगत्यच बोलावें ये रीती । कीं अर्थ न लागे म्हणूनि गती । कल्पावी भलतैसी. ॥ ११०६ ॥ दुसरें जया प्रयाणकाळीं जाणती । तें प्रयाण साधे कोणे रीती । ब्रह्म आपण तेचि उरती । उरी कैंची प्रयाणातें ? ॥ ११०७ ॥ ज्ञानियाचें चित्त । देहादि चेतवी प्रारब्धानिमित्त । जोंवरी वायु तोंचिपर्यंत । तरंग जैसा सागरीं. ॥ ११०८ ॥ वायु राहतां सागरीं । सागरचि होय ते लहरी । ब्रह्मीं चित्त यापरी । ब्रह्म होय सरतां प्रारब्ध. ॥ ११०९ ॥ आतां कैचें प्रयाण । हेंही न विचारी जरी निपुण । एथेंही अगत्यपण । लागे **गी**ता वाखाणितां. ॥ १११० ॥ मुख्यार्थ न सांपडे । तेव्हां ऐसें संकट पडे । भलतसा अर्थ योजणें घडे । टीकाकारासही तो. ॥ ११११ ॥ याचा अर्थ **भ**गवंत । बोलेल पुढील अध्यायांत । तेथें याहूनि **श्री**कांत । प्रयाण बळकट बोलेल. ॥ १११२॥ कीं अंतकाळीं मातें । स्मरत सोडील शरीरातें । आणि जाय तो माझ्या भावातें । पावे एथें संशय असेना. ॥ १११३ ॥ मोक्ष एथें निर्गुण । कोणी वाखाणिती निपुण । मुक्तिसुखाची हे खूण । नुरे जेथें. ॥ १११४ ॥ पक्कज्ञानियास सद्य मोक्ष । आणि अपक्क ज्ञानी हटयोगीं दक्ष । याच्या मोक्षातें क्रममोक्ष । शास्त्रें म्हणती. ॥ १११५ ॥ ते ब्रह्मरंध्र भेदोनि जाती । ब्रह्मयासह मोक्ष पावती । कोणी एथें ते गती । वाखाणिती टीकाकार. ॥ १११६ ॥ तरी या श्लोकीं या ज्ञानी । युक्तचित्त म्हणोनी । श्री**कृ**ष्ण म्हणे यावरूनी । सद्य मोक्षचि युक्त चित्तातें. ॥ १११७ ॥ उत्तराध्यायांत **क**मलेक्षण । वेगळेंचि त्या मोक्षाचेंही लक्षण । बोलेल तेथेंही विवरण । विशद टीकेंतही होणार. ॥१११८॥ एवं एथें मोक्ष सगुण । बोले सर्वज्ञ आपण । दृष्टि तिकडे देती निपुण । मुख्य अर्थ त्यांत सांपडतो. ॥ १११९ ॥ सगुणमोक्षीं प्रयाणसिद्धी । वैकुंठगमन हेही प्रसिद्धी । त्या मोक्षीं अनुभवसमृद्धी । मुक्त असती जाणती ते ऐसें. ॥ ११२० ॥ **'प्रयाणकालेऽपि'** म्हणोनी । व्याकरणें या सप्तमीविभक्तीकरूनी । प्रयाणकालीं जाणती हा अर्थ होउनी । अर्थ आणिकही होतसे. ॥११२१॥ **'प्रयाणकालेऽपि'** म्हणे **श्री**पती । म्हणजे प्रयाणकाले **'सत्यपि'**

ऐसे रीती । अर्थ वाखाणितां सिद्ध होती । मुख्य अर्थ सर्वत्र. ॥११२२॥ आणि **'अपि'** शब्देंकरूनी । कैवल्यमोक्ष जाणणें नसे म्हणोनी । सूचवूनि बोले या वचनीं । कीं या मुक्तींतही मज जाणती. ॥ ११२३ ॥ कीं जाला असतांही प्रयाणकाळ । त्यावरी जेव्हां मुक्तीचा सुकाळ । तेव्हांही मातें जाणती केवळ । कीं अनुभव बुडेना भक्तांचा. ॥ ११२४ ॥ निर्गुण मोक्षापरीस । सगुण मोक्षामृत बहुत सुरस । म्हणूनि सूचवी जगन्निवास । कीं प्रयाणकाळ जाला असतांही जाणती. ॥ ११२५ ॥ कीं जाला असतां प्रयाणकाल । मुक्त होऊनी असती सकळ । तेव्हांही जाणती केवळ । मातें अखंडानंदानुभवें. ॥ ११२६ ॥ हें भक्तांच्या गतीचें प्रकरण । निर्गुणमोक्षास विलक्षण । ऐसें सूचवी कमलेक्षण । कीं निर्गुणमोक्षीं हें नसे. ॥ ११२७ ॥ वैकुंठीं स्वानंदानुभव । निर्गुणीं नसे सधर्मभाव । ज्या सत्त्वें अनुभवावें सर्व वैभव । तें वैभव असोनिही सत्त्व नसे. ॥ ११२८ ॥ अमृतास नाहीं रसना । त्याची गोडी त्याला कळेना । अद्भुत सगुण मोक्षरचना । कीं स्वरूपामृतीं सत्त्वमूर्ति रसना ते. ॥ ११२९ ॥ चित्ताचें जाय चित्तपण । उरे अनुभववर्जित निर्गुण । काय जाणेल येथें खूण । स्थिति ब्रह्मात्मत्वाची तेही जाय. ॥ ११३० ॥ त्याचें जाणणें ओसरे । यास निर्गुणत्वें सगुण स्फुरे । विष्णुरूप पावोनि उरे । सत्त्व अक्षय्यपणें वैकुंठीं. ॥ ११३१ ॥ जैसें ईश्वरोपाधि सत्त्व । तैसेंच याच्या सत्त्वासही अक्षयत्व । मुक्त वैकुंठ विष्णुरूप यांचें तत्त्व । हेंच कीं सत्त्वनित्यत्व सम सर्वांचेंही. ॥ ११३२ ॥ योगनिद्रेच्या अवसरीं । जैसा ईश्वर तैसे परी । निर्गुणत्वेंचि उरती आणि जेव्हां हरी । साकार होतां हेही होती साकार. ॥ ११३३ ॥ येथें नश्वरत्वप्रसंग । बोलती त्यांचा पुढें मुखभंग । चतुर्दशीं होईल जेव्हां श्रीरंग । परिहरील उत्पत्तिनाश या मुक्तांचा. ॥ ११३४ ॥ टीका चतुर्थाध्यायाची । तेथें यज्ञप्रसंगें या मोक्षाची । रीति वर्णिली ते साची । मोक्षशब्देंचि होतसे. ॥ ११३५ ॥ मोक्ष म्हणावें ज्याला । नश्वर म्हणावें त्याला । तेव्हां नित्य म्हणावें याही बोला । अनित्य म्हणोनि कां न वाखाणावें ? ॥ ११३६ ॥ तेज म्हणावें ज्याला । तम मानावें त्याला । यास आणि मोक्ष अनित्य या बोला । नव्हे काय एककोटित्व. ॥ ११३७ ॥ तें असो या प्रस्तुतीं । येथें म्हणे श्रीपती । कीं प्रयाणकाळ जाला असतांही जाणती । मातें म्हणोनि त्याचा हा इत्यर्थ. ॥ ११३८ ॥ कोणी म्हणती भगवंत । याचा अर्थ अष्टमाध्यायांत । बोलेल कीं प्रयाणसमयांत । स्मरोनि मातें जे जाती. ॥ ११३९ ॥ ते

सद्भावातें पावती । तरी जाणती म्हणजे स्मरती । हा अर्थ कां घडेना ये रीती । म्हणतील जरी या प्रसंगीं. ॥ ११४० ॥ तरी याहीपुढें जो श्लोक । तेथें बोलेल उत्तमश्लोक । कीं ज्या ज्या भावातें जे लोक । स्मरती अंतीं पावती तो भाव. ॥ ११४१ ॥ त्याही पुढें म्हणेल कीं या कारणें । अर्जुना ! युद्धही करी माझ्याच स्मरणें । कीं माझ्या स्मरणशील अंतःकरणें । निःसंदेह मज पावसी. ॥ ११४२ ॥ स्मरणभक्तीचा महिमा हरी । कळावया बोलेल या उपरी । कीं माझ्या स्मरणें देह सोडिल्यावरी । पावे माझ्या भावातें. ॥ ११४३ ॥ पावे माझ्या भावातें । म्हणतां सूचवी या अर्थातें । कीं भाव म्हणजे सारूप्यातें । पावे तो जाणेच मातें मुक्तींतही. ॥ ११४४ ॥ कीं आणिकही जो जो भाव । अंतकाळीं स्मरे जीव । तोचि भाव पावे हें देव । बोलेल भावशब्दें आकार. ॥ ११४५ ॥ हा स्मरणमहिमा । कीं अंतकाळीं स्थावर अथवा जंगमा । स्मरतां पावे तयां तैसा पुरुषोत्तम । मजही स्मरतां पावसी. ॥ ११४६ ॥ एवं भावशब्दें आकार । आणि बोलावया स्मरणाचा बडिवार। स्मरत सोडिती कलेवर । ऐसें म्हणे. ॥११४७॥ आणि जाला असतां प्रयाणकाळ । मज जाणती म्हणे मेघनीळ । यावरूनी प्रश्न होतां त्याचें उत्तर प्रांजळ । मद्भावातें पावती हें म्हणतां होणार. ॥ ११४८ ॥ **'कथं ज्ञेयोऽसि'** म्हणोनि । अर्जुन पुसेल यावरूनि । समजेल कीं साकार मोक्षेंकरूनी । जाणती म्हणतो आपणातें. ॥ ११४९ ॥ प्रयाणकाल जालियानंतर कैसा । जाणावया योग्य आहेसि? ऐसा । प्रश्न होईल त्यास आकाराचा ठसा । मद्भावशब्दें सूचवील. ॥ ११५० ॥ हे भावार्थ गहन । कृपादृष्टि सूचवी कमलनयन । तें बहुतेक समजे अर्जुन । न समजे तेथें प्रश्न करी. ॥ ११५१ ॥ ते प्रस्तुत सात प्रकार । याचा न कळतां अर्थविचार । प्रश्न करील हा चमत्कार । कृपासिंधु जगद्गुरूचा. ॥ ११५२ ॥ कीं अपरोक्षाकारणें । या अर्जुनें यावें शरण । **'किं तद्ब्रह्म'** म्हणतां विवरण । अपरोक्षाचें करावें. ॥ ११५३ ॥ हें पुढें बोलणेंचि असे । एवं मोक्ष सगुण येथें दिसे । इतर अर्थ येथें न वसे । विचार करितां. ॥ ११५४ ॥ आरंभीं ज्ञान सगुण । ज्ञानी सगुण भक्तामध्यें वर्णिले निपुण । अंतीं सगुण भक्तीची खूण । सर्वोत्कर्षें या अध्यायांत बोलिली. ॥ ११५५ ॥ ऐसा अध्याय सप्तम । आणि या सातांत जो सप्तम । तो पुरुषार्थ याकरितां उत्तम । कीं भक्ति हातींची नवजाय. ॥ ११५६ ॥ ज्ञान असोनि अनुरक्ती । श्रीकृष्णचरणीं हे भक्ती । अत्यंत थोर चारी मुक्ती । ओंवाळिल्या इजवरोनी. ॥ ११५७ ॥ सकळां उपनिषदांचें सार । हे गीता हरी दुःखसंसार । ते वा-

खाणितां मूळानुसार। भक्तिसम कांहीं तुकेना. ॥ ११५८ ॥ जो स्वयें **गी**ताकार। तोचि स्वयें टीकाकार। **भ**गवत्सुवर्ण **वा**मन आकार। विकार नसे सुवर्णत्वीं. ॥ ११५९ ॥ तथापि कांहीं तो जरी न करी। सर्व सम अकर्ता परी। भक्ति करिती ते तों हरी। करी प्रार्थिला कल्पवृक्ष. ॥ ११६० ॥ जो मागे जें फळ। कल्पवृक्ष दे तेंचि केवळ। **गी**ता केली तैसा प्रांजळ। अर्थ करी म्हणतां करीतसे. ॥ ११६१ ॥ ज्यांस अनन्य शरणागती। ते हेंचि या कल्पवृक्षा मागती। म्हणोनि यथार्थ अनुसंधानगती। तोचि ऐशा करितसे. ॥ ११६२ ॥ कीं नसे देवतांतराची भीड। अथवा कांहीं फळाची चाड। कीं अभक्तास वाटेल अवघड। हेही शंका असेना. ॥ ११६३ ॥ टीका उदंड जाल्या। परी देवतांस तदुपासकास भ्याल्या। यथार्थ अर्थ नाहीं बोलिल्या। तैसी नव्हे हे टीका. ॥ ११६४ ॥ म्हणोनि **'यथार्थदीपिका'**। नांव पावली हे टीका। कीं अद्वैत आणि भजावें एका। **श्री**वत्सांका जगद्गुरूतें. ॥ ११६५ ॥ विघ्न न हो म्हणोनी। आरंभीं देवा एका प्रार्थुनी। स्फूर्ती देईल हे इच्छा धरोनी। प्रार्थना एका आणिकाची. ॥ ११६६ ॥ टीका ऐसी आरंभते। आणि भक्ति अव्यभिचारिणी बोलिजेते। आणि पदोपदीं निषेधिजेते। उपासना अन्य देवतांची. ॥ ११६७ ॥ त्यांचें परोपदेशपांडित्य। गीताच प्रकट करिते सत्य। कीं टीकेंत बोलणें लागे अगत्य। तुच्छत्व इतर देवताभजनाचें. ॥ ११६८ ॥ आणि जेथें गहन अर्थ। तेथें घडेना यथार्थ। जरी मानिती कृतार्थ। टीका आपुली. ॥ ११६९ ॥ **'अंतवत्तु फलं तेषां'** म्हणोनी। याच अध्यायांत या श्लोकेंकरोनी। जें बोलिलें तें येतें दिसोनी। तुच्छफळ-प्रदत्व त्यांतें. ॥ ११७० ॥ कीं टीका निर्विघ्न जाली। आणि रचनास्फूर्तीही आली। तथापि होऊनि आली। ते विरुद्ध मूळासी. ॥ ११७१ ॥ इतरदेव-ताभजन। टीकेंत निषेधिती महाजन। आणि आरंभीं करिती नमन। त्या इतर देवांतें. ॥ ११७२ ॥ वाखाणावी **गीता**। तींही आदि अंतीं एका **अ**-नंता। वंदावें मध्यें ज्या भगवंता। मुख्य सेव्यत्वें वर्णावें. ॥ ११७३ ॥ त्यांस सर्वेही ब्रह्म दिसे। म्हणोनी त्या देवां वंदिती ऐसे। ऐसें म्हणावें तरी म्हणतसे। **कृ**ष्ण काय **गी**तेंत. ॥ ११७४ ॥ सर्व मी सर्व माझे उपासक। परी तें भ-जन अविधिपूर्वक। उपास्यदैवत मीच एक। इतरें पहावींच मद्भावें. ॥ ११७५ ॥ ब्रह्म जरी विघ्नाचाच हर्ता। तरी **म्है**सासूर काय परता?। अद्वैताश्रयें या वार्ता।

फोल अवघिया. ॥ ११७६ ॥ असो तें हे टीका शेषशयन । स्वयें करी आकर्णनयन । गीताटीका तो आणि वामन । भिन्न अणुही न दिसती. ॥ ११७७॥ आत्मत्वें भजतां तया । त्या जगदात्मयाची होतां दया । हात जोडिती सर्व देवता या । परि कोण पाहे त्यांकडे ? ॥ ११७८ ॥ कोणाची नसे भीड । आणि कोणाची नसे चाड । अनन्यभक्ति लागतां गोड । या भगवद्गीतेंत ये रीती. ॥ ११७९ ॥ वाचोत जे वाचिती । न वाचोत जे वाईट मानिती । संतुष्ट होय एक जगत्पती । या यथार्थ निरूपणें. ॥ ११८० ॥ जे अनुभवी आणि भक्त । जे इतर फळीं विरक्त । आणि जे समजती युक्तायुक्त । ते क्षणही न सोडिती हे टीका. ॥ ११८१ ॥ भ्रमरा कमळें प्रार्थावें । कीं चकोरा चंद्रें आमंत्रण द्यावें । कीं मयूरास मूळ पाठवावें । धेराधरीं. ॥ ११८२ ॥ चंद्र नावडे तस्करा । म्हणोनि वीट येना चकोरा । कुमुदें लाजती भास्करा । म्हणोनि कमळें मुख न झांकिती. ॥ ११८३ ॥ जगद्वंद्य श्रीमद्भागवत । तेथें अप्रीति धरिती कुश्चित । अभक्त आणि कुमार्गरत । त्यांस तैसी हे टीका. ॥ ११८४ ॥ बौद्धीं वेद दूषिले । तरी काय ते वांया गेले? । स्वहिततत्पर रसज्ञ भले । तेच वाचिती हे टीका. ॥ ११८५ ॥ असो तें आतां अर्जुनरथाचे ठायीं । जो गीता उपदेशितो शेषशायी । प्रतिपदीं अर्पिली त्याच्या पायीं । हे **'यथार्थदीपिका'** वामन म्हणे. ॥ ११८६ ॥

**भक्तिर्मुकुंदे जगदात्मनीशे नान्यत्र कस्मिन्फलदे त्वनीशे ।**
**यः सप्तमे सप्त जगाद पार्थं सर्वं तदस्माकमहो कृतार्थम् ॥**

---

## अध्याय आठवा.

जय जय सर्व सर्वापरोक्ष । जय जय पारोक्ष्यहेतुहरणदक्ष । जय जय कृष्ण पुंडरीकाक्ष । अर्जुनगुरो ! जगद्गुरो ! महद्गुरो ! ॥ १ ॥ जय जय ब्रह्मात्मसाक्षात्कार । जय जय अध्यात्मविद्याविचारसार । जय जय भूतभावोद्भवविसर्गकर । कर्मब्रह्मभावनाबोधा ! ॥ २ ॥ अधिभूतक्षरतरंगसागर । अधिदैव प्रतिबिंब बिंबेश्वर । सकळ शरीरगत परात्पर । सर्वज्ञ अधियज्ञ. ॥ ३ ॥ जाते सति प्रयाणकालेऽपि । अखंडत्वें न वेद्योऽसि मुक्तावपि । आब्रह्मलोकाःपुनरावर्तिनोऽपि । कोऽपि त्वां प्राप्य वैकुंठ न निवर्तते. ॥ ४ ॥ जय जय अनन्यभक्तिगम्य । जय जय साम्यहृतसक-

१. मेघांनीं.

लवैषम्य । जय जय **र**मामनोरम्य । सगुण सुंदर भक्तवत्सल! ॥ ५ ॥ जय जय **स्मर**णलभ्यचरण । जय जय **ज**गत्पावनाचरण । जय जय **ज**गत्कारणाकारण । **ना**रायण **ज**गत्पते! ॥ ६ ॥ जय जय **प्र**पन्नसुलभ । जय जय **दु**ग्धसिंधुदुहितावल्लभ । जय जय **स**जलजलदसन्निभ । **श्री**वत्सांक **शे**षपर्यंक ! ॥ ७ ॥ जय जय **द**शावताराष्टम । जय जय **दे**वकीतनयाष्टम । जय जय **स**तोपदिष्टाष्टम । जय जय अष्टैश्वर्य! ॥ ८ ॥ देवा! वेदवाणी संस्कृत । लोकवाणी प्राकृत । परि यथार्थ अर्थ व्याकृत । जोडती त्याणेंचि पद तुझे. ॥ ९ ॥ ते तुझे चरणकमल । जे निववितो **श्री**करतळ । ध्यातां करिती शीतळ । त्रितापतप्ता हृदयातें. ॥ १० ॥ करूनियां पायांतें नमन । तुझीं रूपें श्रोते जन । तूं अर्थ दाविसी निवेदन । तें त्यांप्रती करीन अष्टमाध्यायाचें. ॥ ११ ॥ **श्रु**ति म्हणे आत्मा रथी । देह रथ बुद्धि सारथी । बुद्धिस्थानीं **पा**र्थ रथी । सारथि जाला **ज**गद्गुरु. ॥ १२ ॥ बाह्य सारथ्याकारणें । **न**रें प्रार्थिला **ना**रायण । अमृत करीच आपला गुण । पितां उदक मानूनिही. ॥ १३ ॥ बुद्धिस्थानीं वसे **ह**री । मग बोद्धव्यास काय उरी? । जाणायाची सीमा जेथवरी । तेथवरीच पावे बुद्धीतें. ॥ १४ ॥ बुद्धींत सर्वांच्या असे । परि जैसा काष्ठीं सर्वत्र अग्नि बसे । मथिला प्रगट अग्निहोत्रीं दिसे । तैसा रथीं **अ**र्जुनाच्या. ॥ १५ ॥ काष्ठीं काष्ठ प्रकाशक । परि न दावी महिमा कौतुक । तैसे जे भजनहीन लोक । त्यांच्या बुद्धींत तैसा परमात्मा. ॥ १६ ॥ जैसा **अ**र्जुनाचे रथीं । तैसा भक्तियुक्त मनोरथीं । बुद्धिस्थानीं होतो सारथी । जो सारथि **अ**र्जुनाचा. ॥ १७ ॥ जेथें न पावे वेदवाणी । परते मागें लाजिरवाणी । तेथें पाववी **च**क्रपाणी । बुद्धि आपुल्या भक्तांची. ॥ १८ ॥ तो स्वयें सारथि जाला । काय उणें मग तयाला? । **गी**तोपदेश आरंभिला । याच लागीं. ॥ १९ ॥ परंतु अपरोक्ष ब्रह्मविद्या । जे उपदेशितां नासे अविद्या । जिणें जगत्कारणा आद्या । परोक्ष केलें अपरोक्षासही. ॥ २० ॥ दृष्टीस रज्जु दिसे । तेव्हां भ्रम उठे सर्प भासे । अपरोक्ष असोनि न गवसे । परोक्ष आत्मा ऐसा अविद्यें करोनी. ॥ २१ ॥ त्या मिथ्या सर्पातें निषेधी । सत्य रज्जु त्यातें बोधी । ऐसा गुरु भेटे तरी अवधी । शरणागताची तो पाहे. ॥ २२ ॥ कीं क्षुधा असेल जया । तो काकुळती अन्नदातया । करील तैसा गुरुराया ! । मागेल ब्रह्मविद्या मुमुक्षु. ॥ २३ ॥ क्षुधा नसेल ज्याला । मिष्टान्न घालितां त्याला । न रुचे न पचे व्यर्थ गेला । तैसा गुरूचा उपदेश. ॥ २४ ॥ चतुर्थाध्यायटीकेंत या रीती । वर्णिल्या त्याच वदतां मागुती । ग्रंथ वाढेल एवं गुरूप्रती ।

शरण न येतां करूं नये उपदेश. ॥ २५ ॥ अर्जुन अपरोक्षाचें पात्र । कृपेनें ओळहला कमलनेत्र । परि संप्रदायपालनार्थ मात्र । वाट पाहे प्रश्नाची. ॥२६॥ द्वितीयाध्यायांत शरण । आला वंदूनि चरण । मी शिष्य म्हणूनि दीनपण । निवेदिलें. ॥ २७॥ परंतु भीष्मादिकां मारूं कैसा? । मनीं याच शोकाचा वळसा । तें बोलतां प्रसंग ऐसा । ग्रंथ आला येथवरी. ॥ २८ ॥ अध्यायांत तिसरिया । म्हणे बुद्धिपरता आत्मा धनंजया । जाणूनि मग मारीं या । वैरिया कामातें. ॥ २९ ॥ ज्ञानाचें श्रेष्ठपण । प्रतिपदीं आपण । बोलोनि म्हणे ब्रह्म सगुण । कीं तें तूं जाण अर्जुना! ॥ ३० ॥ चतुर्थी 'तद्विद्धि प्रणिपातेन' । या श्लोकें जगज्जीवन । म्हणे संतांपासूनि तें ज्ञान । जाण अर्जुना! ॥ ३१ ॥ षष्ठाध्यायांत लक्षण । योगाचें बोलिला कमलेक्षण । आणि पूर्वाध्यायांत समग्रपण । आपलें जाणशील ऐसेंचि बोलिला. ॥ ३२ ॥ कीं आतां सांगतों परोक्ष । हेंचि होईल अपरोक्ष । जेव्हां पुससील तूं दक्ष । ब्रह्म कैसें म्हणोनि हा भाव. ॥ ३३ ॥ यांत तत्त्वसाक्षात्कार अपरोक्ष । होय ऐसें न बोले अंबुजाक्ष । जें जें वदला तें तें परोक्ष । उपदेश अपरोक्ष हा नव्हे. ॥ ३४ ॥ ब्रह्म अध्यात्मकर्मादि सात । शेवटीं सप्तमाध्यायांत । तेथेंही बोलिला भगवंत । मज ऐसें जाणती म्हणोनी. ॥ ३५ ॥ एवं च येथपर्यंत । जें जें बोलिला भगवंत । तें ऐकोनि जाला बुद्धिमंत । परि ब्रह्म अनुभवा न आलें. ॥ ३६ ॥ शब्दपीयूषाची वृष्टी । मेघश्यामाच्या वाटल्या गोष्टी । ब्रह्म पहावें आत्मदृष्टी । हे अपेक्षाच उपजेना. ॥ ३७ ॥ म्हणोनि ब्रह्म अध्यात्म इत्यादि रीति । भक्त सप्तप्रकारें जाणती । हें चमत्कारें बोलिला श्रीपती । कीं प्रश्न अर्जुनें येथें करावा. ॥ ३८ ॥ कीं या सातां प्रकारांतें । अर्जुन नेणेचि तो आपणातें । प्रश्न करील मग तयातें । या मिसें सांगावें अपरोक्ष. ॥ ३९ ॥ सहज बोलतां ब्रह्मस्थिती । तरी प्रश्नापेक्षा होती अथवा न होती । ब्रह्म अध्यात्मादि सुकृती । जाणती म्हणूनि बोलिला. ॥ ४० ॥ तरी कोण्या प्रकारें जाणती । हें पुसूं या कृष्णाप्रती । प्रश्नापेक्षा ये रीती । दाटूनि निर्मिली स्वयें येथें. ॥ ४१ ॥ पान्हा दाटला स्तनीं । निद्रिता बाळातें जननी । पाजी दाटूनि उठवूनि । कृपालु तैसा श्रीकृष्ण. ॥ ४२ ॥ सांगों नये प्रश्नाविणें । तो तरी न करी प्रश्न आपण । या कारणें ब्रह्म सगुण । करी येथें चमत्कार. ॥ ४३ ॥ कीं ब्रह्म जाणती सुकृती । तें ब्रह्म कैसेंये रीती । प्रश्न करील आपणाप्रती । येथें अर्जुन. ॥ ४४ ॥ प्रश्न ऐसा करील पार्थ । तेव्हांच करावा तो कृतार्थ । हा संप्रदायपालनार्थ । उपाय करी जगद्गुरू.

॥ ४५ ॥ ऐसें बोलोनि सत्तम । अध्याय संपवी **सर्वोत्तम** । उगा राहे तों **पांडवोत्तम** । प्रश्न हा करी **अर्जुन.** ॥ ४६ ॥

**अर्जुन उवाच—किं तद्ब्रह्म किमध्यात्मं किं कर्म पुरुषोत्तम ।**
**अधिभूतं च किं प्रोक्तमधिदैवं किमुच्यते ॥ १ ॥**
**अधियज्ञः कथं कोऽत्र देहेऽस्मिन्मधुसूदन ।**
**प्रयाणकाले च कथं ज्ञेयोऽसि नियतात्मभिः ॥ २ ॥**

**अर्जुन** म्हणे **'किं तद्ब्रह्म'** । प्रश्न सातांत हा प्रथम । प्रश्ननिमित्त हें कीं **पुरुषोत्तम** । **'ते ब्रह्म तद्विदुः कृत्स्नं'** म्हणोनि बोलिला. ॥ ४७ ॥ ब्रह्म जाणती केवळ । आणि तें ब्रह्मचि सकळ । दों प्रकारें ते सुकृती कुशळ । ब्रह्म जाणती. ॥ ४८ ॥ पूर्वाध्यायांत **अधोक्षज** । बोलिला ऐसें प्रश्नबीज । त्यावरूनी **कुंतीचा** आत्मज । दों प्रकारें पुसतों तें ब्रह्म. ॥ ४९ ॥ **'किं तद्ब्रह्म'** हीं चारी अक्षरें । वाखाणावीं दों प्रकारें । **'किं ब्रह्म किं तत्'** ऐसा आदरें । प्रश्न करितो येथें म्हणावा. ॥ ५० ॥ **'किं ब्रह्म'** म्हणजे कैसें ब्रह्म । **'किं तत्'** म्हणजे कैसें तें जें तूं **सर्वोत्तम** । बोलिलासि संपतां सत्तम । **'तद्विदुः कृत्स्नं'** म्हणोनी. ॥ ५१ ॥ जें पूर्वीं बोलिलें । त्यांत पुसतां जें उरलें । तें 'तत्'-शब्दें सूचविलें । कीं तेंचि सर्व म्हणूनि बोलिलासि तें कैसें ? ॥ ५२ ॥ दों परी ब्रह्म जाणती । ऐसें बोलिला **श्रीपती** । दोहीं परी तें कैसें? ऐसें त्याप्रती । पुसतसे श्रोताही. ॥ ५३ ॥ ऐसेंच या प्रश्नाचें उत्तर । दों परी ब्रह्म **सर्वेश्वर** । बोलेल यालागीं ऐसा प्रकार । प्रश्नाचाही बोलावा. ॥ ५४ ॥ व्याकरणसिद्ध अर्थ । प्रश्नबीजानुरूप बोले **पार्थ** । **श्रीकृष्ण** सूचवी तें कां व्यर्थ । टाकूनि वरिच्यावरी उडावें. ॥ ५५ ॥ प्रश्न प्रथम ऐसा बरा । कैसें अध्यात्म हा दूसरा । कैसें कर्म हा तिसरा । प्रश्नबीजां सातांत. ॥ ५६ ॥ आणि बोलिलें अधिभूत । तें कैसें सांग निश्चित । हा चौथा प्रश्न आणि अधिदैवत । कैसें बोलिजेतें हा पांचवा. ॥ ५७ ॥ सहावा प्रश्न ऐसा । कीं अधियज्ञ एथें या देहीं कैसा । एथें कांहीं समजोनिसा । **अर्जुन** पुसे. ॥ ५८ ॥ साधियज्ञ म्हणजे अधियज्ञासहित । मज अधिदैवा जाणती म्हणूनी **भगवंत** । बोलिला इतकेंचि ऐसियांत । अधियज्ञ देहीं आहे ऐसें समजला. ॥ ५९ ॥ तरी हा संवाद सन्मुख । बोलतां हस्त नेत्र मुख । तदनुरूपें चेष्टतां अंतर्मुख । बुद्धि अर्थी होतसे. ॥ ६० ॥ अधिभूतासह जाणती निपुण । ऐसें बोलतां ब्रह्म सगुण । हातें करूनी दाखवी खूण । देहाकडे **अर्जुनाच्या.** ॥ ६१ ॥ आणि म्हणतां साधियज्ञ । हात आप-

णाकडे सर्वज्ञ । दावितां समजला श्रोता अभिज्ञ । कीं अधियज्ञ हा स्वयें श्रीकृष्ण. ॥ ६२ ॥ अधिदैव मी त्या मातें जाणती म्हणे । परि दावितां नये त्याचे खुणे। बिंबात्मा समजे तोचि जाणे । प्रतिबिंबचैतन्या तयातें. ॥ ६३ ॥ एवं साधिभूत म्हणतां देहासहित । जें काय असेल अधिदैवत । त्यातें जाणत असतील आणि निश्चित । अधियज्ञ हा स्वयें श्रीकृष्ण. ॥ ६४ ॥ कीं मी अधियज्ञ त्या मजस-हित । अधिदैवातें जाणती हें भगवंत । खुणेनें दावितो अत्यंत । स्पष्ट उघडूनी. ॥ ६५ ॥ अधिदैव अधिभूतासहित । म्हणतां देहाकडे दाविला हात । तेव्हां समजला कीं अधिदैव याच देहांत । असेल जे रीती असेल. ॥ ६६ ॥ कीं अधिभूत म्हणतां हात । देहाकडे दावितो भगवंत । अधिदैव नसतां या दे-हांत । या देहासहित कोठें म्हणूनि जाणावा? ॥ ६७ ॥ देह देहापरता न दिसे। ऐसिया देहासहित जेव्हां गवसे । तेव्हां जाणावें कीं वसे । अधिदैव कोण तो याच देहांत. ॥ ६८ ॥ आणि हा अधियज्ञ आपण । यासहित त्या अधिदैवाची खूण । जाणती तेव्हां निपुण । तेव्हां हाही असेल याच देहांत. ॥ ६९ ॥ कीं हा जरी या देहीं नसे । तरी देहीं यासहित कैसें । अधिदैव जाणती ऐसें । तर्क करूनि पुसे म्हणावा अर्जुन. ॥ ७० ॥ ऐसें न म्हणतां या देहीं । मी अधि-यज्ञ आहें हें कांहीं । प्रश्नबीज बोलतां नाहीं । श्रीकृष्ण बोलिला. ॥ ७१ ॥ **'साधियज्ञं च ये विदुः'** म्हणोनी । म्हणतां या देहीं अधियज्ञ ये रीती करूनी । न समजतां **'अधियज्ञः कथं कोऽत्र देहेऽस्मिन्'** ऐशा वचनीं । कैशावरूनि हा पुसे? ॥ ७२ ॥ एवं करादिसंकेत । दाविता जाला श्रीनिकेत । त्यावरूनि म्हणावा पांडुसुत । **'अधियज्ञः कथं कोऽत्र देहेऽस्मिन्'** म्हणुनी पुसतसे. ॥ ७३ ॥ तरी हे गोष्टी त्यातें समजली । समजोनि मागुती कां पु-सिली? । शंका ऐशी उपजली । तेव्हां न घडे म्हणावा जरी हा अर्थ. ॥ ७४ ॥ तरी करिती या शंकेचा परिहार । अर्जुनप्रश्नशब्दाचे चमत्कार । कीं अधियज्ञ कोण कैसा हा प्रकार । सांग अजी मधुसूदना! ॥ ७५ ॥ कीं देहीं अधियज्ञ आहे ये रीती । समजलों जी श्रीपती! । तथापि शंका उपजली चित्तीं । अधि-यज्ञ कैसा या देहीं म्हणोनी पुसतो हा भाव. ॥ ७६ ॥ ब्रह्म कैसें अध्यात्म कैसें। कर्म कैसें अधिभूत कैसें । अधिदैव कैसें म्हणवूनि ऐसें । येथवरी पुसे कैसें कैसें म्हणूनि इतकेंचि. ॥ ७७ ॥ अधियज्ञ कैसा कोण । येथें देहीं याच देहीं म्ह-णूनि बोले निपुण । भाव कीं तूं म्हणसी तो आपण । हें कैसें घडे. ॥ ७८ ॥ कीं तूं मधुसूदन । ज्याणें केलें मधुदैत्यहनन । तोचि तूं यदुनंदन । अवतर-लासि या रूपें. ॥ ७९ ॥ जेथें तेथें रूपवंत । तूं सगुण भगवंत । निर्गुण

म्हणों तरी तें अत्यंत । निर्धर्म धर्म कोणी त्याला लागेना. ॥ ८० ॥ अधियज्ञ यज्ञाचा अधिष्ठाता । तो निर्गुण नव्हे कीं ते उगीच सत्ता । सगुण तूं मधुदैत्यहंता । तो कैसा देहवंत या देहीं? ॥ ८१ ॥ या रूपें मधुसूदना! । या देहीं कैसा तूं हें कळेना । या कारणें यदुनंदना! । तो कोण. ॥ ८२ ॥ **'कथं कोऽत्र देहेऽस्मिन्मधुसूदन'** । कैसा कोण येथें देही याच देहीं म्हणे अर्जुन । येविषयींच अत्यंत शंकित मन । दाखवी या प्रश्नशब्दप्रवाहांत. ॥ ८३ ॥ येथें देहीं याच देहीं । आश्चर्य सूचवी तिन्ही शब्दींही । कीं माझिया मतें घडत नाहीं । कीं या देहीं म्हणावास तूं अधियज्ञ ॥ ८४ ॥ 'अत्र' म्हणजे येथें या प्रसंगांत । कीं या सातांत अधियज्ञ या देहांत । कैसा कोण आणि तूं भगवंत । म्हणावा तरी देहांत याच तूं कैसा? ॥ ८५ ॥ तूं वैकुंठीं अथवा जेथें । अवतरोनि फिरसी अससी तेथें । तो कोणे रीती येथें । म्हणावयास या देहीं. ॥ ८६ ॥ आणि मजसमोर दिससी । तो देहांत कैसा अससी? । आणि याच देहीं निवासी । श्रीकृष्णा! काय तूं. ॥ ८७ ॥ ऐसें मानूनि नवल । अर्जुन बोलिला हे बोल । भावार्थ त्यांत अत्यंत खोल । ये रीती. ॥ ८८ ॥ कीं ऐको न जाणे निर्गुण । आणि अवतरतो तो हा कृष्ण सगुण । कीं युगायुगीं अवतरतो आपण । हें चतुर्थीं येथें श्रीकृष्ण बोलिला. ॥ ८९ ॥ तिसरें व्यापक सगुण । तें न कळे कळेना जों निर्गुण । तें कळेल आतांच जेव्हां खूण । कळेल अपरोक्षें ब्रह्मात्मतेची. ॥ ९० ॥ **'किं तद्ब्रह्म'** याचें उत्तर । **'अक्षरं ब्रह्म परमं'** ऐसें सर्वेश्वर । देतां अपरोक्षसाक्षात्कार । होतां व्यापक सगुणही कळेल. ॥ ९१ ॥ कीं शुद्धतत्त्वें अनुभव । हेंचि सगुणत्वाचें वैभव । मग मीच अधियज्ञ म्हणेल देव । संदेह उरेल मग कैंचा. ॥ ९२ ॥ या देहीं अधियज्ञ कोण कैसा । प्रश्न अर्जुनाचा ऐसा । देहीं अधियज्ञ पुसावा हा ठसा । कोठूनि बैसला त्याच्या चित्तांत. ॥ ९३ ॥ ऐसा करितां विचार । बोलणें लागलें हें गुह्यसार । श्रीकृष्ण वक्ता हें वारंवार । काय म्हणवूनि बोलावें. ॥ ९४ ॥ आतां अर्जुन सर्व जाणे । हें लोकांकारणें सांग म्हणे । ऐसें म्हणतां सद्य बाणे । अश्रद्धा सकळांसही. ॥ ९५ ॥ लटिकाच पुसतो अर्जुन । लटिकेंचि त्याचें समाधान । त्यास गीतोपदेशें जालें ज्ञान । सर्व मिथ्या. ॥ ९६ ॥ सप्तमपर्यंत परोक्ष । अष्टमीं तत्त्व अपरोक्ष । एकादशीं आरंभींच दक्ष । अर्जुनही बोलेल. ॥ ९७ ॥ हा विचार सकळीं सांडिला । तो भगवंतें एथें मांडिला । उगाचि गीतासिंधु ओलांडिला । तरी त्यांतील रत्नें कैसीं सांपडती? ॥ ९८ ॥ कूर्मरूपें मंदर ।

पाठी धरी सगुण सुंदर । अजितरूपें अमृतसागर । मथूनि रत्नें तो काढी. ॥ ९९ ॥ असो. आतां यावरी । सातवा प्रश्न अर्जुन करी । कीं प्रयाणकाळीं कैसे परी । जाणिजेतोसि तूं देवा! ॥ १०० ॥ कीं साहा प्रकारें तूतें । जाणती सुकृती जया चित्तें । नियत केलें त्या चित्तातें । सर्वदा जिहीं तुझ्या ठायीं. ॥ १०१ ॥ नियतचित्त जे ऐसे असती । तेचि जाणती तूतें जी श्रीपती! । पुन्हा प्रयाणकाळीं कोणे रीती । तूं तिहीं जाणिजेतोसी. ॥ १०२ ॥ जाला असतां प्रयाणकाळ । त्यावरी मुक्तिदशेचीच वेळ । ते समयींही सगुण-मुक्ति केवळ । जाणती हा अर्थ पार्थ नाहीं समजला. ॥ १०३ ॥ नेणोनि ऐसें हा प्रश्न केला । तरी याचें उत्तर देव त्याला । देईल कीं सगुण मोक्षांत मजला । जाणती न बुडे अनुभव हा त्याचा भाव. ॥ १०४ ॥ सातही प्रश्न ये रीती । आइकता जाला श्रीपती । अनुक्रमें उत्तरें त्याप्रती । देतसे प्रश्नानुरूप. ॥ १०५ ॥ प्रश्न सातांतही प्रथम । ऐसा कीं **'किं तद्ब्रह्म'** । याच्या उत्तराच्या मिसें परम । स्वरूपसाक्षात्कारउपदेश. ॥ १०६ ॥ ज्यानिमित्त प्रश्नबीज । पूर्वाध्यायांत अधोक्षज । बोलता जाला कीं अर्जुन मज । पुसो **'किं तद्ब्रह्म'** म्हणोनी. ॥ १०७ ॥ त्या प्रश्नाचें उत्तर । व्यतिरेक अन्वयरीती परमेश्वर । बोलतो जगद्गुरुतर । षड्गुणसंपन्न ऐसें श्रीभगवान् ॥ १०८ ॥

**श्रीभगवानुवाच—अक्षरं ब्रह्म परमं स्वभावोऽध्यात्ममुच्यते ।**

जें नव्हे क्षर[1] । तें म्हणावें अक्षर । तें ब्रह्म म्हणे गुरुवर । व्यतिरेक उपदेशी इतकियांत. ॥ १०९ ॥ कीं ब्रह्म तें अक्षर । म्हणजे तें नव्हे जितकें क्षर । जडभाग तितका क्षर नश्वर । आत्मा नव्हे. ॥ ११० ॥ निषेधिला जड अनात्मभाव । तेव्हां क्षर नव्हे म्हणोनि बोलिला देव । वाच्यांश निरसतां स्वयमेव । लक्ष्यांश आत्माच उरला. ॥ १११ ॥ कीं शब्द अहंकारापासुनी । तोही निषेधिला जेथूनी । शब्द परतला तेथूनी । उरलें निःशब्द तें ब्रह्म. ॥ ११२ ॥ **'यतो वाचो निवर्तंते'** । हे श्रुति तें ब्रह्म बोलते । बुद्धि अनुभवें त्यास जाणते । तें ऐसें कीं तैसें न बोलवे. ॥ ११३ ॥ यालागीं तें अक्षर । म्हणजे तें कीं जें नव्हे क्षर । हें व्यतिरेकमुखें उत्तर । दे शाखाचंद्रन्यायें श्रीगुरू. ॥ ११४ ॥ उपदेश अनिर्वाच्य आत्मयाचा । कैसी करूं शकेल वाचा । शब्द मूळ शाखेसहित जड वृक्षाचा । निषेध होतां उरे दिसे तोचि चिच्चंद्र. ॥ ११५ ॥ म्हणूनि वाच्य जितकें । क्षर जड म्हणावें तितकें । तें सर्व नव्हे

---

१. नाशवंत, नश्वर.

म्हणतां श्रीवत्सांकें । दाविलें निषेध शेषस्वरूप शिष्यातें. ॥ ११६ ॥ ब्रह्म पुसों लागला । तो स्वयेंचि ब्रह्म होऊनि उरला । राजा स्वप्नीं राजदर्शना गेला । जागा होतां राजा आपण. ॥ ११७ ॥ नवल गुरुराजवाणी । नवल गुरुराज अभय पाणी । नवल गुरुरायाची करणी । कीं ब्रह्मचि करी जीवातें. ॥ ११८ ॥ लोहास लागे परिस । मग काळिमा कैंची तयास? । गुरुकृपा होतां जीवास । जीवत्व कैंचें? ॥ ११९ ॥ लोहत्व करूनि दूरी । परिस लोहास सोनें करी । परी देऊं शकेना सरी । आपुली तया. ॥ १२० ॥ कीं लोहांतराचें हेम। करूं न शके परिसासम । जीव होय स्वयें ब्रह्म । ब्रह्म करी आणिकातें. ॥ १२१ ॥ काय वर्णवेल गुरुमहिमा । वेदास ज्याची वाणी सीमा । जें न बोलवे निगमा । तें निःशब्दशब्दें जो दावी. ॥ १२२ ॥ शब्द राहे शाखेवरी । दृष्टि चंद्रातें धरी । श्रीगुरुरूपी ऐसा हरी । शब्दें दावी निःशब्द. ॥ १२३ ॥ शाखेवरी चंद्र पाहे । म्हणतां शब्द शाखेवरीच राहे । पुढें काय खूण आहे । कीं तेथें चंद्रमा सांगावा. ॥ १२४ ॥ गळे जें क्षर । तेणें दाविलें अक्षर । बाप समर्थ गुरुवर । शब्दें दावी निःशब्द. ॥ १२५ ॥ श्रीगुरुमहिमा अपार । वर्णितां ग्रंथ वाढेल फार । हे गीताटीका जो जो प्रकार । बोले तो तो महिमा तयाचाच. ॥ १२६ ॥ एवं निषेधूनि क्षर । उरला आत्मा तो दाविला अक्षर । आणि **'किं तद्ब्रह्म'** याचें दिधलें उत्तर । कीं हें अक्षर अगा! ब्रह्म. ॥ १२७ ॥ क्षरभाग निषेधितां अनेक । कळलें अक्षर ब्रह्म एक । हा क्षराअक्षरांचा विवेक । व्यतिरेकबोध बोलावा. ॥ १२८ ॥ नेणे आपणातें आपण । हें अविद्येचें होतें आवरण । याच्या परिहाराचें कारण । व्यतिरेकबोध हा केला. ॥ १२९ ॥ ब्रह्म म्हणतां अक्षर । तें अक्षर कळलें निषेधितां क्षर । भगवत्कृपापात्र चतुर । ब्रह्मात्मखुणेतें पावला. ॥ १३० ॥ परि क्षरभाग जड निषेधिला । तो दृश्यत्वें दिसों लागला । म्हणोनी नाहीं बिंबला । अद्वैतबोध. ॥ १३१ ॥ बुद्धि घेऊनि इंद्रियविकार । देखे जडभाग नानाकार । हा जो अविद्येचा प्रकार । विक्षेप म्हणावें यालागीं. ॥ १३२ ॥ या विक्षेपाचा परिहार । कीं सोनेंचि दिसे अलंकार । ऐसें ब्रह्मचि दिसे नानाकार । तो अन्वयबोध बोलावा. ॥ १३३ ॥ या दोंपरी ब्रह्म जाणे । त्यातेंचि अद्वैत बोध बाणे । या लागीं सप्तमीं कृष्ण म्हणे । कीं ब्रह्म जाणती दोंपरी. ॥ १३४ ॥ ब्रह्म जाणती सुकृती । आणि तेंचि सर्व ऐसें जाणती । हें प्रश्नाचें बीज श्रीपती । सप्तमीं शेवटीं बोलिला. ॥ १३५ ॥ तदनुरूप प्रश्नही जाला ।

प्रश्न दोंश्लोकीं तो वाखाणिला । तदनुरूप कृष्णही बोलिला । **'अक्षरं ब्रह्म परमं'** म्हणोनी. ॥ १३६ ॥ यांत हा **'अक्षरं ब्रह्म'** हें एक । उत्तर देतां उपदेशिला व्यतिरेक । आतां एक तेंचि अनेक । समजे ऐसें परमशब्दें उपदेशितो. ॥ १३७ ॥ **'अक्षरं ब्रह्म परमं'** म्हणोनी । यांत दीधलीं उत्तरें दोनी । व्यतिरेक **'अक्षरं ब्रह्म'** येणें करूनी । परमशब्दें अन्वय आतां दावितो. ॥ १३८ ॥ अक्षर म्हणतां निषेधिलें क्षर । कीं सोनें नव्हे कुंडलाकार । जे अलंकार होऊनि निर्विकार । त्या आकारांत तें परम. ॥ १३९ ॥ परम तंतु पटीं । परम माती घटीं । परम सोनें ज्याणें गोमटीं । दिसती भूषणें. ॥ १४० ॥ **'तद्विदुः कृत्स्नं'** म्हणोनीं । प्रश्नबीज या भावें करूनी । सप्तमीं बोलिला त्यावरूनी । परम शब्दें क्षरांतही दाखवी ब्रह्म. ॥ १४१ ॥ सर्व तें ब्रह्म जाणती । कीं कारण कार्यांत पाहती । कार्याहूनि परम म्हणती । कारणातें. ॥ १४२ ॥ तंतु रूपातें न सोडी । जे ऐसी पासोडीची दसोडी । ते दावितां पासोडी । लटकी होऊनि तंतूचि दिसे. ॥ १४३ ॥ पटांत तंतू परम । तैसें जडीं ब्रह्म । तंतुचि पट तैसें स्थावरजंगम । ब्रह्म सकळ. ॥१४४॥ प्रथम तंतुरूपें दिसे आत्मा । पटरूपें तेव्हां दिसे अनात्मा । परम या कारणें म्हणे जगदात्मा । कीं जें नाहीं त्यातें दावी आणि प्रकाशी तें परम. ॥ १४५ ॥ सोनियावीण अलंकार । न दिसे असत्य आकार । तैसें ज्यावीण चराचर । न दिसे परम कैसें तें नव्हे. ॥ १४६ ॥ परि आधीं दिसे दसोडी । मग त्यास दावितां पासोडी । तींत परम म्हणतां न सोडी । दृष्टि मग तंतूतें. ॥ १४७ ॥ तैसें ओळखोनि अक्षर । आहे द्वैतरूपें क्षर । तो परम म्हणतां सर्वेश्वर । ब्रह्मचि सर्वही तो देखे. ॥ १४८ ॥ होती जाती तरंग आकार । ते आकार बोलावे क्षर । परि पाणी परम त्यांत तें अक्षर । आदिमध्यांतही तरंगीं जें. ॥ १४९ ॥ मृगतृष्णा नीर । उपजे असे तें नासे क्षर । परम किरण सूर्याचे अक्षर । आदिमध्यांत त्या मिथ्या जलाचे. ॥ १५० ॥ वेदीं इत्यादि हे दृष्टांत । ते सूचवूनि भगवंत । परम शब्दें अनंत । अन्वय ऐसा उपदेशी. ॥ १५१ ॥ ब्रह्म जाणती केवळ । मग तेंचि ब्रह्म जाणती सकळ । ऐसें बोलोनि घननीळ । व्यतिरेक अन्वय बोलिला सप्तमींच. ॥ १५२ ॥ तरी तेव्हां होतें परोक्ष । अष्टमीं जालें अपरोक्ष । परम शब्दें समजला दक्ष । कार्य क्षरांत अक्षर कारण. ॥ १५३ ॥ कार्य न दिसे कारणाविण । परम म्हणतां कळली खूण । दृष्टांतकोटी विचक्षण । समजला इतकियांत. ॥ १५४ ॥ या दृष्टांताचे

विचार । द्वितीयाध्यायटीकेंत निर्धार । जाले असतां वारंवार । बोलतां ग्रंथ वाढतो. ॥ १५१ ॥ न कळे दृष्टांतावांचूनी । बोलावें अगम्य या गोष्टीवरूनी । कोण्ही कुयुक्ति चाळिती म्हणोनी । पूर्वीं सिद्ध केलेच हे दृष्टांत. ॥ १५६ ॥ प्रथम प्रश्न उत्तर । ऐसें देऊनी सर्वेश्वर । द्वितीयप्रश्नीं श्रीधर । आतां उत्तर देतसे. ॥ १५७ ॥ अध्यात्मशब्दें स्वभाव । बोलिजे तो म्हणे देव । स्वभाव म्हणिजे आपला भाव । उत्तर इतकेंचि परम शब्दासारिखें. ॥ १५८ ॥ परम शब्दें करूनी । कार्य तितकें कारण म्हणोनी । दाविलें तें स्वयें ज्ञाताच यावरूनी । पूर्वोक्त अद्वैत दृढ करितो. ॥ १५९ ॥ कीं स्वयेंचि आपण । या जगाचें उपादान कारण । स्वभाव म्हणजे कार्यपण । आपलाचि भाव. ॥ १६० ॥ म्हणिजे दृश्य तितकें जग । तें आपणचि सोनेंचि जेंवी नग । अलंकारीं सुवर्णाची झगमग । तैसा सर्वत्र आपण. ॥ १६१ ॥ तेव्हां सर्वही आपण । कीं अलंकार तोही सुवर्ण । अध्यात्में बाणे अद्वैतपण । आपलें ऐसें पाहतां. ॥ १६२ ॥ कारणचि कार्य आहे । ऐसें उगाचि जरी पाहे । द्रष्टा आपण राहे । द्वैत अवलंबूनी. ॥ १६३ ॥ म्हणूनि जो द्रष्टा आपण । तोचि जगाचें कारण । आपला भावचि कार्यपण । नग सोनेंचि स्वभाव हा अध्यात्म. ॥ १६४ ॥ एवं प्रथम प्रश्न उत्तर । तेथें ज्ञान जें द्विप्रकार । तेंचि अध्यात्म ज्ञानसार । आत्मप्रत्ययें अनुभवावें हा विशेष. ॥ १६५ ॥ या ज्ञानाचा विचार । तोही ब्रह्मीं हेमीं अलंकार । शेवटीं हाचि निर्धार । कीं ब्रह्मचि अध्यात्मज्ञानही. ॥ १६६ ॥ अधिष्ठूनि आत्माच असे । ऐसें स्थावरजंगम दिसे । अध्यात्म शब्दें होतसे । अर्थ ऐसा. ॥ १६७ ॥ दृष्टि पावे जेथें । नगीं सोनेंचि दिसे तेथें । दार्ष्टांतीं आत्माच एथें । जगीं जेथें मन पावे. ॥ १६८ ॥ आत्माचि तें चित्स्वरूप । जो जडप्रकाशक स्वयंज्योति दीप । हा जो अनुभवाचा प्रताप । याला म्हणावें अध्यात्म. ॥१६९॥ जडीं चैतन्य मात्र स्मरे । तेव्हां आपण वेगळा उरे । आणि सर्व आपण ऐसें स्फुरे । तें अद्वैत अध्यात्म बोलावें. ॥ १७० ॥ यालागीं जाणती ब्रह्म । आणि जाणती सर्व तेंचि परम । तथापि जाणती अध्यात्म । या विशेषें ऐसें बोलिला. ॥ १७१ ॥ आतां तृतीय प्रश्न **'किं कर्म'** । त्यास उत्तर कर्मही ब्रह्म । हें समजावया गुह्य वर्म । सर्व कर्म ज्यांत तें बोलतो उत्तरार्धे. ॥ १७२ ॥

**भूतभावोद्भवकरो विसर्गः कर्मसंज्ञितः ॥ ३ ॥**

भूतें आणि भूतांचे भाव । या सकळांचा जो उद्भव । उद्भव म्हणजे

ज्यापासूनि उत्कर्षे संभव । म्हणजे कारणसमुदाय त्यांचा. ॥ १७३ ॥ ऐसा कारणसमुदाय उद्भव । त्याही उद्भवातें करी जो स्वयमेव । विसर्ग म्हणूनि त्याचें नांव । कर्मसंज्ञा तयाला. ॥ १७४ ॥ भूतें हींच पंचभूतें । भाव म्हणावें भूतांश देहातें । उद्भव बोलिजे कारणातें । या सर्वांचिया. ॥ १७५ ॥ त्या उद्भवातें निर्माण करी । विसर्ग म्हणे त्यातें हरी । गहन भावें वैखरी । चाळी ऐशी ये स्थळीं. ॥ १७६ ॥ त्यास म्हणावें कर्म । तें कर्म जाणावें ब्रह्म । कीं सर्व ब्रह्म हा अवगम । पूर्वींच बोलिला. ॥ १७७ ॥ यांत सर्वही कर्म आटे । आणि कर्म पाहतां ब्रह्म वाटे । कीं कार्य तितकें ऐक्यें भेटे । कारणासी. ॥ १७८ ॥ कर्म म्हणावें विसर्गातें । विसर्ग तो जो करी उद्भवातें । उद्भव म्हणावें उपजण्यातें । देहाच्या आणि भूतांच्या कारणांच्या. ॥ १७९ ॥ विसर्ग आणि उद्भव । अर्थ एक भिन्न नांव । तेव्हां उद्भवास उद्भव करी ऐसें देव । सर्वज्ञ अयुक्त कां बोलेल. ॥ १८० ॥ विविध सृजी जग । अनादि सृष्टिकाळ तो विसर्ग । निमित्त कारण जगाचें श्रीरंग । बोले यथार्थ हा अर्थ. ॥ १८१ ॥ कुंभार आणि माती । घटासि दोनी कारणें असती । त्यांत निमित्तकारण बोलती । कुंभारातें. ॥ १८२ ॥ कराया मृत्तिकापात्र । कुंभार होतो निमित्त-मात्र । माती न सोडी सर्वत्र । उपादान कारण ते म्हणावी. ॥ १८३ ॥ ब्रह्मीं अनादि सृष्टीची वेळ । तेव्हां पहिला प्रगटतो काळ । महत्तत्त्वादि कारणें तत्काळ । उपजती. ॥ १८४ ॥ पंचभूतांपासूनि ज्याचा संभव । भूतांश हे देह जे म्हणावे भाव । उत्पन्न होती हे सर्व । त्या महदादिकांपासूनी. ॥ १८५ ॥ देह भूतांचे होती । त्या भूतांची महदादिकांपासूनि उत्पत्ती । उद्भवशब्दें श्रीपती । सूचवी महदादिकारणांतें. ॥ १८६ ॥ देहाचीं कारणें भूतें । त्यांचा उद्भव म्हणावें त्याच्या कारणातें । तें महदादिकें त्यांतें । करी विसर्ग म्हणजे सृष्टिकाळ. ॥ १८७ ॥ त्यास म्हणावें कर्म । कीं त्यामुळें सर्व क्रिया धर्म । आटलें कर्माकर्म विकर्म । जीवांचें यामध्यें. ॥ १८८ ॥ कीं जीव कर्मानुसार । रचे पंचभूतांचें शरीर । आणि देहयोगें जोडती संस्कार । पुढें कर्मै होती तद-नुरूपें. ॥ १८९ ॥ एवं कर्म विसर्गपर्यंत गेलें । यांत जीव काळ ईश्वर कर्तृ-त्वही आलें । तें ब्रह्मीं पाहतां जालें । किरणीं जैसें मृगजळ. ॥ १९० ॥ किर-णचि तें मृगजळ । चलन तरंगांचें तेंही जळ । उपजणें अलंकारांचें तेंही केवळ । सोनेंचि ज्यावीण किमपिही नसे तयांत. ॥ १९१ ॥ तीं प्रश्नांचें

उत्तर । या श्लोकीं देता जाला सर्वेश्वर । उरले चार त्यांत जगदाधार । तीनी उत्तरें देतसे या श्लोकीं. ॥ १९२ ॥

**अधिभूतं क्षरो भावः पुरुषश्चाधिदैवतम् ।**

अगा! अधिभूताचा अर्थ । प्रश्न तुझा चतुर्थ । कीं क्षररूप भावमात्रचि यथार्थ । अधिभूत तूं जाण. ॥ १९३ ॥ ब्रह्म म्हणतां अक्षर । दृश्य तितुकें कळलें क्षर । क्षर म्हणजे नश्वर । नाशवंत. ॥ १९४ ॥ नव्हे क्षर तें अक्षर । ऐसें ब्रह्म म्हणतां कळलें क्षर । परि जरी क्षरशब्दें नश्वर । कळलें तेथेंचि अर्जुना. ॥ १९५ ॥ पुन्हां बोलणें यास्तव । कीं अधिभूतांसहित अधिदैव । जाणावें म्हणोनि बोलिला देव । प्रश्नबीज सप्तमीं बोलतां. ॥ १९६ ॥ तरी अधिदैव अधिभूताहूनी । विलक्षण प्रतिबिंबांश म्हणोनी । हें बोलतो सूचवूनी । जें स्पष्ट पंचदशीं बोलेल. ॥ १९७ ॥ **'द्वाविमौ पुरुषौ लोके'** या श्लोकें करूनी । क्षर सर्व भूतें आणि कूटस्थ अक्षर म्हणोनी । पुढें बोलेल तें येथें सूचवूनी । अधिभूत अधिदैवशब्दें बोलतसे. ॥ १९८ ॥ ब्रह्म अक्षर कीं जें नव्हे क्षर । प्रतिबिंबांश ही म्हणावा अक्षर । त्यासारिखें नव्हे शरीर । अधिभूत जो क्षरभाग. ॥ १९९ ॥ यालागीं अधिभूत क्षरभाव । आणि पुरुष म्हणावा अधिदैव । पंचदशीं यालाचि देव । म्हणेल कूटस्थ म्हणोनी. ॥ २०० ॥ आणि अधिभूतास सर्वेश्वर । म्हणेल कीं क्षर नश्वर । यालागीं येथें जगदाधार । म्हणे अधिभूत क्षरभाव. ॥ २०१ ॥ आणि नश्वर तितुकें क्षर । ब्रह्म तें नित्य अविनाशी अक्षर । दोहींस ऐक्य न घडे पामर । म्हणती तेही शंका हरीतसे. ॥ २०२ ॥ उगेंच क्षर अधिभूत । येथें न म्हणोनि अच्युत । क्षरभाव म्हणतां अत्यंत । गहन भाव या भावशब्दीं दाखवी. ॥ २०३ ॥ कीं भाव भासमात्र क्षर । वस्तुतः आहे ब्रह्म अक्षर । कीं स्त्रीभाव दावी नर । क्षरभाव भासमात्र तो म्हणावा. ॥ २०४ ॥ नाचतां नाचतां नट । पदर करी उत्तरीय पट । स्त्रीभाव दावूनी निपट । पुरुषभाव दावितां नासे तो भाव. ॥ २०५ ॥ सुवर्णीत जो अलंकार । नश्वर म्हणावा तो आकार । भाव आकार भिन्न प्रकार । शब्द दीसती परि अर्थ एक. ॥ २०६ ॥ तरंगांचा आकार । तो भावचि म्हणावा क्षर । तो भाव पावे जें नीर । तें नश्वर न म्हणवे त्यासह. ॥ २०७ ॥ अधिभूत क्षरभाव । या भावें म्हणे देव । जयासहित जाणती अधिदैव । म्हणूनि सप्तमीं बोलिला. ॥ २०८ ॥ एवं व्यापक जें ब्रह्म अक्षर । त्याचा भाव

अधिभूत क्षर । यासचि म्हणावें नवद्वार पुर । यांत वसे तो तोचि पुरुष अधिदैवत. ॥ २०९ ॥ अधिष्ठूनि सकळ अधिदैवतें । जो देहीं असे तयातें । अधिदैव म्हणावें कीं सर्वांतें । जीववितो पुरुष हा जीव. ॥ २१० ॥ कीं इंद्रियांचे देव । देहीं निघाले सर्व । तऱ्ही विना एक जीव । देह शवरूपें हा असे. ॥ २११ ॥ आणि देव तेही । इंद्रियें वर्तविती जें कांहीं । ते शक्तीही त्यांस नाहीं । विना जीव. ॥ २१२ ॥ एवं जीवविती सकळां देहीं । यावांचूनि सर्वथा नाहीं । कीं व्यापक अक्षर ब्रह्म तेंही । क्षरभाव दावी शवाचाच. ॥ २१३ ॥ शव व्यापूनि तें असे । जाणें येणें त्याला नसे । बाहेर निघतां प्रवेशतां दिसे । पुरुष अधिदैव हाचि ॥ २१४ ॥ **'उत्क्रामंतं स्थितं वापि'** म्हणोनी । पंचदशीं या श्लोकेंकरूनी । उत्क्रमण म्हणजे निघणें देह सांडूनी । **'ममैवांशो'** म्हणूनि बोलिला त्यातेंचि. ॥ २१५ ॥ एवं व्यापकही तें न जीववी देहातें । चेतवूं न शके इंद्रियदैवतें । म्हणूनि अधिष्ठूनि असे दैवतांतें । अधिदैवत पुरुष हा जीव. ॥ २१६ ॥ आणि इंद्रियदेवतासमूह । त्यांसही असती देह । त्या देहांस निःसंदेह । अधिदैव पुरुष जीववी. ॥ २१७ ॥ ऐसा पांचवा प्रश्न जाला । आतां अधियज्ञ कैसा कोण याच देहीं म्हणोनी पूशिला । तो अधियज्ञ अनुभवें त्याला । सांगतो उत्तरार्धें करूनी. ॥ २१८ ॥

**अधियज्ञोऽहमेवात्र देहे देहभृतांवर ॥ ४ ॥**

**'अधियज्ञोऽहमेव'** । म्हणजे अधियज्ञ मीच स्वयमेव । कीं अधिदैव मीच परि तो अंश जीव । स्वयेंचि देवाधिदेव मी अधियज्ञ. ॥ २१९ ॥ **'अत्र'** म्हणजे येथें । या जगीं तूं पहासील जेथें । मी स्वयेंचि आहें तेथें । अधियज्ञ नामें. ॥ २२० ॥ या देहीं तूं कैसा । आणि याच माझ्या देहीं कैसा म्हणूनि ऐसा । अर्जुनें प्रश्न केला तैसा । बोलतो श्रीगुरू त्याप्रती. ॥ २२१ ॥ **'अत्र'** या जगीं म्हणूनि मागुती । **'देहे'** म्हणे श्रीपती । तें तुझ्या देहीं म्हणूनि त्याप्रती । सूचवी येथें. ॥ २२२ ॥ परि वरकडा देहीं । अगा अर्जुना! मी ऐसा नाहीं । प्रसन्न होऊनि जैसा कांहीं । देहीं तुझे मी असें. ॥ २२३ ॥ हा भाव दावी सर्वेश्वर । म्हणे तो **'देहभृतांवर'** । कीं सर्वां देहधारियांत श्रेष्ठतर । तूं अगा अर्जुना! ॥ २२४ ॥ गौरवितां एक अर्जुन । गौरविले सकळ भक्तजन । कीं प्रसन्न मी भवभंजन । तुम्हां भक्तांचिया हृदयांत. ॥ २२५ ॥ कळतां अधियज्ञशब्दार्थ । कळेल हे प्रसन्नता यथार्थ । यज्ञ म्हणजे

होमिला पदार्थ । अग्निच होय अग्नींत. ॥ २२६ ॥ तैसें सर्व कर्म जीव कर्म । ब्रह्मचि देखे सगुणसाक्षी सधर्म । अधिष्ठूनि जीवाचें कर्माकर्म विकर्म । ये रीती असे साक्षी अधियज्ञ. ॥ २२७ ॥ त्यांत इतराचें कर्म । उगेंचि पाहे फळ दे सर्वोत्तम । प्रार्थिल्यावीण कल्पद्रुम । फळ नेदी आपण न मागतां. ॥ २२८ ॥ आपुलाली शिदोरी । कल्पवृक्षातळीं जेविती जरी । तो नेदी लवणही परी । अलवण अन्नें जेवितां रडतही. ॥ २२९ ॥ जाणेल कल्पवृक्षपणें । आणि मागेल त्यासी काय उणें । भक्त श्रेष्ठ या गुणें । कीं जाणोन भक्ति त्याचीच त्यातें मागती. ॥२३०॥ देवा! नको विषयवासना । गोडी तुझीच लागो मना । तोडी सकळही कामना । दे भक्तीच तुझिया पायांची. ॥ २३१ ॥ जे ऐसे मागती अभिज्ञ । त्यांस तैसेंचि दे कल्पवृक्ष सर्वज्ञ । ज्याच्या देहीं ऐसा अधियज्ञ । देहभृतांवर म्हणावें त्यातेंचि. ॥ २३२ ॥ अर्जुनालागीं या भावें । ऐसें कृपेनें देवें । आळविलें देवाधिदेवें । **'देहभृतांवर'** म्हणोनी. ॥ २३३ ॥ ऐशीं साहा उत्तरें । दीधलीं कृपेच्या सागरें । आतां सप्तम प्रश्नाचेंही बरें । उत्तर देतो या श्लोकीं. ॥ २३४ ॥

**अंतकाले च मामेव स्मरन्मुक्त्वा कलेवरम्।**
**यः प्रयाति स मद्भावं याति नास्त्यत्र संशयः॥ ५॥**

आतां अंतकाळींही नर । जो स्मरत मातेंचि कलेवर । सोडोनि जातो मृत शरीर । तो माझ्या भावातें पावतो. ॥ २३५ ॥ येथें संशय नाहीं म्हणे देव । कीं निश्चयेंशीं माझा पावतो भाव । कीं चतुर्भुज मी देवाधिदेव । तो तैसाच पावतो भाव माझा. ॥ २३६ ॥ जाला असतांही प्रयाणकाळ । माझ्या अनुभवाचा सुकाळ । या भावें बोले सप्तमीं मेघनीळ । कीं **'प्रयाणकालेऽपि च मां ते विदुः'** ॥ २३७ ॥ हें तेथें पार्थ न समजला । म्हणूनि प्रश्न ऐसा केला । कीं ते ज्ञानीच आणि तुजला । प्रयाणीं जाणती तें काय. ॥ २३८ ॥ तें ये स्थळीं सूचविलें । माझ्या भावातें पावती ऐसें जेव्हां बोलिलें । कीं निर्गुणीं निर्गुणत्व मात्र उरलें । तो नव्हे हा मोक्ष. ॥ २३९ ॥ हें ऐकोनी लाळ घोटी । गुदगुल्या होऊं लागल्या पोटीं । परि ज्ञणी निर्गुण मोक्ष होय ऐसा किरीटी । संशय मानूं लागला. ॥२४० ॥ कीं कळलें जें निर्गुण। तें निर्गुणचि आपण । यावरूनि निर्गुणपण । मी बहुतेक मोक्षीं पावेन. ॥ २४१ ॥ हा त्याचा संशय । दूरि होय ऐसा निश्चय । दाखवी कीं येथें नाहीं संशय । माझ्या भावातेंचि पावतो. ॥ २४२ ॥ त्यास हेंचि कारण । कीं देह सोडितां

सगुणमूर्तिस्मरण । म्हणूनि मी जो साकार सगुण । त्या मातें स्मरत देह सोडावा. ॥ २४३ ॥ या भावें म्हणे देव । 'अंतकाले च मामेव' । म्हणजे मातें सगुणातें स्मरे तो मद्भाव । पावे येथें संशय असेना. ॥ २४४ ॥ आतां या उपरी । श्लोक बोलेल जो हरी । तो कां म्हणूनि तरी । पूर्वानुसंधानें निमित्त ऐसें तयाचें. ॥ २४५ ॥ कीं ज्ञानावांचूनि नाहीं मुक्ति । त्यांत ज्ञान होऊनिही ज्यांस भक्ति । त्यांस सगुण मोक्षीं व्यक्ति । सगुणसारिखी निश्चित. ॥ २४६ ॥ परंतु देहावसानीं । जरी सगुण स्मरत देह सोडी ज्ञानी । तरीच सारूप्य पावे म्हणोनी । ज्ञानीही ध्याती सगुण श्रुति म्हणे. ॥ २४७ ॥

श्रुति—**यदापश्यत्पश्यते रुक्मवर्णं**
**कर्तारमीशं पुरुषं ब्रह्मयोनिम् ।**
**तदा विद्वान्पुण्यपापे विधूय**
**निरंजनः परमं साम्यमुपैति दिव्यम् ॥**

श्रुत्यर्थ—वाखाणिला अध्याय मागें चतुर्थ । तेथें विशद या श्रुतीचा अर्थ । बोलिला मुख्य हा इत्यर्थ । कीं सगुण ध्यातां परम साम्य सगुणाचें. ॥ २४८ ॥ हेंचि बोलिलें सप्तमीं । विशद त्याच्याच प्रश्नमिसें अष्टमीं । बोलतो स्वयें स्वामी । वैकुंठींचा. ॥ २४९ ॥ कीं स्मरत मातें सोडी शरीर । तो मद्भाव पावे नर । येथें संशय नाहीं म्हणे सर्वेश्वर । संशय वाटतां अर्जुनातें. ॥ २५० ॥ स्मरण तेथें निमित्त । कीं देहावसानीं मातें स्मरे चित्त । तरी माझें सारूप्य पावे निश्चित । मद्भाव म्हणतां हें सूचवी. ॥ २५१ ॥ कीं स्मरे जरी ज्ञानी । मद्भाव देहावसानीं । तरी मद्भावचि पावे म्हणोनी । सिद्धांत केला. ॥ २५२ ॥ कीं ज्ञान नाहीं त्याला । मोक्ष नाहींच बोलिला । आणि हा प्रसंग ज्याचा त्याला । ब्रह्म अध्यात्मादिकें ठाउकीं. ॥ २५३ ॥ आतां मद्भाव म्हणतां स्वरूपता । हाचि कां अर्थ तत्त्वतां । तरी पुढिल्या श्लोकीं अनंता । भावशब्दार्थ बोलणें असे हाची. ॥ २५४ ॥ कीं एथें नसे संशय । म्हणूनि पूर्वश्लोकीं बोलिला निश्चय । तरी मनीं धनंजय । निःसंशय जालाचि नाहीं. ॥ २५५ ॥ कीं देह सोडितां स्मरे यातें । तो पावेलचि याचि भावातें । ये विषयीं कांहीं मातें । प्रमाण न दिसे. ॥ २५६ ॥ कीं जो सगुण । तो काय नव्हे निर्गुण । अलंकारीं सुवर्णाविण । काय असे. ॥ २५७ ॥ निर्गुणत्वही याचाच भाव । कीं निर्गुणचि हा देवाधिदेव । बहुतेक या भावेंचि बोलतसे देव । माझ्या भावातें पावे म्हणोनी. ॥ २५८ ॥ चुकोनिही जन्ममरण । मुक्तींत आत्मानंद स्फुरण । एव्हडें सभाग्यपण । अघटित अत्यंत वाटतें. ॥ २५९ ॥ एथें नाहीं

संशय। म्हणूनि बोलिला निश्चय । तो निर्गुण प्राप्तीच्या विषयींच निर्णय। असेल दृढ केला. ॥ २६० ॥ हा हृदयांतील भाव । जाणोनि देवाधिदेव । तो पुसतां स्वयमेव । पूर्वोक्त दृढ करीतसे या श्लोकीं. ॥ २६१ ॥

**यं यं वापि स्मरन्भावं त्यजत्यंते कलेवरम् ।**
**तं तमेवैति कौंतेय सदा तद्भावभावितः ॥ ६ ॥**

अगा! जो जो आणीकही भाव । स्मरत देह सोडी जीव । त्या त्याच भावातें तो पावतो म्हणे देव । अनादिप्रवाह हा ऐसा. ॥ २६२ ॥ अज्ञानी अथवा ज्ञानी । जें स्मरे देहावसानीं । रूप तेंचि पावे म्हणोनी । स्मरे मद्भाव तो मद्भावचि पावतो. ॥ २६३ ॥ हा अनादि प्रवाह । कधीं न मोडे हा निर्वाह । कीं जें आठवे सुटतां देह । त्या रूपातेंचि तो पावे. ॥ २६४ ॥ ब्रह्मीं अनादि सृष्टि । अचूक होय तैशा कितीएक या गोष्टी । अचूक होतीच लोक कष्टी । व्यर्थ होती कीं कां ऐसें म्हणोनी. ॥ २६५ ॥ बंध तों जों अज्ञान । मोक्ष तेव्हां जेव्हां ज्ञान । कर्म फलरूपें करी बंधन । ईश्वरीं अर्पितां तें चुके. ॥ २६६ ॥ सृष्टि स्थिति संहार । प्रपंच हा वारंवार । ब्रह्मीं होतो हे प्रकार । न मोडती मोडिल्याही. ॥ २६७ ॥ तैसें हेंही न मोडे । कीं अंतीं स्मरण जें जें घडे । रूप तें तेंचि जोडे । प्रवाह हाही अनादि. ॥ २६८ ॥ जो जें स्मरे तेचि गती । पावे या लागीं मातें स्मरती । ते माझ्याच भावातें पावती । नियम अनादि हा ऐसा. ॥ २६९ ॥ ज्या भावाचें स्मरण । त्या भावातें पावतो म्हणतां खूण । अर्जुनास बाणली कीं रूप सगुण । भावशब्दें पूर्वश्लोकीं बोलिला. ॥ २७० ॥ हें ऐकोनि अर्जुन । पावला जरी समाधान । कांहीं एक शंकीत मन । मागुतीं जालें. ॥ २७१ ॥ कीं ज्यास निर्गुणमात्र उपासना । देहावसानीं त्याच्या मना । सगुण आठवे तरी त्या जना । सगुण मोक्ष नलगे तो होय कीं. ॥ २७२ ॥ आणि ज्या ज्ञानियातें सगुणभक्ती । जे न अपेक्षिती निर्गुण मुक्ती । त्यांस लागे प्रवेशणें अव्यक्तीं । अंतीं अव्यक्त निर्गुणचि जरी आठवे. ॥ २७३ ॥ कीं रूप स्मरतां पावे रूप । तरी निर्गुण स्मरतां निर्गुण स्वरूप । पावेच कीं ऐसा प्रताप । मरणकाळींचिया स्मरणाचा. ॥ २७४ ॥ आणि एका देवाचा उपासक । त्यास आठवे आणिक एक । तरी तो नव्हे ज्याचा सेवक । पावे तयातें. ॥ २७५ ॥ इत्यादि शंका मनीं । ते सर्वसाक्षी जाणोनी । श्लोकचतुर्थचरणें करूनी । समाधान करितो. ॥ २७६ ॥

## चतुर्थचरण—सदा तद्भावभावितः।

अगा! तेंचि आठवे देहावसानीं। कीं सदा त्याच्या भावनें करूनी। चित्त रंगेल दिवसरजनीं। भलतें न आठवे ते वेळे. ॥ २७७ ॥ भावशब्दें भावना म्हणजे ध्यान। ध्यान त्याचेंचि ज्याचें भजन। किंवा विषयप्रीति विषयचिंतन। तेंही ध्यान कीं आठवे तें रूप. ॥ २७८ ॥ एवं ज्याची आवडी जया। तेंचि देहावसानीं आठवे तया। गतीही तेचि धनंजया! । आवडी ज्याची अत्यंत. ॥ २७९ ॥ निर्गुणोपासका निर्गुण मुक्ती। सगुणमुक्ति ज्याला सगुणभक्ती। अन्यदेवताभक्तां व्यक्ती। त्याच देवाची. ॥ २८० ॥ तैसाच ज्यास जो प्रिय। मनी ध्यानीं दिसे तोचि विषय। त्याचेंचि त्याला स्मरण होय। प्राणप्रयाणीं. ॥ २८१ ॥ भरतराजा विवेकी उदंड। ज्याच्या नांवें हें भरतखंड। तो हरिणशिशु आठवितां अखंड। हरिणचि अंतीं जाला. ॥ २८२ ॥ इत्यादि भाव धरून पोटीं। तो कृष्ण म्हणे अगा किरीटि! । देहावसानसंकटीं। जें स्मरे तेंचि रूप तो पावे. ॥ २८३ ॥ कीं सर्वदा ज्याची भावना। ध्यान लागलें असे मना। तेंचि आठवे मग अर्जुना! । देह सोडोनि पावे तें रूप. ॥ २८४ ॥ तूं जालासि अपरोक्षज्ञानी। आतां भक्त माझा होऊनी। मज सगुणास पावेन म्हणोनी। अपेक्षितोसि अत्यंत. ॥ २८५ ॥ तरी सांगेन तें आइक। म्हणूनि आपला वेध उत्तमश्लोक। लागे ऐसा आणिक एक। श्लोक बोलतो याविषयीं. ॥ २८६ ॥

## तस्मात्सर्वेषु कालेषु मामनुस्मर युध्य च।

अर्जुना! सदा ज्याचें स्मरण। तेंचि आठवे होतां मरण। देह सोडूनि तो आपण। पावे तयातें. ॥ २८७ ॥ हें तों तुवां अर्जुना!। ऐकिलें आणि बिंबलें मना। आतां माझ्या या वचना। दृढ धरीं हृदयांत. ॥ २८८ ॥ ज्ञानें पावोनिही मुक्ती। मुक्तींत घडे माझी भक्ती। जरी देह सोडोनि पावे व्यक्ती। माझी दिव्य. ॥ २८९ ॥ त्यास हेंचि कारण। कीं सदा माझें अनुस्मरण। तरीच देहास येतां मरण। स्मरण माझें घडेल. ॥ २९० ॥ स्मरणास कारण प्रीती। ज्याची प्रीति त्याची स्मृती। स्मृति ज्याची अंतीं गती। तेचि त्याला. ॥२९१॥ तस्मात्कारण अर्जुना!। अवघियाही काळीं पांडुनंदना!। अरे मज भवभंजना। अनुस्मर प्रीतीनें हा भाव. ॥ २९२ ॥ अगा! माझी विस्मृतीच फटकाळ। पवित्रपणाचा दुष्काळ। माझें स्मरण तोचि सुकाळ। पवित्रपणा सर्वांचा. ॥२९३॥ चांडाळाचा स्पर्श जाला। गंगास्नान वर्ज त्याला। जो बोलेल या बोला।

चांडाळ तोचि. ॥ २९४ ॥ माझ्या स्मरणास काळ । कोणी एक फटकाळ । ऐसें नसे एकचि विटाळ । विस्मरणाचा होऊं नये. ॥ २९५ ॥ काळ असो भलतसा । आपण असो जैसा तैसा । माझ्या स्मरणाचा वेध मानसा । लागला असो. ॥ २९६ ॥ या भावें शेषशायी । म्हणे सर्वां काळांचियाहि ठायीं । चित्त लावूनि माझ्या पायीं । स्मरे मातें. ॥ २९७ ॥ माझ्या भक्ति नवविधा[1] । स्मरणेंचि पावल्या जीवनसुधा । माझिया सर्वा भजनातें क्षुधा । अखंड माझिया स्मरणाची. ॥ २९८ ॥ केंवी घडे श्रवण कीर्तन । अथवा पादसेवन अर्चन वंदन । दास्य सख्य आत्मनिवेदन । स्मरणावीण घडे कैसे परी? ॥ २९९ ॥ विविध अन्न घृतपाचित । तरी वेगळेंही वाढिती घृत । स्मरण तैसें नवविधांत । जरी स्मरणें श्रवणादि भक्ति साधती. ॥३००॥ देह असतांचि कौतुक । स्मरतां भृंग होतो कीटक । देह सोडोनि कांहीं एक । होणें स्मरणें नवल काय? ॥ ३०१ ॥ या भावें म्हणे हरी । कीं सर्वकाळीं स्मरण करीं । पावो इच्छितोस जरी । माझिया भावा. ॥ ३०२ ॥ आयकोनि ऐसी गोष्टी । अर्जुन पावला परम तुष्टी । शरीर पावलें पुष्टी । तटतटी कवच सर्वांगीं. ॥ ३०३ ॥ कृष्णाकडे पाहत असे । निर्गुण सगुण भिन्न न दिसे । सुवर्णावांचूनि केंवि गवसे । दृष्टीस मूर्ति सोन्याची. ॥ ३०४ ॥ यथास्थित निर्गुणपण । दिसोनि दिसे मूर्ति सगुण । अनुभवा आली खूण । निर्गुण सगुण ऐक्याची. ॥ ३०५ ॥ उदकाचें द्रवत्व मृदुत्व । तेंचि गारेचें घनत्व कठिणत्व । तैसें चित्स्वरूपचि शुद्धसत्व । अवयवरूपें अलंकारासह दिसे. ॥ ३०६ ॥ निर्गुणोपासकां नसे सगुण । परि सगुणभक्तां विना निर्गुण । न कळे सगुण मूर्तीची खूण । विना सुवर्ण न दिसे प्रतिमा सुवर्णाची. ॥ ३०७ ॥ दृष्टीस न दिसे पाणी । तों प्रत्यय न उपजे गारपणीं । बुद्धि स्पर्शे निर्गुणीं । तेव्हां चक्रपाणि तीस कळे. ॥ ३०८ ॥ ज्ञानियाचें स्मरण । निर्गुणेंचि सगुणमूर्तिस्फुरण । आत्मा निर्गुण अंतःकरण । देह जितांच पावे सगुणता. ॥ ३०९ ॥ जळे मेण ओते रस । आयती मूर्ति पडतां मूस । देह पडतां मानस । भगवद्रूप करणेंचि नलगे. ॥ ३१० ॥ निर्गुणीं होऊनि निर्गुण । त्या प्रकाशें पाहे मूर्ति सगुण । मनीं बाणली हे खूण । निर्गुण सगुण दोन्ही तोचि. ॥ ३११ ॥ ऐशा सुखें अर्जुन । पाहे दृष्टी कमलनयन । तल्लीन जालें मन । निजानंदीं. ॥ ३१२ ॥ कृष्ण अर्जु-

---

१. नवविधा भक्ति येणेंप्रमाणें—श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम् । अर्चनं वंदनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम् ॥

नातें पाहे । कीं अर्जुन कृष्णचि जाला आहे । तों प्रारब्ध त्याचें उभें राहे । कीं कौरववध राज्यभोग अदृष्टीं तयाच्या. ॥ ३१३ ॥ प्रारब्धकर्माचा क्षय । भोगेंचि घडे हा निर्णय । जरी जाला धनंजय । कृष्णरूप. ॥ ३१४ ॥ तीं प्रारब्धाचीं फळें । ईश्वर भोगवी आपल्या बळें । तीं तया समयांत सकळें । देखिलीं त्याच ईश्वरें अर्जुनाचीं. ॥ ३१५ ॥ त्यास मूळ हें युद्ध । ज्या कारणें दोन्हीं दळें सिद्ध । आणि तें युद्ध वाटलें विरुद्ध । अर्जुनातें. ॥ ३१६ ॥ ते याच कृष्णाची करणी । दया घातली अंतःकरणीं । कीं अविद्या नाशूनि आपुल्या स्मरणीं । अपरोक्षानुभवें तो योजावा. ॥ ३१७ ॥ जरी उगाच युद्ध करिता । तरी कां बोलणें लागतें अनंता? । कां प्रगट होती गीता । नाव तारक जगाची? ॥ ३१८ ॥ तो सत्यसंकल्प जाला । जेव्हां ग्रंथ येथपर्यंत आला । अपरोक्षानुभवें निघाला । तोही अर्जुन. ॥ ३१९ ॥ ज्याच्या प्रसादें मोह गेला । अपरोक्ष साक्षात्कार जाला । आतां श्रीगुरूच्या कोणत्या बोला । शिरीं न वंदी तो शिष्य? ॥ ३२० ॥ पूर्वीं अर्जुना तया । युद्ध करीं ऐसें म्हणावया । बोलणें लागलें देवराया । बहुतां परी. ॥ ३२१ ॥ या समयांत जों पाहे । तों केवळचि आज्ञाधारक जाला आहे । म्हणूनि एकचि गोष्टि बोलिला हे । कीं युद्धही करीं. ॥ ३२२ ॥ सर्व काळीं मातें । स्मर आणि करीं युद्धातें । भोग पूर्वकर्माचा हा ऐसें त्यातें । अष्टादशीं स्पष्ट बोलेल ॥ ३२३ ॥ **'स्वभावजेन कौंतेय'** । **'निबद्ध स्वेन कर्मणा'** म्हणूनि निश्चय । बोलेल कीं करूं न इच्छिसी जें काय । तें करिसी प्रकृतीस वश होउनी. ॥ ३२४ ॥ कीं तो निरूपणाचा शेवट । आणि युद्धाचा काल अति निकट । म्हणूनि हें रहस्य प्रकट । करील तेव्हां. ॥ ३२५ ॥ येथें निर्गुणीं मन । होउनियां तल्लीन । प्रेमें परिपूर्ण नयन । वेधले रूपीं आपुल्या. ॥ ३२६ ॥ म्हणूनि मातें सर्वकाळींही स्मर । ऐसें बोलतांच जाला तत्पर । तों त्यास म्हणे सर्वेश्वर । कीं युद्धही करीं. ॥ ३२७ ॥ हे गोष्टी पडतां कानीं । आज्ञा शिरसा वंदूनी । युद्ध करावेंचि हें मनीं । धरिता जाला. ॥ ३२८ ॥ परि जैशी मुलगी धाकुटी । सासरियां जाय अतिसंकटीं । ऐसा विव्हळ पोटीं । किरीटी जाला. ॥ ३२९ ॥ हृदयांत भाव ऐसा । कीं होईल युद्धाचा वळसा । स्मरणभक्तीचा लाभ कैसा । घडेल तेव्हां. ॥ ३३० ॥ मनीं काय काय भावना । दृढ जडती हें कळेना । देहावसानीं या भवभंजना । स्मरणें मग कैंचें? ॥ ३३१ ॥ हृदयांतील हा भाव । जाणोनि सर्वसाक्षी देव । भरंवसा देतो देवाधिदेव । या उत्तरार्धें. ॥ ३३२ ॥

**मय्यर्पितमनोबुद्धिर्मामेवैष्यस्यसंशयम् ॥ ७ ॥**

अगा अर्जुना ! घाबिरा जरी होसी । अगा ! तूं मातेंचि पावसी । मन बुद्धि जेव्हां अर्पिसी । माझ्या ठायीं. ॥ ३३३ ॥ मन आणि बुद्धि निश्चित । माझ्या ठायीं तुझीं अर्पित । तेव्हां मी जो भगवंत । त्या मातेंचि पावसी. ॥ ३३४ ॥ दृढ धरीं हा निश्चय । या गोष्टीस कांहीं नाहीं संशय । ऐसा करुणावरुणालय । देता जाला भरंवसा. ॥ ३३५ ॥ इतकाच अर्धाचा अर्थ । परि कांहीं यांत भावार्थ । कृष्णेंचि दाविला तो यथार्थ । संक्षेपें तरी बोलावा. ॥ ३३६ ॥ बुद्धि एकली अर्पित । होतां मनही निश्चित । अर्पित होणार भगवंत । मन बुद्धि दोन्हीं कां बोले. ॥ ३३७ ॥ मन राहेल वेगळें । म्हणतां चित्त काय न असेल निराळें । इंद्रियें अनर्थमूळें । तीं काय अर्पितें नसावीं. ॥ ३३८ ॥ तेव्हां कांहीं गूढ भाव । या गोष्टींत दावी देव । आणि तोचि देवाधिदेव । सूचवीही. ॥ ३३९ ॥ कीं युद्ध होतां दारुण । लक्ष लक्षितां हाणतां बाण । लक्ष लक्षा शरांचें उठाण । क्षणामाजी. ॥ ३४० ॥ होतां ऐसें रण । कैचें तेव्हां राहे स्मरण ? । हा तों मनाचा सहज गुण । कीं एक स्मरतां एक विसरावें. ॥ ३४१ ॥ परि जो मनीं स्वार्थ धरिला । आणि तदर्थचि यत्न मांडिला । त्याच यत्नांत त्याला । तो स्वार्थही आठवतो काय सर्वदा. ॥ ३४२ ॥ ज्या राज्यानिमित्त रण । आरंभिलें अंगीकारूनि मरण । नसे तेव्हां त्या राज्यलाभाचें स्फुरण । ज्या कारणें हे प्रयास. ॥ ३४३ ॥ परि संस्काररूपें मनीं । राज्य प्राप्त हो म्हणूनी । गोष्टी जैसी असोनी । जरी न स्फुरे सर्वदा. ॥ ३४४ ॥ तरी बुद्धीचा निश्चय । कीं राज्यप्राप्ति आणि जय । हो म्हणूनि तैसा आशय । भगवत्स्मरणीं असावा. ॥ ३४५ ॥ ऐसा अंतरीं आशय । तेचि बुद्धि जो ऐसा निश्चय । जरी स्मरणास गोचर न होय । मन लोकधंद्याकडे लागतां. ॥ ३४६ ॥ ज्या गोष्टींत सुख आहे म्हणोनी । बुद्धि असे निश्चय करूनी । मन चहूंकडेही भोंवोनी । मागुतीं तेथेंचि तें थारे. ॥ ३४७ ॥ प्रस्तुतीं ऐसा भाव । येथें दाखवी देवराव । कीं युद्धादिकर्मीं विसरे तरी ठाव । मनाचा आशयांत बुद्धीच्या. ॥ ३४८ ॥ कोणी स्वार्था आपलिया । विसरोनि बोलतां आठवी तया । तेव्हां तो आला ठाया । लोक ऐसें बोलती. ॥ ३४९ ॥ एवं बुद्धीचा निश्चय । तेथेंचि मन कल्पनामय । स्थिर होय हा निर्णय । अर्जुनातें कळावा. ॥ ३५० ॥ एवंच निश्चय पोटीं । मन फिरोनि ये तेथें शेवटीं । मन बुद्धि दोनी यासाठीं । येथें बोले श्रीकृष्ण.

॥ ३५१ ॥ कीं बुद्धि निश्चयरूपिणी । ते अर्पिली ज्याच्या चरणीं । मन घालीच तेथें लोळणी । ओढोनि नेलें तरी परते तेथेंचि. ॥ ३५२ ॥ आणि रक्षील या निश्चयें शरण । जो ज्यास असेल त्याचे चरण । विसरला तरी मन स्मरण । संकटीं करील निश्चित तयाचें. ॥ ३५३ ॥ कीं तो रक्षील म्हणोनी । असे बुद्धि निश्चय धरूनी । संकटीं मन त्यावांचूनी । स्मरेल कोणा आणिका. ॥ ३५४ ॥ तरी संकटांत थोर संकट । मरण येतां अति निकट । तेव्हां जो रक्षक उत्कट । स्मरेच मन तयातें. ॥ ३५५ ॥ तेधवां जें आठवे । तो तयातेंचि पावे । भगवत्स्मरणाची सेवे । अगत्य असावी याकरितां. ॥३५६॥' ऐसा बुद्धीचा निश्चय असे । तरी मनातें स्मरण कां न गवसे ? । आणि जे सर्वदा स्मरती ऐसे । ते कां न पावती तयातें ? ॥ ३५७ ॥ म्हणूनि म्हणे भगवंत । कीं मन बुद्धि माझ्या ठायीं अर्पित । करीं म्हणजे पावसी निश्चित । मातेंचि अगा धनंजया ! ॥ ३५८ ॥ जीवाचा जाला धणी । मग काय चिंता आहे रणीं ? । तैसा भरंवसा अंतःकरणीं । धरिला अर्जुनें या गोष्टीनें. ॥ ३५९ ॥ कीं याच्या स्मरणें याला । पावेन ऐसा भरंवसा त्याला । होतां तो संशय उपजला । आज्ञा करितां युद्धाची. ॥ ३६० ॥ कीं युद्धीं अंतःकरण । लागतां कैचें याचें स्मरण । स्मरणाभ्यास राहतां चरण । मरणकाळीं कां आठवती ? ॥ ३६१ ॥ अंतकाळीं याचे चरण । आठवावयास जें कारण । युद्ध करितां तें स्मरण । न घडे संशय हा होता. ॥ ३६२ ॥ संशय होता अंतःकरणीं । याकरितां चक्रपाणी । संशय नाहीं म्हणूनि वाणी । या अर्धश्लोकें बोलिला. ॥ ३६३ ॥ कीं मी तुझा संशय । जाणोनि तुझा आशय । संशय नाहीं म्हणूनि निश्चय । बोलतों ऐसें हा भाव. ॥ ३६४ ॥ आतां यानंतर लोक । तो कां बोलेल उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञ लोक । परिसोत आधीं. ॥ ३६५ ॥ मोक्ष ज्ञानेंचि करूनी । त्यांत ज्ञान अपरोक्ष होउनी । जो तत्पर सगुण भजनीं । तो पावतो सगुण सारूप्य. ॥ ३६६ ॥ कीं सर्वकाळीं जें स्मरे । तेंचि देहावसानीं स्फुरे । निर्गुण स्मरतां निर्गुणचि उरे । सगुण स्मरतां सारूप्य. ॥ ३६७ ॥ परि देहांतीं स्मरे सगुणास । तोचि कीं ज्यास तोचि अभ्यास । म्हणूनि पूर्वश्लोकीं अर्जुनास । स्मरण आपलें बोलिला. ॥ ३६८ ॥ परि हें मोक्षसाधन । न घडे विना निर्गुणात्मज्ञान । तें सोडोनि उगलें ध्यान । करितां पडे बहुत दूरी. ॥ ३६९ ॥ आत्मप्रीती सहज । तोचि आत्मा वाटे अधोक्षज ।

---

१. सवई.

तरीच भक्ति निर्दोष निर्व्याज । आत्मसाक्षात्कार भजनींही ॥ ३७० ॥ हा सदा स्मरणभक्तियोग । घडे तरीच होतां कर्मज देहाचा त्याग। घडे स्मरण-संयोग । आत्मत्वें सगुण मूर्तीचा. ॥ ३७१ ॥ अर्जुनासही देवें । स्मरण सांगीतलें याचि भावें । कीं प्रारब्ध युद्धादि भोगावें । आणि मातें स्मरावें सर्वदा. ॥ ३७२ ॥ कीं बुद्धि माझे पायीं अर्पित । तरी मन विसरोनिही स्मरे निश्चित । ऐसें तुझें जेव्हां व्रत । तेव्हां निःसंशय मातेंचि पावसी. ॥ ३७३ ॥ त्या पावण्याचें निमित्त । देहावसानीं जरी स्मरे चित्त । जें सांगीतलें निश्चित । पुनः पुन्हा. ॥ ३७४ ॥ तें ऐसें स्मरण । कीं सगुणध्यानीं आत्मत्वस्फुरण । म्हणूनि आतां विवरण । करीतसे या श्लोकीं. ॥ ३७५ ॥

**अभ्यासयोगयुक्तेन चेतसा नान्यगामिना ।**
**परमं पुरुषं दिव्यं याति पार्थानुचिंतयन् ॥ ८ ॥**

पुनः पुन्हा जे चित्तास । चिदात्मस्फूर्तीं तो अभ्यास । एतद्रूप योग जो त्यास । अभ्यासयोग म्हणावा. ॥ ३७६ ॥ ज्ञानी आणि सगुणभक्त । त्याणें त्या अभ्यासयोगें युक्त । चित्त करावें जें अनुरक्त । सगुणध्यानयोगीं. ॥ ३७७ ॥ तें चित्त ते चिदात्मस्फूर्ती सोडूनी । अन्यत्र न जाय ऐसें करूनी । त्या चिदात्मस्फूर्तीस घेउनी । ध्यावें परमपुरुषा सगुणातें. ॥ ३७८ ॥ चित्त जें जें स्मरे । तेथें चिदात्मत्व आधीं स्फुरे । परि अविद्यासंस्कारें नुरे । स्मृति ऐसी ज्ञानियासही. ॥ ३७९ ॥ यालागीं जो ज्ञानी भक्त । त्याणें अभ्यासयोगयुक्त । चित्त करूनि नित्य मुक्त । ध्यावा परमपुरुष त्या चित्तें. ॥ ३८० ॥ अविद्याकृत अशेष । तैसा नव्हे जो साकार पुरुष । जो परम आणि निर्दोष । दिव्य चित्स्वरूपरूप जो. ॥ ३८१ ॥ चराचर ही चित्स्वरूप । परि जीव मानिती जडरूप । रज्जू न कळोनि आरोप । साच मानिती सर्पाचा. ॥ ३८२ ॥ एथें तैसें कांहीं नसे । प्रत्यय निर्गुणाचाच गवसे । आकारकल्पना दिसे । जे ज्ञानें सगुण पाहती त्यांतें ॥ ३८३ ॥ ज्या अनुभवें ईश्वर । कल्पितो आपुलें शरीर । त्याचि अनुभवें ध्यातां सादर । सगुण साक्षात्कार ध्यान तें ॥ ३८४ ॥ ज्यास नाहीं ज्ञान । दूरी पडिलें त्याचें ध्यान । साक्षात्कारें चिंतन । तें ऐसें ॥ ३८५ ॥ म्हणूनि अनुभवैक्य सेव्य । परमपुरुष जो दिव्य । तो ऐसा म्हणूनि ध्यान कर्तव्य । ऐसेंचि त्याचें तो बोले ॥ ३८६ ॥ कीं चित्त अभ्यासयोगें करूनी । मुक्त म्हणजे चित्स्वरूप स्मरोनी । दिव्य परमपुरुष कल्पूनी । ध्यावा चित्तें ऐशिया ॥ ३८७ ॥ ऐसेंचि करितां चिंतन । जो देह सोडी करी गमन । तो पावे तया जो कमलनयन ।

परमपुरुष दिव्य वैकुंठनाथ ॥ ३८८ ॥ मज पावसी म्हणोनी । बोलिला पूर्वश्लोकें करोनी । तो ऐसा ध्यातां आणि देहावसानीं । ऐसें चिंतितां पावसी हा भाव ॥ ३८९ ॥ ज्ञानी जाणोनि निर्गुण । ध्याती भक्तियोगें सगुण । तिहीं ऐसें ध्यावें हे खूण । या श्लोकीं श्रीकृष्ण बोलिला ॥ ३९० ॥ जे या गीतेचा अर्थ । जाणों इच्छिती यथार्थ । आणि जे अनुभवी कृतार्थ । दोघांस संमत अर्थ हा ॥ ३९१ ॥ व्यतिरेक मात्र जाणती । अन्वयें जडही चैतन्य ऐसें नेणती । ते न समजोनि एथें म्हणती । कीं निर्गुणें ध्यावें सगुण हें न घडे ॥ ३९२ ॥ उगेंचि मानिती मिथ्या जग । परि नगीं सुवर्ण देखोनि नग । मिथ्या म्हणावी झगझग । अंतर्बाह्य कनकचि तें साच ॥ ३९३ ॥ दिसे सोन्याची झगझग । तेव्हां दिसे मिथ्या नग । तैसें चैतन्य देखोनि जग । मिथ्या म्हणती ते ज्ञानी ॥ ३९४ ॥ तरी काय डोळां दिसतें । इतकेंचि बोलती नुसतें । नगीं सोनें तैसें गवसतें । नेत्रीं आणि रूपीं हें कळेना ॥३९५॥ गार दृष्टीस वाटे दगड । जलत्व समजे जिव्हाचि सुघड । इंद्रियांस वाटे प्रचंड जड । बुद्धि ब्रह्मत्वें देखे त्या इंद्रियांसहित ॥ ३९६ ॥ जे हा अनुभव नेणती । ते हे ध्यानकळा काय जाणती । आत्मांश मात्र कळला ते म्हणती । ऐसें ध्यान केंवी घडे ॥ ३९७ ॥ ऐसियांस या ध्यानगोष्टी । न कळती कीं एथें न पावे दृष्टी । आणि निखळ निर्गुणोपासक कष्टी । होती एथें जे साभिमान ॥ ३९८ ॥ कीं ज्ञानियास पाहिजे निर्गुण । त्यास कां म्हणती ध्यान सगुण । त्यांत जे निरभिमान ते हे खूण । जाणती अन्वयबोधेंकरून ॥३९९॥ कीं विश्व जें त्रिगुण । तेंहीं तरंगनीरन्यायें[1] निर्गुण । शुद्ध सत्त्वमय सगुण । ध्यान कां न घडे ऐसें तयाचें ॥ ४०० ॥ परी दिव्य परमपुरुष । या श्लोकीं तो निर्गुण निर्विशेष । सगुण कां म्हणावा म्हणोनि दोष । ठेविती लटिकेवरी ॥ ४०१ ॥ परंतु ते निरभिमान । मागुती पावतील समाधान । जेव्हां पूर्वापर अनुसंधान । पाहती बरें ॥ ४०२ ॥ कीं सातांपरी भक्त जाणती । सप्तम संपतां म्हणे श्रीपती । त्यांत सप्तमप्रश्नीं बोलतां गती । ग्रंथ येथवरी चालिला ॥ ४०३ ॥ देह सोडोनि जातो । तो तेचि गती पावतो । कीं देह सोडितां जें स्मरतो । देह सोडोनि जातो त्याप्रती ॥ ४०४ ॥ येथवरी येचि रीती । मोक्ष बोलिला जगत्पती । विचारितां हे पूर्वरीती । निर्गुण मोक्ष हा न घडे ॥ ४०५ ॥ देह सोडोनि जातो । कैवल्य मोक्ष न घडेच तो । कीं प्रारब्ध सरतां उरतो । आत्मा केवळ निर्गुण ॥ ४०६ ॥ या प्रसंगें देह सोडितो ।

१. जलतरंगन्यायानें.

आणि जातो आणि पावतो । एवं सगुण मोक्ष सिद्ध होतो । पूर्वानुसंधानें करूनी ॥ ४०७ ॥ एथें **'याति पार्थानुचिंतयन्'** म्हणोनी । निर्गुणचि पावतो हें या श्लोकें करूनी । बोलावें तेव्हां त्यावरूनी । चिंतन निर्गुणाचें बोलावें ॥ ४०८ ॥ कीं सदा स्मरे अंतःकरण । तेंचि देहांतीं स्फुरण । देहांतीं जें स्मरण । तें पावे हेंही प्रकरणीं याचि बोलिलें ॥ ४०९ ॥ चिंतनही निर्गुणाचें बोलावें । शब्दातें तदनुरूप योजावें । तरी हें चिंतन देवें । पुढिल्या श्लोकीं विशद बोलिजेतें ॥ ४१० ॥ चिंतन सगुणाचें श्रुती । बोले आणि प्राप्तिही जे रीती । या श्लोकें आणि पुढिल्या श्लोकें **श्री**पती । सगुणाचिंतन सगुणप्राप्ति बोलतो ॥ ४११ ॥

**कविं पुराणमनुशासितारमणोरणीयांसमनुस्मरेद्यः ।**
**सर्वस्य धातारमचिंत्यरूपमादित्यवर्णं तमसः परस्तात् ॥ ९ ॥**

पुरुष दिव्य परम । चिंतितां पाविजे सर्वोत्तम । म्हणूनि बोलिलों मी **पुरु**षोत्तम । पूर्वश्लोकीं. ॥ ४१२ ॥ त्याचा समजोनि महिमा । जो स्मरे त्या **पुरु**षोत्तमा । तोचि पावे त्या सर्वोत्तमा । तरी महिमा स्मरे तो या रीती. ॥४१३॥ कीं तो कवि म्हणजे ज्ञानी । ज्ञानी म्हणावा सर्वज्ञ म्हणोनी । आणि तें ज्ञान कोणापासूनी । प्राप्त जालें न म्हणवे. ॥ ४१४ ॥ एकापासून एक । ज्ञान पावले ऐसे अनेक । ज्ञानी हा **उ**त्तमश्लोक । स्वतः सिद्ध ऐसें श्रुतीही बोलती. ॥४१५॥

श्रुति—**स्वाभाविकी ज्ञानबलक्रिया च** ॥

स्वाभाविकी म्हणजे स्वभावसिद्ध । ज्ञानबलक्रियादि शक्ति प्रसिद्ध । कर्में यत्नें समृद्ध । इतरांचिया. ॥ ४१६ ॥ स्वभाव म्हणजे वस्तुस्वभाव । कीं बीजापासूनि अंकुराचा उद्भव । किरणांपासूनि संभव । स्वयेंचि मिथ्या जळाभासाचा. ॥ ४१७ ॥ माया ईश्वरोपाधि । सर्वज्ञत्वादि गुणें आधीं । प्रगट होतां **ब्रह्म**यास निर्मूनि बोधी । इतरांस परंपरेनें हें ज्ञान. ॥ ४१८ ॥ येचि रीतीकरूनी । **ब्रह्मा**दिकांस त्याचपासूनी । सृष्टिसामर्थ्यादि शक्ति म्हणोनी । हे ईश्वर तो **ई**श्वरेश्वर सर्वज्ञ. ॥ ४१९ ॥ स्वतःसिद्ध ज्ञानी जरी । एक ईश्वर नसता तरी । न येतेंचि या भूमीवरी । ज्ञान हें ऐसें. ॥ ४२० ॥ त्यावेगळे जीव सकळ । अविद्योपाधि ओंगळ । आत्मज्ञान **ज**गन्मंगल । कोणा कोणास सांगता. ॥ ४२१ ॥ मग कैंचा मोक्ष निर्गुण । अथवा कैंचा मोक्ष सगुण । आत्मत्वाची आधीं खूण । कोण जाणता. ॥ ४२२ ॥ यालागीं स्वतःसिद्ध कवी । **ब्रह्मा** त्यापासूनि तो आदिकवी । ज्याच्या उपदेशें अनुभवी । **ब्रह्मा** जाला श्रुति म्हणे. ॥ ४२३ ॥

श्रुति—**यो ब्रह्माणं विदधाति पूर्वं यो वै वेदांश्च प्रहिणोति तस्मै । तं ह देवमात्मबुद्धिप्रकाशं मुमुक्षुर्वै शरणमहं प्रपद्ये ॥**

मुमुक्षू म्हणे त्या पुरुषोत्तमा । शरण मी जो उपजवितों ब्रह्मा । आणि वेद देतो त्या ब्रह्मया सुरसत्तमा । बुद्धिप्रकाशक जीवांचा जगद्गुरू. ॥ ४२४ ॥ यालागीं आदिकवी । तो ब्रह्मा प्रथम अनुभवी । ऐसें पुराणें बोलती कवी । स्वतःसिद्ध पिता ब्रह्मयाचा. ॥ ४२५ ॥ सकळ वेदसार । श्लोकचतुष्टयें सर्वेश्वर । ब्रह्मयातें उपदेशी हा विचार । श्रीमद्भागवतींही पहावा. ॥ ४२६ ॥ **'ब्रह्मणोऽप्यादिकर्त्रे'** म्हणोनी । अर्जुनही स्वमुखेंकरूनी । गीतेंत बोलिला यावरूनी । कवि आपण ऐसें श्रीकृष्ण सूचवी. ॥ ४२७ ॥ हा कविशब्द निर्गुणाकडे । लागेल हें तों न घडे । पुराणशब्दें सांपडे । अर्थ निर्गुण म्हणूनिही. ॥ ४२८ ॥ पुरातनास म्हणती पुराण । तेंचि निर्गुण तेंचि सगुण । परि पुढिल्या पदीं न सांपडे खूण । निर्गुणपणाची. ॥ ४२९ ॥ कर्मानुरूप शासन करी । तो अनुशासिता चराचरीं । कर्मसाक्षित्व असेल तरी । अनुशासिता म्हणावा. ॥ ४३० ॥ एवं म्हणतां अनुशासिता । सगुणत्व सिद्ध जालें तत्त्वतां । देहांतीं चिंतितां सगुणता । सगुणमोक्ष तेव्हां सगुणमुक्तिप्रकरण हें सिद्ध. ॥ ४३१ ॥ आतां अनुशासिता मानिला जरी । चैतन्यभेद मानावा तरी । कीं जीवैक्य मानितां शासन करी । काय आपणातेंचि आपण. ॥४३२॥ म्हणूनि मानावा भेद । तरी ऐक्य बोलती सर्व वेद । परि शास्ता म्हणतां न घडे अभेद । शासनार्हास शास्तयासी. ॥ ४३३ ॥ परंतु हे शंका करिते खेद । कीं जरी ऐक्य मोडोनि होता भेद । ऐक्य असोनिही वेद । भेद भोगापुरताच बोलती. ॥ ४३४ ॥ कीं एक सूर्य बहुतां जळीं । प्रतिबिंबोनि जैसा डळमळी । तैसा सत्त्वीं निर्मळीं । प्रतिदेहीं जगदीश. ॥ ४३५ ॥ त्यांत कर्मानुरूप जीव । पावे अतिसूक्ष्मही देहभाव । प्रतिबिंबोनि त्या उपाधींतही देव । तितकाच सुखदुःखें भोगितो. ॥ ४३६ ॥ तो लहान दिसे देहा लहानांत । थोरांत थोरही दिसे अत्यंत । आणि बिंब स्वयें अनंत । तो लहान थोरही न म्हणवे. ॥ ४३७ ॥ त्यास लहान लहानाहुनी । थोर थोराहुनी म्हणोनी । प्रतिबिंबत्वेंकरूनी । श्रुति वर्णिती. ॥ ४३८ ॥

श्रुति ॥ **अणोरणीयान् महतो महीयानात्मा गुहायां निहितोस्य जंतोः॥**

अणु अणुहीहुनी । थोर जो थोराहीहुनी । तो आत्मा आणि याचे गुहेंत असे म्हणोनी । गुहा शब्दें बुद्धि श्रुति बोले. ॥ ४३९ ॥ गुहा जीव अहंबुद्धी । ते देहापुर-

तीच हे प्रसिद्धी । मी लहान होतों तों वृद्धी । पावलों जालों एव्हडा म्हणोनी. ॥ ४४० ॥ देहाइतकाच अभिमान । तितकाच मी हें ज्ञान । प्रतिबिंब बुद्धींत जीस अज्ञान । बिंब प्रतिबिंब दोहींचें. ॥ ४४१ ॥ देह लहान जितका । जीव त्यांत भोक्ताही तितका । प्रतिबिंबरूपें देवा एका । लहान थोरपण तदनुरूप. ॥ ४४२ ॥ म्हणूनि अणुहुनीही सूक्ष्म । आणि थोराहुनीही थोर परम । ऐसें बोले निगम । अर्थ न घडे अन्यथा. ॥ ४४३ ॥ कीं तुटोनि वेगळा न पडे । तोंवरी अंश सूक्ष्मत्वें न सांपडे । जैसें हें बोलणें न घडे । कीं पर्वत मोहरीहुनिही अतिसूक्ष्म. ॥४४४॥ मोहरीहूनि सूक्ष्म अत्यंत । पर्वताचा भाग तोही पर्वत । परि पर्वत मोहरीहूनि सूक्ष्म म्हणतां संमत । गोष्टी कोणास वाटेल हे. ॥ ४४५ ॥ तोचि आरसियांत पर्वत । सूक्ष्म दिसे अत्यंत । तैसा सूक्ष्म उपाधींत अनंत । सूक्ष्म सूक्ष्माहुनी दिसे. ॥ ४४६ ॥ यालागीं वेदांचा अर्थ । युक्तिसिद्ध तोचि यथार्थ । युक्ति विरुद्ध तो व्यर्थ । येथें तरी युक्ति ही वेद बोलती. ॥ ४४७ ॥ एवं ऐक्य आणि भेद । प्रतिबिंबत्वें बोलती वेद । आतां अनुशासनीं ऐसा खेद । न उपजे कांहीं. ॥ ४४८ ॥ एवं शासनकर्ता म्हणोनी । जो बोलिला आणि जे त्याच्या शासनीं । त्यांस ऐक्यत्व या श्रुती करूनी । स्मरे ऐसें प्रस्तुतीं भगवंत बोलतो. ॥ ४४९ ॥ सूक्ष्मत्व **'अणोरणीयान्'** यास म्हणोनी । आणि **'सर्वस्य धातारं'** या शब्दें करूनी । थोरपण श्रुत्यर्थ बुद्धींत धरूनी । अनुस्मरे ऐसें बोलतो. ॥ ४५० ॥ अणुहूनि अणुत्व हें सूक्ष्मत्व । आणि सर्वांचा धाता हें महत्व । कीं जीवत्व आणि जडत्व । दोन्ही तोचि ऐसें जो स्मरे. ॥ ४५१ ॥ ब्रह्मांड सर्वांत थोर । तें चतुर्मुखा ब्रह्मयाचें शरीर । या ब्रह्मांडकोटीस आधार । तो धाता सर्वांचा. ॥ ४५२ ॥ धाता म्हणजे धर्ता जो धरी । जेंवि समुद्र धरी सर्व लहरी । सर्वशब्दें ब्रह्मांड कोटी यापरी । जो धरी तो धाता तो सर्वांचा. ॥ ४५३ ॥ **'महतो महीयान्'** या श्रुतीचा अर्थ । **'सर्वस्य धाता'** या शब्दीं सूचवी यथार्थ । थोराहूनि थोर तोचि तोचि समर्थ । थोरां सर्वां ब्रह्मांडातें जो धरी. ॥ ४५४ ॥ ब्रह्मांड थोराही परीस । थोरपण असे जयास । प्रतिबिंबत्वें प्रवेश त्यास । ब्रह्मांड पिंड सर्वांत. ॥ ४५५ ॥ घटा मृत्तिके नसे भेद । तैसा जडा चैतन्या अभेद । एवं दोन्ही भेद खेद । हरूनि स्मरे हा भाव. ॥ ४५६ ॥ एवं लहान लहानाहुनी । आणि थोर थोराहुनी । तो स्वयें अनंत म्हणोनी । अचिंत्यरूपें जो स्मरे. ॥ ४५७ ॥ हें अचिंत्यरूपत्व । दावी सगुणत्व आणि निर्गुणत्व । परि या पुढिल्या पदें जें सगुणत्व । निर्गुणत्व तेथें न बोलावें. ॥ ५५८ ॥ कीं स्मरे आदित्यवर्ण । म्हणजे

आदित्यासारिखा वर्ण । विश्वरूप दिसेल तेव्हां परिपूर्ण । सूर्यसहस्रदीप्ति **पार्थ** देखेल. ॥ ४५९ ॥ **'दिवि सूर्यसहस्रस्य'** म्हणोनी । सहस्रसूर्यप्रकाश या श्लोकें करूनी । अर्जुन देखेल दिव्य नयनीं । तें तों निर्गुणत्व न म्हणवे. ॥ ४६० ॥ कीं अनेक वक्त्र नयन । अनेकाद्भुतदर्शन । ऐसें देखेल अर्जुन । तें काय निर्गुण म्हणों ये. ॥ ४६१ ॥ म्हणतां लक्षवादियाचें कश्मल मत । तें सिद्ध होतें नियत । इंद्रियगोचरत्व अत्यंत । साधतें निर्गुणासी. ॥ ४६२ ॥ एवं आदित्यवर्ण । म्हणावाच सगुण । आणि तमापरता तो आपण । अविद्ये-परता म्हणोनी. ॥ ४६३ ॥ केवळ अविद्येच्या परता म्हणोनी । न म्हणवे तम शब्दें करूनी । कीं ईश्वरत्व चिंतितो जाणोनी । तेथें शंकाचि अविद्येची ला-गेना. ॥ ४६४ ॥ शंकेचा अवकाश नसतां । कां म्हणावा अविद्येपरता । तेथें निर्दोष साकारता । स्मरतो ऐसें म्हणावें. ॥ ४६५ ॥ जेथवरी देहाकृती । तम त्या पांचभौतिकां म्हणती । पंच भूतें उत्पन्न होती । तमापासूनी. ॥ ४६६ ॥ एवं स्थावर जंगम । देह तितकेहि तम । तैसा नव्हे साकार पुरुषोत्तम । देह तमापरता त्याचा म्हणावा. ॥ ४६७ ॥ आदित्यवर्ण आणि तमापरता । देह ईश्वराचा स्मरे कीं जो धाता । लीलाविग्रह तोचि तत्त्वता । स्वेच्छा कल्पित म्हणोनी. ॥ ४६८ ॥ श्रुति म्हणे **'रुक्मवर्ण'** । रुक्मवर्ण म्हणजे सुवर्ण । गीता म्हणे **'आदित्यवर्ण'** । बाळसूर्य सुवर्णदोन्ही सारिखे. ॥ ४६९ ॥ जरी सजल मेघनील । तरी स्वप्रकाश जैसा इंद्रनील । वर्ण कोणी तरी हो प्रांजळ । प्रकाशयुक्त तेजस्वी रूप तें. ॥ ४७० ॥ बहुविध बोलावें लक्षण । त्यांत एक लक्षण बोले विचक्षण । त्यास म्हणावें उपलक्षण । कीं त्या उपलक्षणें बहु लक्षणें जाणावीं. ॥ ४७१ ॥ ब्राह्मण सर्व साधारण । थोर म्हणतां एक ब्राह्मण । जरी वर्णिला गौरवर्ण । तरी त्यांत श्याम काय न घ्यावा? ॥ ४७२ ॥ जो रूप आपुलें दावुनी । मातें स्मरा ध्यानीं म्हणोनी । म्हणतो तो कृष्ण मेघश्याम यावरूनी । आदित्यवर्ण उपलक्षण. ॥ ४७३ ॥ एवं सर्वसाक्षी ही निराकार । रूप तितके अवतार । कोण तरी एक वर्ण आकार । ध्यातां त्यातेंचि पाविजे. ॥ ४७४ ॥ या दों श्लोकेंकरूनी । सगुण चिंतनानुरूप प्राप्ति म्हणोनी । श्रीकृष्ण बोलिला येथूनी । मोक्षाविषयीं दुसरें प्रकरण. ॥ ४७५ ॥ जिहीं गुरुकुळीं केला वास । अपरोक्ष पावले करूनी शास्त्राभ्यास । आणि सगुण-भक्ति करितां ज्या पदास । पावले हें संक्षेपें ऐसें वर्णिलें. ॥ ४७६ ॥ आतां शूद्रादिक जाती । वेदशास्त्र अभ्यास नेणती । आणि संतांचे कृपेनें पावती । व्यतिरेकअन्वयबोधातें. ॥ ४७७ ॥ कोणी तैसेच होऊनिही ब्राह्मण । शास्त्रा-

भ्यासावीण । ओळखती आपलें चिदात्मपण । गुरुकृपेनें. ॥ ४७८ ॥ त्यांत कोणीं धरिलें निर्गुण । कोणी भजों लागले सगुण । ते शास्त्राभ्यासाहीविण । दोवे दोनी गती पावती. ॥ ४७९ ॥ कीं ज्ञान भक्ति वैराग्य । ज्यांस ते मुक्ति पावती सभाग्य । विशेष शास्त्र असिलिया योग्य । गुरुत्वपदवीस ते होती. ॥ ४८० ॥ कैसा तरी हो परी । ज्ञान पावोनि अभ्यास करी । तो मुक्ति पावे लौकरी । निर्गुण अथवा सगुण हो. ॥ ४८१ ॥ कोणी ज्ञान पावले । आणि हटयोगाकडे लागले । सगुण निर्गुण दोन्ही टाकिले । जिहीं अभ्यास. ॥ ४८२ ॥ त्यासही मोक्ष परी । सावधान देह सोडिती जरी । ब्रह्मयासह तेही बरी । पावती मुक्ति निर्गुण. ॥ ४८३ ॥ हें चौं श्लोकें करूनी । श्रीकृष्ण बोलेल येथुनी । जो अनंत वेद मथुनी । हे गीता उपदेशितो. ॥४८४॥

**प्रयाणकाले मनसाचलेन भक्त्या युक्तो योगबलेन चैव ।**
**भ्रुवोर्मध्ये प्राणमावेश्य सम्यक्स तं परं पुरुषमुपैति दिव्यम् ॥ १० ॥**

प्राप्त होतां प्रयाणकाळ । तेव्हां मन करूनि अचळ । आणि आत्मप्रीती जे निर्मळ । युक्त होय त्या भक्तीनें तेधवां. ॥ ४८५ ॥ हो आपणातें सद्गती । हे जे आपली प्रीती । तेचि भक्ति ऐसे रीती । भक्तीनें युक्त तेधवां. ॥ ४८६ ॥ साहाही चक्रें भेदुनी । ब्रह्मरंध्र भेदिती क्रमेंकरूनी । त्यांत आज्ञाचक्र म्हणोनी । दों दळांचें. ॥ ४८७ ॥ दोहीं भोंवयांत त्याचें स्थळ । तें चक्र तेथें द्विदळ । करूनियां योगबळ । त्या चक्रीं घाली प्राणातें. ॥४८८॥ योगबळ म्हणतां यावरूनी । पांच चक्रें पंचभूतें भेदुनी । प्राण आज्ञाचक्रास ने म्हणोनी । सूचवी योगमार्गातें. ॥ ४८९ ॥ गुह्यद्वारावरी । मूळाधार चक्रदळें चारी । पृथ्वीतत्त्व त्या भीतरी । असे आधार होऊनि देहाचें. ॥ ४९० ॥ त्यातें भेदूनियां प्राण । षट्दळ चक्र स्वाधिष्ठान । तें जलतत्त्वाचें स्थान । भेदी तया. ॥ ४९१ ॥ त्यावरी नाभिस्थल । तेथें मणिपूरचक्र दशदल । तत्त्व तेथें अनल । भेदी तया ॥ ४९२ ॥ त्यावरी तेथूनि हृदयांत । चक्र द्वादशदळ अनाहत । वायुतत्त्व तेथें नियत । भेदी तया ॥ ४९३ ॥ तयावरी कंठस्थानीं । षोडशदळ विशुद्धचक्र म्हणोनि । तेथें आकाशतत्त्व त्यातें भेदुनी । भोंवयांत ने प्राणातें ॥ ४९४ ॥ तें आज्ञाचक्र द्विदळ । मन तेथें तत्त्व केवळ । त्या मनातें करूनि अचळ । प्राण तेथें प्रवेशवी ॥ ४९५ ॥ या भावें म्हणे भगवंत । कीं प्राण प्रवेशवूनी भोंवयांत । जो जातो तो पावतो योगरत । त्या दिव्य पुरुषातें ॥ ४९६ ॥ जो पुढिल्या श्लोकीं पुरुष । बोलिजेल निर्विशेष । जो गुरुमुखें निषेधशेष । चित्स्वरूप तेंचि तो ओळखिला ॥४९७॥

ज्ञानावांचूनि न घडे मोक्ष । सर्व जाणती हा पक्ष । हें न बोलत अंबुजाक्ष । प्राप्तीच त्याची बोलतो यालागीं ॥ ४९८ ॥ ज्ञान होऊनि अभ्यास । टाकूनी धरी हटयोगास । षट्चक्र भेदायाचे आयास । सूचवी प्राणप्रवेश भोंवयां-मध्यें बोलतां ॥ ४९९ ॥ तेथूनि प्राण मस्तकीं । ठेवी म्हणूनि तिसरिया श्लोकीं । श्रीकृष्ण बोलेल या भावें कीं । भेदूनि जातो ब्रह्मरंध्र ॥ ५०० ॥ ब्रह्मयासह त्याला । ब्रह्मलोकीं मोक्ष बोलिला । परि सगुणभाव नसे जोडला । तो निर्गुणातें पावे यालागीं ॥ ५०१ ॥ म्हणोनि त्या दिव्य पुरुषातें । पावतो म्हणूनि भगवंतें । या श्लोकीं बोलियेलें अनंतें । हटयोग त्याचा दाखवूनी ॥ ५०२ ॥ पावतो दिव्यपुरुषा तया । तो तों कैसा म्हणसी धनंजया! । तरी ऐसा म्हणूनि बोलतो या । पुढिलिया श्लोकीं ॥ ५०३ ॥

**यदक्षरं वेदविदो वदंति विशंति यद्यतयो वीतरागाः ।**
**यदिच्छंतो ब्रह्मचर्यं चरंति तत्ते पदं संग्रहेण प्रवक्ष्ये ॥ ११ ॥**

अगा! जे वेदवेदांत जाणती । ते अक्षर म्हणूनि ज्यातें म्हणती । तो त्यातें पावे म्हणूनि श्रीपती । आणि हा शास्त्रहीन ऐसें सूचवी ॥ ५०४ ॥ वीतरागी होऊनि यती । ते ज्या स्वरूपीं प्रवेशती । हा पावतोच त्याप्रती । कीं हाही पुढें प्रवेशेल हा भाव ॥ ५०५ ॥ वीतरागी हाही । परंतु सद्यःप्रवेश नाहीं । यति संन्यासी अथवा कांहीं । काम्य न करी यति ऐसाही बोलिला ॥ ५०६ ॥ आणि ज्या प्राप्तीकारण । सर्वदा सेविती गुरुचरण । ब्रह्मचर्य म्हणती निपुण । गुरुगृहवास तांयतें ॥ ५०७ ॥ जे इच्छूनि सुमती । गुरुगृहीं ब्रह्मचर्य आचरती । आणि जितांच पावती । तयातें ॥ ५०८ ॥ ते सद्यः अनायासें मुक्ति पावती । हा आयासें पावे ब्रह्मलोकाप्रती । हा भाव दावी संतांचा पती । इतरातें वर्णितां ॥ ५०९ ॥ जाणोनि वेदवेदांत । करूनि गुरुसेवा भाग्यवंत । पावती त्या पुरुषास हा अत्यंत । प्रयासें पावतो म्हणतां हा तैसा नव्हे हें सूचवी ॥ ५१० ॥ तीं चरणीं हा भाव । दाखवूनि देवाधिदेव । पुढें याचे प्रयास बोलेल देव । ते सांगेन म्हणतो चरणीं चौथिया ॥ ५११ ॥

चतुर्थ चरण—**'तत्ते पदं संग्रहेण प्रवक्ष्ये'** ॥

पाविजेतें जें स्थळ । तें पद म्हणावें केवळ । आणि ज्या प्रयत्नें यत्नशील । पावती त्यासही पद म्हणावें ॥ ५१२ ॥ पद सांगतों म्हणूनी । प्राप्त्युपाय बोलेल पुढिलिया श्लोकेंकरूनी । प्राप्ती उपायास वरूनी । पद शब्दार्थ बोलावा ॥ ५१३ ॥ कीं पढोनि वेदांत । गुरुसेवा ब्रह्मचर्य अत्यंत । ते उपाय तों निश्चित । नाहीं तयाला ॥ ५१४ ॥ आतां याचे उपाय । देव बोलेल काय ।

म्हणूनि विचारी **धनंजय**। तो म्हणे **'संग्रहेण प्रवक्ष्ये'** म्हणोनी ॥ ९१५ ॥ संग्रह म्हणिजे संग्रहण। म्हणिजे आवरावे प्राण। प्राणायामक्रमें ग्रहण। करणें प्राणांचें ॥ ९१६ ॥ षट्चक्र भेदूनि मस्तकपर्यंत। न्यावा प्राण योगबळें त्यांत। साहावें चक्र भोंवयांत। तेथवरी मागें वर्णिलें ॥ ९१७ ॥ आतां ब्रह्मरंध्र भेदूनी। जावें तें पुढिल्या श्लोकें करूनी। कांहीं त्या पुढिल्या श्लोकें वदूनी। नीट हठयोगरीती बोलेल ॥ ९१८ ॥ या कारणें प्राणसंग्रह। करूनि सोडोनि देह। जाणार तों निःसंदेह। म्हणूनि **"संग्रहेण प्रवक्ष्ये"** म्हणतसे ॥९१९॥ **'संग्रहेण'** या शब्दाचा अर्थ। संक्षेपें म्हणूनि बोलती तो व्यर्थ। संक्षेपेंचि करूनि **कृष्ण** समर्थ। सर्वत्र बोलतो **गी**तेंत ॥ ९२० ॥ तथापि न म्हणोनि संक्षेप। जरी बोलेल संक्षेपरूप। तरि काय **अर्जु**नास कोप। येणार येथें? ॥ ९२१ ॥ संग्रहेण प्राणसंग्रह। त्या संग्रहें करूनि सोडोनि देह। गति पावतो यास तों संदेह। नसतां अर्थ हाचि कां न घडे. ॥ ९२२ ॥ आतां हठयोग धारणा धरूनी। भोंवयाही वर्ता कोणे रीती करूनी। प्राण नेतो तरी ऐसा म्हणोनी। बोलतसे. ॥ ९२३ ॥ भोंवयांपर्यंत प्राण नेला। चक्रें भेदूनी म्हणूनि या बोला। **श्रीकृ**ष्ण सूचवी परि नाहीं बोलिला। क्रममार्ग योगाचा. ॥ ९२४ ॥ भोंवयांपर्यंत नेतां पहिलें। योगबळ कैसें करणें लागलें। आणि भोंवयांपर्यंत नेऊनि काय केलें। हें बोलतसे या श्लोकें. ॥ ९२५ ॥

**सर्वद्वाराणि संयम्य मनो हृदि निरुध्य च।**

अगा! आज्ञाचक्र भोंवयांत। योगबळें प्राण तेथपर्यंत। ज्या रीती नेतसे अत्यंत। निरोध प्रकार तो ऐसा. ॥ ९२६ ॥ दारें प्राणाचीं सर्व कोंडी। त्यांत दोन खालीं सात तोंडीं। महातटाकीं जैशा सांडी[1]। पर्जन्यकाळीं जळाच्या. ॥ ९२७ ॥ सांडी असती उदंड। त्या कांहीं वाहती अखंड। जळ तुंबतां प्रचंड। फोडी सांडी बुजाल्याही. ॥ ९२८ ॥ मुख एक नासिका दोनी। प्राण या द्वारत्रयेंकरूनी। सदा वाहे अपानीं। समयविशेषें गुह्यद्वारींही तो भरे. ॥ ९२९ ॥ परि निरोधितां तुंबळ। भलत्या द्वारें फुटे प्रबळ। याकारणें द्वारें सकळ। कोंडावीं कोंडितां प्राणातें. ॥ ९३० ॥ श्रवण नेत्र नासिका तीनी। रंध्रें एक एकास दोनि दोनी। हीं साहा आणि सातवें वदनीं। मळमूत्रद्वारासह नव. ॥ ९३१ ॥ एका पायांची टांच। दडपूनि बुजिती गुदद्वाराची खांच। नखांसहित बोटें पांच। स्पर्शती उफराटीं आसनांतें. ॥ ९३२ ॥ तैसीच टांच दुसरी। ठेविती शिश्नाउपरी। दडपूनि त्या द्वारातें बरी। असे

१. पाणी जाण्याच्या वाटा.

ऐसी. ॥ ९३३ ॥ मुखीं द्वारें सात । दोन्ही अंगुष्ठ दों श्रवणांत । दोहीं नेत्रांवरी अत्यंत । दृढ तर्जनीद्वय ठेविती. ॥ ९३४ ॥ घ्राणद्वारें दोनी । दोनी मध्यांगुळीं करूनी । ओष्ठ दोन्ही दोहींकडोनी । अनामिका कनिष्ठिकायोगें. ॥ ९३५ ॥ ऐशीहीं नवही द्वारें । करचरणयोगें एकसरें । कोंडोनि योगधारणा आदरें । अनुष्ठी ऐसा. ॥ ९३६ ॥ सिंह पुढें जातो । मागें परतोनि पाहतो । योगरीति ऐसी बोलतो । सिंहावलोकनन्यायें. ॥ ९३७ ॥ संयम ऐसा नवद्वारीं । करूनी प्राण त्यावरी । भोंवयांपर्यंत न्यावा परी । तेंचि आधीं बोलिला. ॥ ९३८ ॥ बोलोनि भोंवयांत प्राण । मग हें त्यांचें बोले कारण । आणि हृदयीं मनाचें स्फुरण । तोंच कीं प्राण हृदयावरी न चाले. ॥ ९३९ ॥ मन हृदयीं निरोधूनी । सर्वद्वारें कोंडूनी । प्राण भोंवयांत घालितो म्हणोनी । म्हणतां पूर्वार्धीं सूचविला हा क्रम. ॥ ९४० ॥ चक्र मस्तकीं जैसें कमळ । अधोमुख तें सहस्रदळ । भोंवयांत आज्ञाचक्र द्विदळ । तें भेदितां तेथें निघे तो प्राण. ॥ ९४१ ॥ भोंवयांपर्यंत ऐसा क्रम । या पूर्वार्धपर्यंत पुरुषोत्तम । बोलोनि मोक्षस्थान उत्तम । प्रवेश तेथें उत्तरार्धें बोलतो. ॥ ९४२ ॥

**मूर्ध्न्याधायात्मनः प्राणमास्थितो योगधारणाम् ॥ १२ ॥**

मस्तकीं ठेवूनि आपल्या प्राणा । अनुष्ठी ऐसी योगधारणा । ब्रह्मरंध्र भेदावयाच्या खुणा । सूचवी येथें. ॥ ९४३ ॥ कीं नवही द्वारें कोंडी । कोंडिती जैशा जळाच्या सांडी । तें जळ जेव्हां फुगारा मांडी । निर्बळस्थळीं फोडी पाळीतें. ॥ ९४४ ॥ तैसें दशम द्वारीं । चर्ममात्र असतें शिरीं । जें बाळपणीं टाळूवरी । स्पष्ट रंध्र झांकलें दिसतें. ॥ ९४५ ॥ अस्थि जेथें आड नसे । चर्म मात्र त्यावरी वसे । थोरपणीं रंध्रसें न दिसे । कठिण होतां तें चर्म. ॥ ९४६ ॥ मस्तकीं कोंडतां प्राण । बळें जेव्हां करी उठाण । भेदूनि तें करी प्रयाण । सत्यलोकातें. ॥ ९४७ ॥ मस्तकीं प्राण धरी । या कारणें म्हणे हरी । तें पुढिल्या श्लोकें मुरारी । सूचवील बोलतां प्रयाण. ॥ ९४८ ॥ पूर्वार्धीं सिंहावलोकनरीती । बोलिला जे योगगती । त्याचा अभ्यास श्रीपती । सिंहावलोकनेंच पूर्वदशेचा बोलेल. ॥ ९४९ ॥ कीं अर्जुन म्हणेल मनीं । अत्यंत चंचळत्व या पवनीं । मुख नासिका रंध्रें करूनी । बहिर्मुख वावरे. ॥ ९५० ॥ तो अंतर्मुख समीर । होऊनि मूळाधारीं स्थिर । कैसा जाला कीं सोडूनि शरीर । मस्तकाकडे चालों लागला. ॥ ९५१ ॥ हा प्रकार अर्जुनातें । चतुर्थाध्यायीं अनंतें । सांगतां विविधा यज्ञांतें । प्राणायामयज्ञ सांगीतला. ॥ ९५२ ॥ प्राणायाम अतिपावन । प्रथम या योगास साधन । प्राणसंयमें शुद्ध मन ।

आणि प्रणवावृत्तीनें स्मरण देवाचें. ॥ ९९३ ॥ हें योगसाधन प्रथम । येथें बोलिला नाहीं **पुरुषोत्तम** । म्हणूनि प्राणसंयम । स्वस्मरणरूप पूर्वार्धे बोलतो या श्लोकीं. ॥ ९९४ ॥

**ओमित्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन्मामनुस्मरन् ।**

अगा **अर्जुना**! ओंकार । हें ब्रह्म एकाक्षर । जैसीं **रामकृ**ष्णादि रूपें साकार । तैसें अक्षररूपी **ब्रह्म** हें. ॥ ९९५ ॥ या एकाच अक्षराचा महिमा । ऐसा कीं जैसी शुद्धसत्त्वप्रतिमा । आधीं प्रणव मग सर्वां निगमां । उच्चारिता जाला ईश्वर. ॥ ९९६ ॥ जैसी शुद्धसत्त्वमाया प्रथम । **ब्रह्मीं** प्रकटतां **सर्वो**त्तम । पद्मनाभरूप **पुरुषोत्तम** । त्या मायेनें प्रथम अवतरला. ॥ ९९७ ॥ मग त्या मायेनें कल्पना । केली ते हे त्रिगुणरचना । तैसा ओंकार मग नाना । शब्द आणि भाषा प्रगटल्या. ॥ ९९८ ॥ मग नाना अवतार । त्याच सत्त्वें करी ईश्वर । तैसे अनंत वेद अपार । त्रिगुणसृष्टीपूर्वीं प्रगटले. ॥ ९९९ ॥ प्रणव एकचि अक्षर । म्हणूनि हें ब्रह्म एकाक्षर । तैसेंच ब्रह्म चतुरक्षर । **वा**सुदेव **ना**रायण म्हणोनी. ॥ ९६० ॥ तैसेंच उपनिषदीं । दोनी अक्षरें **ह**रिपदीं । हें द्व्यक्षर **ब्रह्म** वेदीं । जैसा प्रणव एकाक्षर ब्रह्म. ॥ ९६१ ॥ ऐशींच जीं जीं **ह**रिनामें । जैसीं **राम**-**कृ**ष्णादिरूपें अभिरामें । तैसीं ध्वनिरूपरूपें सर्व: सुगमें । अक्षरब्रह्म नामें समस्तही. ॥ ९६२ ॥ परंतु वेदीं पुराणीं । प्रसिद्ध ज्या ज्या नामें **च**क्रपाणी । तें तेंचि अक्षर ब्रह्म लोकवाणी । नामें वदे तीं ऐसीं म्हणूनि न म्हणवे. ॥ ९६३ ॥ रण सोडी **का**न्होबा गोवळ । इत्यादि लोकवाणी केवळ । भावेंचि करूनि फळ । परि तारकशक्ति नसे तैसी स्वत:सिद्ध. ॥ ९६४ ॥ स्वयेंचि गोड केळ । त्यांत दूध तूप गूळ । मेळवितां होय केवळ । अमृतरूप. ॥ ९६५ ॥ तैसीं नामें वेदसिद्धें । किंवा वेदवेत्ते बोलती पुराण-प्रसिद्धें । तीं स्वयें तारकशक्ति समृद्धें । भक्तिनें स्मरती विशेष अत्यंत. ॥ ९६६ ॥ लावूनिया गूळ । दगड चोखिजे केवळ । तैसें रण सोडी **का**न्होबा गोवळ । गोड भक्तीच करूनी ॥ ९६७ ॥ महिमा शर्करेचा न कळे । तरी गोडी देऊनि ते गिळे । दगड गुळावांचूनि चघळे । तैशीं भक्तीवांचूनि हीं नामें ॥ ९६८ ॥ एवं वेदीं पुराणीं नामें अनेकें । तीं महिमा न कळे तरी तारकें । लोकवाणींत नाम तितुकें । सफळ भक्तीनें होत न स्वतां ॥ ९६९ ॥ कीं **म**हाभारतीं **भी**ष्म । **ध**र्मास सांगे सहस्रनाम । तेथें करी प्रथम नियम । ऐसाच या श्लोकें. ॥ ९७० ॥

महाभारतश्लोक—'**यानि नामानि गौणानि विख्यातानि महात्मनः। ऋषिभिः परिगीतानि तानि वक्ष्यामि भूतये ॥**'

भीष्म म्हणे, 'अगा भूपती ! । हरिनामें सांगेन तुजप्रती । जीं नामें ऋषि गाती । गुणानुरूपें हरीचीं. ॥ ९७१ ॥ तींचि नामें ऋषि गाती । ज्यांची वेदीं असे ख्याती । पुराणीं वेदव्यासादी वर्णिती । आणि गाती कीर्तनें करूनी. ॥ ९७२ ॥ एवं च नामें लोकवाणी । तीं नव्हती स्वयें सुखाचिया खाणी । वेदीं पुराणीं काय वाणी । कीं सांवळ्या गोवळ्या जगजेठी म्हणावें. ॥ ९७३ ॥ एवं पुराणप्रसिद्धें । तीं नामें वेदसिद्धें । तारकशक्तीनें समृद्धें । रूपें सगुण ब्रह्माचीं. ॥ ९७४ ॥ प्रणवास एकाक्षर ब्रह्म । या भावें म्हणे सगुणब्रह्म । कीं प्रणवही एक नाम । हें सप्तदशीं स्वयेंचि बोलेल. ॥ ९७५ ॥

सप्तदशाध्याय श्लोक—ॐ **तत्सदिति निर्देशो ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः।**'

'ॐ तत् सत्' शब्द तीनी । त्रिप्रकार ब्रह्म निर्देश म्हणोनी । कृष्ण म्हणेल या वरूनी । ॐकारही हरिनाम. ॥९७६॥ ॐकार नाम वेदसिद्ध । 'तत् सत्' हेंही वेदींच शुद्ध । आणि वेदींच ऐसें प्रसिद्ध । कीं इतिहास पुराणेंही वेद पांचवा. ॥ ९७७ ॥ एकाक्षरब्रह्म ॐकार । तैसें 'तत् सत्' एकएकचि अक्षर । हरिनाम ब्रह्म द्व्यक्षर । वेदप्रसिद्ध. ॥ ९७८ ॥

श्रुति—**हरिं हरं तमनुयंति देवाः ।**'

वाईट तितकें परिहरी । म्हणूनि हरितो तो हरी । त्यातें देव अनुसरती ऐसी बरी । टीका श्रुतीच करी हरिनामाची. ॥ ९७९ ॥ हरितो जो तो हरी । श्रुति इतकेंच बोले परी । वाईट तितकें परिहरी । ऐसें तों न बोले ऐसें जरी म्हणावें. ॥९८०॥ तरी वाईट कीं बरें । हरायास नसे तिसरें । तेव्हां वाईट तितकें हरी सारें । हें स्वयेंचि साधतें. ॥ ९८१ ॥ आतां बरेंही हरितो । ऐसें म्हणतां अर्थचि न घडे तो । कीं सूर्य तमातेंचि संहरितो । प्रकाशही हरितो न म्हणवे. ॥९८२॥ सूर्य जैसा प्रकाशरूप । हरि तैसा सुखस्वरूप । सुखाचे आंगीं हाचि प्रताप । कीं दुःखचि तें परिहरी. ॥ ९८३ ॥ ऐसेंचि नाम अनंत । हें त्र्यक्षरब्रह्म निश्चित । चतुरक्षरही वेदसंमत । नारायण वासुदेव इत्यादि. ॥ ९८४ ॥ एवंच जैसीं वेदसिद्धें । तैसींच नामें पुराणप्रसिद्धें । जैसीं भगवद्रूपें तारकें शुद्धें । तैसींच नामेंही रूपेंचि त्याचीं. ॥ ९८५ ॥ रूपें बुद्धीस कळती लोचनीं । नामें बुद्धीस कळती कानीं । आणि उच्चारितां वाचे करूनी । बुद्धि

१ नाहींसें करितो.

जाणे. ॥ ९८६ ॥ नेत्र जैसें इंद्रिय । कानही इंद्रियचि हा निश्चय । जे जिव्हा नामें गाय । वागिंद्रिय नव्हे काय तेंही? ॥ ९८७ ॥ दृष्टीस न दिसे वारा । तरी कळतो लागतां शरीरा । आणि आइकों येतो भरारा । श्रोत्रेंद्रियातें. ॥ ९८८ ॥ दृष्टीस वारा न दिसे । तरी काय म्हणावा न असे । तैसा वाचेस कानास गवसे । तो काय नव्हे स्वयें ईश्वर. ॥ ९८९ ॥ ईश्वर स्वयें निराकार। तो नेत्रांस दाखवी शरीर । ते अवतार तैसेच हे अवतार । कानास वाचेस जाणवी. ॥ ९९० ॥ अवताररूपीं अधिकपण । आणि नामपणीं उणा आपण । ऐसें वेद अथवा स्मृतिपुराण । कोणीच न म्हणे. ॥ ९९१ ॥ ऐसें असोनि जन । नाम न मानिती रूपासमान । हेंही हरिलें म्हणावें ज्ञान । अविद्येनें जनाचें ॥ ९९२ ॥ तें अविद्येतें जाळी । ऐसी गीता श्रीवनमाळी । प्रकट करितो ये काळीं । गुह्य हेंही बोलतो. ॥ ९९३ ॥ परि मिळाली अणीस अणी । तेव्हां गीता हे चक्रपाणी । उपदेशितो म्हणोनी वाणी । न वदे सविस्तर. ॥ ९९४ ॥ शब्द थोडे अर्थ फार । या गीतेचा ऐसा प्रकार । परि शब्द ऐसे कीं टीकाकार । जे हरिभक्त ते समजती भावार्थ त्यांतील. ॥ ९९५ ॥ प्रणवमहिमा या प्रस्तुती । जरी उगाचि बोलता जगत्पती । तरी म्हणतां 'ओमित्येकाक्षरं ब्रह्म' येचि रीती । 'एकाक्षरं' ऐसें न बोलता एथें. ॥ ९९६ ॥ उगेंचि अक्षर ब्रह्म । म्हणता तरी अक्षररूप हें ब्रह्म । ऐसा होतां अर्थावगम । एकाक्षरब्रह्म म्हणणें किमर्थ. ॥ ९९७ ॥ आपल्या नामाचा महिमा। गीतेंत बोलणें पुरुषोत्तमा । कीं मथूनि सर्वां निगमागमां । हे गीता उपदेशितो ॥ ९९८ ॥ म्हणूनि उगेंचि अक्षरब्रह्म । न वदोनि म्हणे एकाक्षरब्रह्म । स्वनाममहिमा पुरुषोत्तम । एकाक्षर ब्रह्म म्हणतां सूचवी ॥९९९॥ कीं ओंकारीं एकचि अक्षर । म्हणूनि हें ब्रह्म एकाक्षर । तेव्हां कृष्णनाम द्व्यक्षर । ब्रह्मरूप तेंही ऐसें सूचवी. ॥ ६०० ॥ कीं ओंकारही बोले निगम । निगमचि बोले कृष्णनाम। हें एकाक्षर तेव्हां द्व्यक्षर ब्रह्म । कृष्णनामही विराजे श्रुतिशिरीं.॥६०१॥

श्रुति—'उद्धृतासि वराहेण कृष्णेन शतबाहुना ।'

श्रुत्यर्थ श्रुतीचा असो । कारण कृष्णनाम उपनिषदीं दिसो । आणि भावार्थ ऐसा गवसो । कीं द्व्यक्षरब्रह्म कृष्णनाम ॥६०२॥ आतां प्रणव नव्हे नाम । कोणी म्हणतील यालागीं पुरुषोत्तम । सप्तदशीं बोलेल सर्वोत्तम । कीं 'ॐ तत् सत्' हें त्रिविध नाम । ब्रह्मा सगुणाचें. ॥ ६०३ ॥ एकाक्षर ब्रह्म येथें । कीं ज्या नामीं जितकीं अक्षरें जेथें । तें तितकिया अक्षरांचें तेथें । ब्रह्म अक्षररूप बोलावें. ॥ ६०४ ॥ कोणी म्हणतील वेदब्रह्म । तें गीतेंत जें एकाक्षरब्रह्म ।

त्याचा अर्थ एकाक्षर निगम । तरी हें उत्तम त्याहुनी. ॥ ६०५ ॥ कीं **'वेदो-नारायणः साक्षात्'** म्हणोनी । हें प्रमाणसिद्ध यावरूनी । ब्रह्मरूप वेदरूप महिमे दोन्ही । प्राप्त जाले नामातें. ॥ ६०६ ॥ कीं एकाक्षर वेद ओंकार । **कृ**ष्णनाम **ह**रिनाम वेदद्व्यक्षर । **अ**नंतनाम वेदत्र्यक्षर । निगमचतुरक्षर **ना**रायण. ॥ ६०७ ॥ कोणी म्हणती प्रथम । प्रणव जाला तोचि एकाक्षरब्रह्म । तरी पद्मनाभ प्रथम **पु**रुषोत्तम । तोचि ब्रह्मरूप आणि काय **कृ**ष्ण नव्हे? ॥ ६०८ ॥ फटकाळ जैसे हे बोल । तैसाच बोल हाही फोल । भावार्थ टाकूनि खोल । कां वरिच्या वरी उडावें? ॥ ६०९ ॥ कोणी उपदेशूनि ओंकार । सांगती ब्रह्मविद्यासार । प्रणवार्थ तदनुसार । वाखाणिती. ॥ ६१० ॥ तरी गायत्री ब्रह्मचि सारी । **ना**रायण **वा**सुदेव इत्यादि नामांतरीं । ब्रह्मसाक्षात्कार होय यापरी । नसती अर्थ काय ! ॥ ६११ ॥ नर जीव अंश प्रतिबिंब । नारें[1] जड-तत्त्वें त्यांचा त्यांस अवलंब । आश्रय अधिष्ठान बिंब । अनुभव **ना**रायणपणाचा ये रीती. ॥ ६१२ ॥ मंत्र संन्यासी यांचा ओंकार । तिहीं त्याचा वाढविला बडिवार । पाहतां अनुभवप्रकार । कोठें नसे. ॥ ६१३ ॥ व्यतिरेकें कळे निःशब्द । तें प्रणव नव्हे अथवा वेद । अन्वयें सर्व अभेद । तेथें प्रणवचि काय एकला? ॥ ६१४ ॥ आतां लोकवाणी बंध करी । वेदवाणी बंध हरी । त्यांत प्रणव थोर तरी । कीं तें नाम ब्रह्माचें. ॥ ६१५ ॥ ज्यास न कळे ब्रह्म । आणि संन्यास घेतला परम । त्यास एकचि अक्षरब्रह्म । थोर सांगितलें सर्वांत. ॥ ६१६ ॥ जडचैतन्यविवेक । प्रणव न सांगतां व्यतिरेक । उपदेशिला अद्वितीय एक । न कळे काय शिष्यासी. ॥ ६१७ ॥ तैसाच अन्वय । अलंकार जैसा सुवर्णमय । तैसें कार्य कारणचि हेंही काय । विना प्रणव न कळे शिष्यासी. ॥ ६१८ ॥ एवं च संन्यासी याचा हा मंत्र । तिहीं थोर केला प्रणव मात्र । पाहतां **ह**रिनाम सर्वत्र । वेदीं तितकें ब्रह्मरूप. ॥ ६१९ ॥ हें सुचवाया **पु**रुषोत्तम । म्हणावें जें उगेंचि अक्षरब्रह्म । तें एकाक्षरब्रह्म । म्हणुनी येथें बोलिला. ॥ ६२० ॥ असो हें बोलतां फार । ग्रंथ वाढेल अपार । प्रस्तुत बोले **स**र्वेश्वर । प्राणायाम अंग योगाचें. ॥ ६२१ ॥ त्यास अंतरंग ओंकार । त्याचा वर्णिला बडिवार । कीं त्याचा करितां उच्चार । मातें स्मरे. ॥ ६२२ ॥ सिंहावलोकनन्यायें । प्राणायाम येथें देवरायें । सूचविला कीं **ध**नं-

१. मनुष्यसमुदाय.

जयें । प्रथम अभ्यास हाही समजावा. ॥ ६२३ ॥ कीं सोळा प्रणवीं पूरक । आणि बत्तिसां प्रणवीं रेचक । चौसष्ट प्रणव होती तो कुंभक । प्राणायाम एक हा ऐसा. ॥६२४॥ अभ्यासें समीर । राहों लागे स्थिर । द्विगुण त्रिगुण इत्यादि सधीर । प्राणायाम योगी वाढविती. ॥ ६२५ ॥ द्विगुण करितां रेचक । द्विगुण करावा पूरक । द्विगुण धरावा कुंभक । द्विगुण ऐसा प्राणायाम हा. ॥ ६२६ ॥ ऐसा त्रिगुण चतुर्गुण । प्राणायाम करिती योगनिपुण । जों जों वाढे तों तों प्राण । अंतर्मुख होतसे. ॥ ६२७ ॥ गुदद्वाराचपासीं । मूळाधार तेथें प्राणासीं । स्थिरता तों ब्रह्मरंध्रासी । जावयासि मार्ग होतसे. ॥ ६२८ ॥ जैसा लागतां वारा । वाळोनि चिखलाचा थारा । मोकळा होतो मार्ग सारा । ये रीती. ॥ ६२९ ॥ वेळू जैसा पोकळ । परि कांडोकांडीं ग्रंथी पुष्कळ । तैसीं चक्रें सकळ । ब्रह्मरंध्रपर्यंत. ॥ ६३० ॥ लोहशलाकेंकरूनी[1] । जैसीं कांडीं भेदूनी । मार्ग करिती तैसा भरोनी । प्राण षट्चक्रें भेदितो. ॥ ६३१ ॥ तो क्रम पूर्वीं दाविला । हा उपाय बोलतां राहिला । तो स्मरणप्रसंगें बोलिला । सूचविला प्रणव उच्चारें करूनी. ॥ ६३२ ॥ कीं करितां प्राणायाम । षट्चक्रमार्ग होतो सुगम । आणि आपलें स्मरण परम । प्रणवाच्या करितां आवृत्ती. ॥ ६३३ ॥ नाकपुडी डावी धरी । पूरक उजविया रंध्रें वारा भरी । सोळा संख्या आवृत्ति जोंवरी । ओंकाराच्या. ॥ ६३४ ॥ दोहीं पुटांसहित घ्राण । धरितां मूळाधारीं कोंडे प्राण । त्यास म्हणती योगनिपुण । कुंभक म्हणोनी. ॥ ६३५ ॥ प्रणवाचिया आवृत्ती । चौसष्टी जेव्हां होती । त्यास कुंभक म्हणती । योगशास्त्रीं. ॥ ६३६ ॥ धरूनि उजवी नाकपुडी । डावेवाटे हळु हळु वारा सोडी । प्रणवाच्या आवृत्ति मांडी । बत्तीस तेव्हां. ॥ ६३७ ॥ तो प्रणव एकाक्षरब्रह्म । त्यातें जपत साधकोत्तम । मातें स्मरे म्हणे पुरुषोत्तम । या भावें करूनी. ॥ ६३८ ॥ प्राण ब्रह्मरंध्रपर्यंत । जायास उपाय हा अत्यंत । स्मरणप्रसंगें भगवंत । सिंहावलोकनें हें वदे. ॥ ६३९ ॥ येथें टीकाकार इतर । अर्थ हा प्राणायामपर । न करिती म्हणती सर्वेश्वर । म्हणतो जपत ओंकार मातें स्मरतो म्हणोनी. ॥ ६४० ॥ तरी ओंकार एकाक्षर । जपत स्मरत मातें नर । हें पूर्वार्धीं बोलोनि दामोदर । गति बोलतो उत्तरार्धें. ॥ ६४१ ॥ कीं ऐसा जपत मातें स्मरत । जो देह सोडोनि असे ज्यांत । तो परमगतीतें असे पावत । दोहीं अर्धीं दिसतसे अर्थ हा. ॥ ६४२ ॥ आणि याहूनी पूर्वश्लोकीं ।

---

१. शलाका=सळई.

बोलोनी प्राण मस्तकीं । या श्लोकीं म्हणतो कीं । प्रणव उच्चारित स्मरत जातो म्हणोनी ॥ ६४३ ॥ तेव्हां प्राण चढला मस्तकावरी । राहिल्या परा पश्यंती मध्यमा वैखरी । प्रणव उच्चार त्याउपरी । घडे कैसा. ॥ ६४४ ॥ प्राण भेदूनि चक्रें साही । मस्तकासि जातां तळीं देहीं । प्राणचि जेधवां नाहीं । उच्चार करी कोण तेव्हां ? ॥ ६४५ ॥ तैसेंचि पूर्वश्लोकीं पूर्वार्धीं । मन हृदयांत बोलोनि उत्तरार्धीं । प्राण मस्तकीं म्हणे हेही प्रसिद्धी । ऐसीच टीकेंत वर्णिती. ॥ ६४६ ॥ हेही गोष्टी अघटित । कीं प्राण तेथें मन निश्चित । प्राणमनाचें बंधन असे अत्यंत । प्रसिद्ध वेदीं पुराणीं योगींही. ॥ ६४७ ॥ येथें पुढील बोलोनि योगगती । सांगे मागील साधनरीती । सिंहावलोकनन्यायेंच **श्री**पती । सिद्धि बोलोनि साधनें बोलतो. ॥ ६४८ ॥ प्राण मस्तकास नेती । ते भूमींतही पुरोनि घेती । ऐशा समाधींत कोणे रीती । उच्चार करील ओंकाराचा. ॥ ६४९ ॥ नवनीतादि मर्दन । करूनि समाधि त्याचा जन । उतरिती ऐसिया समयीं मन । कैंचें हृदयांत कैंचा प्रणवोच्चार? ॥ ६५० ॥ समाधि न म्हणावा तैसा । तरी मस्तकीं प्राण चढला कैसा ? । आणि **'आस्थितो योगधारणां'** ऐसा । श्रीकृष्णही कां म्हणे ? ॥ ६५१ ॥ ज्ञानयोगधारणा म्हणावी । तरी सर्वद्वारें कां कोंडावीं ? । एवं च इतर क्लिष्टकल्पना सांडावी । बोलावी हठयोगधारणाच हे. ॥ ६५२ ॥ प्रणवोच्चार करीत । प्राण मस्तकीं ठेवूनि असे जात । हा अर्थ येथें विरुद्ध अत्यंत । बोलतां नये. ॥ ६५३ ॥ येथें सिंहावलोकनन्यायें । प्राणायामचि सांगतो म्हणावा निश्चयें । कीं मस्तकीं प्राण जावयाचें धनंजयें । प्राणायामसाधन समजावें हा भाव. ॥ ६५४ ॥ आतां असो हे खटपट । जे विवेकी ते समजतील नीट । विरुद्धार्थ निपट । कैसा अंगीकारावा. ॥ ६५५ ॥ योगधारणा धरूनी । मस्तकीं प्राण ठेवुनी । पुढें काय करितो तें उत्तरार्धें करूनी । बोलोनि बोलतो गति त्याची. ॥ ६५६ ॥

**यः प्रयाति त्यजन्देहं स याति परमां गतिम् ॥ १३ ॥**

मस्तकीं प्राण ठेवुनी । असे ऐसें पूर्वश्लोकेंकरूनी । बोलिलों आतां ऐसा जो प्रकर्षेंकरूनी । देह सोडोनि जातसे ॥ ६५७ ॥ तो परमा गतीतें । पावतो म्हणूनि भगवंतें । ब्रह्मरंध्र भेदूनि जातो गतीतें । सूचविलें हेंही ॥ ६५८ ॥ कीं कोंडी द्वारें सकळ । हें पूर्वींच बोलिला मेघनीळ । आणि प्रयाति म्हणजे जातो करूनि प्रकृष्टबळ । ऐसें येथें बोलिला ॥ ६५९ ॥ भाव कीं मस्तकीं वारा यथेष्ट । कोंडितां बळ करूनि प्रकृष्ट । जें दशमद्वार बाळपणीं स्पष्ट ।

दिसे तें फुटे बळें प्राणाच्या. ॥ १६० ॥ यालागीं कीं मस्तकीं प्राण शिरे । तो इतरांच्या प्रयासें उतरे । तो स्वयें मस्तकींहूनि न फिरे । समाधी उतरिती लोक त्याचा. ॥ १६१ ॥ ज्यास करणें काळवंचना । तो दशमद्वार भेदूनि जाईना । हा ज्ञानवंत यास वासना । परमागतीची. ॥ १६२ ॥ म्हणूनि दशमद्वार पवित्र । ज्यावरी असे चर्म मात्र । तें भेदूनि सोडोनि गात्र । परमागतीतें पावतो. ॥ १६३ ॥ तो सत्यलोकास जातो । तेथें ध्यानयोगातें दृढ करितो । मग ब्रह्मा चतुर्मुख जेव्हां मुक्ति पावतो । मुक्ति पावतो हाही तेव्हां. ॥ १६४ ॥ होईल हें पुढें स्पष्ट । याच्या जावयाची वाट । उत्तरायण शुक्लगति उत्कट । पुढें प्रसंगें भगवंत बोलेल. ॥ १६५ ॥ कीं ज्ञानी आत्मज्ञ खरा । परि आत्मयोग साधिला नाहीं बरा । तरी कष्टेंकरूनि मस्तकासी वारा । नेऊनि बांधिली मोट वायूची. ॥ १६६ ॥ ज्ञानावांचूनि नाहीं मोक्ष । यासि तो मोक्ष बोलिला अंबुजाक्ष । म्हणूनि आत्मज्ञ मानवापरी दक्ष । हठयोगी जैसा तैसा आत्मयोगी न म्हणवे. ॥ १६७ ॥ जो पक्व आत्मज्ञानी सुजाण । प्रारब्ध सरतां त्याचे प्राण । न निघती समुद्रीं लवण । लय पावती तैसे स्वरूपीं श्रुति म्हणे. ॥ १६८ ॥

श्रुति—**'न तस्य प्राणा उत्क्रामंति इहैव स विलीयते ।'**

श्रुत्यर्थ—प्राण त्याचे न निघती । येथेंचि लय पावती । ऐसें स्पष्ट बोले श्रुति । तेणें मस्तकीं प्राण कां न्यावा ? ॥ १६९ ॥ ब्रह्म मस्तकींच त्यास । तेव्हां देह सारा पडला काय ओस ? । स्वदेहासह चराचर जयास । ब्रह्मचि दिसे. ॥ १७० ॥ तो कां सर्व द्वारें कोंडी ? । कां तो योगधारणा मांडी ? । अखंडत्व ज्याला अखंडीं । अखंड बाणे. ॥ १७१ ॥ एवं च पक्वज्ञानी असता । तरी या खटपटीतें न झोंबता । तेव्हां तो मानिजेता । कीं सद्यचि पावलों मुक्तीतें. ॥ १७२ ॥ अथवा ज्ञानी आणि भक्त । असतां सगुणचरणीं अनुरक्त । तरी देह सोडितां ध्यानयुक्त । सगुणमुक्तीतें पावता. ॥ १७३ ॥ कीं जो जें सर्वदा स्मरे । तें त्यास देहावसानीं स्फुरे । एवं सगुणभक्त ज्ञानी वरे । ते सगुणस्मरणें कृतकृत्य. ॥ १७४ ॥ त्यांसही मुक्ति तत्काळ । ज्यांस ज्ञानभक्तीचा सुकाळ । त्यांच्या दृष्टीस फटकाळ । हठयोग हा. ॥ १७५ ॥ ते जरी हठयोग जाणती । तरी न अनुष्ठिती या योगरीती । प्रारब्ध सारायातेंच जिती । देह ज्यांचे. ॥ १७६ ॥ ते आत्मत्वें कृष्णचरण । स्मरती अंतीं तेंचि स्मरण ।

भगवद्रूप ज्यांचें अंतःकरण । [1]भृंगकीटन्यायें जितांचि. ॥ ६७७ ॥ एवं मोक्ष निर्गुण । त्यांत सद्यमुक्ती पावती पक्क निपुण । त्यांचें देह त्यजूनि उत्क्रमण । हठयोगें बोलिलें. ॥ ६७८ ॥ यासही कैवल्यमोक्ष । कीं नव्हे भक्तियोगीं दक्ष । ज्ञानी अपक्क होऊनि धरिला पक्ष । हठयोगाचा. ॥ ६७९ ॥ ब्रह्मरंध्र भेदूनि गेला । पुन्हा जन्म न घडे त्याला । आणि पक्कज्ञानी नाहीं जाला । म्हणूनि मुक्तिही न घडे तत्काळ. ॥ ६८० ॥ जन्म योगभ्रष्टास मागुतीं । मागें बोलिला जगत्पती । यालागीं कीं ब्रह्मरंध्र भेदूनि हे गती । तो नाहीं पावला. ॥ ६८१ ॥ जाय ब्रह्मरंध्र भेदूनी । तो नये पुन्हा परतोनी । परंतु मोक्षज्ञानावांचूनी । न घडे सर्वथा. ॥ ६८२ ॥ यालागीं हा ज्ञानी । परंतु अपक्क म्हणोनी । गेला ब्रह्मरंध्र भेदूनी । ब्रह्मलोका. ॥ ६८३ ॥ तो दों परार्धांचे अंतीं । ब्रह्मयासह पावेल कैवल्यगती । ऐसे अनेक असती । ब्रह्मलोकीं. ॥ ६८४ ॥ ते ब्रह्मयाचा दिवस आणि रजनी । मोजिती मोक्षप्रतीक्षा करूनी । सत्यलोकीं असती म्हणोनी । पुढें चतुर्थश्लोकीं बोलेल. ॥ ६८५ ॥ **'तेऽहोरात्रविदो जनाः'** म्हणोनी । चतुर्थश्लोकेंकरूनी । बोलेल भगवंत त्यावरूनी । गति याची एथें ऐशी वदावी. ॥ ६८६ ॥ ये विषयीं श्लोक । या पुढेंचि बोलणार उत्तमश्लोक । परि आयकोनि याचे कष्ट आत्यंतिक । झणी शंकेल अर्जुन. ॥ ६८७ ॥ कीं ब्रह्मरंध्र भेदिल्यावीण । मोक्ष नव्हे सगुण अथवा निर्गुण । म्हणूनि व्याकुळ अंतःकरण । झणी होय आपल्या भक्ताचें. ॥ ६८८ ॥ म्हणूनि भक्तास आपण । सुलभ आणि सुलभत्व लक्षण । बोलतां प्रकरण । वाढेल श्लोकत्रयपर्यंत. ॥ ६८९ ॥ म्हणूनि **'तेऽहोरात्रविदो जनाः'** । ऐसें चतुर्थश्लोकीं या अनुसंधाना । योजूनि बोलेल प्रस्तुत स्वजना । सुलभ आपण हें बोलतो या श्लोकीं. ॥ ६९० ॥

**अनन्यचेताः सततं यो मां स्मरति नित्यशः ।**
**तस्याहं सुलभः पार्थ नित्ययुक्तस्य योगिनः ॥ १४ ॥**

अगा ! जडभाग तितका अन्य । अन्य नव्हे आत्मा चैतन्य । तथापि जडातरंगीं धन्य । त्या चित्समुद्रातें देखती. ॥ ६९१ ॥ ज्या चित्तें हा अनुभव । त्या चित्तास अनन्यवैभव । ऐसें चित्त ज्याचें तो मानव । अनन्यचेता

---

१. भृंग हा कीटकाला (आळीला) आपल्या घरांत आणून ठेवून वरचेवर तिला टोंचितो, त्यामुळें त्या कीटकाचें सारखें लक्ष त्या भृंगाकडे लागून तो तत्स्वरूप म्हणजे भृंगच होतो असा समज आहे. अलीकडचा समज असा आहे कीं तो भृंग त्या कीटकाच्या अंगांत आपलीं आंडीं ठेवितो आणि त्यांतून पुढें भृंग होतात.

म्हणावा. ॥ ६९२ ॥ ऐसा अनन्यचेता सर्वदा । स्मरे नित्य मज मुकुंदा । निर्गुण ज्ञानी आणि चरणारविंदा । स्मरे माझिया. ॥ ६९३ ॥ पार्था! मी श्रीवल्लभ । त्यास अत्यंत सुलभ । त्याला मोक्ष नसे दुर्लभ । सुलभ मोक्षस्वरूप मी जेव्हां. ॥ ६९४ ॥ होऊनि दुर्लभ आत्मज्ञान । जे मोक्षार्थ मांडिती इतर साधन । त्यांस दुर्लभ मी जगज्जीवन । म्हणूनि मोक्षकष्टें तयांसी. ॥ ६९५ ॥ होऊनिही ज्ञानी । मातें त्या अनन्यचित्तेंकरूनी । स्मरे त्यास न उरती दोनी । एक मी आणि एक मोक्ष. ॥ ६९६ ॥ चित्त चैतन्य जालें । तेव्हांच निर्गुणात्मत्वें धालें । स्मरतां मातें त्यालाचि आलें । मद्रूपत्व अर्जुना! ॥ ६९७ ॥ चित्ता चित्स्वरूपत्व स्फुरे । तेव्हां अनन्यत्वें तें नुरे । मग मज सगुणातें स्मरे । चित्प्रकाशें मदाकार होउनी. ॥ ६९८ ॥ कां त्याणें निरोधावीं द्वारें । कां मस्तकास न्यावें वारें । देह पडतां माझिया आकारें । शुद्धसत्त्व उरे तें चित्त. ॥ ६९९ ॥ आत्मा तरी जगद्व्यापक । मद्रूप चित्त मदात्मक । देह पडतां हेंचि कौतुक । दिसों लागे अनायासें. ॥ ७०० ॥ ज्ञानींच होय पूर्वी बोलिला जो तोही । परंतु ज्ञानयोगीं प्रयत्न केला नाहीं । प्राणनिरोधप्रवाहीं । क्रमिलें आयुष्य. ॥ ७०१ ॥ हा नित्ययुक्त योगीं । चित्त नित्य चैतन्यसंयोगीं । आणि मातें स्मरे यालागीं । त्यास मी सुलभ अत्यंत. ॥ ७०२ ॥ अनन्यचित्त सतत । आणि नित्यशः मातें स्मरत । 'सतत,' 'नित्य' या दों शब्दीं भगवंत । दोन्ही सूचवी. ॥ ७०३ ॥ अनन्यचित्त सतत । सतत म्हणजे सर्वदा अनन्यचित्त । आणि नित्यशः मातें असे स्मरत । नित्यशः म्हणजे प्रतिदिनीं. ॥ ७०४ ॥ नित्यशः म्हणजे नित्य नित्य । म्हणजे प्रतिदिनीं अगत्य । जैसें प्रतिमादिपूजाकृत्य । तैसा प्रतिदिनीं ध्यातो मातें हा भाव. ॥ ७०५ ॥ म्हणजे विश्व भगवद्रूपें । लक्षितो अनन्यचित्स्वरूपें । या अनुभवाच्या प्रतापें । अनन्यचित्त सतत सर्वकाळीं. ॥ ७०६ ॥ आणि नित्य नित्य प्रतिदिनीं । ध्यानीं श्रवणीं कीर्तनीं । नित्यशः स्मरे मातें म्हणोनी । सूचवी भाव. ॥ ७०७ ॥ सतत म्हणजे अखंड । अनन्यत्वीं चित्तास न पडे खंड । कीं सगुणभजनही करी उदंड । तरी अनन्यत्व खंडेना. ॥ ७०८ ॥ कीं भगवद्रूप सगुण । तद्रूपें चित्त आपणातें आपण । कल्पी आत्मप्रकाशें निपुण । अनन्यत्वेंचि चित्त तें. ॥ ७०९ ॥ आत्मप्रत्ययाविण । चित्त काय कल्पूं शकेल सगुण । सुवर्णमूर्तीविना सुवर्ण । सिद्धचि नव्हे. ॥ ७१० ॥ सुवर्णें सुवर्णमूर्ति जाली सिद्ध । सुवर्णावांचूनि न दिसे हेंही प्रसिद्ध । आंत बाहेर अवघें समृद्ध । सोनेंचि तें. ॥ ७११ ॥ तैशी आत्मप्रकाशाविना । कल्पनाचि चित्ताची घडेना । कल्पिली मूर्ति अनुभवा

येना । आत्मप्रकाशावांचूनीं. ॥ ७१२ ॥ ऐसा स्मरे नित्य सगुण । तरी अनन्यत्वाची न तुटे खूण । अखंड अनन्यचित्तें ऐसा निपुण । आणि नित्य नित्य स्मरे सगुणही. ॥ ७१३ ॥ ऐसा योगी नित्ययुक्त । आणि सगुणभजनेंकरूनि भक्त । तो देह असतांचि मुक्त । जेव्हां सुलभ भगवंत ऐसा. ॥ ७१४ ॥ परंतु प्रारब्धाचा देह । सकळ दुःखाचें गृह । अशाश्वत पडणार । निःसंदेह कर्मफळ पूर्वील भोगवी. ॥ ७१५ ॥ म्हणूनि तो पडल्यावरी । मज पावणें हे एक उरी । तो मज पावे तदुपरी । कानीं न पडे कर्मदेहवार्ताही. ॥ ७१६ ॥ याकारणें आपणातें । पावलियावरी तयातें । पुन्हा या दुःखरूपा कर्मलोकातें । येणेंचि न घडे म्हणतसे या श्लोकीं. ॥ ७१७ ॥

**मामुपेत्य पुनर्जन्म दुःखालयमशाश्वतम् ।**
**नाप्नुवंति महात्मानः संसिद्धिं परमां गताः ॥ १५ ॥**

अगा ! पावोनियां मातें । पुन्हा न पावती जन्मातें । मद्रूप होऊनि ज्यांतें । असणें मजसमीप. ॥ ७१८ ॥ उपशब्दें समीप ऐसा अर्थ । दावूनि सगुणमोक्षभावार्थ । येथें दावी समर्थ । निर्गुणमोक्ष चरणीं चौथिया. ॥ ७१९ ॥ **'संसिद्धिं परमां गताः'** म्हणोनी । परमा सिद्धीतें पावले येणेंकरूनी । कैवल्यनिर्गुणमोक्ष सूचवुनी । हठयोगियाहूनि उभयगतिश्रेष्ठत्व वर्णितो.॥७२०॥ कीं पावोनि मातें सगुणातें । आणि परम संसिद्धीतें पावले त्यांतें । पुनर्जन्म नाहीं या उभयांतें । जें पुनर्जन्म गृह दुःखाचें. ॥ ७२१ ॥ मातें म्हणिजे सगुणातें । येथें कोणी म्हणतील हेंही निर्गुणातें । म्हणूनि योजी उपशब्दातें । उप म्हणिजे समीप. ॥ ७२२ ॥ निर्गुणीं निर्गुणचि उरे । तेथें दूरत्व अथवा समीपत्व न स्फुरे । सायुज्यमोक्षीं न शिरे । अर्थ उपशब्दाचा. ॥ ७२३ ॥ सामीप्य सारूप्य सालोक्य गती । उपशब्दें सूचवी श्रीपती । कीं वैकुंठ आणि वैकुंठाचा पति । दोन्ही एक. ॥ ७२४ ॥ जैसे रामकृष्णादि अवतारदेह । नगराकार रूप तेंही निःसंदेह । परि नगराकारीं न वसे स्नेह । उपासकांचा. ॥७२५॥ म्हणूनि रामकृष्णादि अवतार । ध्याती हेचि भगवदाकार । जन्मकर्मैं दिव्यें परि मनुष्यानुसार । गोड मनुष्यां लागती. ॥७२६॥ म्हणूनि हे अवतार । जनास वाटती भगवदाकार । वैकुंठनगर स्वयें सर्वेश्वर । शास्त्रसिद्ध आणि अनुभवी जाणती. ॥७२७॥ हे त्रिगुणरचना । भगवद्रूपावीण असेना । तथापि हे त्रिगुणकल्पना । अनादि [1]जीवकर्मभोगार्थ. ॥ ७२८ ॥ त्यांतचि भगवदवतार । [2]मुक्तिप्रद भगवदाकार ।

---

१. जीवाच्या कर्मांच्या भोगाकरितां. २. मुक्ति देणारा.

आणि मुक्तिरूप सर्वेश्वर । अनादि वैकुंठरूप स्वयें प्रगटतो. ॥ ७२९ ॥ एवं च वैकुंठातें पावला । ऐक्य आणि समीपत्वही त्याला । त्यांत कोणास सामीप्य मोक्ष बोलिला, । कोणास सारूप्य सालोक्य. ॥ ७३० ॥ त्यांत वैकुंठनाथाचें रूप । सामीप्य म्हणिजे त्यासमीप । वैकुंठलोकही भगवत्स्वरूप । तेव्हां समीपत्व हें सकळांसही. ॥ ७३१ ॥ वैकुंठनाथसमरूप । वैकुंठीं त्यास म्हणती सारूप्य । तें वैकुंठही भगवत्स्वरूप । तेव्हां समीपत्व त्यासही. ॥ ७३२ ॥ वैकुंठींच वैकुंठाकार स्थळ । ज्यांत वैकुंठरचना सकळ । मुक्त तेथें नांदे जाणों केवळ । नित्यमुक्त वैकुंठनाथचि नांदतो. ॥ ७३३ ॥ हा सालोक्यमोक्ष बोलिला । तोही समीपचि पावला । कीं वैकुंठीं त्याला । तें वैकुंठचि वैकुंठनाथ तो. ॥ ७३४ ॥ उपशब्दें ऐसें सूचवुनी । **'संसिद्धिं परमां गताः'** यावरूनी । निर्गुण कैवल्यमोक्ष बोलोनी । पुनर्जन्म नाहीं म्हणूनि बोलतो. ॥ ७३५ ॥ या दोहीं मोक्षांस पावले । ते महात्मशब्दें थोर केले । कीं महा थोर अत्यंत जाले । आत्मे म्हणिजे चित्तें जयांचीं. ॥ ७३६ ॥ **'यो वै भूमा तत्सुखं'** हे श्रुती । म्हणे जो भूमा त्यास सुख म्हणती । ज्यास आदि मध्य अंत नसती । तो भूमा अनंत तोचि आनंद. ॥ ७३७ ॥ महाशब्दें भूमा । चित्तास म्हणावें आत्मा । तदाकार चित्तें अनुभविती तो महिमा । महात्मशब्दें ते पुरुष. ॥ ७३८ ॥ एवं च देहपतनपर्यंत । आनंद ऐसा अत्यंत । यावरूनी सूचवी भगवंत । कीं थोर त्या हठयोगियापरीस हे. ॥ ७३९ ॥ कीं हे पावले शाश्वत । पुन्हा जन्मदुःखालय अशाश्वत । न पावती म्हणे यावरूनि भगवंत । ब्रह्मलोकगति त्यांची अशाश्वत ऐसें सूचवी. ॥ ७४० ॥ कीं हे ज्ञानी दक्ष । सद्यचि पावले मोक्ष । तो ज्ञानी परि धरूनि हटयोगपक्ष । ब्रह्मलोकास पावला. ॥ ७४१ ॥ तो ब्रह्मलोक आणि ब्रह्मा । होतां त्यांच्या शतवर्षांची सीमा । नाश पावती या साधकोत्तमा । मोक्ष तेव्हां जरी होणार. ॥ ७४२ ॥ मुक्ति होय तोंपर्यंत । सत्यलोकीं दिवस मोजित । गति पावोनि अशाश्वत । असावें तेणें. ॥ ७४३ ॥ म्हणूनि नश्वर गती । म्हणावें हटयोगी पावती । या भावें सर्व जगत्पती । श्लोकद्वय बोलतो. ॥ ७४४ ॥ आणि इतरदेवतोपासक । त्या त्या देवांचेच पावती लोक । परंतु न चुके पुनर्जन्म शोक । प्रसंगें हेंही सूचवी या श्लोकीं. ॥ ७४५ ॥

---

१. विष्णूसारखें रूप. २. श्रेष्ठत्व. ३. जन्म व दुःख यांचें घर.

**आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्तिनोऽर्जुन ।**
**मामुपेत्य तु कौंतेय पुनर्जन्म न विद्यते ॥ १६ ॥**

अगा ! ब्रह्मयाचें भुवन । सत्यलोक ज्याचें अभिधान[1] । तें धरूनि जें जें स्थान । ज्या ज्या ब्रह्मादिदेवांचें. ॥ ७४६ ॥ अर्जुना! हे लोक सकळ । थोरा थोरा पुण्याचें फळ । तथापि पुनरावृत्तिशीळ । जे पावले पुन्हां जन्मलेच ते. ॥ ७४७ ॥ हे गोष्टी आयकोनी । शंकित जाला अर्जुन मनीं । ऐसाच वैकुंठही लोक म्हणोनी । शंका उपजली. ॥ ७४८ ॥ कीं लोक मात्र जितका । पुनरावृत्ति देणार तितका । तेव्हां पुनरावृत्तीचा ढका । वैकुंठवासीं यासही. ॥ ७४९ ॥ हा अर्जुनाचा भाव । जाणोनियां देवाधिदेव । संदेह निरसे ऐसें वासुदेव । उत्तरार्धें बोलतो. ॥ ७५० ॥ कीं मातें पावोनि कुंतीसुता ! । पुनरावृत्तीची वार्ता । कानीं पडे हें न घडे तत्त्वता । कीं लोक माझा तो मीच हा भाव. ॥ ७५१ ॥ सकळ लोक आणि लोकपती । मीच स्वयें जगत्पती । परि ते लोकपाळ मानिती । कीं आम्हीं धनी या लोकांचे. ॥ ७५२ ॥ कीं गुण अविद्यामय । ते लोक हा निश्चय । मी ईश्वर अद्वय । मीच माझा लोक मज वाटे. ॥ ७५३ ॥ जे ऐसे मद्रूप होती । तेचि त्या लोकातें पावती । वैकुंठ अपुनरावृत्ति गती । यालागीं बोलतों अर्जुना! ॥ ७५४ ॥ मातें म्हणतां हा भाव । एथें सूचवी देवाधिदेव । एथेंही उपशब्द देव । पूर्वोक्त भावें बोलतो. ॥ ७५५ ॥ कीं मातें म्हणतां मी निर्गुण । त्या मातें पावती म्हणतो सगुण । ऐसें झणी कोणी शब्दनिपुण । बोलती एथें. ॥ ७५६ ॥ म्हणोनि म्हणतां उप । अर्थ याचा समीप । तेव्हां मी वैकुंठनगररूप । त्या मातें ऐसें सूचवी. ॥ ७५७ ॥ वैकुंठ माझें स्वरूप । तेथें जे असती पावोनि मद्रूप । तितकेही मजसमीप । हें उपशब्दें सूचवी. ॥ ७५८ ॥ आणि या प्रकरणींच पुरुषोत्तम । यापुढें जो श्लोक पंचम । तेथें म्हणेल कीं **'तद्धाम परमं मम'** । आधीं **'यद्गत्वा न निवर्तंते'** म्हणोनी. ॥ ७५९ ॥ ज्यास अव्यक्त[2] अक्षर[3] म्हणती । ज्यास म्हणती परमगती[4] । ज्यातें पावोनि न परतती । तें परम धाम गृह माझें ऐसें बोलेल. ॥ ७६० ॥ तो अव्यक्त अक्षर आपण । तोचि धाम आपलें म्हणे हे एथें खूण । सूचवी सर्वज्ञ निपुण । जें मातें म्हणूनि या श्लोकीं बोलिला. ॥ ७६१ ॥ ऐसें ज्या पंचम श्लोकीं । त्यासही कोणी म्हणतील कीं । सगुणाचें धाम निर्गुण इतकी । गोष्टी तेथें बोलतील. ॥ ७६२ ॥ म्हणूनि

---

१. नांव. २. अगोचर. ३. अविनाश. ४. ज्या गतीस पोंचल्यावर पुनः जन्म येत नाहीं ती.

त्याही पुढें श्लोक । तेथें ऐसें बोलेल उत्तमश्लोक । कीं **'तद्धाम परमं मम'** म्हणजे **वै**कुंठलोक । अर्थ हाचि सिद्ध होय. ॥ ७६३ ॥ **'पुरुषः स परः पार्थ। भक्त्या लभ्यस्त्वनन्यया'** ऐसें समर्थ । बोलेल याचा विशदही अर्थ । होईल पुढें ते स्थळीं. ॥ ७६४ ॥ एवं च पावेल मातें । हें म्हणे **वै**कुंठलोकातें । कीं जो पावला त्यातें । पुनर्जन्म न घडे. ॥ ७६५ ॥ कीं **वै**कुंठनाथ आणि **वै**कुंठवासी । चिद्रूपचि **वै**कुंठ वाटे इतकियांसी । मातें पावे म्हणूनी **अ**र्जुनासी । आणिका गहनभावेंही बोलिला. ॥ ७६६ ॥ कीं **वै**कुंठीं स्थळें दोनी । मुक्तस्थळ अमुक्तस्थळ म्हणोनी । मुक्तस्थळास भक्त ज्ञानी । जाती न परतती ते पुन्हा. ॥ ७६७ ॥ ज्यांस नसोनि आत्मज्ञान । तीव्र घडलें सगुणध्यान । होतां देहावसान[1] । तेंचि आठवे. ॥ ७६८ ॥ जो जें स्मरे देहावसानीं। तो तेंचि रूप पावे म्हणोनी । याच अध्यायीं स्वमुखेंकरूनी । मागें श्री**कृ**ष्ण बोलिला. ॥ ७६९ ॥ देहावसानीं **ह**रिस्मृति । त्या स्मरणें **भ**गवदाकृति । परि संसारबीज प्रकृति । आत्मयोगें न भाजली ज्ञानाग्नींत. ॥ ७७० ॥ अमुक्तस्थळ त्यांकारणें । तैसेंचि अनादि कल्पिलें **ना**रायणें । तेथें त्यांस भेद स्फुरणें । आपण आणि तो लोक भिन्न म्हणोनी. ॥ ७७१ ॥ तेथें द्वारपाळ **जय वि**जय । त्यांसि अविदित ब्रह्म अद्वय । शाप ज्या दोघांस होय । **स**नकादिकांचा. ॥ ७७२ ॥ तयांस भेदाचा प्रत्यय । म्हणूनि च्यवले **ज**य **वि**जय । उगेंच **वै**कुंठ म्हणतां संशय । पुनरावृत्तीचा पडेल. ॥ ७७३ ॥ हा पुराणोक्त त्यांचा इतका परिहार । बोलतां **गी**ता वाढेल फार । म्हणूनि मातें पावती ते न जन्मती मत्पर । इतकेंचि बोले. ॥ ७७४ ॥ कीं अद्वैत अनुभविती भक्त । तेचि त्या **वै**कुंठींचे मुक्त । ज्यांस न वाटे विभक्त । आपण **वै**कुंठ **वै**कुंठनाथही. ॥ ७७५ ॥ जेथें नसे द्वैतस्फुरण[2] । तितकेंचि मी **ना**रायण । आपले दृष्टीनें तों आपण । नव्हे ऐसें कांहीं असेचिना. ॥ ७७६ ॥ म्हणूनि मातें पावले । ते पुन्हा जन्मास नाहीं आले । इतकेंचि **भ**गवंत बोले । **वै**कुंठ न म्हणे यास्तव. ॥ ७७७ ॥ प्रस्तुतीं हठयोगियांस । साधनीं सांगोनि अति आयास । सिद्धीही जे तयांस । तेही ऐसी जेथूनि पुन्हां परतती. ॥ ७७८ ॥ आतां जे कर्मफळें । ब्रह्मलोकास गेले पुण्यबळें । त्यांतेंचि पुनरावृत्ति काळें । योगिया ऐसिया तों परतणें असेना. ॥ ७७९ ॥ त्यांत हाही हठयोगी । ब्रह्मरंध्र भेदूनि जगीं । पावोनि राहिला मोक्षालागीं । **ब्र**ह्मलोकीं तया. ॥ ७८० ॥ पुनरावृत्ति

---

१. देहसमाप्ति, मृत्यु. २. द्वैताभास, मीतूंपण.

यास नसे । आणि ब्रह्मयासह मुक्ति गवसे । गति तों वाईट न दिसे । हठयोगिया ज्ञानियाची. ॥ ७८१ ॥ तेव्हां ज्ञानी आणि भक्त त्याहुनी । बरे बहुत काय म्हणोनी । हेही शंका या श्लोकेंकरूनी । परिहरितो श्रीकृष्ण. ॥ ७८२ ॥

**सहस्रयुगपर्यंतमहर्यद्ब्रह्मणो विदुः ।**
**रात्रिं युगसहस्रां तां तेऽहोरात्रविदो जनाः ॥ १७ ॥**

युगें चारि क्रमती । त्यास एक युग म्हणती । ऐसीं सहस्र युगें होती । तो ब्रह्मयाचा दिवस एक. ॥ ७८३ ॥ तैसा युग सहस्रांचा अंत । होय इतका काळपर्यंत । रात्रीही थोर अत्यंत । ब्रह्मयाची. ॥ ७८४ ॥ ऐसे दिवस ऐशा राती । अगा अर्जुना! ते जाणती । जे प्राण मस्तकास नेऊनि जाती । परम गतीतें म्हणूनि तूतें बोलिलों. ॥ ७८५ ॥ याकारणें ते । जन अगा! अहोरात्र जाणते । दिवस जाला रात्रि होते । सत्यलोकीं ऐसें जाणती. ॥ ७८६ ॥ ऐसा क्रमतां काळ अत्यंत । होती ब्रह्मयाचीं वर्षें शत । काळाच्या मुखीं तोंपर्यंत । असावें तिहीं. ॥ ७८७ ॥ ऐसिया युगांच्या कोटी । क्रमतां अगा किरीटी! । जेथें त्यांचे देह तो लोक शेवटीं । पडेल दाढेस काळाच्या. ॥७८८॥ जरी त्यांस पुनरावृत्ति नाहीं । असती काळाचिया चपेटियांत तेही । हे वार्ताही नेणती कांहीं । सच निर्गुण सगुण मोक्ष ज्यांला. ॥ ७८९ ॥ अगा! जोंवरी काळाच्या प्रवाहीं । तोंवरी त्यांस सुख नाहीं । सुख जें वाटतें कांहीं । तेंही दुःखचि नश्वरत्वें. ॥ ७९० ॥ अहोरात्र जाणती ते । म्हणूनि भगवद्वाणी बोलते । त्यांत पूर्वानुसंधानें दाविते । भावार्थ इत्यादि. ॥ ७९१ ॥ कीं ज्ञानावांचूनि मोक्ष न घडे । तें ज्ञान होऊनि हठयोगाकडे । भरले ते बापडे । ठकले ऐसा हा भाव. ॥ ७९२ ॥ देऊनि हातींचा विडा । तांबूल मागे वेडा । ज्यास होता ज्ञानें मोक्ष रोकडा । तो दाढेंत पडला काळाच्या. ॥ ७९३ ॥ मोजूं लागला दिवस राती । युगसहस्रें ज्यांत जाती । हारवूनि हातींचें मोतीं । खडे मोजूं लागला. ॥ ७९४ ॥ घर पुसत नवरी आली । ते सेजारियास अनुकूल केली । तीस कन्या होईल ते आपली । स्त्री करीन धरिली हे आशा. ॥ ७९५ ॥ ज्ञानें मोक्ष तत्काळ । तो टाकूनि योग फटकाळ । धरूनि मोजूं लागला काळ । ब्रह्मलोकीं मोक्षाकारणें. ॥ ७९६ ॥ योगभ्रष्ट मागें बोलिला । तो याहुनी कोटिगुणें भला । कीं एक जन्म जरी अपक्व वायां गेला । दुसरेच जन्मीं तो सिद्ध. ॥ ७९७ ॥ एवं च हठयोगगती । ज्ञानियांस मागें वदला श्रीपती । **'तेऽहोरात्रविदो जनाः'** म्हणूनि मागुती । ते म्हणूनि तेथें पू-

र्वोक्त दाखविले. ॥ ७९८ ॥ कोणी टीकाकार । हें अनुसंधान पूर्वापर । सोडोनि उगेंच इतर । 'तेऽहोरात्रविदो' म्हणोनी वाखाणिती. ॥ ७९९ ॥ पूर्वी बोलिले असावे । तरी ते म्हणोनि सूचवावे । ज्यास जे मागें नसतीच ठावे । त्याणें ते म्हणतां समजावे ते कोण. ॥ ८०० ॥ न अनुसंधान सांपडे । भलतीकडे भरती बापडे । अनन्यशरणागतांतेंचि ठायीं पडे । यथार्थ अर्थ भगवद्वाणीचा. ॥ ८०१ ॥ इतर देवता पोटीं । भगवद्भक्ति ओंठीं । भक्ति म्हणावी तेथें थोंटी । हाता गीतार्थ केंवी लागे? ॥ ८०२ ॥ तत्रापि हठयोगाचा बडिवार । ज्यास मिरवणें वारंवार । त्यास एथें चमत्कार । दृष्टी न पडती. ॥ ८०३ ॥ हठयोगें पावले सिद्धी । हठयोगें आपल्या केल्या प्रसिद्धी । त्यांस हठयोगेंचि वाटे समृद्धी । मोक्षाची. ॥ ८०४ ॥ असो आतां हा श्लोक जाला । श्लोक दुसरा पुढें आला । तो हा श्लोक कां बोलियेला । तें निमित्त आधीं विचारावें. ॥ ८०५ ॥ ब्रह्मयाचे दिवस आणि राती । जाणती जे पावले ब्रह्मलोकगती । म्हणूनि बोलिला वैकुंठपती । तरी तेथें कोणे रीती दिवस रातीही. ॥ ८०६ ॥ उदय अस्त सूर्याचा नसे । दिनरात्री जाणती ते कैसे । म्हणूनि ऐसें अर्जुन पुसे । तों स्वयेंचि बोलतो या श्लोकीं. ॥ ८०७ ॥

**अव्यक्ताद्व्यक्तयः सर्वाः प्रभवंत्यहरागमे ।**
**रात्र्यागमे प्रलीयंते तत्रैवाव्यक्तसंज्ञके ॥ १८ ॥**

अगा! ब्रह्मयाच्या दिवसाचा आगम । होतां सकळां भूतांचा उगम । प्रकृतीपासूनि होतां अवगम । ते जाणती त्याच्या दिवसाचा. ॥ ८०८ ॥ आगम होतां रात्रीचा । लय होतो भूतांचा । तो रात्रिभाग ब्रह्मयाचा । जाणती ते. ॥ ८०९ ॥ हीं भूतें दिवसा कोठोनि आलीं । आणि रात्रीं कोठें लय पावलीं । जेथूनि उपजलीं तेथें निमालीं । तें काय? ॥ ८१० ॥ ऐसें पुसेल धनंजय । म्हणूनि येथेंचि जगन्मय । हा ब्रह्मयाचा दिनप्रलय । आणि सृष्टिप्रतिदिवसाची हे सांगतो. ॥ ८११ ॥ अव्यक्तापासूनी । व्यक्ति होती म्हणोनी। कारणापासूनि कार्य उपजे हें सूचवुनी । प्रतिदिनसृष्टि सांगतो. ॥ ८१२ ॥ व्यक्ति म्हणजे आकृती । जीपासूनि होती ते प्रकृती । स्वयें आकृतिहीन यालागीं म्हणती । अव्यक्त तीतें. ॥ ८१३ ॥ त्या [१]अव्यक्ततत्त्वप्रकृतीपासूनी । स्थावरजंगमरूपें करूनी । व्यक्ति उपजती म्हणोनी । अव्यक्त कारण व्यक्तीचें. ॥ ८१४ ॥ अव्यक्तापासूनी व्यक्ति होती । तो ब्रह्मयाचा दिवस म्हणती । उपजल्या क्रमें

१. इंद्रियागोचर जें तत्त्व म्ह० ब्रह्म त्याच्या मायेपासून.

लय पावती । त्याच अव्यक्तीं रात्री ते. ॥ ८१५ ॥ युगें सहस्त्र क्रमती । तेव्हां आरंभे राती । मेघ पर्जन्यवृष्टि न करिती । मानवी वर्षें शतपर्यंत. ॥ ८१६ ॥ अग्नीहूनि तीक्ष्ण । सूर्य तपेल ऐसें उष्ण । ते शोषितील किरण । रस वृक्षौषधिधान्यांचे. ॥ ८१७ ॥ अन्नापासूनि उत्पन्न । तीं शरीरेंचि होती अन्न । अन्नावांचूनि क्षुधापन्न । एक एकांस भक्षिती. ॥ ८१८ ॥ अन्नें भूमीपासूनि उपजती । तीं पुरिलीं पेरिलीं होतात माती । आपल्या कारणीं लय पावती । अन्नें ऐसीं. ॥ ८१९ ॥ शेषाचीं मुखें दशशत । विषाचा अग्नि त्यांतूनि अत्यंत । निघेल तो स्वर्गपर्यंत । करील भस्म. ॥८२०॥ मानवी शत वर्षेंपर्यंत । ऐसें अवर्षण होतां अत्यंत । त्यावरी वर्षती वर्षें शत । प्रलयमेघ दिनरात्री. ॥ ८२१ ॥ हस्तीचे जेंवि शुंडादंड । धारा स्थूळ ऐशा अखंड । मेघ वर्षतां जळ उदंड । आणि समुद्र तेव्हां सर्व लोटती. ॥८२२॥ स्वर्ग मृत्यु पाताळ । तिहीं लोकीं तेव्हां एक जळ । भस्मही नाहीं ऐसें सकळ । लोक तिन्ही विघरती. ॥ ८२३ ॥ महर्लोकापासूनी । वरील लोक प्रतिदिनीं । न जळती न बुडती म्हणोनी । शास्त्र बोले. ॥ ८२४ ॥ तेव्हां जीवोपाधि सकळ । अव्यक्ततत्त्वीं केवळ । तन्मय होती जैसें आटतां जळ । प्रतिबिंबें बिंबीं तैसें ब्रह्मीं जीवांश. ॥ ८२५ ॥ सृष्टि प्रलय ऐसा जगीं । तेचि दिवस आणि रात्री ते योगी । जाणती म्हणूनि बोलणें लागलें यालागीं । सृष्टि आणि प्रलय हा. ॥ ८२६ ॥ ऐसा सृष्टिसंहार । विशद वर्णितां ग्रंथ वाढेल फार । परंतु अर्जुन समजला सविस्तर । महिमा चरणसंनिधानाचा. ॥ ८२७ ॥ विश्वरूपीं श्लोक दुसरा । तेथें अर्जुन बोलेल सर्वेश्वरा । कीं सृष्टिसंहार विस्तारें बरा । म्यां आइकिला तुजपासुनी. ॥ ८२८ ॥ एवं च महत्तत्त्व आदिकरूनी । एक एकापासूनी तत्त्वें उपजोनी । सर्व एकत्र मिळोनी । उद्भवलीं भूतें. ॥ ८२९ ॥ जें ज्यापासूनि जालें । तें प्रलयीं त्यामध्यें मिळालें । प्रलयलक्षण बोलिलें । याप्रकारें. ॥ ८३० ॥ शेवटीं उरे प्रकृती । अव्यक्त तत्त्व तीस म्हणती । तीपासूनी मागुतीं उपजती । त्याची क्रमें व्यक्त तत्त्वें. ॥८३१॥ होतां महाप्रलय । हें अव्यक्ततत्त्वही पावे ब्रह्मीं लय । महासृष्टिकाळीं पुन्हा उदय । होय या अव्यक्तरूपिणी मायेचा. ॥ ८३२ ॥ अव्यक्ताचा लय उदय । न सांगतां दाखवी अभिप्राय । कीं सृष्टिसंहार ऐसा होय । ब्रह्मयाच्या प्रतिदिनीं प्रतिरात्रीं. ॥ ८३३ ॥ मागील हा प्रकार । पुढेंही वारंवार । ऐसेंचि होणार । म्हणूनि म्हणतो या श्लोकीं. ॥ ८३४ ॥

**भूतग्रामः स एवायं भूत्वा भूत्वा प्रलीयते ।**
**रात्र्यागमेऽवशः पार्थ प्रभवत्यहरागमे ॥ १९ ॥**

अगा ! पूर्वीं भूतग्राम नाशला । तोचि हा जो दिसतो तुजला । उद्भव तरंगांस आतां जाला । परि मागील तरंगही हेच. ॥ ८३५ ॥ जें कालचें मृगजळ । तेंचि आजिचें हें केवळ । तैसा तोचि हा भूतांचा मेळ । खेळ त्याच प्रकृतीचा. ॥ ८३६ ॥ तें मृगजळ होत होत । अकस्मात् लयातें असे पावत । उपजे मध्यान्हकाळीं निश्चित । अवश्य लयातें पावे सायान्हीं. ॥ ८३७ ॥ तैसा भूतग्राम हा अत्यंत । वृद्धीतें पावत पावत । अवश्य लयातें असे जात । रात्रि आरंभतां ब्रह्मयाची.॥८३८॥ज्या अव्यक्त तत्त्वापासूनि होय । त्याचिमध्यें पावे लय । हा प्रतिदिन उद्भव प्रलय । प्रवाह ऐसा सर्वदा. ॥ ८३९ ॥ मागुती दिवसाचा आगम । होतां उपजतो हा भूतांचा ग्राम । अनादि मायाप्रवाह नियम । अगा पार्था ! ये रीती. ॥ ८४० ॥ आइकोनि हा उद्भव लय । शंकित जाला धनंजय । कीं सर्वही भगवंत अद्वय । तरी काय हाचि उपजतो नाशतो. ॥ ८४१ ॥ आणि हा तों अविनाशी नित्य । आणि हाचि नश्वर विश्व सर्व हें सत्य । विश्व नाशतां अगत्य । नश्वरत्व लागे यास ही. ॥ ८४२ ॥ ऐसा त्याचा भाव । जाणोनिहि देवाधिदेव । तो पुसे तों स्वयमेव । संशय परिहरितो या श्लोकीं. ॥ ८४३ ॥

**परस्तस्मात्तु भावोऽन्योऽव्यक्तो व्यक्तात्सनातनः ।**
**यः स सर्वेषु भूतेषु नश्यत्सु न विनश्यति ॥ २० ॥**

अगा ! जो भाव म्हणिजे सत्ता । सनातन म्हणिजे ज्यास नित्यता । तो अव्यक्त ज्याला व्यक्तता । कधींच नसे. ॥ ८४४ ॥ अव्यक्त म्हणूनि येथवरी । जें मी बोलिलों तें तरी । मायातत्त्वविकार कारण परी । कारण तेंही अव्यक्त. ॥ ८४५ ॥ त्या मायातत्त्वा अव्यक्ताहुनी । हें वेगळें जें सत्तारूप अव्यक्त म्हणोनी । तुज सांगतों यावरूनी । सत्ताहीन माया अव्यक्तत्व जाण.॥८४६॥ सत्ताहीन अव्यक्त । तें कार्यरूपें होतें व्यक्त । व्यक्त म्हणजे नानाकारें दिसे विभक्त । तें नश्वर कार्यरूप त्या अव्यक्त तत्त्वाचें. ॥ ८४७ ॥ एवं च सत्ताहीन । अभाव त्याचें अभिधान । म्हणूनि भाव शब्द गहन । सत्तावाचक यालागीं. ॥ ८४८ ॥ कारणीं सत्ता नाहीं । तेव्हां कार्यास सत्ता नाहींच कांहीं । ज्यास सत्ता तें न पडे प्रवाहीं । कार्याचिया. ॥ ८४९ ॥ ब्रह्मही कारण मायाप्रवाहाचें । परि माया मिथ्या ब्रह्म साचें । त्यास कार्यरूप होणें कैंचें । रज्जू

जाला कधीं सर्प. ॥ ८९० ॥ यालागीं अव्यक्त सत्ता मात्र चैतन्य । तें सत्ताहीना अव्यक्ततत्त्वाहूनि अन्य । परि सत्तेवांचूनि सत्ताहीन शून्य । कांहींच नसे. ॥ ८९१ ॥ ऐसें जतन होऊनि अद्वैत । नित्या अनित्यास साधे द्वैत । ऐसा चमत्कार भगवंत । बोलतसे या प्रसंगीं. ॥ ८९२ ॥ कीं जो भाव सनातन । नश्वरा भूतीं असोन । भूतें नश्वरें पावती निधन । तो सत्तास्वरूप भाव नित्य नासेना. ॥ ८९३ ॥ सत्तास्वरूप तोचि भाव । सत्ताहीन भाग तो अभाव । यांत मायाशब्दार्थ देव । सूचवी टीकाकारातें. ॥ ८९४ ॥ 'मा' म्हणजे नसे । 'या' म्हणजे नसोनि दिसे । न दिसतीच ते तरी ऐसे । विचार तिचे कां होते? ॥ ८९५ ॥ यालागीं जें दिसे । आणि विचारितां न गवसे । त्यास अभाव म्हणती जैसे । अलंकार. ॥ ८९६ ॥ ज्यास सत्ता असे । स्वप्रकाशें स्वयें दिसे । त्यास भाव म्हणावें ऐसे । दृष्टांत सूचवी एथें भगवंत. ॥ ८९७ ॥ कीं भाव जैसें कनक । भाव नाना अलंकारीं एक । हेम असे ते नसती अनेक । अभाव नांव त्या अलंकारांचें. ॥ ८९८ ॥ सुवर्ण भाव तें नित्य । अभाव नग ते अनित्य । सोनें नित्य आणि सत्य । अनित्य असत्य ते अलंकार. ॥ ८९९ ॥ अलंकार नासती सकळ । सोनें त्यांत नासेना निखळ । यालागीं अव्यक्त मानावें केवळ । सुवर्ण तें. ॥ ८६० ॥ आणि त्या सुवर्णीं जे शक्ती । जे पावली या अलंकाराची व्यक्ती । ते स्वयेंचि पावली अभिव्यक्ती । नाना स्वकार्यरूपाची. ॥ ८६१ ॥ कार्यरूपें होतें व्यक्त । परि कारणरूपें तेंही अव्यक्त । एवं अव्यक्त म्हणणें युक्त । सुवर्णास सुवर्णशक्तीसही. ॥ ८६२ ॥ सुवर्णीं शक्ति नसे । तरी सुवर्णत्वचि नासे । अलंकाररूपें जेव्हां दिसे । नासे दुग्धत्व जैसें दधि होतां. ॥ ८६३ ॥ दुधाचें जालें दहीं । दूधपण तेव्हां त्यास नाहीं । अलंकार होऊनिही कांहीं । विकार न घडे सुवर्णातें. ॥ ८६४ ॥ ऐसी चालतां युक्ती । सुवर्णीं सांपडे शक्ती । किरीटकुंडलादि व्यक्ती । विलास कार्यरूपें हे तिचे. ॥ ८६५ ॥ तेही माया म्हणावी ऐसी । कीं सुवर्णांत न दिसे जैसी । नाहीं म्हणावी तरी कैसी । अलंकारसृष्टि होते तीविण. ॥ ८६६ ॥ जें दुग्धाचें दधिपण । तें म्हणावें शक्तिवीण। विकारी निर्विकार सुवर्ण । शक्ती ऐसी दुग्धीं असेना. ॥ ८६७ ॥ ऐसी ब्रह्मीं माया । ते अव्यक्त म्हणावी धनंजया ! । ती अभाव तीपरता भाव जो तया । अव्यक्त सनातन म्हणावें. ॥ ८६८ ॥ जैसें नश्वरा अलंकारीं सुवर्ण । तैसें नश्वरा भूतीं तें पूर्ण । भूतें नाशतां तें आपण । नाश न पावे अलंकार नाशतां सोनें कदापिही. ॥ ८६९ ॥ जैसा हा दृष्टांत । तैसेच अनुभविती संत । तैसिया टीकाकारास भगवंत । तैसे दृष्टांत येथें

सूचवी. ॥ ८७० ॥ जों सुवर्णाची झगमग । दृष्टी दिसेना तों नग । न दिसे तैसें दिसेना जग । जों न दिसे जग नगप्रकाशक सुवर्ण. ॥ ८७१ ॥ तेव्हां सोनेंचि आहे नग । ब्रह्मचि आहे जग । कार्य कारण दोनी प्रसंग । उडती ऐसे. ॥ ८७२ ॥ घट आणि जेंवि माती । कीं सुवर्ण आणि अलंकारजाती । ब्रह्म आणि जग तैसें म्हणती । उपनिषद्भाग. ॥ ८७३ ॥ हे वेदोक्त दृष्टांत । अनुभव जाणती भक्त संत । परि भेदवादी विवादी अत्यंत । ते कोरूनि युक्ति काढिती. ॥ ८७४ ॥ कीं सुवर्ण घडतें मोडतें । ब्रह्मसाम्य त्याला केंवि घडतें । ऐसें म्हणती कीं न म्हणतां उडतें । भेदवाद मत तयांचें. ॥ ८७५ ॥ नाहीं म्हणतां दृष्टांतीं सर्व साम्य । हें तरी केवळ अनुभवगम्य[1] । कमलासारिखे नेत्र रम्य । म्हणतां येतें अंधत्व. ॥ ८७६ ॥ सिंह मारूनियां गजातें । ये परतोन आपल्या स्थळातें । शत्रु जिंकोन नगरातें । राजा पावला या दृष्टांतें. ॥ ८७७ ॥ क्रूरत्व शूरत्व सिंहाचें । दृष्टांतीं साम्य इतकेंचि साचें । सर्व साम्य घडणार कैंचें । दृष्टांत दार्ष्टांतिक दोहींस ? ॥ ८७८ ॥ सिंह गेला आला एकला । राजा सेनेसहित गेला आला । सिंहास पुच्छ राजयाला । पुच्छ नसे. ॥ ८७९ ॥ घडे मोडे सुवर्ण । ब्रह्म अखंड परिपूर्ण । परि जगा नगा असत्यपण अनित्यपण । सत्यत्व नित्यत्व कनकातें. ॥ ८८० ॥ ब्रह्मचि सर्व जग । सोनेंचि सर्वही नग । ब्रह्मत्व सुवर्णत्व दोहींस भंग । नसे दुग्धत्वभंग जैसा दधित्वीं. ॥ ८८१ ॥ आपल्या पाडें न नासे हेम । आपल्या पाडें न नासे ब्रह्म । निर्विकारत्वीं दोन्हीं सम । अनित्यांत नित्यें सम दोन्हीं. ॥ ८८२ ॥ विश्व अलंकार असत्य । ब्रह्म सोनें दोन्ही सत्य । विश्व अलंकार अनित्य । ब्रह्म हेम नित्य हे दोन्ही. ॥८८३॥ आयता घडला सुवर्णाचा नग । तैसें ब्रह्मीं म्हणतां जग । अद्वैताचा मानूनि उबग । कां पूर्वदशा स्मरावी सुवर्णाची. ॥ ८८४ ॥ गोड जैसा गूळ । तैसेंचि गोड हें केळ । ऐसें बोलती सकळ । विरुद्ध सर्वथा म्हणवेना. ॥ ८८५ ॥ पूर्वदशा स्मरावी गुळाची । मग गूळसमता केळास कैंची ? । ऊंस रस पाक पिळणी क्रिया साची । गुळाची नये केळातें. ॥ ८८६ ॥ हें विरुद्धत्व जैसें । कनक घडमोडीचें तैसें । अत एव सर्व शास्त्रें बोलती ऐसें । नाहीं दृष्टांतें सर्व साम्य म्हणोनी. ॥ ८८७ ॥ घडमोडी पूर्वदशा सुवर्णाची । ऊंस रस पिळणी पाक पूर्वदशा गुळाची । हें केळास नसोनि उपमा साची । केळ गुळाची पावतें. ॥ ८८८ ॥ घडमोडी नसे ब्रह्मीं । घडमोडी असे हेमीं । तथापि उपमा

---

१. अनुभवानें समजतें.

निगमीं । हे प्रसिद्ध. ॥ ८८९ ॥ अरे! आम्हांस सहाय वेद । कीं सहाय वेद-वक्ता गोविंद । अनुभवगम्यही अभेद । संहारी प्रत्यक्ष भेदास तुमचिया. ॥ ८९० ॥ जे अनुभवाचे अधिकारी । ते आशंका हे घेऊनि बरी । गोष्टी येथवरी येतां शिरीं । धरिती अनुभवाहुनि पूर्वींही. ॥ ८९१ ॥ तुम्हीं होवूनिही निरुत्तर । सोडणार न व्हा करकर । कीं पित्तातुरास साकर । कडू लागे. ॥ ८९२ ॥ चंद्र नावडे तस्करा । प्रिय अत्यंत जो चकोरा । सूर्य पक्षिया रजनीचरा । दिसेचि ना. ॥ ८९३ ॥ असो ते प्रस्तुतीं संदेह । हरतां पार्थ निःसंदेह । जग नश्वर तेव्हां ब्रह्म नश्वर हा मोह । पळे रज्जू कळतां सर्प जैसा. ॥ ८९४ ॥ नश्वरीं असोनि नव्हे नश्वर । तो सत्तास्वरूपभाव ऐसें सर्वेश्वर । वर्णूनि त्याचे ठायीं आदर । श्रोत्यास उपजवितो या श्लोकें. ॥ ८९५ ॥

**अव्यक्तोऽक्षर इत्युक्तस्तमाहुः परमां गतिम् ।**
**यं प्राप्य न निवर्तंते तद्धाम परमं मम ॥ २१ ॥**

अगा! सत्तास्वरूप भाव । जो पूर्वश्लोकीं मी देवाधिदेव । तुज बोलिलों त्याचा प्रभाव । आईक पार्था! ॥ ८९६ ॥ या भावें म्हणे सर्वेश्वर । कीं तो भाव अव्यक्त अक्षर । म्हणूनि वेदांतवेत्ते चतुर । बोलती. ॥ ८९७ ॥ व्यक्ति नाहींच जया । अव्यक्त म्हणावें तया । व्यक्ति तितकिया माया । तेही माया त्यावेगळी असेना. ॥ ८९८ ॥ म्हणूनि सर्वही तो । वेदीं वेदांतीं बोलिजेतो । युक्ति अनुभवेंही दिसतो । अव्यक्तभाव तोचि सर्व. ॥ ८९९ ॥ परि पाहतां मागुती । यथास्थित त्याची स्थिती । अव्यक्त म्हणावें ये रीती । कीं तो सत्ताच आकार विकार मायेचे. ॥ ९०० ॥ तो तीहूनि जेव्हां परता । मायेच्या कार्य-रूपास येते क्षरता । यालागीं तो अक्षरही तत्त्वता । वेदीं वेदांतीं बोलिला. ॥ ९०१ ॥ इति म्हणजे याप्रकारें । अव्यक्त अक्षर या विचारें । तो बोलिजेतो निर्धारें । वेदीं आणि वेदांतीं. ॥ ९०२ ॥ आणि कैवल्य परम गती । ते तोचि जो भाव सत्तामात्र बोलती । कीं पावोनि कोण्ही न परतती । त्या सत्ता-स्वरूप भावातें. ॥ ९०३ ॥ गति उदंडा असती । परि तेथूनि मागुती पर-तती । म्हणूनि हे परमागती । न परतती पावोनि ज्या गतीतें. ॥ ९०४ ॥ जेथूनि कोण्ही न परतती । मुक्ति म्हणावी ते गती । ते चतुर्विध चतुर्विधांतही होती । प्रकार दोन्ही. ॥ ९०५ ॥ कीं सायुज्यमोक्ष तो निर्गुण । सामीप्य सारूप्य सालोक्य सगुण । इतर गति स्थळें त्रिगुण । पुनरावृत्ति यालागीं.

---

१. घुबडास.

॥ ९०६ ॥ त्यांत तिसरिया चरणपर्यंत । निर्गुणमोक्ष बोलिला भगवंत । चतुर्थ चरणीं अनंत । सगुण मोक्षही तोचि भाव ऐसें बोलतो. ॥ ९०७ ॥

चतुर्थचरण—**'तद्धाम परमं मम'**।

अगा! माझें धाम । धाम म्हणिजे गृह वैकुंठ परम । तेंही तेंचि सत्तामात्र निर्गुण ब्रह्म । कीं इतर प्रलय जेथें असेना. ॥ ९०८ ॥ कीं जेथें रज तम । तेथें न स्फुरे सत्तामात्र निर्गुण ब्रह्म । शुद्ध सत्त्वें तेंचि परम । स्फुरे यालागीं तेंचि तें. ॥ ९०९ ॥ धामशब्दें घर । वैकुंठ शुद्ध सत्त्वाकार । तें सत्त्व आणि अव्यक्त अक्षर । न स्फुरती जेथें भिन्नत्वें. ॥ ९१० ॥ यालागीं तेंचि आपलें धाम । वैकुंठनगराकार परम । जैसें त्रिगुण अविद्यारचित स्थावर जंगम । धाम तैसें नव्हे तें माझें. ॥ ९११ ॥ आब्रह्मभुवन लोक । तेथें पुनरावृत्तीचा असे शोक । मातें पावोनि कोण्ही एक । न परते ऐसें मागें बोलिला. ॥ ९१२ ॥ आणि मीच वैकुंठलोक । या भावें त्या श्लोकीं उत्तमश्लोक । बोलिला कीं मातें पावोनि तो कोणी एक । पुनर्जन्म नाहीं पावला. ॥ ९१३ ॥ तेंचि येथें स्पष्टतर । बोलतसे सर्वेश्वर । कीं जें अव्यक्त अक्षर । माझें परम धाम तें तेंचि. ॥ ९१४ ॥ कीं मीच तें अव्यक्त अक्षर । तें अव्यक्त अक्षरचि माझें घर । तेव्हां त्यातें जे पावले नर । ते मातेंचि पावले. ॥ ९१५ ॥ मोक्ष बोलोनि निर्गुण । त्यापुढेंचि बोलतो मोक्ष सगुण । हे येथें दावूनि खूण । स्पष्ट चतुर्दशीं बोलेल. ॥ ९१६ ॥ **'परं भूयः प्रवक्ष्यामि'** । या श्लोकीं मुमुक्षूचा स्वामी । या ज्ञानें मोक्ष निर्गुण ब्रह्मीं । सर्वही मुनि पावले म्हणेल. ॥ ९१७ ॥ **'इदं ज्ञानमुपाश्रित्य'** या श्लोकीं । सगुण मोक्ष बोलेल कीं । माझें साधर्म्य वैकुंठलोकीं । याचि ज्ञानें पावले. ॥ ९१८ ॥ ते सृष्टिकाळीं न जन्मती । ते प्रळयीं व्यथेतें न पावती । तेंचि या मोक्षप्रकरणीं श्रीपती । द्विविध मोक्षही बोलतो. ॥ ९१९ ॥ अर्थ ऐसा असोनी । जे अभक्त निर्गुण ज्ञानी । ते सगुणाचें धाम निर्गुण म्हणोनी । **'तद्धाम परमं मम'** वाखाणिती. ॥ ९२० ॥ पुढिलिया श्लोकेंकरूनी । तो पुरुष अनन्यभक्तिलभ्य म्हणोनी । बोलेल त्यावरूनी । समाधान याही शंकेचें होणार. ॥ ९२१ ॥ आतां सगुण टाकूनि निर्गुण एक । उपासिती अभक्त निर्गुणोपासक । त्यांस वैकुंठ नसे हें वैकुंठनायक । त्या पुढिलिया श्लोकीं बोलेल. ॥ ९२२ ॥ आणि सगुण भक्त ज्ञानहीन । तेही न पावती कीं विना ज्ञान । मोक्ष नसे जे ज्ञानी भक्तजन । तेचि पावती म्हणतसे या श्लोकीं. ॥ ९२३ ॥

**पुरुषः स परः पार्थ भक्त्या लभ्यस्त्वनन्यया ।**

अगा ! जो वसे त्या वैकुंठपुरीं । तो पुरुष म्हणावा यापरी । ज्ञानियास वास वैकुंठनगरीं । त्याज्या अनन्य भक्तीनें. ॥ ९२४ ॥ या भावें म्हणे पार्था! आइक । जो वैकुंठ वैकुंठनायक । जो वैकुंठपुरवासी वैकुंठदायक । लभ्य तो पुरुष तो अनन्य भक्तीच करूनी. ॥ ९२५ ॥ अन्य नव्हे आपला आत्मा । तोचि अपरोक्ष होतां परमात्मा । जे आत्मत्वप्रीति परमा । तेचि परमात्मयाची होतसे. ॥ ९२६ ॥ बृहदारण्य उपनिषद्भागीं । याज्ञवल्क्य मैत्रेयी स्वस्त्रियेलागीं । आत्मत्व उपदेशी महायोगी । भक्तियोगेंचि करूनी. ॥ ९२७ ॥ कीं भ्रतारास बाईल । स्वनिमित्तचि प्रिय होईल । सुत धन वित्त सकळ । आवडे ज्या आत्मयाच कारणें. ॥ ९२८ ॥ तो आत्मा जाणावा । तो श्रवण मनन निदिध्यासें पहावा । एवं पावणें सर्वात्मभावा । याच आवडी करूनी. ॥ ९२९ ॥ प्रिय आत्मा सर्वांहुनी । तो सर्व तोचि आत्मा म्हणोनी । उपासिती भक्त जे ज्ञानी । मानूनि तेंचि सर्व गुणत्व. ॥ ९३० ॥ त्या आत्मप्रीतीनें तें सगुण । अनन्यत्वें भजतां तेंचि निर्गुण । ऐसे जे ज्ञानी भक्त निपुण । वैकुंठपुरपति पुरुष लभ्य त्यातेंचि. ॥ ९३१ ॥ पूर्वं श्लोकीं **'तद्धाम परमं मम'** । म्हणतां सुचविलें वैकुंठ धाम । येथें म्हणे पुरुषोत्तम । तो पुरुष अनन्यभक्तिलभ्य म्हणोनी. ॥ ९३२ ॥ वैकुंठीं मुक्ति सगुण । मुक्ति तेही नसे ज्ञानाविण । चतुर्दशीं बोलेल हे खूण । **'इदं ज्ञानमुपाश्रित्य'** या श्लोकीं. ॥ ९३३ ॥ ज्ञान ज्यास भक्तीवांचूनी । निर्गुण मोक्ष पावती ते ज्ञानी । ज्ञानें आणि भक्तीकरूनी । वैकुंठ लभ्य. ॥ ९३४ ॥ सगुणीं ज्ञानियां भक्ती । ते अनन्य भक्ती दे सगुण मुक्ती । त्या सगुण मुक्तीची अभिव्यक्ती । वैकुंठ लोकीं मग नित्य. ॥ ९३५ ॥ यालागीं **'तद्धाम परमं मम'** । ऐसें पूर्वश्लोकीं वैकुंठधाम । स्वस्वरूप बोलोनि येथें पुरुषोत्तम । अनन्यभक्तिलभ्य म्हणतसे तो पुरुष. ॥ ९३६ ॥ भक्तिशब्द गीतेंत जेथें । सगुणोपासना सिद्ध तेथें । म्हणूनि म्हणे भगवंत येथें । **'भक्त्या लभ्यः'** म्हणोनि. ॥ ९३७ ॥ तथापि भक्ति जे ज्ञानावांचूनी । मुक्ति नव्हे ते भक्तीकरूनी । अनन्यपद येथें म्हणोनी । भक्तिशब्दीं योजिलें. ॥ ९३८ ॥ आतां अनन्य भक्तीकरूनी । निर्गुणोपासकचि पावती म्हणोनी । म्हणतां सगुणभजनावांचुनी । भक्त न म्हणवे तयांतें. ॥ ९३९ ॥ कीं भक्तीची खूण । जे ते नेणे निर्गुण निर्धर्मपण। त्याच्या भक्तीनें कवण । फलप्राप्ती ? ॥ ९४० ॥ मागें चतुर्थी हा विचार । जाला, पुढेंही होणार, । चित्तचि करणें निर्गुणाकार । भक्ति करणें साक्षिया

सगुणाची. ॥ ९४१ ॥ ज्ञान ज्याचें तो निर्गुण । भक्ति ज्याची तो सगुण । ऐसा भगवदुपदेशें होऊनि निपुण । द्वादशीं अर्जुन ऐसें बोलेल. ॥ ९४२ ॥

द्वादशाध्यायश्लोक—**एवं सततयुक्ता ये भक्तास्त्वां पर्युपासते ।**
**ये चाप्यक्षरमव्यक्तं तेषां के योगवित्तमाः ॥**

ऐसे सर्वदा युक्त । जे तूतें उपासिती भक्त । आणि जे उपासिती अक्षर अव्यक्त । यांत कोण अधिक योगवेत्ते तें सांग. ॥ ९४३ ॥ एवं च उपासिती अव्यक्त अक्षर । अर्जुन भक्त न म्हणे ते नर । जे सगुणभजनीं तत्पर । भक्त तेचि. ॥ ९४४ ॥ हे आलीकडील अध्याय । येथें संकेत हे धनंजय । समजूनि करूनि निश्चय । भक्त ते सगुण भक्तचि म्हणतसे. ॥ ९४५ ॥ कीं भक्ताची भक्ति जैसी । प्रीति देवाची त्यावरी तैसी । सप्तमीं स्पष्ट रीति ऐसी । बोलिली आणि चतुर्थी **'ये यथा मां'** या श्लोकीं. ॥ ९४६ ॥ सप्तमीं म्हणे भगवंत । कीं प्रिय ज्ञानिया भक्तास मी अनंत । आणि तोही प्रिय मज अत्यंत । म्हणे **'प्रियो हि ज्ञानिनोऽत्यर्थमहं'** या अर्धी[1]. ॥९४७॥ निर्गुणीं भक्ति तरी घडती । कीं परस्पर प्रीति जरी दिसती । एवं च निर्गुणध्यान सगुणीं प्रीती । प्रस्तुतीं प्राप्ति सगुणाची बोलिली अनन्यभक्तीनें. ॥९४८॥ कीं येथें भक्तीच करूनी । लभ्य तो पुरुष म्हणोनी । श्रीकृष्ण म्हणे यावरूनी । तो पूर्वश्लोकोक्त सगुणचि लेखावा. ॥ ९४९ ॥ तो तरी अव्यक्त अक्षर । म्हणूनि म्हणे सर्वेश्वर । उगाच अर्थ त्याचा करावा सगुणपर । तरी माझें धाम जो पूर्वश्लोकीं म्हणतो तो श्रीकृष्णही सगुण. ॥ ९५० ॥ तेव्हां सगुण सगुणाचें धाम । तें म्हणावें वैकुंठचि परम । जरी अव्यक्त अक्षर निर्गुण ब्रह्म । तरी भक्तिलभ्य तो न म्हणवे. ॥ ९५१ ॥ **'ये यथा मां प्रपद्यंते'** या श्लोकेंकरूनी । **'तांस्तथैव भजाम्यहं'** म्हणोनी । कृष्ण म्हणे यावरूनी । निर्धर्म भक्तीनें फलप्रद सगुणही होईना. ॥ ९५२ ॥ आतां भक्तीनें ज्ञान होतें म्हणोनी । लभ्य तो पुरुष भक्तीकरूनी । म्हणावें तरी प्रकरणावरूनी । अर्थ बोलावा. ॥ ९५३ ॥ ज्ञानप्राप्तिप्रकरणीं । योजेल तैसी गोविंदवाणी । ज्ञानिया भक्तास भक्तपणीं । मुक्ति येथें बोलतो. ॥ ९५४ ॥ भक्ति न फळे निर्गुणीं । आणि ते भक्ति पावेना सगुणीं । एवं भक्ति म्हणतां काहणी । नव्हे निर्गुणाची आणि प्रसंग मुक्तीचा. ॥ ९५५ ॥ कीं त्यास म्हणती परमागती । ज्यास पावोनियां न परतती । तो भक्तीनें लभ्य

1. श्लोकार्धांत.

म्हणे श्रीपती । प्रसंगचि मुक्तिप्राप्तीचा. ॥ ९५६ ॥ एवं तो पुरुष भक्तीकरूनी । लभ्य म्हणतां यावरूनी । **'तद्धाम परमं मम'** म्हणोनी । वैकुंठचि वर्णिलें हें स्पष्ट. ॥ ९५७ ॥ आतां अनन्यभक्तीकरूनी । बोलिला तो लभ्य म्हणोनी । तें अनन्यत्वचि स्वमुखेंकरूनी । उत्तरार्धें विशद बोलतो. ॥ ९५८ ॥

**यस्यांतःस्थानि भूतानि येन सर्वमिदं ततम् ॥ २२ ॥**

अगा! तो पुरुष असता अन्य । तरी भक्ति न घडती अनन्य । अनन्य भक्ती करिती धन्य । कीं तो अनन्य म्हणोनी. ॥ ९५९ ॥ तरंग जैसे सागरीं । ऐसीं भूतें ज्या अंतरीं । तरंग सागरें व्यापिले यापरी । ज्याणें व्यापिलें हें सर्व. ॥ ९६० ॥ ऐसा अनन्यत्वें भजती । सुलभ त्यांस तो वैकुंठपती । आत्मत्वें पूर्वोक्त रीती । ध्याती जयातें. ॥ ९६१ ॥ भृंगकीटकन्यायें करूनी । ध्येयचि होती जीवंत असोनी । देह पडतां तद्रूप होउनी । त्यास पावती नवल काय? ॥ ९६२ ॥ जों विश्वात्मत्व न कळे मना । तों आत्मत्वें ध्यान बाणेना । विश्वात्मत्वें जाणोनि जगज्जीवना । आत्मत्वें ध्यातां तोचि तें. ॥ ९६३ ॥ ऐसें मोक्षप्रकरण । प्रसंगें अन्या गतीचेंही विवरण । करितो जगद्वंद्यचरण[1] । कीं त्यांत पुनरावृत्ति कळाव्या. ॥ ९६४ ॥ त्या गति पुनरावृत्ती । आणि मोक्ष पावले ते न परतती । त्या मोक्षांत दोन रीती । एक निर्गुण सगुण एक. ॥ ९६५ ॥ ज्ञानावांचूनि मोक्ष न घडे । त्यांत सगुणमोक्ष लागला भक्तांकडे । निर्गुणोपासकां निर्गुण आवडे । त्यांस निर्गुण मोक्ष कैवल्य. ॥ ९६६ ॥ त्या निर्गुणमोक्षीं भिन्न रीती । यद्यपि कोणासही नसती । परी प्राप्ति त्यांची बोलती । एक सद्य एक क्रमें करूनी. ॥ ९६७ ॥ ज्ञानयोगींच ज्यांचा श्रम । ते देह पडतांचि पावती ब्रह्म । जे हठयोगीं मांडिती आक्रम । क्रममुक्ती बोलिली तयांसी. ॥ ९६८ ॥ कीं हठयोगाकडे भरले । ज्ञानी अपक्व होऊनि उरले । ते ब्रह्मलोकास अनुसरले । ब्रह्मरंध्र भेदूनी. ॥ ९६९ ॥ त्यांचा बोलतां श्रमप्रसंग । झणी सभय होय अर्जुनाचें अंतरंग । म्हणूनि **'अनन्यचेताः'** या श्लोकीं श्रीरंग । भक्तांस सुलभ आपण ऐसें बोलिला. ॥ ९७० ॥ सुलभ होऊनि अत्यंत । सुख जें देतो त्यास नाहीं अंत । म्हणूनि **'मामुपेत्य'** या श्लोकें अनंत । अपुनरावृत्ति[2] आपली प्राप्ति बोलिला. ॥ ९७१ ॥ ज्या हठयोगियांच्या कष्टावरूनी । भक्तांस अनायासें लभ्य म्हणोनी । बोलिला ते हठयोगीही ब्रह्मलोक पावोनी । कैवल्य अपुनरावृत्तीच पावती. ॥ ९७२ ॥

---

१ ज्याचे चरण जगाला वंद्य. २ पुनर्जन्म नाहीं अशी.

गति भक्तांची न पावले । तरी निर्गुणोपासकांसमान आले । म्हणूनि **'आब्रह्म-भुवनाल्लोकाः'** हा श्लोक बोले । त्या श्लोकापुढेंचि उत्तमश्लोक. ॥ ९७३ ॥ कीं हठयोगी ब्रह्मलोकाप्रती । डोई फोडोनि घेऊनि जाती । परि तेथें इतर पावले ते [१]च्यवती । कीं ब्रह्मादि सर्व देवतास्थानें ऐसींच. ॥ ९७४ ॥ बरें ज्या ब्रह्मलोकातें पावले । तेथूनि इतर जरी च्यवले । हे तों महाप्रलयपर्यंत राहिले । तेव्हां तरी पावलेच कैवल्य. ॥ ९७५ ॥ म्हणूनि मागुतीं निर्गुणोपासकांसमान । त्यातें ज्ञणी मानील अर्जुन । यद्यपि या प्रसंगींच्या हठयोगियांसही ज्ञान । तरी अपक्वमोक्ष बहु विलंबेंकरूनी. ॥ ९७६ ॥ म्हणूनि ब्रह्मयाचा दिवस । लांबच लांब क्रमणें तयांस । लांबच लांब रात्रीही जयांस । क्रमणें मोक्षेच्छें-करूनी. ॥ ९७७ ॥ एक अमृतपान करिती । एक त्याकारणें लाळ घोंटिती । बहुता विलंबें तेही पिती । तरी बहु उणें त्याहूनी. ॥ ९७८ ॥ या भावें ब्रह्मयाच्या दिनराती । सहस्रयुगपर्यंत या श्लोकें श्रीपती । वर्णी तेथें खुणावी अर्जुनाप्रती । कीं **'तेऽहोरात्रविदो जनाः'** म्हणोनी ॥ ९७९ ॥ तों ब्रह्मयाचें अहोरात्र कैसें । ते जाणती म्हणूनि अर्जुन पुसे जों ऐसें । **'अव्यक्ताद्व्यक्तयः'** या श्लोकें जगन्निवासें । केलें त्याचें समाधान. ॥ ९८० ॥ त्या प्रसंगें उत्तमश्लोकें । **'भूतग्रामः स एवायं'** या श्लोकें । सांगितलें अर्जुनास इतुकें । कीं तोच हा ग्राम भूतांचा. ॥ ९८१ ॥ प्रतिदिनीं प्रकृतीपासूनि उपजतो । प्रतिरात्रीं तीमाजीं लय पावतो । परि हठयोगियाचा प्रसंग तो । तुटला नाहीं ॥ ९८२ ॥ या प्रसंगें भूतें नश्वर । परि भूतात्मा अविनाशी अक्षर । ऐसें बोलिला सर्वेश्वर । परि प्रसंग त्याच हठयोगियाचा. ॥ ९८३ ॥ कीं तदर्थ ब्रह्मयाच्या दिनराती । सांगतां भूतें उपजती नाशती । त्या प्रसंगें म्हणे जगत्पती । कीं भूतें क्षरें तो अक्षर. ॥ ९८४ ॥ म्हणूनि अव्यक्ताक्षर । या पूर्वश्लोकीं सर्वेश्वर । त्याच्या ठायीं उपजवी आदर । कीं तोचि परमगती तोचि धाम माझें. ॥ ९८५ ॥ या श्लोकीं अनन्यभक्तीकरूनी । तो पुरुषलभ्य म्हणोनी । बोलिला स्वमुखें करूनी । परि प्रसंग त्याच हठयोगियाचा. ॥ ९८६ ॥ आतां ब्रह्मलोकास जाती । ते म्हणावी उत्तरायणगती । कीं ते उत्तरायणकाळही अपेक्षिती । त्या काळीं भेदिती ब्रह्मरंध्र. ॥ ९८७ ॥ अपक्व तरी ज्ञानी । आणि उत्तरायणीं ब्रह्मरंध्र भेदूनी । जाती ते न परतती पावोनी । ब्रह्मलोक तो ॥ ९८८ ॥

---

१ चलन पावतात.

न सांपडे उत्तरायण । आणि त्याकाळीं दक्षिणायन । तरी योगी परतती हें जगज्जीवन । येथूनि पुढें बोलेल. ॥ ९८९ ॥ परि हठयोगियांचें प्रकरण । बोलतां मध्यें आलें ऐसें विवरण । म्हणूनि जगद्वंद्यचरण । प्रसंगें अनुसंधान लावितो या श्लोकीं. ॥ ९९० ॥

**यत्र काले त्वनावृत्तिमावृत्तिं चैव योगिनः ।**
**प्रयाता यांति तं कालं वक्ष्यामि भरतर्षभ ॥ २३ ॥**

'यत्र' म्हणजे ज्या मार्गीं । 'काले' म्हणजे ज्या काळीं ते योगी । गेले ते जाती अपुनरावृत्तिलागीं । म्हणूनि त्या मार्गातें त्या काळातें सांगेन. ॥ ९९१ ॥ आणि ज्या मार्गीं ज्या काळीं योगी । गेले ते जाती पुनरावृत्तीलागीं । तो मार्ग तो काळही यथाविभागीं । सांगेन तुज. ॥ ९९२ ॥ एथें भरतर्षभा म्हणूनी । अर्जुनातें या नांवेंकरूनी । आळवी हृदयीं धरूनी । गूढभाव. ॥ ९९३ ॥ कीं सोमदत्ताचा पुत्र । बाल्हीकाचा पौत्र । तोही भरतकुलोत्पन्न पवित्र । युद्धीं हठयोगें शरीर सोडील. ॥ ९९४ ॥ द्रोणपर्वीं जयद्रथवधीं । सात्यकी अर्जुनातें व्यूहांत शोधी । त्याशीं भूरिश्रवा भांडे तधीं । छेदील बाहु त्याचा अर्जुन ॥९९५॥ त्याणें ऐसा उचलिला कर । त्या घायें तुटे सात्यकीचें शिर । तों दुरूनि अर्जुनें हाणोनि शर । बाहूच त्याचा उडविला. ॥ ९९६ ॥ बाहू गेलियावरी । तो रणींच बाण पसरी । बैसोनि त्या आसनावरी । जाय ब्रह्मरंध्र भेदूनी. ॥ ९९७ ॥ त्यास देखोनि नयनीं । अर्जुन हा प्रसंग स्मरेल मनीं । तेव्हां भक्त थोर हठयोगियाहुनी । तेंही स्मरेल. ॥ ९९८ ॥ हे खूण अर्जुनातें एथें न बाणे । परि भविष्य भगवंत जाणे । त्या भावेंकरूनि म्हणे । अगा भरतर्षभा म्हणोनी. ॥९९९॥ श्लोकार्थ एतत्प्रकार । परि एथें इतर टीकाकार । 'यत्र'शब्द 'काळ'शब्द यांचा अर्थविचार । वेगळा न करिती. ॥१०००॥ एथेंचि वाट चुकती । पुढें भोंवों लागती । मग जैसी तैसी गती । कल्पिती पुढिल्या श्लोकांची. ॥ १००१ ॥ एथें म्हणे सांगतों काळ । आणि पुढें बोलेल जंजाळ । अग्निज्योती ज्वाळ । आणि धूमादिकें मार्गीं दुसरिया. ॥ १००२ ॥ आणि पूर्वानुसंधानप्रसंग । मागील हठयोगियाचा योग । त्यातें ब्रह्मलोकीं क्रममुक्तियोग । हें कांहींच न सुचे तयांसी. ॥ १००३ ॥ सद्यमुक्ती ज्यांला । त्यांचा हा प्रसंग वाटे त्यांला । तेव्हां उत्तरायणच ज्ञानियांला । अगत्य नसे हें श्रुतिसिद्ध. ॥ १००४ ॥ आणि या शुक्लकृष्णगती । सांगोनि त्यापुढें श्रीपती । म्हणेल कीं 'नैते सृती । पार्थ जानन्योगी मुह्यति कश्चन. ॥ १००५ ॥ कीं पार्था! या गती । जाणोनि योगी न मोहती । तरी तूं अगा

महामती । होईं योगयुक्त सर्वदा. ॥ १००६ ॥ एवं च सद्य मोक्षातें पावती । त्यांचा प्रसंग न वदे हा **श्री**पती । ऐसें पूर्वापर न पाहती । आणि सगट वाखाणिती हे **गी**ता. ॥ १००७ ॥ असो तें पुढें वाईट बरें । अववेंचि कळेल खोटें खरें । परंतु निर्मत्सरीं आदरें । पाहावा अर्थ. ॥ १००८ ॥ जैसें बोलतो **च**क्रपाणी । तदनुरूपचि त्याची वर्णिजेल वाणी । ते सोडोनि कल्पित काहाणी । बोलती त्यांची भीड काय? ॥ १००९ ॥ पुढें काळ आणि मार्ग । दोन्ही वर्णील **श्री**रंग । तो सांगेन म्हणतो प्रसंग । 'यत्र' आणि 'काळ' म्हणूनि या दों शब्दीं. ॥ १०१० ॥ **'यत्र प्रयाता गच्छंति'** । आणि **'यत्र काले प्रयाता'** ऐसे रीती । 'यत्र'शब्दाचे अन्वय ऐसें सूचविती । मार्ग आणि काळ दोहींतें. ॥ १०११ ॥ **'न तद्भासयते सूर्यो'** या श्लोकांत । **'भासयते'** हा शब्द सूर्याजवळीच **भ**गवंत । बोले परि **श**शांक**पा**वकपर्यंत । तिहीं ठायीं दावी **'भासयते'** योजावें ये रीती. ॥ १०१२ ॥ ये रीती दोहींकडे । 'यत्र'-शब्दाचा अन्वय घडे । तरी यथास्थित अर्थ सांपडे । पुढिलिया श्लोकांचा. ॥ १०१३ ॥ आणि ब्रह्मलोकास जाऊनि मुक्ति । पावती म्हणतां साधे **भ**गवंताची उक्ती । उत्तरायणीं अपुनरावृत्ती । त्या हठयोगियास. ॥ १०१४ ॥ आतां काळ उत्तरायण । तेव्हां जातां मार्गीं कोण कोण । देवता भेटती हें **ना**रायण । **न**रास सांगतो या श्लोकीं. ॥ १०१५ ॥

**अग्निर्ज्योतिरहः शुक्लः षण्मासा उत्तरायणम् ।**

उत्तरायणीं ब्रह्मरंध्र फुटे । तो योगी ब्रह्मलोकास जातां वाटे । त्यास मूर्तिमंत अग्नि भेटे । आणि ज्योतिर्देवता मूर्तिमंत. ॥ १०१६ ॥ या मार्गांच्याच देवता । अग्नि ज्योति दोघी मूर्तिमंता । एथूनि काळ देवता आतां । अहः शुक्ल इत्यादि. ॥ १०१७ ॥ उत्तरायण सामास । तो देवतांचा एक दिवस । म्हणूनि वाटेस भेटे त्यास । मूर्तिमंत दिवसही. ॥ १०१८ ॥ ऐशा देवांचिया प्रतिदिनीं । ब्रह्मलोकमार्ग मोकळा होतो म्हणोनी । जो जातो ब्रह्मरंध्र भेदूनी । त्यास त्या देवता पावविती ब्रह्मलोका. ॥ १०१९ ॥ या मार्गीं देवता जित्तकिया । प्रकाशरूपा तितकिया । अग्नि ज्योति दिवस इतकिया । प्रकाशरूपा प्रत्यक्ष. ॥ १०२० ॥ तैसाच शुक्लपक्ष । मूर्तिमंत त्या मार्गीं त्यास होय प्रत्यक्ष । जो उत्तरायणीं जातो दक्ष । ब्रह्मरंध्र भेदूनियां. ॥ १०२१ ॥ तैसेंच मकरसंक्रांतीपासूनि मिथुनपर्यंत । सौरमास साहा प्रकाशवंत । देवांचिया दिवसाचे भाग अत्यंत । प्रकाशरूप मूर्तिमंत ते साही. ॥ १०२२ ॥ तैसाच उत्तरायण-

काळ । देवांचा दिवस मूर्तिमंत अति उज्ज्वळ । ब्रह्मभवन विशाळ । पावविती तेथें योगिया तयातें. ॥ १०२३ ॥ उत्तरायणचि साहामास । उत्तरायणचि देवांचा दिवस । परि उत्तरायणकाळ मानवांस । म्हणूनि वेगळालीं तद्रूपें. ॥ १०२४ ॥ दिवसा मार्ग वाहती । देव उत्तरायणीं ये रीती । आपल्या दिवसांत पावविती । ब्रह्मलोकीं योगियास. ॥ १०२५ ॥ एवं ब्रह्मलोकास तो पावला । जो उत्तरायणीं योगी ज्ञानी गेला । ब्रह्मया सांगातें त्याला । ब्रह्मप्राप्तीही. ॥ १०२६ ॥ परंतु या श्लोकीं जरी । ब्रह्म जाणे गुरुमुखें तरी । ब्रह्मयास मोक्ष होते अवसरीं । निर्गुण ब्रह्मसायुज्य तो पावे. १०२७ ॥ हा भाव उत्तरार्धेंकरूनी । दाखवितो स्पष्टही वदूनी । परि तो अपक्क आणि हठयोगी म्हणोनी । उत्तरायण अपेक्षित तयासी. ॥ १०२८ ॥

**तत्र प्रयाता गच्छंति ब्रह्म ब्रह्मविदो जनाः ॥ २४ ॥**

'तत्र' म्हणजे तेथें । मार्गीं देवता या जेथें । आणि 'तत्र'शब्दीं येथें । त्या काळीं हाही अर्थ. ॥ १०२९ ॥ कीं **'तत्र प्रयाता'** म्हणजे त्या मार्गीं गेले । ते ब्रह्मवेत्ते ब्रह्म पावती ऐसें बोले । आणि **'यत्र काले त्वनावृत्तिं'** ऐसें श्लोकीं पहिले । बोलिला म्हणूनि 'तत्र' त्या काळींही म्हणावें. ॥ १०३० ॥ आणि ज्या काळीं न परते म्हणोनी । बोलिला तो काळ उत्तरायण शब्दें करूनी । बोले आणि दैवतें कालाभिमानी । त्या प्रसंगें त्या मार्गींचीं वर्णिलीं. ॥ १०३१ ॥ एवं 'तत्र'शब्दें त्या मार्गीं त्या काळीं । जे गेले म्हणे वनमाळी । ते पावती ब्रह्मीं केवळीं । ब्रह्मवेत्ते जन म्हणोनी. ॥ १०३२ ॥ ऐसे जे ब्रह्मवेत्ते पावती ब्रह्म । म्हणूनि विरोध बोले पुरुषोत्तम । कीं तों विरोध परिहरितां अवगम । व्हावा यथार्थ अर्थाचा. ॥ १०३३ ॥ कीं ब्रह्मवेत्ते याचे प्राण । देहाबाहेर न करिती प्रयाण । ऐसें श्रुति बोलती ब्रह्मनिर्वाण । ब्रह्मज्ञानियाचें. ॥ १०३४ ॥ प्रयाणचि मिथ्या त्याचें । त्यास वाटे देवता भेटणें कैंचें ? । **'तत्र प्रयाता गच्छंति ब्रह्म'** म्हणूनि साचें । भगवद्वचन तों ये रीती. ॥ १०३५ ॥ एवं नव्हे हे सद्यमुक्ती । क्रममुक्तीविषयीं हेच उक्ती । येथें युक्ति प्रयुक्ती । राहिल्या सर्व. ॥ १०३६ ॥ एवं क्रममुक्ति ज्याला । उत्तरायण पाहिजे त्याला । सद्यमुक्तीच्या अधिकारियाला । श्रुति नलगे म्हणती उत्तरायण. ॥ १०३७ ॥ ब्रह्मसूत्र वेदश्रुती । ज्ञानियास उत्तरायण नलगे म्हणती । तरी हे सद्यमुक्तीस आणि जो प्रस्तुतीं । पाहिजे याला उत्तरायण. ॥ १०३८ ॥ तेव्हां **'यत्र काले'** म्हणे चक्रपाणी । ते यथास्थित नव्हे कां भगवद्वाणी ।

अर्थांतराची नसती काहणी । कां मिरवावी? ॥ १०३९ ॥ आणि मागें चौं श्लोकेंकरूनी । **'मूर्ध्न्याधायात्मनः प्राणं'** म्हणोनी । ज्याची गति वर्णिली त्यावरूनी । प्रसंग चालिला येथवरी. ॥ १०४० ॥ तो हठयोगी हें तों खरें । कीं कोंडोनि सर्वही द्वारें । मस्तकास ने वारें । प्राणांचें. ॥ १०४१ ॥ आणि **'तेऽहोरात्रविदो जनाः'** । म्हणूनि पूर्वोक्त तेचि तच्छब्दें सूचवी अर्जुना । तेच उत्तरायण मार्गगमना । अधिकारी कां नव्हती? ॥ १०४२ ॥ कीं सद्य-मोक्ष ज्याला । मस्तकास कां प्राण नेणें लागे त्याला? । कां द्वारें कोंडावीं बोला । त्या पक्कज्ञानियानें? ॥ १०४३ ॥ आणि कां उत्तरायण । त्यांस जे जितांच अनुभविती निर्गुण । आणि संपतां हें प्रकरण । श्रीकृष्णही हेंचि बोलेल. ॥ १०४४ ॥ **'नैते सृती'** या श्लोकेंकरूनी । म्हणे हे दोन्ही मार्ग आइकोनी । योगी न मोहती म्हणोनी । कीं हे दोन्ही मार्ग न लगती पक्कज्ञा-नियां तयांसी. ॥ १०४५ ॥ **'नैते सृती'** याही श्लोकीं । अर्थ सद्यमुक्ती-विषयीं योजिला कीं । परी हा विचार नाहीं सूचला कीं । काळ आणि मार्ग हा कां तयाला? ॥ १०४६ ॥ आणि या श्लोकेंकरूनी । वर्णिले न परतती म्हणोनी । ते ब्रह्मवेत्ते स्वमुखेंकरूनी । श्रीकृष्ण म्हणे. ॥ १०४७ ॥ ब्रह्मशब्दें जरी म्हणावे वेद । तरी जों न कळे ब्रह्मीं अभेद । तोंवरी न तुटे खेद । पुनरावृत्तीचा. ॥ १०४८ ॥ आत्मत्वें ब्रह्म जों कळेना । शब्दज्ञानें पुनरावृत्ती जनां । त्यांस अपुनरावृत्तिगमना[1] । अधिकार कैंचा? ॥ १०४९ ॥ एवं हे ब्रह्मवेत्ते । म्हणावे ब्रह्मजाणते । आणि जे ब्रह्म जाणती ते । प्राण न सोडितां येथेंचि उरती निर्गुणत्वें. ॥ १०५० ॥ आतां अपक्कज्ञानी । या मार्गें गेले म्हणोनी । तरी योगभ्रष्ट येती परतोनी । यांतें अपुनरावृत्ति बोलतो. ॥ १०५१ ॥ एवं अपक्कज्ञानी । आणि ब्रह्मरंध्र भेदूनी । या मार्गें जाती म्हणोनी । नसे पुनरावृत्ति हें बोलिला. ॥ १०५२ ॥ तेव्हां ब्रह्मयासह । मुक्ति हेंही निःसंदेह । कीं सोडोनि जाती देह । ब्रह्मीं न मिळती तत्काळ. ॥ १०५३ ॥ लिंगदेहाचा न जाला ध्वंस । तरी देवतामार्ग बोलिला त्यास । लिंगदेह नसे जयास । काळ मार्ग देवता हे त्यांस कैंचे? ॥ १०५४ ॥ ब्रह्म-प्राप्ति सद्य ज्याला । देह सोडोनि कोठें जाणें घडे त्याला? । क्रममुक्ति बोलता तरी बोला । ब्रह्मलोक. ॥ १०५५ ॥ ऐसा गीतेचा अर्थ । न कळोनि वाखाणिती व्यर्थ. । हठयोगबळें समर्थ । म्हणविती सिद्धि दावूनी. ॥१०५६॥

---

१ पुनर्जन्म नाहींसा होण्यास.

कोणी पुरूनि घेती । कोणी गगनपंथें जाती । नाना चमत्कार दाविती । चेटकी जैसे. ॥ १०५७ ॥ त्यांत कोणी विरळ । ब्रह्मात्मता ओळखती केवळ । ब्रह्मरंध्र भेदूं जाणती कुशळ । त्यांस गति ऐसी बोलिली. ॥ १०५८॥ ब्रह्मरंध्रही भेदूं जाणती । आणि ब्रह्मात्मता नेणती । ते पुन्हा परतती । हें न बोलतां सिद्ध होय. ॥ १०५९ ॥ ऐसी अपक्क ज्ञानिया हठयोगियाची गती । सांगतों कीं तेही दक्षिणायनीं जरी जाती । चंद्रामृत सेवूनि परतती । तो मार्ग बोलतो या श्लोकीं. ॥ १०६० ॥

**धूमो रात्रिस्तथा कृष्णः षण्मासा दक्षिणायनम् ।**
**तत्र चांद्रमसं ज्योतिर्योगी प्राप्य निवर्तते ॥ २५ ॥**

ज्या काळीं ज्या मार्गीं गती । पुनरावृत्तीची योगी पावती । तेही सांगेन तुजप्रती । ऐसें बोलिलों होतों तें आइक. ॥ १०६१ ॥ धूममार्गीं मूर्तिमंत । मूर्तिमंत रात्रि तैसाचि तम अत्यंत । कृष्णपक्ष आणि मकरसंक्रांतीपर्यंत । कर्कसंक्रांतीपासूनि मास सहा. ॥ १०६२ ॥ दक्षिणायन देवांची राती । साहा मास साही भाग तीचे होती । तेही अंधकाररूप असती । कर्कापासूनि धनुर्मासपर्यंत. ॥ १०६३ ॥ मास साही मूर्तिमंत । आणि साही मिळतां तें एक दैवत । कीं देवांची रात्रि आंधारी अत्यंत । दक्षिणायनीं ते भेटे. ॥ १०६४ ॥ दक्षिणायन मार्ग ये रीती । या देवता चंद्रज्योतीस पावविती । दक्षिणायनीं जे जाती । अपक्क ब्रह्मवेत्ते हठयोगी तयातें. ॥ १०६५ ॥ ते उत्तमलोकातें जाउनी । चंद्रज्योतीतें पावोनी । म्हणजे चंद्रकलामृत सेवूनी । देवांत असती. ॥ १०६६ ॥ पावोनि गति ऐसी । होय मागुती गर्भवासी । परतूनि ये हठयोगियासी । पुनरावृत्ति दक्षिणायनीं होतसे. ॥ १०६७॥ येथें बोलिला योगी । तो कर्मयोगी म्हणोनि त्यालागीं । टीकाकार बहुतेक जगीं । वाखाणिती. ॥ १०६८ ॥ मार्ग आणि गती । हीं कर्मयोगियाचींच दिसती । कीं धूमादि मार्ग श्रुती । बोलती कर्मयोगियातेंचि. ॥ १०६९ ॥ तरी योगभ्रष्टलक्षण । षष्ठाध्यायांत कमलेक्षण । बोले तेथें म्हणे आपण । कीं पुण्यकृतांच्या लोकास तो पावतो. ॥ १०७० ॥ **'प्राप्य पुण्यकृतांल्लोकान्'** म्हणोनी । श्रीकृष्ण या श्लोकेंकरूनी । म्हणे पुण्यकर्त्यांच्या लोकातें पावोनी । शुचि श्रीमंतगृहीं जन्मतो. ॥ १०७१ ॥ हाही धूमादि मार्गेंकरूनी । चंद्रज्योतीतें पावोनी । पुन्हा येतो परतोनी । परि ब्रह्मात्मवेत्ता अपक्कयोगी म्हणावा. ॥ १०७२ ॥ कीं कर्मयोगियांस दक्षिणायनीं । पुनरावृत्ति तैसीच उत्तरायणीं । दक्षिणायन विशेष चक्रपाणी । काय येथें वदला म्हणावा. ॥१०७३॥

ज्ञानहीनास अपुनरावृत्ती । कर्मयोगियास जरी उत्तरायणीं असती । तरी दक्षिणायनीं पुनरावृत्ती । उचित दिसती बोलतां. ॥ १०७४ ॥ अमृत विष दोहींचे दोन्ही । गुण सांगतां अमर अमृतें न मरे म्हणोनी । मरणारचि तो मरे विषेंकरूनी । या बोलासारिखा अयोग्य या अर्थी हा बोल. ॥ १०७५ ॥ जो अमृतें होय अमर । तोचि विषें मरे नर । ऐसें सांगेल चतुर । मूर्ख म्हणावा अन्यथा. ॥ १०७६ ॥ अमृतविषाचे गुण । सांगेन म्हणे निपुण । आणि ज्यांची सांगे अमरत्वाची खूण । म्हणे अमृतें तो अमर होय. ॥ १०७७ ॥ जो मरणारचि आपण । तो म्हणे विष भक्षितां पावे मरण । ऐशा गोष्टी जो निपुण । तो न बोले कदापि. ॥ १०७८ ॥ उत्तरायण मार्गें जाती । ते ब्रह्मवेत्ते ब्रह्म पावती । जे ब्रह्मीं येथेंचि मिळती । किमर्थ उत्तरायण हा मार्ग त्यांला. ॥ १०७९ ॥ ते त्या पंथें न जाती । तरी ब्रह्मचि ते पावती । किमर्थ हे उत्तरायणगती । तयांला. ॥ १०८० ॥ तैसेच कर्मयोगी । पुनरावृत्ति आहेच त्यांलागीं । काळ अथवा उभयमार्गविभागीं । गुण काय येथें देखिला.॥१०८१॥ आतां दोघांच्या दोन्ही गती । कळाया कारणें सांगे म्हणावा श्रीपती । तरी दों प्रकारींचे योगी ये रीती । अधिकारी वेगळे न बोले. ॥ १०८२ ॥ जरी अधिकारी वेगळे बोलता । तरी तदनुरूपें अर्थही योजिता । या श्लोकीं तो सकळ गतिदाता । बोलतो इतकेंचि. ॥ १०८३ ॥ कीं ज्या काळीं जातां योगी न परतती । तो सांगेन तुजप्रती । आणि ज्या काळीं जातां परतोनि येती । तोही तूतें सांगेन. ॥ १०८४ ॥ भेद बोले काळाचे । तैसे भेद न दावी योगियाचे । योग्य अर्थ सोडोनि वाचे । अयोग्य अर्थ कां आणावा ? ॥ १०८५ ॥ जे उत्तरायणीं न परतती । तेचि दक्षिणायनीं परतोनि येती । अर्थ वदतां ये रीती । मूळानुरूपचि दिसतो. ॥ १०८६ ॥ जरी दोन्ही काळ न लेखिले । क्लिष्टकल्पेनेनेंचि मार्ग वाखाणिले । तरी जे या मार्गें नाहीं परतले । तेचि परतले त्या मार्गें. ॥ १०८७ ॥ आतां काळ नलगे ज्ञानियास । म्हणूनि मार्गचि बोलावा ब्रह्म पावावयास । तरी जितांचि ब्रह्म जाले तयांस । कां हा मार्ग ? कां या देवता ? ॥ १०८८ ॥ एवं नलगे जेव्हां काळ । मार्ग देवताही फटकाळ । ज्ञानी अपक्क हठयोगी कुशल । तो ब्रह्मलोकास या काळीं या मार्गें जातो हा अर्थ. ॥ १०८९ ॥ अर्थ हाचि अनुकूळ । इतर अर्थ प्रतिकूळ । बलात्कारें टीका आणि मूळ । यासि एकवाक्यता घडेना. ॥ १०९० ॥ ते ब्रह्मवेत्ते परतती । कैसें वदावें म्हणोनि भीति । ज्या ब्रह्मवेत्त्यांस ऐशी गती ।

त्यांस दक्षिणायनीं एक जन्म पुनरावृत्तीही घडों ये. ॥ १०९१ ॥ कीं पक्व-ज्ञानियाचे प्राण । न करितीच कधीं प्रयाण । हें अपक्वयांस हठयोग उत्तरायण । सांपडे तरीच मुक्ति ब्रह्मया सांगातें. ॥ १०९२ ॥ उत्तरायण जया न सांपडे । त्यास पुनरावृत्ति घडे । पूर्वसंस्कारें बुद्धि पडे । पुन्हा ज्ञानमार्गींच. ॥१०९३॥ मग सद्यमुक्ति घडो । अथवा क्रममुक्तींत मागुती पडो । पूर्वसंस्कार नेदी बुडों। मृत्युसंसारसागरीं. ॥ १०९४ ॥ **'नहि कल्याणकृत्कश्चित्'** म्हणोनी । षष्ठाध्यायांत या श्लोकेंकरूनी । कृष्ण ऐसें बोलिला यावरूनी । तो वायां जाय न म्हणावा. ॥ १०९५ ॥ षष्ठाध्यायांत योगभ्रष्ट । तो सद्यमुक्तिमार्गीं जाला भ्रष्ट । हा पूर्वसंस्कारें पुन्हा कष्ट । हठयोगीं करूनि अपुनरावृत्ति साधील. ॥ १०९६ ॥ आतां यापुढें जो श्लोक । तेथें ऐसेंचि बोलेल उत्तमश्लोक । कीं पुन्हा अपुनरावृत्ति लोक । पावेल हा म्हणूनी. ॥ १०९७ ॥ एवं च या श्लोकीं योगी बोलिला । ज्ञानी अपक्व आणि हठयोगी म्हणावें त्याला । जरी दक्षिणायनीं ब्रह्मरंध्र भेदूनि गेला । तरी परतेल हाचि सिद्धांत. ॥ १०९८ ॥ अनादि हे मार्ग दोनी । हें बोलेल या पुढिल्या श्लोकेंकरूनी । तेथेंही अधि-कारी एकचि म्हणोनी । बोलेल तो हा या पुढील श्लोकीं. ॥ १०९९ ॥

**शुक्लकृष्णे गती ह्येते जगतः शाश्वते मते ।**
**एकया यात्यनावृत्तिमन्ययावर्तते पुनः ॥ २६ ॥**

शुक्लकृष्ण दोन्ही गती । शुक्ल उज्ज्वल प्रकाशास म्हणती । उत्तरायण मार्ग अग्नि ज्योती । इत्यादि सर्व तेजोमय ॥ ११०० ॥ कृष्णगतिकाळीं । धूमादि तमोरूप दक्षिणायनकाळीं । या जगास म्हणे वनमाळी । या शाश्वता गति अनादि हा भाव. ॥ ११०१ ॥ या दोनी गति संमत मला । कीं उत्त-रायणीं मोक्षचि ज्ञानियाला । दक्षिणायनीं जरी परतला । तरी जन्मीं दुस-रियातेंचि गति पावेल. ॥ ११०२ ॥ तेंचि उत्तरार्धें बोलतो । कीं एके गतीनें न परतेचि तो । आणि दुसरे गतीनें तो परततो । परि पुन्हा तोही जातो अपुनरावृत्तीतें. ॥ ११०३ ॥ **'अन्ययावर्तते पुनः'** म्हणोनी । या शेवटिल्या 'पुनः'शब्दें करूनी । **'यात्यनावृत्तिं'** या अक्षरांसी योजूनी । श्लोक वाखाणावा हें सूचवी. ॥ ११०४ ॥ कीं **'अन्ययावर्तते'** । इत-कियानेंचि अर्थसिद्धि होते । 'पुनः' शब्दें भगवद्वाणी होते । न कळे तया व्यर्थ येथें. ॥ ११०५ ॥ कीं **'अन्ययावर्तते'** म्हणोनी । म्हणतां अन्यगति कृष्णगति तीकरूनी । योगी येतसे परतोनी । हा अर्थ सिद्ध होतो.

॥ ११०६ ॥ जरी पुन्हा न म्हणे हरी । आणि **'अन्यययावर्तते'** इतकेंचि म्हणे जरी । दुसरे गतीनें परततो ऐसेंपरी । तरी होयच सिद्ध अर्थ. ॥ ११०७ ॥ परततो म्हणतांच होता अर्थ । परततो पुन्हा म्हणणें व्यर्थ । एवं पुन्हा जन्मांतरीं होऊनि कृतार्थ । अपुनरावृत्तीतें पावतो हेंचि सत्य. ॥ ११०८ ॥ पुन्हा धूमादि कृष्णगतीतें तो । पावोनियां परततो । कर्मयोगियास ऐसें म्हणतो । श्रीकृष्ण म्हणोनि जरी म्हणावें. ॥ ११०९ ॥ तरी स्वर्गास जाऊनि च्यवला । तो जन्मांतरीं पापी जाला । दुष्टसंगें नरकास गेला । ऐसे उदंड. ॥ १११० ॥ नरकास जाऊनी आला । सत्संगें पुण्यें करूं लागला । तो उत्तमा स्वर्गगतीस पावला । ऐसेही उदंड. ॥ ११११ ॥ पुन्हा पावोनि चंद्रज्योती । परतोनि येईल मागुती । पुनःपुन्हा कर्मयोगियास ते गती । होणार हेंही प्रसिद्ध. ॥ १११२ ॥ स्वर्गास राजा नहुष गेला । तो अजगर होऊनि पडिला । ज्यास जैसा प्रसंग घडला । तो पावला तैसे गतीतें. ॥ १११३ ॥ हे प्रसंग बोलतां फार । ग्रंथ वाढतो अपार । 'पुनः'—शब्दाचा निर्धार । कोठें न लागे. ॥ १११४ ॥ आणि हा कर्मयोगी हेंही न घडे । पुनरावृत्तीही हठयोगिया ब्रह्मवेत्त्याकडे । लागते कीं सेवूनि चंद्रामृतातें मुरडे । दक्षिणायनीं. ॥ १११५ ॥ पुन्हा शुक्लगतीनें तो । अपुनरावृत्तीतें पावतो । ब्रह्मवेत्ता योगी जरी परततो । दक्षिणायनीं देह सोडितां. ॥१११६॥ टीकाकारीं येचि रीती । टीका करावी म्हणूनि श्रीपती । पूर्वार्धाच्या अंतीं । दोनी अक्षरें वदे मतें म्हणोनी. ॥ १११७ ॥ मत म्हणजे संमत । मज संमता दोनी गति म्हणे भगवंत । षष्ठाध्यायीं योगभ्रष्टजन्म अत्यंत । श्रेष्ठत्वें जैसा वर्णिला. ॥ १११८ ॥ तैसी एकदा जरी पुनरावृत्ती । तरी पुन्हा पावेल अपुनरावृत्ती । यालागीं देवताचक्रवर्ती । म्हणे दोन्ही गति मज संमत. ॥ १११९ ॥ पुनरावृत्ति कर्मयोगियाची अत्यंत । निंदी स्थळस्थळीं भगवंत । मागें निंदिलें द्वितीयाध्यायांत । पुनरावृत्ति अधिकारी आणि गतीही. ॥११२०॥ **'यामिमां पुष्पितां वाचं'** या श्लोकापासूनी । **'कामात्मानः स्वर्गपराः'** म्हणूनी । गति आणि गतीस जाणार निंदूनी । बोलीला. ॥ ११२१ ॥ पुढेंही बोलेल नवमीं । ऐसेंच मुमुक्षूंचा स्वामी । कीं गतागती पावती कामकामी । **'गतागतं कामकामा लभंते'** म्हणोनी. ॥ ११२२ ॥ आतां निष्कामकर्मगती । म्हणूनि संमत म्हणतो म्हणावें श्रीपती । तरी हेही बंधक म्हणे जगत्पती । निंदा नव्हे हे काय? ॥ ११२३ ॥ **'यज्ञार्थात्कर्मणो-**

ऽन्यत्र' । या श्लोकीं कमलनेत्र । म्हणे कृष्णार्पणावीण कर्ममात्र । बंधक म्हणोनी. ॥ ११२४ ॥ एवं हे योगियाची पुनरावृत्ती । पुनः देणार अपुनरावृत्ती । म्हणूनि दोन्ही संमता म्हणे श्रीपती । आणि कर्मयोगीही हा नव्हे. ॥ ११२५ ॥ आतां या संमता दोन्ही गती । म्हणूनि म्हणे जो श्रीपती । मोहली अर्जुनाची मती । तो मोह परिहरितो या श्लोकीं. ॥ ११२६ ॥

**नैते सृती पार्थ जानन्योगी मुह्यति कश्चन ।**
**तस्मात्सर्वेषु कालेषु योगयुक्तो भवार्जुन ॥ २७ ॥**

अर्जुना! या दोन्ही गती । जाणोनि काय योगी मोहती । कोण योगियाची ही मती । मोह येथें न पावे. ॥ ११२७ ॥ अगा! जे स्वरूपीं चित्त योजिती । जे ब्रह्मचि होऊनि जाती । ते कां दिवस रात्रि मोजिती । ब्रह्मयाची? ॥ ११२८ ॥ त्यांसि कां पाहिजे उत्तरायण? । त्यांसकां ब्रह्मलोकप्रयाण? । अग्नि ज्योति इत्यादि देवतागण । चरणरजही न लाहती तयांचे. ॥ ११२९ ॥ न त्यांस उत्तरायण दक्षिणायन । न त्यांस अग्न्यादि धूमादि मार्ग देवतागण । अपुनरावृत्ति पुनरावृत्ति दोंहीची खूण । ते न जाणती जे ब्रह्म जाले देहींच. ॥ ११३० ॥ ते या दोन्ही गती । पूर्वोक्ता योगियांच्या जाणती । परि आपुल्या अनुभवापुढें ते म्हणती । कीं या दोन्ही गति फटकाळ. ॥ ११३१ ॥ कर्मयोगियाच्या गतीहुनी । या गति उत्तमा या भावेंकरूनी । मज संमता म्हणोनी । मी म्हणतसें हा भाव. ॥ ११३२ ॥ परंतु ज्ञाननिष्ठा योगिया । जे सद्यगती धनंजया! । तीवरूनि दोनी गति या । ओंवाळिल्या तरी महत्त्व याही कांहीं पावती? ॥ ११३३ ॥ मज संमता म्हणोनी । गोष्टी पडली तुझिया कानीं । घाबिरा जालासि यावरूनी । कीं न वाटती दोन्ही तुज उत्तमा. ॥ ११३४ ॥ अगा! दुष्काळें जे मरती । त्यांस कांजी आंबील बरी म्हणावी ये रीती । तैसी दोहीं गतींची करितो स्तुती । अमृतपान करणारिया तुजपासीं. ॥ ११३५ ॥ त्या गति योग्या तुजला । मी नाहीं बोलिलों या बोला । या गति जाणोनिही योगियाला । कदापि कोणासही मोह नव्हे. ॥ ११३६ ॥ अर्जुना! तूं तों माझा भक्त । माझ्या चरणीं अनुरक्त । म्हणूनि म्हणतों कीं होय योगयुक्त । तस्मात्कारण अर्जुना! ॥ ११३७ ॥ कीं जो योगी त्याची मती । न मोहे जाणोनि या गती । म्हणूनि योगयुक्त तूंही सुमती । होय सर्वकाळीं अर्जुना! ॥ ११३८ ॥ इत्यादि· सूर्यापुढें खद्योत होती । योगी पावे तो ऐशा पदाप्रती । म्हणूनि बोलतो जगत्पती । अध्यायांतीं हा श्लोक. ॥ ११३९ ॥

**वेदेषु यज्ञेषु तपस्सु चैव दानेषु यत्पुण्यफलं प्रदिष्टम् ।**
**अत्येति तत्सर्वमिदं विदित्वा योगी परं स्थानमुपैति चाद्यम् ॥ २८ ॥**

अगा! या दोन्ही गती । त्यांस कीं जे हठयोगी ब्रह्म जाणती । उत्तरायण-मार्गे जाणारे तुजप्रती । ब्रह्मवेत्ते म्हणूनि जे बोलिलों. ॥ ११४० ॥ तेचि जातां दक्षिणायनीं । जरी येती परतोनी । तरी पुन्हा ब्रह्मवेत्ते म्हणोनी । जाती अपुनरावृत्तीतें. ॥ ११४१ ॥ ब्रह्मीं कळणें अभेद । तें गुरुमुखें निषेधितां भेद । तेथें कारण **वेद** । हाचि **'वेद'**शब्दाचा अर्थही. ॥ ११४२ ॥ 'वेदयंतीति वेदाः' म्हणोनी । जाणविती ते **वेद** या अर्थावरूनी । पूर्वोक्त मार्ग ज्यांस दोनी । ते मार्ग ते ब्रह्मवेत्ते त्या गति सूचवी. ॥ ११४३ ॥ कीं **वेद** यज्ञ तप दान । यांचे ठायीं जें जें निदान । तें अतिक्रमूनि पावतो मुख्य स्थान । योगी म्हणूनि या लोकीं. ॥ ११४४ ॥ तरी हा योगी तोचि निश्चित । कीं ब्रह्मीं ब्रह्ममय करी चित्त । **'यतो वाचो निवर्तंते'** हा अद्भुत । योग जया योगियाचा. ॥ ११४५ ॥ त्याचा योग योजतो जेथें । परा वाचा नसे तेथें । हे **वेद** तों वर्तती एथें । परेआलीकडे वैखरीपर्यंत. ॥ ११४६ ॥ म्हणूनि सद्यमुक्ति याला । क्रममुक्ति हठयोगें त्याला । ब्रह्म जाणती परि ज्याला । नसे **वे**दवाणीपरता हा अनुभव. ॥ ११४७ ॥ यालागीं त्यांचें ज्ञान आणि त्यांची गती । **वे**दींच आहे कीं **वेद** बोलती । **वे**दवाणी टाकूनि आरती । परती वृत्ति नाहीं निमाली तयांची. ॥ ११४८ ॥ स्थिति गति त्यांची बोलती श्रुती । याची स्थिति **वे**दाहूनि परती । कीं **वेद** जेथूनि परतती । हा त्या आनंदीं निमग्न. ॥ ११४९ ॥ यालागीं जें सर्वां निगमीं । तें हा योगी अतिक्रमी । आणि पद पावे म्हणूनि म्हणतो स्वामी । निर्गुण सगुण मोक्षाचा. ॥ ११५० ॥ **वे**दीं ज्ञान **वे**दीं ध्यान । इत्यादि जें जें मुक्तिसाधन । तें अतिक्रमितो ऐसें वचन । बोलतां नये. ॥ ११५१ ॥ नदी लंघूनि गेलियावरी । नाव नलगे तयास परी । नाव अतिक्रमूनि जातो हे वैखरी । बोलतां विरुद्ध होय. ॥ ११५२ ॥ नावेस लावूनि कर । बाहुबळें तरती सागर । भागती राहती नर । द्वीपांतरीं. ॥ ११५३ ॥ जे नावेंत बैसले । ते त्यांस अतिक्रमूनि गेले । पैलतिरीं जाऊनि प्याले । दिव्यामृतातें म्हणों ये. ॥ ११५४ ॥ ब्रह्मयाची नाव तीरा । जातां हेही पावतील पैलपारा । परि खोळंबा बहुकाळ त्या नरां । अतिक्रमिलें योगियानें तयांतें. ॥ ११५५ ॥ **वे**दीं म्हणतां **श्री**पती । सूचवी कीं अतिक्रमी या गती । त्या गतीची वाट पाहती । योगी पावे ज्या पदा. ॥ ११५६ ॥ तेंच

म्हणतो **स्वामी** । कीं जें सर्वां वेदीं अतिक्रमी । आतां कर्मफळ बोलिलें निगमीं । तें अतिक्रमी जरी म्हणावें. ॥ ११५७ ॥ तरी तें वेगळें करूनी । या श्लोकींच बोलतो म्हणोनी । जें सर्व वेदीं तें अतिक्रमितो या वचनीं । हाचि अर्थ हा सिद्धांत. ॥ ११५८ ॥ यज्ञ तप दानें सकळ । यांचे ठायीं बोलिलें पुण्यफळ । तें सर्व अतिक्रमूनि केवळ । पर जें परब्रह्म त्यातें पावतो. ॥ ११५९ ॥ **'परं स्थानमुपैति चाद्यं'** म्हणोनी । बोलतो दोनी मोक्ष या शब्देंकरूनी । उप शब्द आणि चकार योजूनि । स्पष्ट मुक्ति दोनी बोलतो. ॥ ११६० ॥ पर म्हणजे पलीकडे । शुद्ध सत्त्वही ज्या आलीकडे । तेथें पावतो म्हणतां घडे । केवळ निर्गुण निर्वाण. ॥ ११६१ ॥ पर शब्दें निर्गुण मोक्ष दावुनी । जरी सगुणभक्त असे योगी ऐसा होउनी । तरी **'स्थानमुपैति चाद्यं'** म्हणोनी । या शब्दीं बोले सगुणमोक्ष. ॥ ११६२ ॥ प्रकटे पहिलें सर्वांहुनी । त्यास म्हणावें आद्य म्हणोनी । तोचि सगुण वैकुंठरूपें करूनी । स्थान जाला मुक्ताचें. ॥ ११६३ ॥ **'आद्यं स्थानं च उपैति'** । पदें एथें ऐसीं योजिती । अर्थ याचा ये रीती । कीं आद्यस्थान जें त्यातेंही पावतो. ॥ ११६४ ॥ आणि उप म्हणजे समीप । आद्यस्थान वैकुंठ भगवद्रूप । तेथें सत्त्वरूपें स्वानंदस्वरूप । अखंड अनुभविती समीप ते सर्व. ॥ ११६५ ॥ निर्गुणीं उपशब्द न घडे । आणि आद्यशब्दही न लागे तिकडे । आद्य म्हणतां सगुण सांपडे । सर्वांहूनि आदिकाळीं प्रगटे म्हणोनी. ॥ ११६६ ॥ करितां क्लिष्टकल्पना । केले तैसे अर्थ होती नाना । परि शब्दशक्ति पाहतां लागेना । निर्गुणाकडे आद्य शब्द. ॥ ११६७ ॥ तैसेंचि निर्गुण स्वरूप । तें न दुरी अथवा समीप । उप शब्दशक्तीचाहीं प्रताप । सगुण मोक्षाच पर्यंत. ॥११६८॥ शब्दमात्रें करूनी । निर्गुणपक्ष मात्र जो तो धरूनी । **गी**ता वाखाणिती म्हणोनी । झांकोनि राहिले स्पष्टार्थ. ॥ ११६९ ॥ च्यवले जय **वि**जय । ज्या त्यांस हाचि संशय । म्हणूनि सगुण मोक्षाचा निर्णय । निर्गुण मोक्षींच योजिती. ॥ ११७० ॥ जय **वि**जय च्यवले हें पुराणीं । आणि **म**हाभारतीं हे **भ**गवद्वाणी । एथें चतुर्दशीं **च**क्रपाणी । बोलेल हें सत्य कीं तें अधिक. ॥ ११७१ ॥ **'सर्गेऽपि नोपजायंते'** । म्हणजे सृष्टिकाळींही न जन्मती ते । आणि **'प्रलये न व्यथंति ते'** । म्हणजे प्रलयीं न पावती ते व्यथा. ॥ ११७२ ॥ पांचवा **वेद भा**रत । पुराणांसही प्रमाणभूत । त्यांत सर्व **वे**द मथूनि **भ**गवंत । हें **गी**तामृत स्वमुखें बोलतो. ॥ ११७३ ॥ जें **म**हा-

भारतीं । तेंचि पुराणें बोलती । येथें नसे कोठेंच नाहीं ऐसे रीती । **व्यास** कर्ता पुराणांचाच बोलतो. ॥ ११७४ ॥ **भा**रतीं **जयवि**जयांस । असुरत्व-प्राप्ति वर्णी **व्यास** । आणि **गी**ता **भ**गवद्वाणीही जनास । **व्यास**चि तो ऐ-कवी ॥ ११७५ ॥ येथें सगुणमोक्ष । ये रीती वर्णी **अं**बुजाक्ष । तेव्हां सर्वांत थोर हा पक्ष । आणि तेंही नव्हे अन्यथा. ॥ ११७६ ॥ याचा निवाडा **व्या**-सवाणी । करी **कू**र्मपुराणीं आणि **पद्म**पुराणीं । कीं अज्ञ आणि सगुणस्मरणीं । ते **दु**र्गाभागीं **भू**भागीं राहती. ॥ ११७७ ॥ **श्री**भाग मुक्तिस्थान । तें भक्त पावती ज्यांस आत्मज्ञान । भक्त आणि ज्ञानहीन । **भू**भाग **दु**र्गाभाग पावती. ॥ ११७८ ॥ देहांतीं जो स्मरे ज्यास । तो तद्रूप होय पात्रे त्यास । तैसेंचि ज्ञानहीन भक्तांस । तद्रूपत्व परि तो मोक्ष नव्हे. ॥ ११७९ ॥ जो ज्ञानी भक्त । तो **श्री**भागीं म्हणावा मुक्त । हा पक्ष **भ**गवद्वाणीसंयुक्त । आणि संमत पुराणांसही. ॥ ११८० ॥ इतिहासपुराणीं नवी ग्रंथरचना । स्वमतानुरूप क-रिती कल्पना । आणि मिसळिती श्लोक नाना । **व्यास**वाणी वाटे लोकांतें. ॥ ११८१ ॥ **गी**ता आणि **वे**द । जगीं पाठशाखाभेद । तेथें कल्पितपणाचा संदेह खेद । न उपजे सर्वथा. ॥ ११८२ ॥ भेदमती **श्रु**तीही बहुत । कल्पिती परि त्या न होती संमत । कल्पितपण दिसे अत्यंत । शाखाभेद पाठकांकरितां ॥ ११८३ ॥ **वेदश्रु**ती आणि हे । **भ**गवद्वाणी जो पाहे । त्यास सिद्धांत जो आहे । तो कळे निःसंदेह. ॥ ११८४ ॥ स्थळस्थळीं **श्रु**ती । सगुणमोक्ष बोलती । हें तों सर्वही जाणती । तैसीच **गी**ता. ॥ ११८५ ॥ प्रस्तुतीं पर-शब्दें मोक्षनिर्गुण । **'स्थानमुपैति चाद्यं'** म्हणूनि सगुण । मोक्ष सांगे दावूनि खूण । तदनुरूप. ॥ ११८६ ॥ त्यांत जे योगी चित्त अव्यक्तीं । योजिती त्यांस निर्गुणमुक्ती । जे **वा**सुदेव सर्व ऐसी भक्ती । करिती ते सगु-णमुक्ति भक्त पावती. ॥ ११८७ ॥ येथें नुसता योगी पावे निर्गुण । सर्वा-त्मभक्त पावे स्थान आद्य सगुण । म्हणूनि सर्वात्मभक्ति आपण । श्लोकीं याच बोलतो. ॥ ११८८ ॥ कोण्या भक्तीकरूनी । भक्त पावतो आद्यस्थानीं । तरी सर्व हें जाणोनी । पावतो म्हणे. ॥ ११८९ ॥ **'वासुदेवः सर्वमिति । स महात्मा सुदुर्लभः'** म्हणे **श्री**पती । हें सप्तमाध्यायांत अंतीं । स्पष्ट भक्तश्रेष्ठत्व वर्णिलें. ॥ ११९० ॥ सर्वदा सर्वात्मतेचें स्मरण । हेंच सगुण भजनाचें लक्षण । या ज्ञानाचें नांव सगुण । धर्म्य पदें उत्तराध्यायांत बोलेल. ॥ ११९१ ॥ निर्गुणज्ञान सगुणभक्ती । आणि परमपुरुषार्थ सगुणमुक्ती ।

ऐसी गीता भगवदुक्ती । सार सकळां वेदांचें. ॥ ११९२ ॥ ऐसा अध्याय आठवा । बोले अवतार आठवा । तो देवकीचा आठवा आठवा । वामन म्हणे. ॥ ११९३ ॥ ऐसी हे यथार्थदीपिका । श्रीभगवद्गीतेची टीका । त्यांत अष्टमाध्यायाची हे श्रीवत्सांका । वैकुंठनायका तया अर्पिली. ॥ ११९४ ॥ आतां राजविद्याराजगुह्योपदेश । करील उत्तराध्यायीं हृषीकेश । ज्याची टीका करितां क्लेश । थोर थोरही पावले. ॥ ११९५ ॥ नेणें कांहीं ज्ञान । नेणें कांहीं भजन । एक शेषशायी कमलनयन । दैवत इतकें जाणतों. ॥ ११९६ ॥ हा भावही देऊनि जतन । करितो तोचि शेषशयन । म्हणूनि गीतार्थ अति-गहन । तोचि कमलनयन सूचवितो. ॥ ११९७ ॥ ज्यांस इतर टीकाकारांचे अभिमान । ते न देतील या टीकेस मान । हरिभक्त निर्मत्सर निरभिमान । तेचि देतील सन्मान या टीकेतें. ॥ ११९८ ॥ जे हरिचरणीं अभक्त । क्षुद्रकाम क्षुद्रदेवताभक्त । त्यांस काय वाटेल युक्त । हे टीका ? ॥ ११९९ ॥ ज्यास कृष्णचरणांची चाड । त्यास काय अभक्ताची भीड? । हे त्यांतेंचि वाटेल गोड । जे बाह्यांतरींही हरिभक्त. ॥ १२०० ॥ हरिभक्ताचें अंतःकरण । तेथेंचि वैकुंठनाथाचे चरण । त्यास मी अनन्यभावें शरण । वामन म्हणे. ॥ १२०१ ॥

सर्वदा स्वचरणस्मरणाय पार्थमादिशदपि स्मरणाय ।
यद्गतस्य न हि संसृतिचक्रं तं स्मरामि सततं धृतचक्रम् ॥

---

## अध्याय नववा.

जय जय करुणासुधाजलनिधे ! । जय जय सविज्ञानज्ञाननिधे ! । जय जय जडजगदूर्मिचिन्महोदधे ! । श्रीसच्चिदानंद ! ॥ १ ॥ जय जय राजविद्योपदेशक । जय जय राजगुह्यप्रकाशक । जय जय निर्गुण सगुण त्रिगुणभेदनाशक । धर्मविज्ञानबोधमूर्ते ! ॥ २ ॥ जय जय जलजदलायताक्ष । जय जय अतींद्रिय सकलेंद्रिय परोक्ष । जय जय जगद्रूप प्रत्यक्ष । ऐश्वर्ययोगमूर्ते. ॥ ३ ॥ जय जय धृतजगदशेष । जय जय चित्प्रकाश परिहृतजडतमोदोष । जय जय चित्तंतुकपटजडपटवेष । शेषशयना शेषगुरो ! ॥ ४ ॥ जय जय अनल्पकल्पक । जय जय अजल्पजल्पक । जय जय अशेषशेषतल्पक । स्वजनकल्पतरो जगद्गुरो. ॥ ५ ॥ जय जय अनादिमायाध्यक्ष । जय जय मायात्रिगुणपरोक्ष । जय जय

मायासत्वापरोक्ष । मोक्षानंद सहजानंद ! ॥ ६ ॥ जय जय सकलसुरावतंस । जय जय सुरसंपत्समृद्धमानसराजहंस । जय जय कंसाद्यसुरभावविध्वंस । परमहंसगुरो ! ॥ ७ ॥ जय जय सत्कीर्तनार्हगुण । जय जय सदुपास्यसगुणनिर्गुण । जय जय सद्वृंदवंद्यचरण । एकत्वाद्युपासनोपास्य ! ॥ ८ ॥ जय निजजनपालनैकचतुर । निं[1]जजनयोगक्षेममंदरधर । निजजनावनप्रतिज्ञोद्धृतकर । सर्वेश्वर कृपानिधे कृष्ण ! पाहि पाहि. ॥ ९ ॥ जी जी देवाधिदेवा ! । प्राकृतभाषें करितां तुझी सेवा । वेदवाणीस उपजे हेवा । तुझ्या स्वरूपाचा ठेवा जीमाजीं. ॥ १० ॥ मुख्य तुझें नाम गोड । पुरवी सर्वां भाषांचें कोड । तें कानीं मुखीं येतां मोड । देहीं उपजती प्रेमाचे. ॥ ११ ॥ काय वेदशास्त्र जाणे व्रे[2]ज । ज्यांची भक्ति देखोनि तुझा आत्मज । ब्रह्मा वेदवक्ता शिरीं पदरज । वंदी व्रजनारीनरांचे. ॥ १२ ॥ ग[3]जेंद्र कोण शास्त्र पढला, । बा[4]ळ कोण्या पांडित्यें ध्रु[5]वपदा चढला, । दासी कु[6]ब्जा तिला घडला । काय अभ्यास संस्कृताचा. ॥ १३ ॥ व्रजीं चारितां गायी । कुचकंकुमें गोपिकांचीं पायीं । तदंकित तृणें कृतार्थ ठायीं ठायीं । ब[7]ल्लवस्त्रिया पढलिया त्या काय. ॥ १४ ॥ अभिमानें बुडाले पंडित । य[8]ज्ञपत्न्यांनीं अर्चितां वैकुंठमंडित । न पढतां न वाचितां अखंडित । आनंद भक्तीनें पावल्या. ॥ १५ ॥ भक्ति थोर भक्ति थोर । तूं चंद्रमा भक्त तुझे चकोर । तूं मेघ भक्त मयूर । मेघश्याम समोर । त्यांस तूं सर्वत्रही. ॥ १६ ॥ एवं पावावया तुझे चरण । भाषा कोणी नव्हे कारण । कारण सप्रेम अंतःकरण । देवाधिदेवा ! ॥ १७ ॥ जैसें भजनास कारण नव्हे वित्त । मुख्य सादर असावें चित्त । तथापि वित्त-

---

१. आपल्या भक्तांचा योगक्षेमरूपी पर्वत उचलून धरणारा. २. गौळी. ३. नक्रानें गजेंद्रास ओढून नेलें असतां तो (गजेंद्र) परमेश्वरास शरण गेला व त्यांनीं त्याची नक्रापासून सुटका केली. 'गजेंद्रमोक्ष' नांवाचें स्तोत्र सर्वप्रसिद्ध आहे. ४. उत्तानपादराजाचा मुलगा ध्रुव. ५. अढळपद, अढळस्थान. ६. कंसाची दासी. कृष्ण आणि बलराम हे मथुरेस जात असतां तिची मार्गांत गांठ पडली. ती कंसास लावण्याकरितां उटणीं नेत होती. त्यांतील बराच भाग तिनें त्या बंधुद्वयास दिला. कृष्ण सुप्रसन्न होऊन त्यानें तिला सुंदर स्त्री बनविली. ७. गौळणी, गोपी. ८. गोकुळांतील सर्व ब्राह्मण श्रीकृष्णाची आचारभ्रष्टता पाहून गोकुळाबाहेर रहाण्यास गेले व तेथें यज्ञ करूं लागले. एकदा श्रीकृष्णाची गोपाळ मंडळी शिदोरी विसरल्यामुळें क्षुधेनें व्याकुळ झाली तेव्हां कृष्णानें त्यांस त्या ब्राह्मणांकडे पाठविलें. त्यांनीं अन्न देण्याचें नाकारलें. श्रीकृष्णानें पुन्हां गोपाळांस त्या ब्राह्मणांच्या स्त्रियांकडे पाठविलें. त्या कृष्णभक्त असल्यामुळें अन्न घेऊन श्रीकृष्णाकडे आल्या, त्यामुळें यज्ञनारायण संतुष्ट झाला व ब्राह्मणांस आपलें अज्ञान समजलें. (हरिविजय—अध्याय १६.)

वंत वेंचिती यानिमित्त । कीं अन्यथा वित्तशाठ्य लागेल. ॥ १८ ॥ मंगलाचरण म्हणोनी । करितों देवा संस्कृतें करोनी । कोणी अर्थीं दृष्टीही नेदुनी । सुखें उगेचही वाचोत. ॥ १९ ॥ जेथोनि टीकेचा आरंभ । तेथोनि गीतार्थ जो स्वयंभ[1] । तो होय अत्यंत सुलभ । शब्द ऐसे योजितों. ॥ २० ॥ परंतु गीतार्थाच्या कंडोविकडी[2] । अर्थानर्थाच्या घडामोडी । म्हणोनी वाटे कठिण रोकडी । परि विचारितां सुलभ तुझ्या कृपेनें. ॥ २१ ॥ आतां सकळ विद्येचा राणा । ऐसी विद्या तेही नारायणा । या अध्यायीं सांगसी स्वशरणा । आणि गुह्य राजा गुह्यां सर्वांचा. ॥ २२ ॥ सर्व ज्ञानाचा कळस । मुक्ति देऊनिही ज्याच्या दानीं आळस । त्याचा धावयाचा वोरस[3] । भक्ताच्या ठायीं येथें दाखविसी. ॥ २३ ॥ रहस्य ऐसें उत्कट । या अध्यायीं करिसी जरी प्रकट । तरी अनन्यभक्तीवांचूनि संकट । पडिलें टीकाकारांसही. ॥ २४ ॥ वंदिती पूजिती तुझे चरण । तरी अंतरीं इतर देवताशरण । करिती क्षुद्रदेवता मंगलाचरण । इच्छोनि निर्विघ्न कवितास्फूर्तीही. ॥ २५ ॥ राजविद्या राजगुह्याचा । उकल नव्हे त्यांस साचा । जैसी तैसी युक्तवाचा । योजोनि गेले. ॥ २६ ॥ जगीं मिरवोनिया सिद्धी । आपलाल्या टीकांची केली प्रसिद्धी । तथापि नाहीं झाली अर्थसिद्धी । यथार्थ गीतारहस्याची. ॥ २७ ॥ सिद्धी कर्मजनिता । क्षिप्र या मनुष्यलोकीं येती हाता । म्हणोनि बोले हेचि गीता । चतुर्थाध्यायांत.॥२८॥

चतुर्थाध्यायश्लोकार्ध—**'क्षिप्रं हि मानुषे लोके सिद्धिर्भवति कर्मजा ।'**

मागें याची जाली । कर्मसिद्धि भलत्याचिया हाता आली । परि अनन्यभक्तीवांचूनि बोली । हे भगवंताची कळेना. ॥ २९ ॥ आतां देवाधिदेवा ! । श्रोते वक्ते तूंचि देवा । टीकाप्रवाह वासुदेवा । त्याकडे चाले ऐसा चालतों. ॥ ३० ॥ भूमीचवरी चाले जळ । वाफे तेही भूमीच केवळ । श्रोते वक्ते तूंचि सकळ । पूर्वानुसंधान त्यांप्रति निरूपितों. ॥ ३१ ॥ अष्टमाध्यायांत देव । अर्जुनास अपरोक्षानुभव । देऊनि आतां स्वऐश्वर्य विभव । दावीतसे या नवमांत. ॥ ३२ ॥ व्यतिरेक अक्षर[4] ब्रह्म । या शब्दीं उपदेशिता जाला पुरुषोत्तम । अक्षरब्रह्मापुढें शब्द परम । अन्वय बोधिला त्या शब्दीं. ॥ ३३ ॥ विश्वावेगळें निर्गुण । आणि निर्गुणचि विश्व त्रिगुण । हे व्यतिरेकान्वयाची खूण । अष्टमीं उपदेशिली.॥३४॥ अनुभव तितकाच हें यथार्थ । मुमुक्षु इतकियानें कृतार्थ । परि मोक्षही न इच्छी पार्थ । अनन्यभक्त सखा आपुला. ॥ ३५ ॥ निर्गुणोपासकाहूनी । भक्त ज्ञानी

---

१. स्वतःसिद्ध. २. गुंतागुंत. ३. वृष्टि. ४. अविनाशी.

थोर म्हणूनी । द्वादशीं स्वमुखें करोनी । भगवंत बोलेल. ॥ ३६ ॥ तरी आ-त्मज्ञानाविण । उगेंचि भजती सगुण । थोर त्याहूनि निपुण । अनुभवी निर्गु-णाचे. ॥ ३७ ॥ आतां भक्तही ज्ञानी भला । तरी निर्गुणोपासकासमान बोला । त्याहूनिही अधिक जाला । कोण्या ज्ञानें? ॥ ३८ ॥ नुसतें जें सगुणसाकारभ-जन । त्याहूनि थोर आत्मज्ञान । ज्ञानांतही ज्ञान गहन । भक्तास असे त्यापरिस थोर हें. ॥ ३९ ॥ तरी याही गुणें भक्त अधिक । कृष्णकृपाजलधराचे चातक । त्याहूनि उणे निर्गुणोपासक । कीं विश्व भगवद्रूप हें नेणती. ॥ ४० ॥ तें आतां सांगों अर्जुना । ऐसी कृपा उपजली कमलनयना । तदर्थ सावध करून त्याच्या मना । बोलों आरंभितों तें ज्ञान. ॥ ४१ ॥ मागील अष्टमाध्याय । तेथें बोलिला व्यतिरेकअन्वय । ब्रह्म आणि जग याचा ऐक्यनिर्णय । परम रहस्य अर्जुना! ॥ ४२ ॥ परंतु आतां सांगेन म्हणोनी । म्हणतो हें गुह्य सकळ गुह्याहुनी । भाव ऐसा दाखवूनी । बोलता जाला श्रीभगवान. ॥ ४३ ॥

श्रीभगवानुवाच—**इदं तु ते गुह्यतमं प्रवक्ष्याम्यनसूयवे ।**

अगा! जें गुह्य सकळ गुह्याहुनीं । तें म्हणावें गुह्यतम म्हणोनी । आतां सांगेन म्हणतो येथूनी । हें तों गुह्यतम अत्यंत. ॥ ४४ ॥ कीं तूं दोषरहित । म्हणोनि हें गुह्य अत्यंत । सांगेन म्हणतो ऐसा भगवंत । भाव येथें दाखवी. ॥ ४५ ॥ **'अनसूयवे'** म्हणोनी । गहन भाव हृदयीं धरोनी । म्हणे कीं मजवरी नसता दोष ठेवुनी । लोक दोषी होती तूं निर्दोष. ॥ ४६ ॥ मी सर्व-सम धनंजया! । समान सर्वांवरी दया । निर्दोषा मज ऐशिया । दोष लाविती. ॥ ४७ ॥ माझें थोरपण बोलों जाती । परि मज दोष लागतो हें नेणती । सर्वकर्ता ईश्वर म्हणती । तेव्हां जनांस दुःख काय मी देतों? ॥ ४८ ॥ स्वयें पाप आचरती । ईश्वर करवितो म्हणती । पापें करवूनि दुर्गती । मी देतों काय सर्वांतें? ॥ ४९ ॥ हें पंचमाध्यायांत विस्तारें । तुज म्यां सांगीतलें बरें । कीं न करवी ईश्वर खरें । पाप अथवा पुण्यही. ॥ ५० ॥ तें तुवां धरिलें मनीं । ईश्वर विषम निर्दय नव्हे म्हणोनी । आणि अनादि वासनेकरूनी । पाप पुण्य आचरती हेंही समजलें. ॥ ५१ ॥ हा भाव तूतें समजला । हें बरें कळलें मजला । म्हणोन हें गुह्य अत्यंत तुजला । सांगेन म्हणतो. ॥ ५२ ॥ **'अनसूयवे'** म्हणोनी । या भावें करूनी । येथें अर्जुनास आळवूनी । गुह्य सांगेन म्हणतसे. ॥ ५३ ॥ येथें इतर टीकाकार । म्हणती कीं तुज वारंवार । आपण सांगतों तत्त्वविचार । हा दोष मजवर न ठेविसी म्हणूनी. ॥ ५४ ॥ म्हणती **'अनसू-**

**यवे'** म्हणूनी । **कृ**ष्ण म्हणे या भावेंकरूनी । परि अमृत वारंवार पिउनी । दोष दातयातें कोण लावी? ॥ ५५ ॥ अष्टादशीं **श्री**पती । ऐसेंच म्हणेल **अ**र्जुनाप्रती । कीं **'न च मां योऽभ्यसूयति'** । म्हणोनी. ॥ ५६ ॥ म्हणजे जो मजवरी दोष । ठेवील कुत्सित पुरुष । त्यास हे **गी**ता माझें वचनपीयूष । सांगूं नको. ॥ ५७ ॥ त्या **गी**तेंत **भ**गवंत । सांगेन म्हणतो गुह्य अत्यंत । हें पाजितां अमृत । दोषारोपणाची कां शंका? ॥ ५८ ॥ न स्मरे पूर्वापर । न कळे तों हा विचार । ज्यास अनन्यदैवत हा **गी**ताकार । त्यातेंच हा अर्थ सूचवी. ॥ ५९ ॥ एवं च ईश्वर सम सदय । तो हा **कृष्ण** नव्हे विषम नि-र्दय । ऐसें समजला **ध**नंजय । म्हणूनि **'अनसूयवे'** म्हणे तयातें. ॥६०॥ ऐसि-यास गुह्य सांगेन म्हणतां । **अ**र्जुन म्हणेल गुह्य काय आतां । उरलें असे कीं जें सांगावें शरणागता । तें अष्टमींच सांगितलें. ॥ ६१ ॥ निर्मूल जालें द्वैत । बरवें बिंबलें अद्वैत । आतां याहूनि गुह्य काय अत्यंत । सांगों पाहतो. ॥ ६२ ॥ उत्तरार्धाचा उद्भव । यानिमित्त करितो **दे**व । परि अंतरीं भाव । ये रीती. ॥ ६३ ॥ कीं म्हणसी व्यतिरेकान्वयज्ञान । ज्याणें जालें अविद्यानिरसन । याही-परीस गुह्य गहन । असेल काय? ॥६४॥ तरी अगा! ज्ञान तों तेंचि निश्चित । परि तेंचि ज्ञान विज्ञानासहित । सांगेन याकरितां गुह्य अत्यंत । कीं हें ज्ञानी भक्तचि माझे जाणती. ॥ ६५ ॥ कीं विविधरूप जें ज्ञान । त्यास म्हणावें विज्ञान । अन्वयें ब्रह्मचि सर्व परि भान । प्रतीतीस येते ते माया. ॥६६॥ आणि विविधही हें ब्रह्म । ऐसें कळलें बुद्धीस वर्म । ते बुद्धीही मायाधर्म । ब्रह्मनिर्धर्म ते सर्वथा वृत्ति नव्हे. ॥ ६७ ॥ आतां माया तेंही ब्रह्म । हे प्रतीतीही मायाधर्म । निर्गुणोपासका आवडे निर्धर्म । बाळास जैसी शर्करा. ॥ ६८ ॥ शर्करामाधुर्य-सीमा । त्याच साकरेच्या ओतिल्या प्रतिमा । माधुर्य आणि कौशल्यमहिमा । जाणती प्रौढ. ॥ ६९ ॥ माधुर्य चाखे त्याची रसना । आकार गोड त्याच्या लोचना । तैसें निर्गुण आणि मायारचना । सगुण **भ**गवद्रूप भक्तांतें. ॥ ७० ॥ त्याज्य मायांश त्यांस नाहीं । **भ**गवद्रूपें सेव्य तेंही । ऐसें विविधमायामयाचें जें कांहीं । ज्ञान तें विज्ञान हा भाव. ॥ ७१ ॥ तरी न कळोनि ब्रह्मात्मत्व नि-श्चय । नेणोनि व्यतिरेकअन्वय । शब्दबोधेंचि मायामय । सगुण म्हणतां अविद्या नासेना. ॥ ७२ ॥ म्हणोनि विज्ञानासहित ज्ञान सांगेन । जें जाणोन अशुभापासोनि मोचन । पावसी म्हणोन **क**मललोचन । बोलतो उत्तरार्धें करोनी. ॥ ७३ ॥

**ज्ञानं विज्ञानसहितं यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥ १ ॥**

विज्ञानसहित येथुनी । ज्ञान सांगेन स्वमुखेंकरूनी । अशुभा अविद्या तीपासूनी । ज्ञान जाणोनी सुटसी तूं. ॥ ७४ ॥ व्यतिरेकअन्वय तुजला । शब्देंच अर्जुना समजला । परि तुज बोध जाला वाटेल मजला । अभ्यास जेव्हां बाणेल. ॥ ७५ ॥ गुरु सांगे वेदऋचा । तैसीच म्हणे शिष्यवाचा । परिं पाठ जालें म्हणोनि त्याचा । भरंवसा गुरूतें वाटेना. ॥ ७६ ॥ अष्टमीं ज्ञान उपदेशुनी । मागुती म्हणे या भावें करोनी । कीं विज्ञानसहित जें ज्ञान जाणुनी । अविद्येपासूनि तूं सुटसी. ॥ ७७ ॥ जें ज्ञान बोललों निश्चित । तेंचि ज्ञान विज्ञानसहित । सांगेन कीं त्रिगुणरचना ही भगवंत । त्या ज्ञानेंच तुज वाटे हा भाव. ॥ ७८ ॥ अगा! ज्याची अविद्या गेली । त्यातेंच समजे हे बोली । म्हणोनि ज्ञानेंचि कळे किली । विज्ञानाची ऐसिया. ॥ ७९ ॥ म्हणोनि विज्ञानसहित । ज्ञान सांगेन म्हणतो भगवंत । जैसें अन्नचि गोड अत्यंत । परि लवणासहित बहुगोड. ॥ ८० ॥ अष्टमीं कोरडें अन्न पहिलें । आपणचि अर्जुनातें दिधलें । तेंचि लवणासहित रांधिलें । ऐसें सिद्धान्न वाढीन आतां हें म्हणतो. ॥ ८१ ॥ लवणावांचूनि गोडी नसे । तरी क्षुधा अन्नचि नासे । विश्व भगवद्रूप तेव्हां समरसे । जेव्हां व्यतिरेकान्वयें नासे अविद्या. ॥ ८२ ॥ नुसतें भक्षितां लवण । तृप्त जाला ऐसा कवण । आणि लवणावांचोनि जेवण । कोण गोडीनें जेविला? ॥८३॥ ज्ञान या विज्ञानासहित। थोरपण पावतें अत्यंत । म्हणोनि त्याचा महिमा भगवंत । सादर बोलतो या श्लोकीं. ॥ ८४ ॥

**राजविद्या राजगुह्यं पवित्रमिदमुत्तमम् ।**
**प्रत्यक्षावगमं धर्म्यं सुसुखं कर्तुमव्ययम् ॥ २ ॥**

अगा! निर्गुणात्मत्वें नासे अविद्या । ते निर्गुणाद्वैत शुद्ध विद्या । जें सांगेन म्हणतो राजविद्या । राजा सकळ विद्यांचा. ॥ ८५ ॥ वेदांताचें श्रवण । विद्या नव्हे म्हणेल कवण । न कळे जया शास्त्राविण । मुख्य सिद्धांत वेदाचा. ॥ ८६ ॥ वेगळें जड वेगळें चैतन्य । कळतां ब्रह्म आपण अनन्य । ज्या व्यतिरेकें होय ऐसा धन्य । नव्हे काय विद्या ते व्यतिरेक? ॥ ८७ ॥ चैतन्याहूनि विलक्षण । त्या जडीं चैतन्य लक्षण । सांपडे अलंकारीं जैसें सुवर्ण । ते अन्वयविद्या नव्हे काय? ॥८८॥ ऐशा अद्वैतबोधरूपा सुविद्या। ज्या नाशिती अनादिमाया अविद्या । परि राजा इतक्या विद्यांत राजविद्या । जे सांगेन म्हणतो

श्रीकृष्ण. ॥ ८९ ॥ सर्व शास्त्रें बोलती द्वैत । वेदांत बोले अद्वैत । तें शास्त्र तों गुह्य अत्यंत । म्हणावेंच कीं. ॥ ९० ॥ देह आत्मा म्हणे चार्वाक । ज्ञानगुण म्हणे नैयायिक । ज्ञानपरिणाम म्हणे मीमांसक । तो आत्मा आत्मानुभवव्यतिरेकें येतसे. ॥ ९१ ॥ गुह्य ऐसें हाहीं व्यतिरेक । आतां जड जें दिसे नश्वर अनेक । हें अन्वयें कळे ब्रह्म एक । गुह्यपरम अन्वय ऐसा. ॥ ९२ ॥ इत्यादि गुह्य सकळ । कीं ज्याकरितां कळे अकळ । परि हें राजगुह्य केवळ । राजा सर्वां गुह्यांचा. ॥ ९३ ॥ जें आतां भगवंतें । सांगों आरंभिलें अर्जुनातें । सर्वांहुनि थोर त्यातें । आदींच म्हणतो. ॥ ९४ ॥ तरी काय त्यांत विशेष । कीं एवढा त्याचा उत्कर्ष । ऐसें अर्जुन पुसे तों परमहंस । म्हणतो प्रत्यक्षावगम[1] म्हणोनी. ॥ ९५ ॥ प्रत्यक्ष स्थावर जंगम । हें सर्वही पुरुषोत्तम । ऐसा होय अवगम । तें प्रत्यक्षावगम बोलावें. ॥ ९६ ॥ कीं जें जें इंद्रिय । तें तें घेत आपला विषय । हे दोनी प्रत्यक्ष यांतें जें अतींद्रिय । प्रकाशितें ब्रह्म दोनीही. ॥ ९७ ॥ **'सर्वं खल्विदं ब्रह्म'** । इत्यादि बोलती निगम । तरी प्रत्यक्षावगम । न म्हणवे तें ज्ञान. ॥ ९८ ॥ एक सर्व आणि एक ब्रह्म । दोहींस ऐक्य बोलती निगम[2] । परि दोनी म्हणतां उपजे भ्रम । द्वैताचा. ॥ ९९ ॥ सर्व शब्दें विश्व त्रिगुण । ब्रह्म विलक्षण निर्गुण । ऐक्य न घडे परि बोले आपण । वेदवाणी भगवंत. ॥ १०० ॥ तेव्हां प्रत्यक्ष तें असत्य । आणि अतींद्रिय ब्रह्म तें सत्य । ऐसें वेदोक्त पांडित्य । करितां वेदोक्त सर्व ब्रह्म साधावें. ॥ १०१ ॥ एवं प्रत्यक्ष जें दिसे । तें मिथ्या म्हणोनी मानावें कीं नसे । त्याचें प्रकाशक त्यांत गवसे । तेंचि तें मानूनि अनुभवावें. ॥ १०२ ॥ किरीटकुंडलादि अनेक । तें सर्वही **'खलु'** निश्चयें कनक[3] । तैसें हें सर्व आणि ब्रह्म एक । परि आकार सोनें हें न घडे. ॥ १०३ ॥ सोनें किरीटाचा आकार । तरी सोनें न म्हणवे इतर अलंकार । कीं जरी किरीटाकारचि प्रकार । स्वरूपाचा त्याच्या नेमिला. ॥ १०४ ॥ एवं सुवर्ण आकाररूप । नव्हे कीं तें पीतप्रभास्वरूप । रूप पावलें जरी अरूप । तरी रूप ऐसें त्यातें न म्हणावें. ॥ १०५ ॥ परि आकाररूपी द्वैत नाहीं । कीं तें मिथ्या त्याविण नसे कांहीं । तथापि ज्याकरितां जें दिसे तेंही । तेंचि म्हणावें अद्वितीय. ॥ १०६ ॥ परि सोनें प्रिय बहु कीं तें सत्य । अलंकार तैसा प्रिय नव्हे असत्य । कांहीं मोडतां अगत्य । पिटीती आटिती. ॥ १०७ ॥ अलंकार दिसती फार । वाटेस नागवितील चोर । म्हणोनि मोडिती अलंकार ।

---

१. जें प्रत्यक्ष दिसतें तें सर्व ईश्वरस्वरूप. २. वेद. ३. सोनें.

मूस करोनि ते नेती. ॥ १०८ ॥ जरी केली मूस । आकार आहेच त्यास । लांब लाटा म्हणावें ज्यास । आकार नव्हे तो काय? ॥ १०९ ॥ वाटोळा गोळा केला । तरी आकार म्हणती त्याला । सोनें न कळेच कोणाला । कांहीं एक आकारावांचुनी. ॥ ११० ॥ जडावेगळा व्यतिरेक । पाहती जरी निर्गुणोपासक । ब्रह्मीं ब्रह्ममय जाला तोहि एक । सत्त्वांश मायेचा. ॥ १११ ॥ त्यास नलगे माया । परि ते न सोडी तया । प्रपंच तो मायेच्या गुणत्रया- । वांचूनि न घडे. ॥ ११२ ॥ ज्यासी एकचि आवडे निर्गुण । त्याज्य त्यास मायागुण । जरी निर्गुणचि ने निपुण । त्रिगुणीं पाहती. ॥ ११३ ॥ ज्यास पाहिजे सगुण । त्यास विश्व सकळ हें त्रिगुण । सगुण ईश्वरचि वाटे हे खूण । **'प्रत्यक्षावगमं'** म्हणतां सूचवी. ॥ ११४ ॥ प्रत्यक्ष जडत्व इंद्रियातें कळे । चित्स्वरूप बुद्धीतें आकळे । परि इंद्रियद्वारा जें आढळे । तेंही बोद्धव्य बुद्धीचें. ॥ ११५ ॥ जडीं चित्स्वरूप देखे बुद्धी । तीतेंचि इंद्रियद्वारा जडत्वबोधसिद्धी । बुद्धि तेचि अनुभवसमृद्धी । उभय प्रकारें. ॥ ११६ ॥ गुळाचा भेला दिसे दृष्टी । परि जों रसना लागली आहे उष्टी । तोंपर्यंत दृष्टी कष्टी । नव्हे भेला मातीचा म्हणोनी. ॥ ११७ ॥ प्रत्यक्षीं बुद्धि चिद्वस्तू पाहे । आणि इंद्रियां जडत्वही दिसताहे । तेव्हां जडत्व काय लाहे । हें जड प्रत्यक्षही. ॥ ११८ ॥ तथापि जडत्व मायांश । चित्प्रकाशें त्याचा प्रकाश । हाही त्याज्यांशलेश । नुरे या ज्ञानीं विज्ञान मेळवितां. ॥ ११९ ॥ कीं ज्या शुद्धसत्त्वें कल्पना । ईश्वराची अवताररचना । त्याच सत्त्वें प्रत्यक्ष नाना । ईश्वर कल्पितो. ॥ १२० ॥ अविद्योपाधि जीव । ते अविद्याकर्में त्रिगुणभाव । भोगीत म्हणोनि देव । त्याच शुद्धसत्त्वें कल्पितो. ॥ १२१ ॥ **'ममात्मा भूतभावनः'** म्हणोनी । प्रकरणीं याच या श्लोकचरणें करोनी । माझी बुद्धि भूतें कल्पिते म्हणेल यावरूनी । ईश्वरकल्पना हे प्रत्यक्ष. ॥ १२२ ॥ धाता यथापूर्व[1] कल्पितो ऐसी श्रुती । वेद अन्यत्रही स्थळीं बोलती । हें पुढें विशदरीती । बोलणें असे. ॥ १२३ ॥ एवं ईश्वराची कल्पना । जैसी श्रीरामकृष्णाद्यवताररचना । तैसें त्रिविध हें प्रत्यक्ष नाना । कल्पना ईश्वराचीच. ॥ १२४ ॥ राजमुद्रांकित । सुवर्णद्रव्य अमित । त्यांत कांहीं भांडारीं संचित । हाटोहाट[2] कांहीं फिरतसे. ॥ १२५ ॥ तथापि भांडारीं तें उत्तम । हाटोहाट फिरतें तें अधम । ऐसें न म्हणावें तेंचि हेम । आणि त्याच मुद्रा रायाच्या. ॥ १२६ ॥ तेंवी शुद्ध चित्स्वरूप । तेंचि

१. पूर्वीप्रमाणें हें जगत् निर्मितो, नवें नाहीं. २. बाजारांत.

कल्पनेचें रूप । जगीं न दाखवी ईश्वरत्वप्रताप । अवतारीं दाखवी. ॥ १२७ ॥ राजद्रव्य भांडारीं । रत्नांकित मंदिरीं । तेंचि जनासी देतां दारोदारीं । फिरे परि तेंचि तें. ॥ १२८ ॥ ऐसें ज्ञान तें विज्ञान । प्रत्यक्ष मायामयही चित्स्वरूप हें ज्ञान । या विज्ञानयुक्त ज्ञानें अनुसंधान । राहे प्रत्यक्षही हें भगवंतचि म्हणोनी. ॥ १२९ ॥ दृष्टि न पडे कारणीं । तरी जडत्व वाटे कार्यपणीं । या अन्वयज्ञानावांचुनी । त्रिगुणीं काय भगवद्भाव वाटेल? ॥ १३० ॥ म्हणोनि मुख्य पाहिजे ज्ञान । परि माया त्याज्यांश वाटे जडत्वभान । त्यांत सगुणत्व पाहणें हें विज्ञान । मेळवितां प्रत्यक्ष भगवद्रूप वाटे. ॥ १३१ ॥ ऐसें ज्ञान विज्ञानसहित । तेव्हां प्रत्यक्षावगम निश्चित । कीं प्रत्यक्ष दिसतें हेंही भगवंत । कल्पूनि आपणा आपण दावितो. ॥ १३२ ॥ उभा राहोनि निरंतर । स्तंभरूप दावी शरीर । पुरुषचि तो स्तंभाकार । तें शरीर कल्पना तयाची ॥ १३३ ॥ तथापि ते माया । त्याज्य वाटे धनंजया । कीं सुवर्णाचिया क्रयविक्रया । चाड अलंकाराची असेना ॥ १३४ ॥ परि सुवर्णें सधन अलंकारें सुंदर । दोनी अपेक्षिती जे चतुर । ते आयत्या नगीं परम तत्पर । त्याज्यांश त्याला दिसेना. ॥ १३५ ॥ आतां वेगळी कैंची माया । जड भास कैंचा धनंजया? । पाहे आतां जगास या । योग ऐश्वर रूप ऐसें पुढें बोलेल. ॥ १३६ ॥ म्हणोनि हें प्रत्यक्ष जें स्थावरजंगम । स्वयें मीच साकार पुरुषोत्तम । ऐसें ज्ञान तें प्रत्यक्षावगम । यास राजविद्याराजगुह्य मी म्हणतों. ॥ १३७ ॥ जें प्रत्यक्ष तेंचि अवगम । या भावें म्हणे प्रत्यक्षावगम । दुसरा अर्थ याचा प्रत्यक्षीं अवगम । मिथ्या संपत्ति अवगम जैसा रज्जूचा. ॥ १३८ ॥ जड सर्प निषेधितां असत्य । कळे चित्स्वरूप रज्जु सत्य । हा अर्थ टाकोनि काय अगत्य । कीं तो अर्थ अंगीकारावा? ॥ १३९ ॥ ऐसे कोणी म्हणती । हें सर्वज्ञ जाणे जगत्पती । यालागीं खूण सांगे अर्जुनाप्रती । कीं हें धर्म्य म्हणोनी.॥१४०॥ कीं जडसर्प निषेध घडे । चित्स्वरूप रज्जू ठायीं पडे । तैसा प्रत्यक्षीं अवगम सांपडे । प्रत्यक्ष निषेधितां निर्गुण रज्जूचा.॥१४१॥ तें नैर्धर्म्य म्हणावें ज्ञान । कीं निर्धर्मीं लागे अनुसंधान । या ज्ञानांत मिसळितां विज्ञान । हें सगुणज्ञान धर्म्य ऐसें म्हणावें. ॥ १४२ ॥ प्रत्यक्ष नाना धर्मरूप । अवगम त्याचा कीं तें भगवत्स्वरूप । नव्हे निर्धर्म निर्गुण अरूप । या प्रत्यक्षासारिखें. ॥ १४३ ॥ जेथें कांहीं तरी गुण । तेथें लागतें धर्मपण । केवळ गुणातीत निर्गुण । निर्धर्म त्यातें म्हणावें. ॥ १४४ ॥ जेथें माया तेथें

---

१. ईश्वरपण. २. ज्ञान.

धर्म । मायेपरतें तेंचि निर्धर्म । विश्व आणि ईश्वर दोनी सधर्म । हें ज्ञान धर्म्य यालागीं. ॥ १४५ ॥ आतां पुण्यजनक कर्म । त्यासही म्हणावें धर्म । तरी ज्ञान नैष्कर्म्य हें वर्म । कर्मातीतास धर्म लागेना. ॥ १४६ ॥ कर्म लागलें अविद्येकडे । ज्ञानियास त्या अविद्येच्या संस्कारें घडे । कीं प्रारब्धही अविद्येंत पडे । फळ अविद्यारचित कर्माचें. ॥ १४७ ॥ पुण्य आणि पाप । दोनीही अविद्यारूप । कर्मधर्मदाहकस्वरूप । ज्ञानाग्नि हा. ॥ १४८ ॥ धर्म म्हणतां पुण्यकर्म । ज्ञानीं न लगे तो धर्म । या धर्म्य पदाचें न कळोनि वर्म । प्राकृत टीकाकार धर्म्य इतकेंचि बोलती. ॥ १४९ ॥ आतां आत्मा पहावा हाचि परम । याज्ञवल्क्य बोलिला धर्म । तरी तें स्मृतींत बोलतां कर्म । पुरुषार्थ धर्म शब्दें उपपादिती. ॥ १५० ॥ तरी कर्ममार्गीं जो पुरुषार्थ । तो मुख्य पुरुषार्थ न म्हणावा हा अर्थ । कीं पुरुषार्थ थोर तोचि यथार्थ । जेथें योगें घडे आत्मदर्शन. ॥ १५१ ॥

याज्ञवल्क्यस्मृति—**इज्याचारदमाहिंसादानस्वाध्यायकर्मणाम् ।**
**अयं तु परमो धर्मो यद्योगेनात्मदर्शनम् ॥**

स्मृत्यर्थ—इज्या यज्ञ आणि देवतापूजन । आचार स्वधर्म शौच सोवळें स्नान । दम इंद्रियदमन । परपीडा टाकणें अहिंसा. ॥ १५२ ॥ सत्पात्रीं देणें हें दान । स्वाध्याय वेदशास्त्राध्ययन । कर्में इत्यादि आचरती जन । धर्म म्हणावे हे सर्व. ॥ १५३ ॥ परंतु योगें करोनी । आत्मदर्शन साधिती मुनी । परम धर्म तो हा म्हणोनी । परम पुरुषार्थ सूचवी. ॥ १५४ ॥ कर्मशास्त्ररूपा स्मृती । आचार व्यवहार प्रायश्चित्तें सांगती । तेथें धर्म पुरुषार्थ बोलती । प्रसंगें म्हणे मुख्य पुरुषार्थ आत्मज्ञान. ॥ १५५ ॥ हे ज्ञानशास्त्र गीता । येथें ज्ञान नैष्कर्म्य हेंचि तत्त्वतां । नैष्कर्म्य नैष्कर्म्य म्हणोन बोलता । जाला बहुतां स्थळीं. ॥ १५६ ॥

गीतावचन—**न कर्मणामनारंभान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते ।**
**नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाधिगच्छति ॥**

ऐसें नैष्कर्म्यशब्दें करोनी । ज्ञान कर्मातीत म्हणोनी । स्वयें सर्वत्र बोलोनी । ज्ञानास धर्म्य कां तो म्हणेल? ॥ १५७ ॥ एवं प्रत्यक्ष विश्व हें भासतें । ज्या ज्ञानें सगुणरूपचि दिसतें । प्रत्यक्षावगम त्यास म्हणिजेतें । धर्म्य म्हणावें या लागीं. ॥ १५८ ॥ ऐसें विज्ञानसहित ज्ञान । ज्ञानियास हेंचि सगुणभजन । द्वादशीं धर्म्यामृत म्हणोनी जगज्जीवन । सगुणभक्त

वर्णोनि बोलेल. ॥ १५९ ॥ अष्टादशीं शेवटीं । **गी**ता सगुणपर हा भाव पोटीं। मुखें म्हणेल अगा **किरीटी**! । संवाद माझा तुझा हा धर्म्य. ॥१६०॥ **'अध्येष्यते च य इमं'** या श्लोकेंकरोनी । **'धर्म्यं संवादमावयोः'** म्हणोनी । विश्व सगुणब्रह्म हें ज्ञान यावरूनी । धर्म्य म्हणावें या स्थळीं. ॥ १६१ ॥ सगुणभक्त ऐसे ज्ञानी । **अर्जुना**! हा भाव हृदयीं धरोनी । **'एवं सततयुक्ता ये'** या श्लोकें करोनी । हे थोर कीं ते थोर द्वादशीं पुसेल. ॥ १६२ ॥ या प्रसंगाचेंचि उद्धाटण[1] । तेथें करोनि **जगज्जीवन** । अंतीं हें धर्म्यामृत म्हणोनि वचन । द्वादशीं या भावेंचि बोलेल. ॥ १६३ ॥ निर्गुणज्ञानाचा मुकुट । हें सगुण ज्ञान उत्कट । त्याज्यांश जेथें नुरे निपट । **रामकृष्णरूपें** तैसें चराचर पाहतां. ॥ १६४ ॥ समुद्रांत उठला कल्लोळ । त्या कल्लोळीं समुद्राचेंचि जल । जो त्याचा आकार त्याचेंही मूळ । कैंचें सागरावेगळें. ॥ १६५ ॥ तरंगां प्रकाशी सागर । ब्रह्म प्रकाशी चराचर । माया जे चराचराकार । ब्रह्मचि मूळ तीचेंही. ॥१६६॥ बीज आणि अंकुर । दोनी मिळोनि जाला तरुवर । तैसें ब्रह्ममाया मिळोन चराचर । प्रत्यक्ष **भ**गवद्रूप हें. ॥ १६७ ॥ बीजा अंकुरा वेगळेपण । तेंवी वेगळी माया आणि निर्गुण । दोनी पृथक् आणि एकपण । प्रत्यक्ष **भ**गवद्रूप हें. ॥ १६८ ॥ ऐसें जें कां अत्यंत । **भ**गवद्भक्तिरूप अद्वैत । धर्म्यपदें **भ**गवंत । उपपादितो. ॥ १६९ ॥ धर्म्य नांव या ज्ञानाचें । महत्व सर्वांहून याचें । या अध्यायमुखें वर्णी साचें । अन्यत्र ऐसी प्रशंसा करीना. ॥ १७० ॥ **गी**तेंत हेंच ज्ञान थोर । हेचि भक्ति वर्णी सादर । म्हणोनि अष्टादशीं **स**र्वेश्वर। अवघाच धर्म्यसंवाद हा म्हणे. ॥ १७१ ॥ **गी**तेंत आहे कर्मकांड । तेथें धर्मही बोलिला उदंड । परि प्रतिअध्यायांतीं अखंड । **'उपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे'** च म्हणतसे. ॥ १७२ ॥ घरीं कुणबी आणि कुणबिणी । परि ब्राह्मण घरचा धनी । तें ब्राह्मणगृह ऐसीच वाणी । सर्वांची निवतसे. ॥ १७३ ॥ तैसें **गी**तेंत संकळ । परि अध्यात्म आद्यंत पुष्कळ । त्यांत ब्रह्म बोलोनिही निष्कल[2] । अतिशय महिमा याच सगुणज्ञानाचा. ॥ १७४ ॥ आतां धर्म्यपदाचा निर्णय । बहुत बोलोनि काय? । निर्गुण तों बोलिलें न जाय । ज्ञान धर्म्यपदेंकरूनी. ॥ १७५ ॥ एक सगुणज्ञानेंच घडे । कीं लागे पुण्यकर्माकडे । तरी कर्मप्रशंसा न सांपडे । या प्रकरणीं सर्वथा. ॥ १७६ ॥ आणि ज्या **अर्जुना**प्रती । हें ज्ञान बोलतो **श्री**पती । तो विश्वरूपीं प्रथमश्लोकीं वि-

---

१. स्पष्टीकरण. २. सर्व.

नंती । काय करितो? ॥ १७७ ॥ कीं माझ्या अनुग्रहाकारणें अत्यंत । गुह्य अध्यात्मसंज्ञित । जें बोलिलासि तूं भगवंत । त्याणें गेला माझा मोह हा. ॥ १७८ ॥ येथें धर्माची कां कथा । धर्म्यपदें निर्गुणही नव्हे सर्वथा । सगुणज्ञानावांचोनि अन्यथा । न लागे हें धर्म्यपद. ॥ १७९ ॥ आतां या श्लोकीं कमलनेत्र । म्हणतो हें उत्तम पवित्र । तरी पवित्र पदार्थ मात्र । ज्ञानासारिखा असेना. ॥ १८० ॥ **'नहि ज्ञानेन सदृशं'** या श्लोकें करोनी । ज्ञानासारिखें पवित्र नाहीं म्हणोनी । मागें श्रीकृष्ण बोलिला यावरूनी । पवित्र शब्दें सोंवळें जें नातळे द्वैतातें. ॥ १८१ ॥ पवित्र उगेंचि ज्ञान निर्धर्म । आणि हें पवित्र म्हणे उत्तम । कीं माया म्हणावें स्थावर जंगम । हेंही जेथें असेना. ॥ १८२ ॥ हे राजविद्या राजगुह्य परम । हें पवित्र उत्तम । हें ज्ञान प्रत्यक्षावगम । आणि धर्म्य यालागीं. ॥ १८३ ॥ ऐसें श्रेष्ठत्व याचें तीं चरणीं । आयकोनि अर्जुन अंतःकरणीं । भ्याला कीं षष्ठीं योगप्रकरणीं । मनोनिग्रह कठीण वाटला. ॥ १८४ ॥ तें मी बोलिलों याप्रती । तेथें वैराग्य अभ्यास हा जगत्पती । उपाय सांगोनि म्हणे मागुती । कीं योग मनोनिग्रहावांचूनि असाध्य. ॥ १८५ ॥ त्या सकळां योगाहूनि । हें ज्ञान थोर म्हणोनि । मज म्हणतो यावरोनी । साधन याचें कठीण असेल. ॥ १८६ ॥ अर्जुन ऐसा शंकला मनीं । तों देव मंद हास्य करोनी । **'सुसुखं कर्तुं'** म्हणोनी । या पांचा अक्षरीं बोलतसे. ॥ १८७ ॥ कीं उपजोनिही वैराग्य । अभ्यास करी सभाग्य । तथापि त्यास वाटे अभाग्य । प्रत्यक्ष हें दिसतसे. ॥ १८८ ॥ कीं वाटतां फुलांचा हार । संतोष वाटे अपार । पूर्वसंस्कारें सर्पाकार । भासतां भयें तोचि कांपे. ॥१८९॥ गारोडियास हार । सुखावह आणि सर्पाकार । भय न करी म्हणोनि लावितां कर । सुखस्पर्श हार तो साच लागे. ॥ १९० ॥ हें प्रत्यक्षही वासुदेव । स्वयें दिसतो देवाधिदेव । हें समजला तो स्वयमेव । हें प्रत्यक्ष सकळही. ॥ १९१ ॥ ज्यास ऐसा प्रत्यक्ष अवगम । त्यास तो पूर्वोक्त योगही सुगम । हें पुढिल्या अध्यायीं पुरुषोत्तम । बोलेल या श्लोकीं. ॥ १९२ ॥

उत्तराध्यायश्लोक—**'एतां विभूतिं योगं च मम यो वेत्ति तत्त्वतः ।
सोऽविकंपेन योगेन युज्यते नात्र संशयः ॥'**

हे माझी विभूती । आणि योग माझा बरवे रीती । जो जाणेल त्याची वृत्ती । योजेल योगीं न कांपतां. ॥ १९३ ॥ पुढें टीका होईल सविस्तर । येथें बोलणें हेंचि सार । कीं योगीं वृत्ति होय स्थिर । अनायासें करितां.

॥ १९४ ॥ म्हणोनि हा उत्तराध्यायश्लोक । बोलेल ऐसा उत्तमश्लोक । कीं हे महर्षि सप्त चत्वारि सनकादिक । विभूति माझी. ॥ १९५ ॥ आणि बोलेल **'पश्य मे योगमैश्वरं'** म्हणोनी । नवमाध्यायीं ईश्वरत्व योग स्वमुखें करोनी । हे विभूति आणि तो योग जो ज्ञानी । तत्त्वतां जाणेल. ॥ १९६ ॥ तो अविकंपयोगें करोनी । योजेल येथें संशय नसे म्हणोनी । म्हणे कीं चित्त स्वरूपीं लागोनी । न कांपे अविकंपयोग तो म्हणावा. ॥ १९७ ॥ षष्ठाध्यायांत अर्जुन । दुर्निग्रह म्हणूनि म्हणे मन । तरी सगुण भक्तीवांचून योग कठिण । या भावें श्रीकृष्णही बोलिला. ॥ १९८ ॥ ते सगुणभक्ति ज्ञानहीन । अविद्यायुक्त तिचें भजन । परि त्या भक्तीनें होणार आत्मज्ञान । त्या ज्ञानें सगुणज्ञान हें उमजे. ॥ १९९ ॥ या सगुणज्ञानाचें नांव योग ऐश्वर । कीं ईश्वरत्व योग हें चराचर । तें जो जाणेल म्हणे सर्वेश्वर । तो अविकंपयोगें योजेल. ॥ २०० ॥ तंतुरूपें पाहणें पट । मृत्तिका मात्र पाहणें घट । ब्रह्मचि विश्व निर्पट । हा योग बाणे या ज्ञानें. ॥ २०१ ॥ आत्मा तंतु सत्यत्वें पहावा । जड पटाकार मिथ्यत्वें त्यजावा । हें येथें नसे परि चित्प्रकाशें भजावा । चराचररूपें भगवंत. ॥ २०२ ॥ त्या चित्प्रकाशाविण । न कळे हें ज्ञान सगुण । तेव्हां अनायासें बाणे खूण । त्या योगाचीही. ॥ २०३ ॥ एवं तो योग या ज्ञानें बाणे । आणि मग या योगेंचि हें ज्ञान जाणे । प्रत्यक्ष भगवद्रूप या खुणें । जो पावला. ॥ २०४ ॥ या ज्ञानाचा प्रताप । ऐसा कीं जड जग दिसे भगवद्रूप । तेव्हां अनायासें चित्स्वरूप । पटीं तंतू ऐसें जडीं ब्रह्म दिसों लागे ॥ २०५ ॥ तेव्हां न करितां कष्ट । साधन न लगे उत्कृष्ट । निर्गुण विश्वरूपें स्पष्ट । दिसे तें सगुणज्ञान हें धर्म्य प्रत्यक्ष. ॥ २०६ ॥ **'सुसुखं'** म्हणजे अतिशय सुख । जेथें साधन यत्न न दिसे दुःख । जें तें **'विश्वतोमुख'** । भगवद्रूप प्रत्यक्ष हें. ॥ २०७ ॥ प्रत्यक्ष भगवद्रूप हें ज्ञान । जालें परि करावें जतन । त्यासही म्हणे कृपाळू कमलनयन । **'सुसुखं कर्तुं'** म्हणोनी. ॥२०८॥ जरी विश्वात्मअन्वययोगाविण । हें प्रत्यक्ष धर्म्य ज्ञान सगुण । नोहे परि तेही जडचैतन्य एकत्वखूण । या ज्ञानेंचि दृढ बाणते. ॥ २०९ ॥ याविषयीं उत्तमश्लोक । उत्तराध्यायांत बोले जो श्लोक । त्याचा निर्णय सुज्ञ लोक । पूर्वापर विचारदृष्टी पाहोत. ॥ २१० ॥ आतां प्रत्यक्ष हें जें दिसे । हेंचि धर्म्यज्ञान असे । तरी हें प्रत्यक्ष नाशतें ऐसें । शोधक कोणी म्हणती ये स्थळीं.

---

१. अतिशय, पुष्कळ.

॥ २११ ॥ हें सर्वज्ञशिखामणी । जाणोनि म्हणे चक्रपाणी । शेवटीं श्लोकाचिया चतुर्थचरणीं । म्हणे कीं हें अव्यय. ॥ २१२ ॥ अव्यय म्हणजे नव्हे जें नाशवंत । आणि हें तरी नासोनि असे उपजत । आणि अव्यय म्हणतो भगवंत । तेव्हां युक्तीनें हें साधावें. ॥ २१३ ॥ जें कालचें मृगजळ । तें आजचें दिसे पुष्कळ । तैसें भगवद्रूप हें केवळ । आविर्भाव तिरोभाव दावितें. ॥ २१४ ॥ दृष्टी दिसे देव । त्यास म्हणावें आविर्भाव । न दिसे तेव्हां तिरोभाव । पावला म्हणावें. ॥ २१५ ॥ रासक्रीडा प्रथम राती । गोपी गर्व करितां जगत्पती । अंतर्धान पावोन मागुती । प्रगट जाला. ॥ २१६ ॥ तैसेंचि विश्व पावोनि लय । पुन्हा पावतां उदय । तेंचि म्हणावें हें अव्यय । प्रत्यक्ष हें. ॥ २१७ ॥ येथें हें प्रत्यक्षचि अव्यय । कृष्ण म्हणतो हा पोटीं निश्चय । समजोनि धरी धनंजय । कीं प्रश्न करील ऐसाच विश्वरूपा. ॥ २१८ ॥ **'मन्यसे यदि तच्छक्यं'** या श्लोकें करोनी । **'दर्शयात्मानमव्ययं'** म्हणोनी । अव्यय देह आपला दावी याचि वरोनी । विश्वरूपास हाही अव्यय म्हणेल. ॥ २१९ ॥ की चित्स्वरूप कळलें खरें । परि विश्वरूप न दिसे बरें । म्हणोनि हेंचि जग पाहेल आदरें । दिव्यचक्षू करोनि. ॥२२०॥ एवं प्रत्यक्ष हें स्वयें पुरुषोत्तम । म्हणोन या ज्ञानाचें नांव प्रत्यक्षावगम । हें अव्यय म्हणोनि सर्वोत्तम । हें ज्ञानही अव्यय म्हणतसे. ॥ २२१ ॥ ज्ञान तेंचि ज्ञेय । तेंचि ज्ञाता हा निश्चय । एक अविद्या जातां अव्यय । सर्वेही. ॥ २२२ ॥ हा सकळ जगाचा लय उदय । परि. शरीरें नाशती हा निश्चय । तो देह पुन्हा नये तेव्हां अव्यय । कैसें म्हणावें ? ॥ २२३ ॥ तरी नाचत नाचत नट । पांघरला असे जो पट । [२]घुंगट घेवोनि निपट । बायको स्वशरीरचि दाखवी. ॥ २२४ ॥ तेव्हां ते बायको उपजली । पदर काढितां मागुतीं मेली । पुनः घुंगट घेतां जन्मली । काय ते म्हणावी ? ॥ २२५ ॥ अवघें मिळोन तो नट । किंवा त्याचा तो पट । दोहींची जे खटपट । ते ही तो नट आणि तो पटचि त्याचा. ॥ २२६ ॥ गर्भापासोनि जों स्मशान । आपणास आपण जो जगज्जीवन । कल्पून दावी होऊनि जननयन । स्वयेंचि पाहे. ॥ २२७ ॥ या धर्म्यज्ञानरज्जूवरी । अविद्या सर्प निर्माण करी । जन्ममरण षड्भाव कूसरी । सत्यत्वें जग दोरीच दाविते. ॥ २२८ ॥ ते ही शक्ति त्याची । त्याच्या प्रकाशाविण ते कैंची ? । परि ते जों आहे तों साची । संसारबाधा आणि

---

१. नाहींसा होणें. २. पांघरुण, बुरखा.

जीवत्व जीवातें. ॥ २२९ ॥ एवं हें ज्ञान म्हणतां अव्यय । भाव इतका समजे धनंजय । पिकलें पीक अतिशय । भाग्याचें जयाचिया. ॥ २३० ॥ परि एक उपजली शंका । ते तत्काळ कळली श्रीवत्सांका । म्हणोनि पुढिलिया श्लोका । बोलों पाहे. ॥ २३१ ॥ सुखसाध्य अत्यंत हें ज्ञान । जें सांगों पाहतो कमलनयन । तरी कां मृत्युमुखीं सर्वजन । दीसती? ॥ २३२ ॥ त्यांत केवळ मूढ अंध । ते वेदशास्त्रांचा नेणतीच कीं गंध । जे वाचिती वेद शास्त्र पुराण प्रबंध । कां तेही पडती मृत्युमुखीं? ॥ २३३ ॥ हा दयालु जगत्पती । वेदीं शास्त्रीं या ज्ञानरीती । बोलिला असे तें जे वाचिती । ते कां पडती मृत्युमुखीं? ॥ २३४ ॥ हा अर्जुनाचा भाव । समजोनि उत्तर देतसे देव । कीं स्वघात स्वयमेव । ते लोक करिती. ॥ २३५ ॥ कीं ज्याच्या प्राप्तीस जें द्वार । त्या द्वारें न जाती पामर । म्हणोनि मृत्युमुखीं पडती नर । हें सर्वेश्वर बोलतो या श्लोकीं. ॥ २३६ ॥

**अश्रद्दधानाः पुरुषा धर्मस्यास्य परंतप ।**
**अप्राप्य मां निवर्तंते मृत्युसंसारवर्त्मनि ॥ ३ ॥**

अगा! या ज्ञानाचा धर्म । म्हणिजे या ज्ञानप्राप्तीस मार्ग सुगम । त्याची अश्रद्धा ज्यास त्यातें दुर्गम । कैसें नव्हे ज्ञान हें? ॥ २३७ ॥ ज्या धर्में हें ज्ञान । पाविजे तेंचि याचें साधन । त्या धर्माचे अश्रद्दधान । श्रद्धाहीन केंवी यातें पावती? ॥ २३८ ॥ चहूंकडोनि कांटे । कल्पवृक्षास पावणें ज्या एकेच वाटे । त्या वाटे न जातां केंवी भेटे । तो कल्पवृक्ष? ॥२३९॥ जरी म्हणों मार्ग चुकले । नेणोनि सर्वांस मुकले । तरी वेद शास्त्र पुराणें शिकले । भागवतधर्म काय ठाउके नसती? ॥ २४० ॥ एक श्रीकांत सर्वेश्वर । नव्हती मुक्तिप्रदा देवता इतर । ऐसे अव्यभिचार भजनीं तत्पर । होती तरी या धर्मेंच मज पावती. ॥ २४१ ॥ मीच राजविद्याराजगुह्यस्वरूप । मीच प्रत्यक्ष आणि प्रत्यक्षावगम बोधरूप । नानारूप मीच अरूप । असें आपणा आपण कल्पूनी ॥ २४२ ॥ त्या मातें पावणें अर्जुना! । हेंच कीं पावणें या ज्ञाना । तरी याच्या धर्मानुष्ठानाविना । प्राप्त नव्हे हें ज्ञान मद्रूप. ॥ २४३ ॥ या भावें म्हणे सर्वेश्वर । कीं याच्या धर्माचे अश्रद्दधान नर । मातें न पावोनि पामर । मृत्युसंसारमार्गीं परतती. ॥ २४४ ॥ ज्यास जें ठाउकेंच नाहीं । तो अश्रद्दधान म्हणवेना कांहीं । एवं भागवतधर्म जाणोनिही । अश्रद्दधान जे श्रद्धा न धरिती. ॥ २४५ ॥ आणि याच्या धर्माचे अश्रद्दधान । म्हणजे प्रस्तुतीं बोलों पाहतो जें ज्ञान । ते या

ज्ञानाच्या धर्माचे अश्रद्धधान जन । ते मातें न पावोनि मृत्युसंसारमार्गीं परतती. ॥ २४६ ॥ म्हणिजे प्रत्यक्ष स्थावर जंगम । हेंचि मी ऐसा अवगम । हा न होतां प्रत्यक्षावगम । मृत्युसंसारमार्ग हेंचि प्रत्यक्ष. ॥ २४७ ॥ आतां **'निवर्तंते'** म्हणिजे परतती । तरी काय पावोनि फिरती मागुती? । मृत्युसंसारमार्गीं पहिलेच असती । परतती ते कैसे? ॥ २४८ ॥ हा संदेह तरी उत्पन्न होता । कीं अश्रद्धधान जरी न म्हणता । आणि याच्या धर्मांचे अश्रद्धधान तत्त्वता । हेंही बोले. ॥ २४९ ॥ कीं या ज्ञानातें पावला । तो तों अमृतचि प्याला । मृत्युसंसारमार्गीं त्याला । परतणें कैचें? ॥ २५० ॥ आतां मृत्युसंसारमार्गीं असती । परि अमृत पावेल जेथें सुमती । त्या गृहाच्या द्वारास पावती । आणि परतती अमृत येथें नसेल म्हणोनी. ॥ २५१ ॥ गीता भारत भागवत । यांत या ज्ञानप्राप्तीचे धर्म विहित । ते वाचोनि आयकोनि म्हणती यांत । काय आहे म्हणोनी. ॥ २५२ ॥ नेत्रीं रोग केवळ । पिंवळा दिसे चंद्र उज्ज्वळ । ताका-सारिखेंचि दूध धवळ । ज्यास वाटे. ॥ २५३ ॥ इतरदेवतापूजन । आणि भागवतधर्मं भगवद्भजन । समान मानूनि ते जन । श्रद्धा न धरिती या ज्ञान-प्राप्तिधर्मांची. ॥ २५४ ॥ अमृतसत्रद्वारास जाती । आणि कांजीच असेल मानिती । आणि अन्यत्र जाऊनि कांजीच पिती । जे पीतचि होते सर्वदा. ॥ २५५ ॥ तथापि अमृतप्राप्तीचें द्वार । पावोनि परतले म्हणावे ते नर । ऐसे परतती म्हणे सर्वेश्वर । अश्रद्धधान या ज्ञानप्राप्तिधर्मांचे. ॥ २५६ ॥ येथें अगा! परंतप! म्हणोनी । बोले अर्जुनातें आळवूनी । गहनभाव हृदयीं धरोनी । परंतप म्हणतसे. ॥ २५७ ॥ कीं पर जे वैरी । त्यांतें युद्धीं संताप करी । त्यातें संस्कृत वैखरी[2] । परंतप म्हणतसे. ॥ २५८ ॥ तरी शत्रुसंहारकर्म । क्षत्रि-याचा स्वधर्म । तें कृष्णार्पण करितां तुटे भ्रम । कृष्णप्रसादें अविद्येचा. ॥ २५९ ॥ हें तृतीयाध्यायीं कळलें वर्म । कीं विना कृष्णार्पण इतर कर्म । बंधक, म्हणोनि जो जो स्वधर्म । तो या कृष्णास अर्पावा. ॥ २६० ॥ **'यज्ञार्था-त्कर्मणोऽन्यत्र'** । या श्लोकीं बोलिला कमलनेत्र । कीं कृष्णार्पणाविण कर्म-मात्र । बंधक म्हणोनी. ॥ २६१ ॥ शत्रुसंतापरूप कर्म । भगवंतीं अर्पितां भागवतधर्म । जाणि भगवंत तोचि सगुणब्रह्म । कृष्णरूपें हा अवतरला. ॥ २६२ ॥ हें चतुर्थाध्यायांत अर्जुन । समजला जेथें कमलनयन । **'परि-त्राणाय साधूनां'** इत्यादि वचन । स्वावतारविषयीं बोलिला. ॥२६३॥ सप्तमीं

---

१. ज्ञान. २. वाणी, भाषा.

इतरदेवताराधन । नश्वर फलाचेंचि साधन । अनंतफल **अनंताचेंच** भजन । हेंही **अर्जुन** समजला. ॥२६४॥ **'कामैस्तैस्तैर्हृतज्ञाना: । प्रपद्यंतेऽन्यदेवताः'** म्हणोनि **अर्जुना!** । बोलिला इत्यादि श्लोकरचना । बिंबली हृदयीं **अर्जुनाच्या.** ॥ २६५ ॥ अष्टमीं मातें स्मरोनी । युद्ध करीं म्हणोनी । **'तस्मात्सर्वेषु कालेषु'** या श्लोकें करोनी । तें दृढ धरिलें मनीं **अर्जुनें.** ॥ २६६ ॥ कीं सर्वदा यातें स्मरणें । आणि स्वधर्म युद्ध हें करणें । आणि स्वधर्म समर्पणें । चरणीं याचिया. ॥ २६७ ॥ आणि देवता सर्वांत । थोर हा **भगवंत** । या भावें स्वधर्मविहित । समर्पणें चरणीं याचिया. ॥ २६८ ॥ सर्वांत थोर **नारायण** । म्हणोनि या भावें स्मरोनी समर्पण । स्वकर्माचें करणें हें प्रथम लक्षण । **भागवतधर्माचें.** ॥ २६९ ॥ हे **भागवतधर्मपदवी** । **जनकरायास** नव योगियांत कवी । श्रीमद्भागवतीं बोलिला बरवी । या श्लोकें करोनी. ॥ २७० ॥

एकादशस्कंधश्लोक—**'कायेन वाचा मनसेंद्रियैर्वा**
**बुद्ध्यात्मना वानुसृतस्वभावात् ।**
**करोति यद्यत्सकलं परस्मै**
**नारायणायेति समर्पयेत्तत् ॥'**

श्लोकार्थ—कवी म्हणे **भागवतधर्म** । राया! पुसतोसि तरी सकळ कर्म । **नारायणाकारणें** समर्पावें हें वर्म । **भागवतधर्माचें.** ॥ २७१ ॥ काया वाचा मन इंद्रियें बुद्धी । ज्या ज्या करितां ज्या ज्या कर्माची समृद्धी । अथवा अहंकारेंही कर्मसिद्धी । अनुसरला संस्कार त्यास्तव. ॥ २७२ ॥ ऐशा ज्या ज्या करितो क्रिया । त्या त्या **नारायणाकारणें जनकराया** । अर्पण कराव्या **नारायणा देवराया** । सर्वांत थोर ऐसें स्मरोनी. ॥ २७३ ॥ **'परस्मै नारायणायेति । समर्पयेत्'** ऐसें पदापुढें पद योजी सुमती । आणि बोले **जनकरायाप्रती** । कीं सर्वांत थोर **नारायण** म्हणोनि अर्पावें. ॥ २७४ ॥ या श्लोकीं आत्मशब्दें अहंकार । अनुसृतस्वभाव म्हणिजे पूर्वसंस्कार । जो निरहंकार त्यासही हा प्रकार । कर्मसमर्पणीं बोलिला. ॥ २७५ ॥ कीं काया वाचा इंद्रियें । मनाच्या संकल्पें बुद्धिनिश्चयें । कर्म करिती कांहीं स्वयें । करीत नाहीं. ॥ २७६ ॥ कर्तृत्व मानी अहंकार । त्यावेगळा आत्मा कळला निर्विकार । तो अकर्ता परि पूर्वसंस्कार । अनुसरला असे बुद्धीतें. ॥ २७७ ॥ **'अनुसृतस्वभावात्'** या वचनें करोनी । हा अर्थ दावी वदोनी । उगेंचि अनुसरल्या संस्कारें म्हणोनी । अर्थ येथें न वदवे. ॥ २७८॥ कीं उगाच काडिया मोडी । कीं उगाच रेघा ओढी घेऊनि काडी । उगाच

दांतें नखें तोडी । बुद्धिपूर्वक नव्हे हें कर्म. ॥ २७९ ॥ कोणी जे ते कीं जे ते कीं म्हणोनी । इत्यादि वृथा शब्द प्रतिवचनीं । बोलती लटक ऐसी वाचेची जनीं । बुद्धिपूर्वक नव्हे हेंही. ॥ २८० ॥ हा अनुसृतस्वभाव[1] । म्हणोनि जरी काढावा भाव । तरी तेंही काया वाचा मन इंद्रियांत सर्व । कर्म आढळे. ॥ २८१ ॥ बुद्धिपूर्वक कर्मे न होती । तथापि काया वाचा इंद्रियेंचि तीं करिती । अर्थ अन्यथा कोणे रीती । न योजे येथें. ॥ २८२ ॥ निरहंकारियासही अहंकारें । आत्मविस्मृतींत पूर्वसंस्कारें । मी कर्ता वाटे तें याप्रकारें । अबाधित अर्थ अनुसृतस्वभावाचा. ॥ २८३ ॥ तें असो या प्रस्तुतीं । **'परस्मै नारायणायेति'** म्हणोनि ये रीती । कर्मे समर्पावीं ऐसें जनकाप्रती । कवी वडील नव योगियांत तो बोले. ॥ २८४ ॥ हें समजला अर्जुन । कीं सर्वांत थोर हा कमलनयन । स्वधर्म यास अर्पूनि नमन । सर्वदा यातें करावें. ॥ २८५ ॥ प्रथम भागवतधर्म । कीं कृष्णचरणीं समर्पावें कर्म । परि हा सर्वांत थोर हें वर्म । **'परस्मै नारायणायेति'** म्हणजे या प्रकारें. ॥ २८६ ॥ त्यांत अर्जुनाचा स्वधर्म । शत्रुसंहार शौर्यकर्म । इतका अर्थ सगुण ब्रह्म । स्मरोनि म्हणे 'अगा परंतपा!' म्हणोनी. ॥२८७॥ कीं पुढें बोलों पाहतो जें ज्ञान । त्या त्या धर्माचे जे अश्रद्दधान[2] । ते मातें न पावोनि मरण जनन । या संसारमार्गी निघाले. ॥ २८८ ॥ म्हणोनि बोलिलों मी अर्जुना! । तरी झणी वाटेल तुझ्या मना । कीं भागवतधर्म जरी मजही घडेना । तरी मीही पावेना ज्ञान हें. ॥ २८९ ॥ तूं युद्ध स्वकर्म टाकावया । सिद्ध होतासि धनंजया!। आतां परांतें ताप युद्धीं कराया । सिद्ध जालास या गीताश्रवणेंच कीं. ॥ २९० ॥ एवं गीतार्थ तुजला । जेव्हां हृदयांत बिंबला । तेव्हां स्वधर्म अर्पिसील निश्चित मला । ज्या धर्मे ताप शत्रूतें. ॥ २९१ ॥ मज समर्पी सर्व कर्म । तयास घडलेच भागवतधर्म । या ज्ञानप्राप्तीचें वर्म । सांपडलेंचि तुजला. ॥ २९२ ॥ या गूढभावें करोनी । त्यातें परंतप म्हणोनी । स्वमुखें श्रीकृष्ण आळवूनी । बोलावें तें येथोनि बोलेल. ॥ २९३ ॥ एवं बोलों पाहतो ज्ञान । याच्या साधनरूप धर्माचा अश्रद्दधान । होय श्रोता पंडुनंदन । हें मधुसूदन बोलिला. ॥ २९४ ॥ याच्या धर्माचे अश्रद्दधान । ऐसें स्पष्ट येथें बोले कमलनयन । कोणी वाखाणिती कीं श्रद्धाहीन । या ज्ञानाचेच म्हणोनी. ॥ २९५ ॥ नीट अर्थ ऐसा सोडूनी । धर्मशब्दें ज्ञान मानूनी । वाखाणिती या वरोनी । संमत नव्हे तो अर्थ. ॥ २९६ ॥ भागवतधर्म नेणती । ते भ-

---

१. अनुकरण केलेला.　२. श्रद्धाहीन.

ल्तैसी गति कल्पिती । परि एकेपरी घडे हेही रीती । अर्थ वदती जरी तैसा. ॥ २९७ ॥ कीं परम भागवतधर्म । हें ज्ञान जेथें विश्वचि हें सगुणब्रह्म । जरी ऐसें घडे तरी परम उत्तम । संमतचि आम्हां अत्यंत. ॥ २९८ ॥ असो तें आतां ज्ञान विज्ञानसहित । सांगेन तूतें म्हणोनि बोलिला भगवंत । तें दों श्लोकीं अनंत । बोलों पाहतो. ॥ २९९ ॥ त्यांत पुढिलिया श्लोकाचा एक चरण । तेथवरी आदीं ज्ञानाचें विवरण । दुसरिया चरणीं जगद्वंद्यचरण । विज्ञान बोलेल पुढिलिया श्लोकांत. ॥ ३०० ॥ त्याच्या उत्तरार्धेंकरोनी । तें विज्ञानचि सांगेल विवरोनी । प्रस्तुत ज्ञान आरंभोनी । बोलतसे श्लोक ॥ ३०१ ॥

**मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना ।**
**मत्स्थानि सर्वभूतानि न चाहं तेष्ववस्थितः ॥ ४ ॥**
**न च मत्स्थानि भूतानि पश्य मे योगमैश्वरम् ।**
**भूतभृन्न च भूतस्थो ममात्मा भूतभावनः ॥ ५ ॥**

अगा! म्यां हें जग सकळ । व्यापिलें असे पाहें निवळ । जे अव्यक्तमूर्ती केवळ । त्या चित्स्वरूपें करोनी. ॥३०२॥ पुढिलिया श्लोकीं **'पश्य'** म्हणोनी । बोलेल त्या शब्देंकरोनी । पांचां प्रकारें तत्त्व विवरूनी । पाहें पाहें ऐसें पांचाठायीं बोलतो. ॥ ३०३ ॥ पूर्वाध्यायीं अपरोक्ष । अर्जुनास उपदेशी पद्मपत्राक्ष । तो हें पहायास जाला दक्ष । म्हणोनि पाहें पाहें म्हणतसे. ॥ ३०४ ॥ चतुर्थाध्यायांत मागें । ज्ञानार्थ संतवंदनप्रश्नसेवाप्रसंगें । बोलियेलें ऐसें श्रीरंगें । कीं त्या ज्ञानें व्यापका आपणांत सर्व भूतें देखसी. ॥ ३०५ ॥ त्यास अष्टमीं अव्यक्त मूर्तीची खूण । चिदात्मत्वें कळे ऐसा केला निपुण । आतां व्यापक अव्यक्त मूर्ती निर्गुण । पाहें म्हणतसे अपरोक्ष. ॥ ३०६ ॥ **'येन भूतान्यशेषेण'** । या श्लोकीं चतुर्थीं कमलेक्षण । अपरोक्ष साक्षात्कारलक्षण । परोक्षरीती ऐसें बोलिला. ॥ ३०७ ॥ कीं ज्या ज्ञानें करोनी । आपणांत सर्व भूतें देखसी त्यावरोनी । मजसीं ऐक्य देखसी म्हणोनी । शब्दबोधें बोलिला. ॥३०८॥ अष्टमीं **'अक्षरं ब्रह्म'** । या श्लोकीं क्षरातीत आत्मा तोचि ब्रह्म । हा बोध करूनि निर्गुण ब्रह्म । येथें व्यापकत्व त्याचें आदीं दाखवी. ॥ ३०९ ॥ परि म्हणतां म्यां हें व्यापिलें । ज्ञणी चतुर्भुजरूप आपलें । ये स्थळीं पाहेल जें बैसलें । रथीं याच्या एकत्र. ॥ ३१० ॥ आणि म्यां व्यापिलें न म्हणे जरी । गुरु देव याचा मीच हरी । माझें ऐक्यानुसंधान तरी । अंतरेल. ॥ ३११ ॥ आणि आत्मयांत सर्वां भूतांसी । पाहसी तेव्हां ऐक्य मजसी । देखसी ऐसें चतुर्थीं यासी । **'येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि'** ऐसें बो-

लिलें. ॥ ३१२ ॥ तरी हें आणि तें एक । श्रोते समजोत पार्थादिक । ऐसें बोलतो श्रीवत्सांक । **'मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना'** म्हणोनी. ॥ ३१३ ॥ कीं व्यक्ति पावली सगुण मूर्ती । हे चतुर्भुज माझी पवित्र कीर्ती । तेही न दिसे जेथें ऐसी चिदात्मस्फूर्ती । शुद्धशुद्धसत्त्वेंकरोनी. ॥ ३१४ ॥ परि तें सत्त्व आणि तेंचि ब्रह्म । सगुण साकारिलें सधर्म । आतां पाहसी त्या सत्त्वें तेंचि निर्धर्म । तों तेथें नसे व्यक्त हे मूर्ती. ॥ ३१५ ॥ मीच तें शुद्ध चित्स्वरूप । परि अव्यक्तमूर्ति बोलावें अरूप । कीं नाहीं व्यक्त हें अवताररूप । त्या निजस्वरूपीं माझिया अर्थ ऐसा. ॥ ३१६ ॥ कोणी येथें ऐसें म्हणती । कीं अव्यक्तमूर्ति म्हणजे अतींद्रियमूर्ती । ऐसी मूर्ति म्हणजे अमूर्तिस्फूर्ती । ऐसें वाखाणिती हें पद. ॥ ३१७ ॥ तरी जे स्वस्वरूपस्फूर्ती । ते उगीच म्हणावी अमूर्ती । अमूर्तीस म्हणोनि मूर्ती । मूर्तित्वपरिहारार्थ अव्यक्तपद योजावें. ॥ ३१८ ॥ इतके आढे वेढे घेउनी । कां म्हणावें अव्यक्तमूर्ति म्हणोनी । हा बाधित अर्थ यावरोनी । अबाधित अर्थ येथें सूचवी. ॥ ३१९ ॥ अर्थ हाचि कीं म्यां व्यापिलें । म्हणतां पाहेल मूर्तिमंत हें रूप आपलें । तें हें नव्हेचि म्हणतां आलें । भिन्नत्व दोहींसही ॥ ३२० ॥ तरी म्यांच व्यापिलें परी । त्या स्वरूपीं व्यक्त नाहीं मूर्ति बरी । जरी अवतारमूर्ति नानापरी । व्यक्ति त्याच्याच बोलाव्या. ॥ ३२१ ॥ एवं म्यांच त्या अव्यक्तमूर्तीकरोनी । जग सर्व व्यापिलें म्हणोनी । पाहे म्हणतां भगवदैक्य त्यावरोनी । चिदात्मत्व आपलेंचि तो पाहे. ॥ ३२२ ॥ सहज ज्या चिदात्मत्वस्फूर्तिविना । चराचर कांहींच दिसेना । तो अव्यक्तमूर्ति आत्मा अर्जुना । सर्वांभूतीं दिसों लागला. ॥ ३२३ ॥ तंतु न दिसे दृष्टीं । तो काय दिसेल पट सृष्टीं ? । होणेंचि न लगे कष्टीं । सर्वभूतीं आत्मा पाहतां. ॥ ३२४ ॥ व्यापकत्व पार्थ पाहे । याच अनुभवीं गुंतोन राहे । तों देव म्हणत आहे । **'मत्स्थानि सर्वभूतानि'** म्हणोनी. ॥ ३२५ ॥ कीं पाहे व्यापकत्वाकडे । परि अनंतत्वीं दृष्टि न पडे । तृतीय चरणीं हेही दृष्टि उघडे । सर्वभूतें मजमाजीं ऐसें बोलतां. ॥ ३२६ ॥ कीं ब्रह्मांड आवरणासहित । मन धांवे तेथपर्यंत । पुढें धांवतां अत्यंत । तेंचि पंगुत्व अवलंबी. ॥ ३२७ ॥ मनास त्याच्या प्रकाशें मनपण । त्या प्रकाशींच या चराचराची खूण । ऐसें ब्रह्मांडासहित सप्तावरण । आयकोन मन जाणें धांवे तेथवरी. ॥ ३२८ ॥ पर्वताचें उंच शिखर । तेथोनि दृष्टि चाळी नर । तों सूर्यप्रकाशाचे वरी पसर । पसरे त्यांच्या दृष्टीचा. ॥ ३२९ ॥ त्याच तेजें प्रकाशली । त्याच तेजें जग

पाहों लागली । पाहतां तेचि भागली । तेज उरलेंचि तें असे. ॥ ३३० ॥ अनंतत्वाच कारणें । हा दृष्टांत लागला घेणें । हें नव्हे अद्वैत बोलणें । कीं दृष्टांतीं सर्वसाम्य न घडेच. ॥ ३३१ ॥ समुद्राच्या अनंत लहरी । दृष्टि धांवतां त्यांवरी । दृष्टि भागे परि असेच उरी । पुढेंही समुद्राची. ॥ ३३२ ॥ इत्यादि दृष्टांत एकदेशी । प्रस्तुत श्रीकृष्ण उपदेशी । चैतन्य मनीं आणि सर्वदेशीं । सर्वभूतें मजमध्यें म्हणोनी. ॥ ३३३ ॥ तीं सर्वभूतें अर्जुनें । स्वरूपीं पाहतां मनें । अनंतत्व अनुभवितां जगज्जीवनें । पुढें बोलों आरंभिलें. ॥ ३३४ ॥ कीं ज्ञणी आकाशीं भूतें जैशीं । चित्स्वरूपीं जडें पाहे तैशीं । किंवा जळीं भिजलीं वस्त्रें ऐशीं । व्यापका परि भिन्नत्व. ॥ ३३५ ॥ या भेदाचा परिहार । करी चतुर्थचरणीं जगदुद्धार । कीं मजमाजीं आहेत भूतें चराचर । परि त्या भूतांत मी असेना. ॥ ३३६ ॥ सर्वांत व्यापकता प्रथम बोलोनी । तीं मजमध्यें आहेत हें अंगीकारोनी । आतां मी त्यांत नाहीं म्हणोनी । बोलतां विरोध अत्यंत. ॥ ३३७ ॥ हें बोलिला सर्वेश्वर । ज्या युक्तीनें घडे विरोधपरिहार । त्या युक्तीचा करोनि विचार । एकवाक्यता साधावी. ॥ ३३८ ॥ आतां भूतें मजमाजीं असती । परि मी नसें तयां भूतीं । जैसे फेस उदकीं तरंगती । परि उदक नसे तया फेंसांत. ॥ ३३९ ॥ ऐसें कोणी बोलती । म्हणोनी हेचि अंगीकारावी रीती । तरी येथेंचि म्हणतो जगत्पती । कीं तीं भूतेंही नसती मजमध्यें. ॥ ३४० ॥ जरी फेंसही ज़ळीं नसे । तरी हा दृष्टांत युक्त असे । आतां फेंस जळाबाहेरही गवसे । परि तो जळीं नाहीं म्हणावा. ॥ ३४१ ॥ तरी भूतें मजमाजीं असती । हें जें बोलिला जगत्पती । विरोध येतसे त्याप्रती । वचन सर्वज्ञशिखामणीचें तेंही कीं. ॥ ३४२ ॥ आतां दृष्टांत साधेल तरी । कीं सोडोनि गोष्टी तिसरी । धरावी पहिली आणि दुसरी । कीं भूतें मजमाजीं मी भूतीं असेना. ॥ ३४३ ॥ उरली गोष्टी तिसरी । ते वेगळीच साधावी बरी । हे युक्त वाटे संतांस जरी । तिहीं संतीं दृष्टांत वेगळेच कां न बोलावे ? ॥ ३४४ ॥ सर्वभूतें मजमाजीं । घटांत जैसी भरली असे कांजी । मी नसें त्या भूतांच्या समाजीं । जैसा घट नसे कांजींत. ॥ ३४५ ॥ दोहीं गोष्टींस एक दृष्टांत घडे । तिसरीस तो दृष्टांत उडे । तरी एकचि दृष्टांत एकीचकडे । लागे आणि दोंकडे न लागे न लागो. ॥३४६॥ ऐसा बोलतां अर्थ । होतो सर्वही अनर्थ । तीनी गोष्टी बोलिला समर्थ । कीं तिहीं गोष्टींत तत्त्व एक जाणावें. ॥ ३४७ ॥ एवं च तीनी गोष्टी । न साधतां एक दृष्टांत दृष्टी । अर्थ न लागे वृथा कष्टी । वैखरी करावी किमर्थ ? ॥ ३४८ ॥

आतां ते थोर त्यांचा भाव । न कळे म्हणावा तरी देवाधिदेव । जें गूढ बोलिला स्वयमेव । भाव त्याचा कैसा उकलतो ? ॥ ३४९ ॥ शोधकांसही न कळे अर्थ । तरी टीका करावी किमर्थ ? । एवं उदंड जाले समर्थ । तरी विना अनन्यभक्ति हें न कळे. ॥ ३५० ॥ पूर्वश्लोकीं पुरुषोत्तम । बोलिला कीं या ज्ञानप्राप्तीचे धर्म । टाकितां न सांपडे हें प्रत्यक्षावगम । धर्म्यज्ञान विज्ञानसहित जें. ॥ ३५१ ॥ जे मंगलाचरणीं । लागती इतर देवतांचे चरणीं । त्यांस भगवंताचे जगद्वंद्यचरणीं । कैचें अनन्यभक्तित्व ? ॥ ३५२ ॥ द्वारचि ज्याचें न सांपडे । त्या गृहांतील निधि केंवी ठायीं पडे ? । या ज्ञानाचें कवाड उघडे । अनन्यचरणशरणातें. ॥ ३५३ ॥ आतां असो ते काहणी । प्रस्तुत काय वदे भगवद्वाणी । मजमाजीं भूतें म्हणे चक्रपाणी । परी त्या भूतीं मी नसें. ॥ ३५४ ॥ आणि मजमाजींही तीं भूतें । नाहींत पाहें म्हणे अर्जुनातें । या तिहीं विरुद्ध गोष्टीस होतें । एकवाक्यत्व एकाच दृष्टांतें. ॥३५५॥ सागरीं जेवीं कल्लोळ । तैसे मजमाजीं भूतांचे खेळ । कोटि कोटि ब्रह्मांडगोळ । मजमाजीं ऐसे. ॥३५६॥ किंवा किरणीं जैसें मृगजळ । नानानगीं कनक केवळ । कीं रज्जूंत जैसा व्याळ । तैसीं भूतें विवर्तरूपें अधिष्ठानीं मजमाजीं. ॥३५७॥ परि तरंगीं नसे सागर । कीं तो तरंग सागराचेंच नीर । उदय लय पावती आकार । ते कैंचे कीं त्यांत सिंधु असे ? ॥ ३५८॥ एकचि पाहतां जल । सिंधु आणि त्याचे कल्लोळ । तरंगाकारें दिसे लोळ । नाहींच तो. ॥ ३५९ ॥ एवं सागरीं तरंगाकार । तरंगीं नसे सागर । तैसें मजमाजीं चराचर । त्या चराचरीं मी नसें. ॥ ३६० ॥ किरणांत पाणी दिसे । परि किरणप्रभा त्यांत नसे । कीं किरणावांचोनि न गवसे । वेगळें सत्यत्वें किमपिही. ॥ ३६१ ॥ तेव्हां मृगजळीं नसती किरण । तैसेंच भूषणीं नसे सुवर्ण । कीं सुवर्ण तों पीतवर्ण । आकार नसती तया वेगळे. ॥ ३६२ ॥ सर्प रज्जूंत भासे । परि तो रज्जू त्या सर्पीं नसे । कीं रज्जू कळतां जरी तो दिसे । तरी रज्जू त्या सर्पीं होता म्हणावा. ॥ ३६३ ॥ ऐशा दृष्टांताच्या कोटी । श्रीकृष्ण धरूनि पोटीं । म्हणे भूतें मजमध्यें किरीटी । परि त्या भूतीं मी नसें. ॥ ३६४ ॥ ऐसें बोलिला हरी । तों शंका उपजली यावरी । कीं भूतें मिथ्या म्हणोनि जरी । त्यांत मी नाहीं म्हणतसे. ॥ ३६५ ॥ तरी जीं मिथ्या तीं मजमाजीं असती । हें विरुद्ध बोलिला जगत्पती । ऐसी म्हणे जों अर्जुनाची मती । तों म्हणे भूतेंही नसतीं मजमध्यें. ॥ ३६६ ॥ मजमाजीं सर्व असती या बोलें । अर्जुना यालागीं बोलिलों पहिलें । कीं हीं भूतें म्हणोनी होतें आलें ।

प्रतीतीस तुझ्या. ॥ ३६७ ॥ धरून तुझी हे प्रतीती । बोलिलों कीं भूतें मजमाजीं असती । मी भूतीं नसें म्हणोनि मागुती । तीं मिथ्या म्हणोनि आपल्या प्रतीतीनें बोलिलों. ॥ ३६८ ॥ माझी प्रतीति तूतें कळली । तेव्हां भूतें असत्य हे किल्ली आकळली । मग तुझी बुद्धि खवळली । असत्य तरी आहेत हें कां बोलिलासी ? ॥ ३६९ ॥ तरी माझिया मतें । मीच आहें नाहींत भूतें । मिथ्या प्रतीति याची तूतें । बाणतां गुह्य हें वदलों जें तत्त्व. ॥ ३७० ॥ अगा! एक रज्जूस जाणतो । एक त्यास सर्प म्हणतो । जाणे त्याच्या मुखें बोध बाणतो । कीं सर्प कधींच नव्हता रज्जुंत. ॥ ३७१ ॥ सुवर्णाचें केलें केळ । नेणतां म्हणे कदलीफळ । त्याची प्रतीति धरून केवळ । सुवर्ण सत्य आणि फळ मिथ्या सांगावें. ॥ ३७२ ॥ कीं फळ कदलीचें तुज दिसतें । हें सुवर्णें व्यापिलें सुवर्णाच असतें । परि हें पीतप्रभ सुवर्ण नुसतें । केळांत न असे कीं नाहींच तें केळें. ॥ ३७३ ॥ ऐसें म्हणतां नेणतां । सुवर्णत्वीं जाला जाणता । तो म्हणे केळें नाहीं तत्त्वतां । तरी आदीं आहे कां म्हणावें ? ॥३७४॥ तो या गोष्टीस पावला । तेव्हां केळेंही नाहींच म्हणावें त्याला । पूर्वी आहे म्हणोन या बोला । तुझ्या प्रतीतीनें बोलिलों म्हणावें. ॥ ३७५ ॥ तथापि केळासारिखें दिसे केळ । आणि केळ नाहीं आहे कनक केवळ । त्यास बोध बाणे ऐसा प्रांजळ । ये रीती ब्रह्मीं हीं भूतें. ॥ ३७६ ॥ एवं तत्त्वप्रकार चारी । पाहें म्हणोनि श्रीहरी । दाविता जाला येथवरी । तें ऐसें. ॥ ३७७ ॥ म्यां अव्यक्तमूर्तीनें सकळ । व्यापिलें पाहें निवळ । पटीं विणिलिया प्रतिमा समूळ । व्यापिल्या जैशा तंतूनें. ॥ ३७८ ॥ ऐसें पाहे म्हणोनि पहिलें । व्यापकत्व भूतीं दाविलें । त्या उपरी ऐसें बोलियेलें । कीं मजमाजीं भूतें हीं असती. ॥ ३७९ ॥ मजमाजीं हीं अमितें । पाहें अर्जुना सर्व भूतें । जैसीं विणिलीं प्रतिमाशरीरें बहुतें । तंतूमध्यें दिसती. ॥ ३८० ॥ तंतूंत त्या प्रतिमा नाना । परी तंतु प्रतिमारूपीं असेना । कीं जे पाहसी प्रतिमारूपरचना । ते तंतूच असे. ॥ ३८१ ॥ प्रतिमेचें जें जें गात्र । करचरणादि तें तें आहे तंतुमात्र । तंतूच असे तुझे नेत्र । जे अवयव देखती. ॥ ३८२ ॥ ऐसें पाहतां तंतूचि दिसे । तेव्हा प्रतिमा कैंच्या कीं त्यांत तो असे ? । ऐसी चित्स्वरूपीं[1] दृष्टि वसे । तेव्हां नसेच तें भूतीं कीं भूतेंच नसतीं. ॥ ३८३ ॥ आतां चैतन्याकडे सत्त्वदृष्टी । देऊनि पाहें सर्व सृष्टी । ऐसी करोनि करुणावृष्टी ।

१. चित्स्वरूप.

चौथी गोष्टी बोलतसे. ॥ ३८४ ॥ चौथे गोष्टीचें ये रीती । निमित्त बोलावें कीं भूतें समूळ नसती । म्हणोनि त्यांत नाहीं हा जगत्पती । तरी आहेत म्हणे पहिलें किमर्थ ? ॥ ३८५ ॥ तरी शिष्यदृष्टी अंगीकारोनी । मजमाजीं भूतें म्हणे त्यावरोनी । यालागीं भूतेंही नसती मजमाजीं म्हणोनी । बोले हें निमित्त पूर्वींच बोलिलों. ॥ ३८६ ॥ परंतु **'पश्य'** म्हणिजे पाहें । हा शब्द पांचाठायीं वर्तताहे । भूतें ही मजमाजीं नसती म्हणे हे । गोष्टी चौथी. ॥ ३८७ ॥ अर्जुना ! जो जो आकार । दावी दृष्टी अलंकार । तो तो सोनेंचि निर्विकार । कनकपरीक्षक पाहतो. ॥ ३८८ ॥ तंतूकडे देतां दृष्टी । तंतूचि असे नसे पटप्रतिमा सृष्टी । ये रीती पाहें म्हणे हे चौथी गोष्टी । कीं भूतें नसतींच चित्स्वरूपांत. ॥ ३८९ ॥ ऐसा एक श्लोक एक चरण । दुसरिया श्लोकाचा येथवरी विवरण । सांगे जगद्वंद्यचरण । निर्धर्म निर्गुण ज्ञानाचें. ॥ ३९० ॥ येथवरी जें **'पश्य'** शब्दें पाहें म्हणे । तें बुद्धीनें पाहें म्हणतसे ऐसेंचि बाणे । विषय इंद्रियांसहित अर्जुन जाणे । कीं चित्स्वरूपचि हें जड प्रत्यक्ष. ॥३९१॥ प्रत्यक्ष कांहींच नसे । प्रत्यक्षांत बुद्धीस चित्स्वरूप गवसे । तथापि इंद्रियद्वारा दिसे । भास मात्र बुद्धीतें. ॥ ३९२ ॥ जें चित्स्वरूपाचें लक्षण । त्याहूनि जड हें विलक्षण । जरी मिथ्या म्हणोनि कमलेक्षण । प्रतिपदीं सूचवितो. ॥३९३॥ जड मिथ्या होय परी । शरीर आहे जोंवरी । हा प्रत्यय नव्हे दूरी । तरी उगेंचि काय मिथ्या म्हणावें ? ॥ ३९४ ॥ यास काय म्हणोनि म्यां पहावें ? । ऐसें जों अर्जुनें पुसावें । तों स्वयेंचि बोलिलें देवें । दुसरिया श्लोकीं चरणीं दुसरिया. ॥ ३९५ ॥

द्वितीयचरण—**पश्य मे योगमैश्वरम् ।**

अर्जुना जो भास दिसतो । माझा योग म्हणोनि पाहें सर्व तो । आणि योगही तो म्हणिजेतो । ऐश्वर म्हणोनी. ॥ ३९६ ॥ नसोनि दिसती रूपें नाना । अघटित म्हणावी हे घटना । अघटित घटनेस अर्जुना ! । योग म्हणोनि बोलावें. ॥ ३९७ ॥ आहे सकळ चित्स्वरूप । नसे कांहींच जडरूप । तथापि भास जड भासे हा प्रताप । सामर्थ्याचा माझ्या म्हणावा. ॥ ३९८ ॥ हें मज ईश्वराचें चातुर्य । सामर्थ्य माझें ऐश्वर्य । वेद आणि मुनिवर्य । हेंचि रूप माझें वर्णिती. ॥ ३९९ ॥ **'सहस्रशीर्षा पुरुषः'** । इत्यादि ये विषयीं वेदघोष । मी जो ईश्वर परम पुरुष । तोचि अघटित घटनायोग हा. ॥ ४०० ॥ अत एव याच योगातें मुनी । म्हणती ऐश्वर म्हणोनी । हा योग ईश्वराचेंचि रूप या भावें करोनी । ऐश्वर म्हणावा हा योग. ॥ ४०१ ॥ एवं प्रत्यक्ष

जें दिसे । तें ईश्वराचेंचि रूप असे । म्हणोनि हे प्रत्यक्ष विलास ऐसे । पाहें माझा योग आणि स्वरूप म्हणोनीं. ॥ ४०२ ॥ योग म्हणजे युक्तिचातुर्यप्रकार । तरी योगचि माझे हे अवतार । ऐश्वररूपें हें जैसें तैसें चराचर । ऐश्वररूप माझें हें तूं पाहें. ॥ ४०३ ॥ उगाच मायाभास । त्याज्यांश मानूनि यास । कां पहावें प्रत्यक्षास? । म्हणोनि ईश्वररूप माझें तूं पाहें. ॥ ४०४ ॥ **'योगमैश्वरं'** म्हणोनी । या पांचां अक्षरें करोनी । ईश्वराची योगमाया ऐसेंचि बोलोनी । बहुत गेले. ॥ ४०५ ॥ तरी ईश्वराचा देह । योगमायाच निःसंदेह । हेंचि तेही म्हणती परि स्नेह । सगुणभजनीं बहिरंगें. ॥ ४०६ ॥ म्हणोनि म्हणती स्वयोगमाया । पाहें म्हणतो धनंजया! । कीं प्रत्यक्षावगमबोधास[1] या । ते नाहीं पावले. ॥ ४०७ ॥ पाहें पाहें म्हणोनी । येथवरी निर्गुणतत्त्व दावुनी । पाहें योग ऐश्वर या शब्दें करोनि । म्हणती माया पाहें म्हणतसे. ॥ ४०८ ॥ यांत प्रत्यक्षावगमपण । आणि धर्म्यशब्दें ज्ञान सगुण । याची अणुमात्रही खूण । सांपडली नसे तयांतें. ॥ ४०९ ॥ योग आणि ऐश्वर । या दों शब्दीं सर्वेश्वर । रूप आपलें हें चराचर । पाहें म्हणोनी म्हणतसे. ॥ ४१० ॥ पाहतां दोनी अर्थ । व्याकरणसिद्ध यथार्थ । त्यांत माझें रूप पाहें हा समर्थ । अर्थ त्याहोनि होतसे. ॥ ४११ ॥ एकादशीं विश्वरूप । दाखवी तें तों ईश्वराचें होय रूप । तोही योगमायारचित आरोप । ब्रह्मीं निर्गुणीं. ॥ ४१२ ॥ योग ऐश्वर म्हणोनी । त्या रूपाचें नांव याच दों पदीं करूनी । बोलेल एकादशीं त्यावरूनी । नवमीं प्रमाणसिद्ध हा अर्थ. ॥ ४१३ ॥

विश्वरूपाध्याय श्लोक—**न तु मां शक्यसे द्रष्टुमनेनैव स्वचक्षुषा ।**
**दिव्यं ददामि ते चक्षुः पश्य मे योगमैश्वरम् ॥**

अर्जुना! मातें विश्वरूपेंकरोनी । पाहों न शकसी या स्वचर्मचक्षूंनीं । कीं सूर्यचंद्रांचीं रूपें दुरोनी । वीत वीत मंडलें दिसती. ॥ ४१४ ॥ हे अविद्याकर्मरचित दृष्टी । ईस मद्रूपचि दिसते हे जरी सृष्टी । परि कामलारोगें[2] जे कष्टी । ते शंखचंद्र पिंवळा देखते. ॥ ४१५ ॥ आणि भिंतीआड असे । तें या चर्मचक्षूंस न दिसे । एकसरेंचि या नेत्रांसि केंवीं गवसे । विश्व सर्वरूप माझें? ॥ ४१६ ॥ हेचि विश्वरचना परी । समग्र एकसरें आणि बरी । तूं देखसी ऐशा परी । दिव्यचक्षु तुज मी देतसें. ॥ ४१७ ॥ त्या चक्षूकरोनी । योग ऐश्वर पाहें म्हणोनी । बोलेल विश्वरूपी त्यावरोनी । योग ऐश्वर म्हणजे अघटितघटना रूप ईश्वराचें. ॥ ४१८ ॥ या दृष्टीं पाहों न शकसी

१. या प्रत्यक्ष ज्ञानाच्या बोधाला. २. काविळीच्या रोगानें जी दृष्टि कष्टी होत आहे.

मातें। तरी दिव्य दृष्टि माझा योग ऐश्वर त्यातें। पाहें म्हणोनि अर्जुनातें। पुढें बोलेल. ॥ ४१९ ॥ तेव्हां जें पाहणें योग ऐश्वरातें। हेंचि पाहणें मातें। ऐसें योग ऐश्वर शब्दें भगवंतें। स्पष्ट विश्वरूप आपलें बोलिलें. ॥ ४२० ॥ दिव्य चक्षूचें कारण। एकसरें पाहणें समग्रपण। अन्यथा सूर्य चंद्र ग्रह दिसोनि ही खूण। या दृष्टीस न दिसे त्याच्या रूपाची. ॥ ४२१ ॥ खाटप्रमाण वावडी गगनीं। ते वितीएवढी दिसे येथूनी। तैसेंचि चर्मचक्षूंस विश्व दिसोनी। बरें न दिसे आणि आड तें दिसेना. ॥ ४२२ ॥ पुढें याचे विचार। उदंड होतील येथें सर्वेश्वर। पाहें म्हणे योग ऐश्वर। प्रत्यक्ष विश्व ईश्वररूप म्हणोनी. ॥ ४२३ ॥ व्यतिरेकें आत्मा समजोनी। अन्वयें ब्रह्मचि सर्व उमजोनी। भास म्हणावा माया म्हणोनी। ते भक्त भगवद्रूपें पाहती. ॥ ४२४ ॥ याचें नांव विज्ञान। या मागें बोलिलें तें ज्ञान। हें प्रत्यक्षावगम धर्म्य हें श्रद्धान। पावती भागवत धर्माचे. ॥ ४२५ ॥ हें अनन्य भक्तांतें आकळे। इतरांतें अर्थचि न कळे। सयुक्त मुखरस चांगला गळे। परि नव्हे भगवद्भाव [1]पीयूष तें. ॥ ४२६ ॥ एवं योग अघटित घटना। कीं नसोनि दिसे विश्वरचना। तेंचि ऐश्वर रूप ईश्वराचें अर्जुना!। पाहें म्हणे. ॥ ४२७ ॥ यास काय विरुद्ध। अद्वैत साधतां शुद्ध। प्रत्यक्ष पाहतां होते सिद्ध। भक्ति ईश्वराची. ॥ ४२८ ॥ चित्स्वरूप नव्हे इंद्रिय प्रत्यक्ष। तें बुद्धीस दिसे अपरोक्ष। इंद्रियांस कृष्ण अंबुजाक्ष। दिसे तैसीं चराचर तद्रूपें. ॥ ४२९ ॥ बुद्धीस ठाउका नट नर। स्त्रीवेष दृष्टीस दिसे शरीर। त्याच्या प्रतीतीकडे पाहती चतुर। तैसा साक्षिप्रत्यक्ष भक्त पाहती. ॥ ४३० ॥ तो ज्या त्या रूपें सगुण। कल्पूनि आपणातें आपण। दावितो जडत्वें परि स्वयें पूर्ण। चित्स्वरूप अखंड अनुभव तयाचा. ॥ ४३१ ॥ चिदात्मत्व अनुभवाकडे दृष्टी। दिसे इंद्रियांस भगवद्रूप सृष्टी। विना भगवत्कृपापीयूषवृष्टी। हें अचाट पीक सर्वथा पिकेना. ॥ ४३२ ॥ आतां योग ऐश्वर हें रूप माझें पाहें। म्हणोनि ज्ञान बोलोनि हें विज्ञान बोलताहे। ऐसी अर्जुनास दाखवी स्वपदवी हे। तो कृष्ण भगवान् नाम त्याचें. ॥ ४३३ ॥ आणि सर्वत्र '**भगवानुवाच**'। आणि भगवद्गीता नाम साच। कृष्णगीता '**कृष्ण उवाच**'। वेदव्यास ऐसें म्हणेना. ॥ ४३४ ॥ नामें सकलही त्याचीं। पदवी समान सर्वांची। परि गीतेंत प्रसिद्धि भगवन्नामाची। या प्रत्यक्षावगम धर्म्यज्ञानाच करितां. ॥ ४३५ ॥ भगवद्भक्त तेचि भागवत। भगवद्धर्म तेचि

१. अमृत.

धर्म भागवत । भगवच्छास्त्र तेंचि भागवत । भागवत पुराण अर्थ याच भगवद्गीतेचा. ॥ ४३६ ॥ उभे कौरव पांडव रणीं । मिळाली असे अणीस अणी । हे भगवद्गीता चक्रपाणी । उभयदळामध्यभागीं रथीं उपदेशितो. ॥ ४३७ ॥ सूत्रप्राय हे बोल । अर्थ भावार्थ अति खोल । धरूनिया गीतामृताची ओल[1] । निगमकल्पतरु लाविला श्रीभागवत ॥ ४३८ ॥ तें श्रीमद्भागवत । जेथें सर्वोत्कृष्ट धर्म भागवत । त्रिविध भगवद्भक्त भागवत । एकादश स्कंधीं बोलिले. ॥ ४३९ ॥ त्यांत उत्तम भागवत । बोलतां अनुभव तयाचा जो भागवतांत । तोचि या अध्यायांत भगवंत । प्रत्यक्षावगम धर्म्य म्हणोनि बोलतो. ॥ ४४० ॥ येथें स्थळोस्थळींही हेंच सूचवी । परि न वाखाणिती टीकाकार कवी । तो जों बुद्धीतें न शिकवी । तोंवरी बुद्धि न पावे या अनुभवा. ॥ ४४१ ॥ परि सर्वत्र हेच सूचना । करी उमजे तेच अर्जुना ! । हे गीता धर्म्यसंवादरचना । तरीच अष्टादशीं त्यातें बोलेल. ॥ ४४२ ॥ तुझा माझा हा संवाद । धर्म्य म्हणेल गोविंद । धर्म्यशब्दें प्रत्यक्षावगम ऐसें विशद । तो उमजला तरीच हे खूण दाखवी. ॥ ४४३ ॥ एवं प्रत्यक्ष हें भगवद्रूप । म्हणोनि हें ज्ञान धर्म्यस्वरूप । कीं नव्हे नुसतें बुद्धिगम्य अरूप । चित्स्वरूप कीं तें अतींद्रिय प्रत्यक्ष. ॥ ४४४ ॥ भजन जिज्ञासूचें परोक्ष । त्यास भगवत्प्रसादें निर्गुण अपरोक्ष । होतां मग हें पाहे प्रत्यक्ष । भगवद्रूप कृष्णरूप जेवीं. ॥ ४४५ ॥ तो उत्तम भागवत । म्हणोनि बोले भागवत । येथें सूत्रप्राय बोले भगवंत । हें ज्ञान त्या उत्तमाचें. ॥ ४४६ ॥ ऋषभ नामें भगवंत । अवतरला त्याचे पुत्र शत । त्यांत नव योगी परम भागवत । त्रिभुवनीं संचरती. ॥ ४४७ ॥ जनक राजा करी यज्ञ । त्या यज्ञमंडपीं ते सर्वज्ञ । नवही भागवतधर्मीं अभिज्ञ । जनक पुसे भागवतधर्म तयांतें. ॥ ४४८ ॥ त्यांत कवि याचें उत्तर । देता जाला अति सादर । त्यांत आकाश वायु अग्नि इत्यादि चराचर । म्हणे हरिरूपें वंदावें. ॥ ४४९ ॥ एवं शेवटील श्लोकीं । कवि ऐसा बोलिला कीं । ऐसें अद्वैतबोधें भजतां लोकीं । भगवत्प्रबोध होय भागवतां तयांतें. ॥ ४५० ॥ तों राजा जनक पुसे तें वर्म । कीं कैसा तो भागवत ? कोण त्याचा धर्म ? । तों हरिनामा त्या धाकटा यथाक्रम । उत्तम भागवत सांगे या श्लोकीं. ॥ ४५१ ॥

---

१. ओलावा, आधार.

श्रीमद्भागवत श्लोक—**सर्वभूतेषु यः पश्येद्भगवद्भावमात्मनः ।**
**भूतानि भगवत्यात्मन्येष भागवतोत्तमः ॥**

हरि म्हणे जनकराया ! । जो प्रत्यक्ष सर्वभूतांत या । पाहे आत्मया आपलिया । तोच भगवद्भाव. ॥ ४९२ ॥ आणि आपला आत्माच भगवंत । सर्वभूतें पाहें तयांत । हा म्हणावा उत्तम भागवत । शब्दार्थ तो हाचि इतका. ॥ ४९३ ॥ आतां भगवद्भावाची खूण । ऐश्वर्यादि षड्गुण । ऋषि बोलती निपुण । त्याची खूण या श्लोकीं. ॥ ४९४ ॥

श्लोक—**ऐश्वर्यस्य समग्रस्य धर्मस्य यशसः श्रियः ।**
**ज्ञानवैराग्ययोश्चेति षण्णां भग इति स्मृतिः ॥**

समग्र म्हणजे सकल निःसीम । ऐसें समग्र ऐश्वर्य आणि धर्म । यश श्री ज्ञान वैराग्य यथाक्रम । समग्र निःसीम षड्गुण पाहें. ॥ ४९५ ॥ भग म्हणावें या सा गुणांतें । हे साही गुण असती जयातें । घडे श्रीभगवन्नाम हें तयातें । तो हाचि आत्मा जो हें ज्ञान जाणतो. ॥ ४९६ ॥ प्रस्तुत कवि धाकटा हरि म्हणताहे । कीं सर्वभूतीं आत्मयाचा भगवद्भाव पाहे । सर्वां भागवतांत तोचि लाहे । पदवी उत्तम भागवतपणाची. ॥ ४९७ ॥ त्यांत ऐश्वर्य सामर्थ्याचें नांव । जो अघटितघटनारचनाप्रभाव । कीं कांहीं नसोनि नाना भाव । स्वयेंचि सर्वेश्वर होतसे. ॥ ४९८ ॥ दृष्टीस जरी पट दिसे । बरें पाहतां तंतु मात्र असे । विश्व आत्मयांत समरसें । ये रीती अन्वयें पाहतां. ॥ ४९९ ॥ तथापि इंद्रियद्वारा मती । पावती मिथ्याभासप्रतीती । तो ऐश्वर्यभाव सर्वभूतीं । आत्मयाचा. ॥ ४६० ॥ परि हाही आत्मयाविण । अनुभव न घडे ऐसी खूण । जतन करावया म्हणे निपुण । कीं भूतें देखे आत्मा जो भगवंत त्यामाजीं. ॥ ४६१ ॥ एवं नसोनि भूतें दिसतीं । हे अघटित घटना दिसे त्याच भूतीं । कीं चित्र विचित्र लेखकाची हस्तकौशल्यरीती । चित्रींच तथापि त्यास दिसतसे. ॥ ४६२ ॥ हे ईश्वराची मायाकल्पना । परि जीवास अविद्येनें सत्यरचना । आणि राजविद्येनें तें विश्व नाना । भगवंताचें ऐश्वर्य दिसतसे. ॥ ४६३ ॥ तेचि जीव अविद्याकर्मबळें । पावती सुखदुःखरूपें विषमफळें । परि विद्यादृष्टींत हीं केवळें । भगवद्रूपेंचि दिसतीं. ॥ ४६४ ॥ तरी भगवंत षड्गुण । नव्हे निर्धर्म निर्गुण । सर्वसाक्षी सर्वज्ञ सगुण । विषम निर्दय केवीं म्हणावा ?

॥ ४६५ ॥ जो निर्दय आणि विषम । येथें म्हणावा मुख्य तो अधर्म । या वैषम्यनिर्दयत्वपरिहारें धर्म । गुण हा लागतो ईश्वरीं. ॥ ४६६ ॥ कीं जीवाची अनादि वासना । वासनेनें कर्में घडती नाना । कर्मानुरूप फळ हेचि रचना । चराचराची. ॥ ४६७ ॥ नरक नाना दुष्ट योनी । हें सर्व भगवद्रूप म्हणोनी । विषम निर्दय नव्हे कीं कर्में करोनी । फळें त्या कर्मांचीं पावती ते जीव. ॥ ४६८ ॥ स्वर्गभोग देवादि योनी । हेंही सर्व भगवद्रूप म्हणोनी । विषम निर्दय नव्हे कीं तैसीं सत्कर्में करोनी । तीं फळें तेसमयीं ते पावले. ॥ ४६९ ॥ तेव्हां धर्मही हें चराचर । कीं चराचररूपेंचि समसदय ईश्वर । तथापि हा मायागुणही शरीर । ईश्वराचें. ॥ ४७० ॥ प्रत्यक्ष हें धर्मरूप । प्रकाशक त्याचें शुद्ध चित्स्वरूप । तो आत्मा अरूप । या भक्त ज्ञानियाचा. ॥ ४७१ ॥ कीं याचिया आत्मयाविण । न दिसे चराचराची खूण । अन्वयबोधीं हें वर्म निपुण । समजला. ॥ ४७२ ॥ तेव्हां साही गुणांचा भाव । आत्माच या भक्ताचा स्वयमेव । कीं समुद्रचि तें वैभव । जे आकार नाना तरंगांचे. ॥ ४७३ ॥ आतां ईश्वर देवाधिदेव । त्याचें स्वतःसिद्ध षड्गुण वैभव । त्याच्या प्रसादातें पावती मानव । ते स्वात्मयाचेच ते भाव देखती. ॥ ४७४ ॥ प्रस्तुत हा ऐसा धर्मगुण । गीतेंत पंचमीं याचें जालें विवरण । **'न कर्तृत्वं न कर्माणि'** इत्यादि श्लोकीं खूण । समसदयपणाची बोलिली. ॥ ४७५ ॥ कीं ईश्वर न करवी कांहीं हें निश्चित । जीव वासनेनें घडे सुकृत दुष्कृत । तदनुरूप त्यांचें कर्मसंचित । भोगिती फळें प्रारब्धेंकरोनी. ॥ ४७६ ॥ तें फळ हेंच चराचर । तें ईश्वराचें शरीर । फळरूप होऊनि समसदय ईश्वर । निरूपण पंचमीं हें जालें. ॥ ४७७ ॥ पंचमीं धर्म सगुण । नवमीं ऐश्वर्य दावी स्वयें षड्गुण । योग पाहें माझा म्हणतां खूण । यशाचीही दाखवी. ॥ ४७८ ॥ अघटितघटना हृषीकेश । पाहें म्हणे हेंचि यश । जो जें दावी स्वकौशल्यलेश । तो तें यशचि आपलें दावितो. ॥४७९॥ एवं हे चराचराची रचना । अघटित ईश्वराची घटना । तेव्हां जें विश्व दिसे नाना । हेंचि यश ईश्वराचें. ॥ ४८० ॥ चित्स्वरूपेंचि हेंही वैभव । प्रकाशलें तेव्हां हाही भाव । आत्मयाचाच पाहे भक्तराव । जो उत्तम भागवत भागवतीं बोलिला. ॥ ४८१ ॥ ऐसें ऐश्वर्य यश धर्म म्हणोनी । स्मृत्युक्त गुण हे तीनी । आतां श्री म्हणजे माया कीं याच भावेंकरोनी । विरुद्ध तीनी गोष्टी अविरुद्ध दाविल्या. ॥ ४८२ ॥ कीं मजमध्यें भूतें सकळ । तीं व्यापूनि त्यांत मी नाहीं केवळ । तींही मजमाजी नुसतीं निवळ । पाहें म्हणे हें रूप मायेचें.

॥ ४८३ ॥ मिथ्या सर्पातें व्यापी दोर । दोरीं असे सर्पआकार । दोर त्या सर्पीं नसे कीं तें सर्पशरीर । नसेच त्या रज्जूंत. ॥ ४८४ ॥ एवं रज्जूंत जैसा सर्प । ब्रह्मीं तैसें मायरूप । ते माया **श्री**रूपिणी आणि ब्रह्मस्वरूप । **श्री**धर-रूपें प्रकटते. ॥ ४८५ ॥ **श्री** यालागीं हृदयावरी । **श्री**धर साकाररूपें धरी । कीं **श्री** माया आणि मी ब्रह्म यापरी । समजोत लोक. ॥ ४८६ ॥ **श्री** आणि **श्री**धर । दोनी मायेचेच आकार । दोहीं देहीं निर्विकार । प्रकाशक ब्रह्म चिन्मात्र. ॥ ४८७ ॥ परि मी मायाच ऐसा निश्चय । **श्री**रूपीं आणि आपण ब्रह्म ऐसा प्रत्यय । **श्री**धररूपी म्हणोनि अद्वय । तो सगुण ब्रह्म ते **श्री**रूपिणी माया म्हणावी. ॥ ४८८ ॥ तो **श्री**धर चित्स्वरूप । चराचर धरी मायारूप । रूप तितकें माया तो अरूप । चराचरचि तेव्हां श्रीही गुण चतुर्थ. ॥ ४८९ ॥ जों जों अधिक नारी नर । जों जों अधिकपशुभूचर । अधिक पक्षी अधिक तरुवर । तों तों अधिक तो श्रीमंत. ॥ ४९० ॥ भूमीं नाना धातु नाना तळीं जळ । इत्यादि श्रीच सकळ । बहुत चुली बहुत अनल । तों तों श्रीमंत गृह तें. ॥४९१॥ गृहासी माडिया खिडकिया फार । श्रीमंताच्या घरींच वारा फार । उंच वर माडिया अपार । फार आकाश फार तों तों श्रीमंत. ॥ ४९२ ॥ बोलोनि काय बहुत । जे करिती मळे शेत । ते मलमूत्रयुक्त जें खत । द्रव्य वेंचूनि शकटावरी तें नेती. ॥ ४९३ ॥ श्रीमंत नव्हे तो कांहीं । नाम रूप पदार्थेचि नाहीं । जे निःश्रीक म्हणविती घरीं तयांच्याही । जें असे तेंही **श्री**रूप. ॥ ४९४ ॥ अर्थ नासे तृष्णा उरे । तो **श्री** गेली म्हणोनि झुरे । कीं अधिक **श्री** देखोनि मरे । मत्सरें आणि मानी कीं आपण **श्री**हीन. ॥ ४९५ ॥ निःश्रीकता अमंगळ । ते हे तृष्णाच ओंगळ । तृष्णारहित जे सुमंगल । ते स्वयें **श्री**धर जो आत्मा चराचराचा. ॥ ४९६ ॥ हेंचि वर्णितां लांब । प्रस्तुतप्रसंगास होतो विलंब । एवं चराचरा या **श्री**रूपास अवलंब । चित्[1]स्वरूप आत्मा भक्तांचा. ॥ ४९७ ॥ तो हा चतुर्थ गुण । आत्मयाचाच भाव पाहें निपुण । प्रत्यक्ष **भ**गवद्रूप ऐसी खूण । सांपडली जया. ॥ ४९८ ॥ आतां पांचवा गुण ज्ञान । हें ज्ञान सत्त्ववृत्ति मायासत्ताहीन । आणि ज्ञान चित्स्वरूप निरं[2]जन । तें प्रकाशक या वृत्तिरूप सात्विक ज्ञानाचें. ॥ ४९९ ॥ भगशब्दें हे सहा गुण । त्या सहांमध्यें या ज्ञानाची लेखिली खूण । चित्स्वरूप आत्मा निर्गुण । या षड्गुणभगें युक्त तो **भ**गवान. ॥ ५०० ॥ ईश्वरत्व प्रत्यय । निर्गुणीं मायायोगें हा निर्णय । तयासि

---

१. ज्ञानरूप, २. परब्रह्मस्वरूप.

सृष्टिसंकल्पनिश्चय । साक्षित्व तेथूनी. ॥ ९०१ ॥ तो आपणास आपण ई-श्वर । कल्पी जैसा नट नर । नारीरूपें दावी चतुर । जननादि षड्भावांचा साक्षी कल्पी ऐसे षड्भाव. ॥ ९०२ ॥ प्रथम जननभाव दावितो । मग उपजोनि आहे या अस्तित्वभावा दाखवितो । मग **'वर्धते'** म्हणजे वृद्धि पावतो । मग **'परिणमते'** म्हणजे पावतो परिणाम. ॥ ९०३ ॥ वाढतां वाढतां राहिला । आतां वृद्धि पावणें नसे ज्याला । चतुर्थ भाव परिणाम त्याला । षड्भावांत बोलती. ॥ ९०४ ॥ मग **'अपक्षीयते'** । म्हणजे दंतादि अंगरचना क्षयातें पावते । **'नश्यति'** म्हणजे तनु नासते । षड्भाव शास्त्रीं ये रीती. ॥ ९०५ ॥ साही ऐसे भाव । कल्पितो आपणास आपण देव । सा भावांचा साक्षी देवाधिदेव । ऐसे षड्भाव जाणणें हें ज्ञान. ॥ ९०६ ॥ या गुणांचें नांव ज्ञान । चित्स्वरूप याचें अधिष्ठान । तो आत्मा ज्यावरी भान । जननादि षड्भावांचें. ॥ ९०७ ॥ आपल्या आत्मयाचा ऐसा भाव । भागवत पाहे जो स्वयमेव । तो षड्गुण भगवान् देवाधिदेव । एवं ज्ञानगुणही चराचर हेंचि तेव्हां. ॥ ९०८ ॥ कीं तो ज्ञानगुण षड्विकार । दावुनी जीवदृष्टीस साही प्रकार । तरंग होउनी उरे सागर । तैसा ज्ञानगुण निर्विकार तो उरतो. ॥ ९०९ ॥ भगवद्भाव उत्तम भागवत । आत्मयाचा पाहें म्हणे भागवतांत । त्यांत ज्ञानगुण ऐसा गीतेंतही या भगवंत । याच श्लोकीं उत्तरार्धीं बोलेल. ॥ ९१० ॥ उरला वैराग्यगुण एक । तोही या प्रकरणींच उत्तमश्लोक । बोलेल तो नवम श्लोक । जवळींच असे या नवमीं. ॥ ९११ ॥ कीं रचोनि इतकी रचना । इच्छा कोठें त्याला असेना । सुवर्णास अलंकार नाना । काय वाटती ल्यावेसे? ॥ ९१२ ॥ आपण मायाविवर्ताचें[1] अधिष्ठान । हें अखंडित ज्याचें ज्ञान । करावें जड पटाचें परिधान । त्या ज्ञानतंतूस काय वाटेल? ॥ ९१३ ॥ मृगजळीं सूर्य बुडे । हे गोष्टी काय घडे? । कीं समुद्र चाले तरंगांकडे । तृषित होऊनि पानार्थ? ॥ ९१४ ॥ शुक्तीवरी[3] रजत भासे । शुक्ति धरील काय त्या रुप्याचे आशे । स्वयें स्त्रीवेष दावीतसे । काय इच्छील तिचा अंगसंग तो? ॥ ९१५ ॥ ऐसें अनादि वैराग्य । शुकसनकादिक ज्याच्या अंशें सभाग्य । प्रपंचसत्यत्व हेंचि अभाग्य । बीज विषयवासनेचें. ॥ ९१६ ॥ मिथ्यात्व कनकीं नगाचें । तैसें मिथ्यात्व ईश्वरीं जगाचें । हेंचि बीज वैराग्याचें । तेव्हां चराचर त्याचें वैराग्यही. ॥ ९१७ ॥ कीं सत्य वाटे कामिनी । ती भोगानु-

---

१. मायेचा भोंवरा. २. ठिकाण. ३. शिंपीवर रुप्याचा भास होतो. ४. भोगाचे इच्छेनें.

रागें आठवे मनीं । अनुराग विषयाचा म्हणोनी । विषयरूपचि लेखावा. ॥ ९१८ ॥ विषय जोंवरी न ये ध्यानीं । तो अनुराग त्याचा न उपजे मनीं । परि जो वाटे मिथ्या म्हणोनी । वैराग्य त्याचें त्यारूपें. ॥ ९१९ ॥ हाटांत जें देखिलें रजत । त्याचा अनुराग उपजे निश्चित । शुक्तिरजत मिथ्या अत्यंत । वैराग्य त्याचें. ॥ ९२० ॥ एवं सत्यरजतरूप प्रीती । असत्यरजतरूपें अप्रीती । तेव्हां चराचररूपें दिसे स्थिती । मिथ्या म्हणोनि वैराग्याची तयाच्या.॥९२१॥ मजमाजीं भूतें परि त्या भूतीं । मी नसें तींही मजमध्यें नसतीं । ऐसें प्रस्तुत बोले जगत्पती । हाचि वैराग्यगुणही तयाचा. ॥ ९२२ ॥ कीं रौप्य शुक्तींत दिसे । परि शुक्ति सत्य जे नाहींच त्या रजतीं नसे । आणि तें रजतही न वसे । कालत्रयीं शुक्तींत. ॥ ९२३ ॥ एवं जगचि वैराग्यगुण । कळे व्यापका आत्मयाकरितां त्याची खूण । तेव्हां आत्मयाचा भाव हाही तो निपुण । वैराग्य गुण भागवत उत्तम देखतो. ॥ ९२४ ॥ ऐसें श्रीमद्भागवत । बोलतां उत्तम भागवत । बोले परम धर्म भागवत । कीं तो प्रत्यक्ष भगवद्रूप पाहे हें विश्व. ॥ ९२५ ॥ त्या प्रत्यक्षाचें नांव योग ऐश्वर । आपलें रूप हें चराचर । पाहें म्हणोनि सर्वेश्वर । **'पश्य मे योगमैश्वरं'** या चरणें म्हणतसे. ॥ ९२६ ॥ योग म्हणजे अघटित घटना । ऐश्वर म्हणजे मज ईश्वराचें हें रूप विश्व नाना । जो बोलतो या अनुभवाची रचना । भगवान्नाम तयाचें. ॥ ९२७ ॥ भगवद्रूप त्याचें । भगवद्रूपीं रूप सगुणाचें । रूप त्या सा ऐश्वर्यादिकांचें । भागवत-श्लोकें निरूपिलें. ॥ ९२८ ॥ हे गीता भगवद्गीता । **'भगवानुवाच'** म्हणजे भगवान जाला बोलता । तो प्रत्यक्ष आपलें रूपचि हें पाहें म्हणे तत्त्वतां । एवं भगवद्रूप हें प्रत्यक्ष. ॥ ९२९ ॥ ऐसें पूर्वापरविचारेंकरोनी । हें चराचर भगवद्रूप म्हणोनी । युक्त्यनुभवें उपपादिलें परि मनीं । अर्जुन अद्यापि नाहीं समजला. ॥ ९३० ॥ तो म्हणे मायेनें विश्व केलें । तें याचें रूप केवीं झालें? । हें समाधान एकाच बोलें । श्रीकृष्ण या उत्तरार्धें करीतसे. ॥ ९३१ ॥

उत्तरार्ध—**भूतभृन्न च भूतस्थो ममात्मा भूतभावनः ।**

मी भूतांचा धरणार । परि भूतीं नसें मी त्याचा विचार । ऐसा कीं हा नानाकार । बुद्धि माझी कल्पिते. ॥ ९३२ ॥ यांत प्रथमचरणीं पूर्वानुसंधान । दुसरिया चरणीं समाधान । त्या समाधानें होतां ज्ञान । चराचर भगवद्रूप म्हणोनी. ॥ ९३३ ॥ मी भूतें धरणार म्हणिजे म्यां जीं व्यापिलीं । तीं मज-माजीं बोलिलों तेव्हां म्यां धरिलीं । त्या भूतीं मी नसें कीं तुज कळलीं ।

---

१. प्रीति. २. बाजारांत, यात्रेंत.

नाहींतर्शीं तीं भूतें मजमध्यें. ॥ ९३४ ॥ ऐसें रज्जुसर्पन्यायेंकरूनी । भूतें मजमाजीं म्हणोनी । हीं भूतें मायामात्र ऐसें यावरूनी । सिद्ध जालें. ॥९३५॥ ते माया म्हणोनि म्हणावी । त्याज्यांशांत जे गणावी । ते माझी कल्पना म्हणोनि जाणावी । योग ऐश्वररूप माझें हीं भूतें. ॥ ९३६ ॥ **राम**कृष्णाद्यवतारकल्पना जैसी । कल्पना चराचराची तैशी । तेव्हां माझी तनू न होती कैशी । हीं भूतें सकळही? ॥ ९३७ ॥ या भावें म्हणे **ज**गज्जीवन । कीं माझा आत्मा **'भूतभावन'** । आत्मा बुद्धि माझी म्हणे **म**धुसूदन । बुद्धि चिच्छक्ति कल्पनाशक्ति ईश्वराची. ॥ ९३८ ॥ ते भूतभावना **अ**र्जुना? । म्हणजे भूतांची करी भावना । भावना म्हणजे कल्पना । एवं शक्ति माझी भूतें कल्पिते हा अर्थ. ॥९३९॥ **'संभवाम्यात्ममायया'** । म्हणोनि चतुर्थाध्यायांत **ध**नंजया। म्हणे माझी जी आत्ममाया । ती करोनि मी संभवतों. ॥ ९४० ॥ तेथेंचि कळलें **अ**र्जुना । कीं अवतार मायाकल्पना । येथें चराचरभूतरचना । बुद्धि माझी कल्पिते म्हणतसे. ॥ ९४१ ॥ आणि पूर्वार्धीं बोले **स**र्वेश्वर । कीं हा प्रत्यक्ष पाहें माझा योग ऐश्वर । भगवत्कृपापात्र चतुर । तत्त्व **अ**र्जुन समजला. ॥ ९४२ ॥ कीं चित्स्वरूपीं चराचर । स्वशक्तीनें कल्पितो **ई**श्वर । तैसेचि कल्पितो अवतार । तेव्हां हा **क**मलपत्राक्ष तैसे प्रत्यक्षही. ॥ ९४३ ॥ आतां सामर्थ्य अवतारीं दिसे । तैसें चराचरीं कां नसे? । हेंही **अ**र्जुन अभिज्ञ न पुसे । तत्त्व कळलें. ॥ ९४४ ॥ कीं **कृ**ष्ण **ज**रासंधभयें[१] पळे । तरी काय सामर्थ्यापासूनि तेव्हां चळे? । तैसें चराचरीं असूनि न कळे । सामर्थ्य बाळपणीं जैसें **कृ**ष्णाचें. ॥ ९४५ ॥ शयन शेषपर्यंकीं करी । तो मुते बाळांतियावरी[२] । जो उदर विश्वाचें भरी । स्तन्यार्थ **वि**श्वंभर तो रडे. ॥ ९४६ ॥ ब्रह्मांड भेदोनि **गं**गा आणी । गोपी न्हाणिती तो **च**क्रपाणी । पालथा घालोनि ओतिती पाणी । स्वपायांवरी **वि**श्ववंद्यचरणातें. ॥ ९४७ ॥ अनादि बंध तोडी नामें । **य**शोदा त्यास बांधी दांमें[३] । गोरसचौर्य **आ**त्मारामें । करावें पळावें निर्भयें भिऊनियां. ॥ ९४८ ॥ इत्यादि बाललीला । करितां तया **न**वमेघनीला । देखतां गोपगोपिका मुलांमुलींला । काय समर्थ **ई**श्वर तो वाटे? ॥ ९४९ ॥ सामर्थ्य तो चराचरीं । आच्छादोनि असे यापरी । सुखदुःख भोग तो शिरीं । स्थापिला प्रतिबिंबांश जीवाचिया. ॥ ९५० ॥ एवं जरी सामर्थ्य न दिसे । तरी चराचररूपें **ई**श्वर असे । हा अर्थ **अ**र्जुना गवसे । म्हणतां **'ममात्मा भूतभावनः'** म्हणोनी. ॥ ९५१ ॥ आतां कल्पना समजावी कैसी ।

---

१. जरासंधानें द्वारकेवर हल्ला केला तेव्हां. २. बाळंतिणीच्या वस्त्रावर. ३. दांव्यानें.

अर्जुन पुसेल गोष्टी ऐसी । तरी पंचविध रीति बोलिली जैसी । ज्ञानविज्ञान-सहित सांगतां. ॥ ५५२ ॥ एक भूतें म्यां व्यापिलीं म्हणोनी । भूतें मजमाजीं यासहित दोनी । मी भूतीं नसें या सकट तीनी । भूतेंही मजमाजीं नसती चतुर्थ. ॥ ५५३ ॥ पांचवें माझें योग ऐश्वर । रूप पाहें म्हणे सर्वेश्वर । कल्पना चौं गोष्टींत समजोनि चतुर । पांचवें भगवद्रूपें दर्शन जगाचें. ॥ ५५४ ॥ म्हणोनिया अर्धाचा पूर्वचरण । तेथें या पूर्वोक्त रीतीचें विवरण । सूचवी जगद्वंद्यचरण । **'भूतभृन्न च भूतस्थो'** म्हणोनी. ॥ ५५५ ॥ या पूर्वचरणें पूर्वानुसंधान । यानिमित्त कीं विश्व ईश्वरकल्पना याचें ज्ञान । होय ऐसें जगज्जीवन । सूचवोनी बोलतो. ॥ ५५६ ॥ कीं मनीं कल्पिलीं भूतें अनेक । त्यांत आंत बाहेर तो कल्पक । त्यावेगळा आकार कोण एक । कल्पिला जाय आणि कळे कल्पकातें. ॥ ५५७ ॥ तेव्हां ते कल्पिली रचना । कल्पकामाजींचि असे नाना । परि कल्पक त्यांत तो असेना । जैसा सर्पीं रज्जुकल्पना । मिथ्या म्हणोनी. ॥ ५५८ ॥ मिथ्या कल्पना जेधवां । कल्पकामाजीं नाहींच तेधवां । कीं जें मेलें जाळिलें तेंही मानवां । कल्पिता दिसे तरी काय आहे तें म्हणावें? ॥ ५५९ ॥ परि तें रूप कल्पकाचें । म्हणतां जनां न वाटे साचें । कीं पूर्वकर्मरचित जीवाचें । शरीर म्हणोनि कल्पना निराळी वाटते. ॥ ५६० ॥ परि जागृतीची जे कल्पना । तेचि स्वप्नीं स्वदेहरचना । ईश्वरासी तों देहचि असेना । कल्पनाचि त्याची त्याचे अवतार. ॥ ५६१ ॥ एवं कल्पनासामर्थ्य त्या कल्पकाचें । आणि रूपचि म्हणावें तयाचें । हें शरीर जरी कर्माचें । तरी कर्म उपजे त्या कल्पनेचपासूनि. ॥ ५६२ ॥ कर्म करी कल्पूनी । ते कल्पना उपजे आदीं मनीं । पाहतां ऐसें विचारूनी । कल्पनाच देह जीवाचा. ॥ ५६३ ॥ दृष्टांतीं जीवकल्पना । ईश्वराचा तों देह कर्माचा असेना । जे त्याच्या कल्पनेची रचना । तोचि देह ईश्वराचा. ॥ ५६४ ॥ प्रस्तुत **'ममात्मा भूतभावनः'** म्हणोनी । म्हणतां इत्यादि भाव मनीं । अर्जुन समजला त्यावरूनी । चराचर भगवद्रूप तो पाहे. ॥ ५६५ ॥ कीं जननभाव कोठें कल्पितो । कोठें जन्मोनि आहे या अस्तित्वभावा दावितो । कोठें वृद्धि कल्पोनि वाढतो । कोठें परिणामें अपक्षयकल्पना दाखवी. ॥५६६॥ दंतकेशादिक्षीणता । कोठें बधिरता अंधता । इत्यादि अपक्षयता । कोठें कल्पितो. ॥ ५६७ ॥ कोठें भाव नश्यति । कल्पूनि दाखवी शवाकृती । कोठें भस्मादिरूप जगत्पती । कल्पी आपण आपणा. ॥ ५६८ ॥ प्रतिशरीरीं षड्भाव । या रीती कल्पी देव । ऐसीच ब्रह्मांडरचना स्वयमेव । उत्पत्तिनाश-

पर्यंत कल्पितो. ॥ ९६९ ॥ जें जैसें कल्पितो । तें तैसें लक्षितो । साक्षी ये रीती म्हणवितो । प्रत्यक्षज्ञान गुण भगवत्कल्पना. ॥ ९७० ॥ इतकें कल्पूनि कांहीं । मागुती त्याच्या स्वरूपीं नाहीं । इतकी रचना रचोनि तेही । नाहींच म्हणोनि जो जाणे. ॥ ९७१ ॥ हा शेवटील वैराग्यगुण । तोही समजला तो निपुण । आणि या साही गुणांची खूण । सर्वव्यापका आत्मयाच करितां. ॥ ९७२ ॥ तेव्हां आत्मा आपुला । तोचि षड्गुण अनुभवें वाटला । भगवद्भाव आंगीं बाणला । एकसरां **अर्जुना**सी. ॥ ९७३ ॥ श्रीकृष्ण एक **भ**गवंत । **अर्जुन** **भ**गवद्भक्त भागवत । देशधडी जालें हें द्वैत । परम अद्वैत बिंबलें. ॥ ९७४ ॥ नवल भाग्याचा उदय । कृष्णचि जाला **ध**नंजय । बोध बिंबला अद्वय । उभयत्र **भ**गवद्भाव सारिखा. ॥ ९७५ ॥ मनीं पाहे **अर्जुन** । तों **भ**गवद्रूप हें त्रिभुवन । अनुभवीं होऊनि तल्लीन । दचकला मागुती. ॥ ९७६ ॥ सर्व संशय निरसला । तों संदेह कांहीं एक उद्भवला । कीं विश्व आत्मा आपुला । परि यथास्थित विश्व मजला कळेना. ॥ ९७७ ॥ जितक्या जगाचा मज आठव । तितक्यांचा प्रतीतीस येतो **भ**गवद्भाव । जें आठवे तें मी स्वयमेव । ऐसें वाटतें. ॥ ९७८ ॥ जें जें मातें न स्मरे । तेथें आत्मा मजसी मजला न स्फुरे । स्मरतां विश्व जें उरे । काय तेथें मी नसें? ॥ ९७९ ॥ आत्मा तरी अखंडित । हाचि वाटे **भ**गवंत । जें न स्मरेही जग तयांत । हाचि आत्मा स्वयें नांदतो. ॥ ९८० ॥ परि ज्याचा नव्हे आठव । तेथें आत्मयाचा नव्हे अनुभव । आणि नाठवे तेंही स्ववैभव । तरी तें कोणे रीती जाणावें? ॥ ९८१ ॥ आणि मजमाजीं सर्व भूतें । तूं पाहें म्हणोनि मातें । **'मत्स्थानि सर्वभूतानि'** या चरणीं **भ**गवंतें । आज्ञा केली कीं **'पश्य'** पाहें म्हणोनी. ॥ ९८२ ॥ ऐक्य मज आणि यास खरें । परि यास सर्वभूतें दिसती एकसरें । मज तें पाहणें नाकळे बरें । म्यां आपणांत कैसीं पाहावीं तीं सर्वं? ॥ ९८३ ॥ मज जें जितकें आठवतें । तितकेंचि तें प्रत्यास येतें । विश्व अपरिमित उरतें । तें कैसें मजमाजीं म्यां अवधारावें हें सर्व? ॥ ९८४ ॥ हें पुसों म्हणोनि । **अर्जुन** चिंती मनीं । तों अंतरसाक्षी तें समजोनि । ऐसीं आपणांत भूतें अवधारीं म्हणतो या श्लोकीं. ॥ ९८५ ॥

**यथाकाशस्थितो नित्यं वायुः सर्वत्रगो महान् ।**
**तथा सर्वाणि भूतानि मत्स्थानीत्युपधारय ॥ ६ ॥**

अगा! आकाशीं वायु नित्य वसे । तो सर्वत्र गगनीं असे । तोचि महाथोर

चंचल होतां गवसे । अनुभव येतसे हा वारा थोर होय म्हणोनी. ॥ ९८६ ॥ आणि नित्य सर्वत्र गगनीं समीर । तो न कळे कीं न स्पर्शे शरीर । जरी प्रत्यया नये वायु स्थिर । तरी आकाशीं आहेच तो म्हणावा. ॥ ९८७ ॥ महावायु तो जो वारा । चंचळ होऊनि लागतो शरीरा । तो गगनीं असे तैसाच पांडुकुमारा । नये प्रतीतीस तोही गगनींच आहे म्हणावा. ॥ ९८८ ॥ घरांत होतो उबारा । अणुमात्र नाहीं साच वाटे वारा । परि विंजणा वस्त्र कांहीं हालतां शरीरा । लागे गगनीं असे म्हणोनी. ॥ ९८९ ॥ येविषयीं तों अर्जुना । संदेह नुपजो तुझ्या मना । या भावें आकाशवायुदृष्टांतरचना । पूर्वार्धीं ऐसी निरूपिली. ॥ ९९० ॥ आकाशीं द्विविध वायु जैसा । सर्वभूतें आपणांत तूं अवधारीं तैसा । कीं सर्वत्र वायु अनुभवा ये तरी कैसा । नाहीं म्हणावा कीं त्याच गगनीं तो असे. ॥ ९९१ ॥ **'यथा'** म्हणजे जैसें । **'तथा'** म्हणजे तैसें । दृष्टांतदार्ष्टांतीं समाधान ऐसें । शिष्यभक्तांचें जगद्गुरु करीतसे. ॥ ९९२॥ वारा नित्य सर्वत्र गगनांत । भूतेंही स्थितिकाळीं नित्य आत्मयांत । परि श्रवणेंद्रिया त्वगिंद्रिया प्रत्यया असे येत । जो चंचळ महावायु तोचि. ॥ ९९३ ॥ तथापि त्याच गगनीं । प्रत्यया न ये तोही वायु असे म्हणोनी। जन न जाणती या दृष्टांतें करोनी । सर्वभूतें तूं आपणांत अवधारीं. ॥ ९९४ ॥ कीं नभीं वायु तैसीं भूतें सर्वत्र आत्मयांत । जितकीं बुद्धीस विदित तीं प्रत्यया येती. तयांत । तो जैसा महावायु प्रत्यया असे येत । श्रवणेंद्रिया त्वगिंद्रियासी. ॥ ९९५ ॥ प्रत्यया न येतां उरला । तो वायु त्याच गगनीं असे भरला । जैसें हें सत्य वाटतें तुजला । तैसीं तींही भूतें त्याच आत्मयांत हें समज. ॥ ९९६ ॥ स्मरतां प्रत्यया आलें चराचर । आणि उरलें जें नव्हे प्रत्ययगोचर । तेंही तूं आपणामाजीं अवधारीं ऐसें सर्वेश्वर । अप्रतीत जगीं ही अद्वैतधारणा बोलतसे. ॥ ९९७ ॥ कीं आत्मयाविण । न कळे जड जगाची खूण । परि तो निर्धर्म निर्गुण । प्रत्यया बुद्धीवांचून तों न ये. ॥ ९९८ ॥ काष्ठ गोंवरी कोशा[2] एकाविना । नुसता अग्नि दृष्टी दिसेना । बुद्धीविना प्रत्यया येईना । निर्धर्म आत्मा देहींही. ॥ ५९९ ॥ देहीं सर्वत्र आत्मा भरला । हें तों ठाउकें भलतियाला । परि जें जग तेव्हां नाठवे ज्याला । त्याच्या प्रत्ययांत तें तेव्हां असेना. ॥ ६०० ॥ आणि असोनि त्या अंगीं आपण । तेथें आपली आपणास न कळे खूण । तें स्मरतांचि अंग तोचि निपुण । तेथें जो आत्मा त्या आत्मयाच करितां तें जाणे. ॥ ६०१ ॥ एवं बुद्धि जेथें पावते । तेथेंचि आत्मयाची

१. विंझणा, पंखा. २. हरळीच्या मुळ्या.

प्रतीति येते । जड सृष्टि तेंव्हां दिसते । तेथें तयाच आत्मयाकरितां गुरुमुखें. ॥ ६०२ ॥ आत्मयांत भूतें सकळ । आत्मा भूतीं तरंगीं जैसें जळ । परि दृष्टि जेथें पाहे निवळ । तेथें जलतरंग दोनी दिसती. ॥ ६०३ ॥ आणि जेथें न पावली दृष्टी । तेथेंही जळींच असे तरंगसृष्टी । प्रस्तुतीं कृपामृताची वृष्टी । याचि भावें या श्लोकीं होतसे. ॥ ६०४ ॥ कीं सर्वगत आकाश पोकळ । त्यांत वायु सर्वत्र तो अकळ । कळतो जो महावायु म्हणिजे चंचळ । परि अकळही तोचि वायु त्याच आकाशीं. ॥ ६०५ ॥ तैसा आत्मा सर्वगत । त्यांत भूतें सर्व एकसरें न कळती निश्चित । कळती तीं जेथपर्यंत । दिसे इंद्रियां अथवा स्मरे बुद्धी. ॥ ६०६ ॥ बुद्धि इंद्रियें जाणती । तीं भूतें ज्या आत्मयांत असती । त्यावेगळीं प्रत्यया न येतां उरती । तींही तेंच त्याच आत्मयांत हा अर्थ. ॥ ६०७ ॥ आत्मा नव्हे वेगळा । प्रकृतिभागही नव्हे निराळा । अन्योन्य जडभागा सकळा । भेद नसे. ॥ ६०८ ॥ आत्मा सर्वत्र परि निर्धर्म । तों तों प्रत्यय जों जों बुद्धीचा आक्रम । न स्मरे तेंही स्थावरजंगम । अवधारीं आपणांत अर्जुना! म्हणतसे. ॥ ६०९ ॥ **'तथा सर्वाणि भूतानि । मत्स्थानीत्युपधारय'** म्हणोनी । कृष्ण म्हणे कीं मजमाजीं म्हणजे ये रीतीकरोनी । तूं आपणांतही सर्वभूतें अवधारीं. ॥ ६१० ॥ पूर्वी **'मत्स्थानि सर्वभूतानि'** । म्हणे पाहें **'पश्य'** म्हणोनी । येथें **'तथा सर्वाणि भूतानि । मत्स्थानीत्युपधारय'** म्हणतसे. ॥ ६११ ॥ कीं पूर्वी मजमाजीं सर्वभूतें । पाहें म्हणोनि बोलिलों तूतें । तीं एकसरें तुझ्या बुद्धीतें । न आकळती हें सत्य. ॥ ६१२ ॥ तरी आकाशीं द्विधा वायु दृष्टांतें । आपणाचि माजीं स्मृतें आणि अस्मृतें । आहेत सर्वेही भूतें । अवधारीं ऐसें अर्जुना! ॥ ६१३ ॥ अगा! मजशीं ऐक्य जालें । परि माझें ईश्वरत्व तुज नाहीं आलें । म्हणोनि सर्वसाक्षित्व राहिलें । त्यामुळें तुज हा संदेह. ॥६१४॥ अगा! राजा दरिद्रता हरी । सभाग्य आपणासम करी । तोही तैसाच जाला परी । समग्र पृथ्वीशासन तें तों नये तयातें. ॥ ६१५ ॥ आणि जरी नये तें शासन । तैसाच जाला सभाग्य सधन । परि तें करावें त्याणें जतन । तैसा भगवद्भाव हा ध्यावा तुवां सर्वदा. ॥ ६१६ ॥ त्या ध्यानीं सर्वेही भूतें । न आठवती जरी तूतें । या भावें आकाशवायुदृष्टांतें । **'तथा' 'उपधारय'** म्हणोनि बोलिलें हें ध्यान. ॥ ६१७ ॥ भगवद्वाक्यार्थ ये रीती । परि इतर टीकाकार

१. पूर्ण, भागरहित.

ऐसें न बोलती । पूर्वी ज्ञान बोलिला त्यास म्हणती । **'यथाकाश--'** हा दृष्टांत. ॥ ६१८ ॥ तरी मागिल्या तिन्ही गोष्टी । पाहतां तिकडे देऊनि दृष्टी । वृथा जाले सर्वही कष्टी । दृष्टांत त्या तिहीं गोष्टींस लागेना. ॥ ६१९ ॥ मजमाजीं सर्वभूतें । जरी इतकेंचि बोलिलें असतें । तरी या दृष्टांतास येतें । साम्य कांहींसें. ॥ ६२० ॥ कीं मजमाजीं म्हणतो तो अव्यक्तमूर्ती सत्य । आणि भूतें जरी जडें असत्य । तरी दृष्टांत एकदेशी घ्यावा अगत्य । कीं आकाशीं वायु तैसीं भूतें त्यामाजीं. ॥ ६२१ ॥ परि प्रस्तुतीं म्हणतो कीं मी नसें त्या भूतीं । आणि तीं भूतेंही मजमाजीं नसती । तैसा आकाश वायूंत नसे ये रीती । आणि वायुही नसे नभीं तरी हें घडे. ॥ ६२२ ॥ आकाश जड पोकळ । ब्रह्म चिन्मात्र इंद्रियां अकळ । तथापि आकाशवत्सर्वगत केवळ । श्रुति एकदेशी दृष्टांत बोलती. ॥ ६२३ ॥ येथें **गीतें**तही त्रयोदशीं । आकाशासारिखें व्यापक म्हणोनि एकदेशी । व्यापकत्वीं दृष्टांत उपदेशी । श्रीकृष्ण. ॥ ६२४ ॥ परि मजमाजीं भूतें असती । आणि मी नसें त्या भूतीं । तींही मजमाजीं नसती म्हणे **श्री**पती । यास दृष्टांत आकाशीं वायु केंवी घडे? ॥ ६२५ ॥ आकाशीं वायु असे । वायूंतही आकाश वसे । आतां सादृश्य केंवी गवसे? । दृष्टांतीं आणि दार्ष्टांतिकीं. ॥ ६२६ ॥ आतां **'भूतभृन्न च भूतस्थो'** या चरणीं । पूर्वश्लोकीं भूतें धरोनि भूतीं नसे म्हणे **चक्र**पाणी । इतकिया दृष्टांतीं वाणी । योजावी तरी योजेना. ॥ ६२७ ॥ कीं आकाश वायूतें धरी । आणि असेच त्या समीरीं । गगन समीरीं नसे यापरी । न घडे तो न लगे दृष्टांत. ॥ ६२८ ॥ आतां वारा चळेना गगनीं । तेव्हां गगनच असे वारा नसे म्हणोनी । दृष्टांत साधिला ऐसा दांत चावुनी । तरीही व्यर्थ. ॥ ६२९ ॥ कीं चळेना वायु जेधवां । वारा नसे जरी म्हणावा तेधवां । तरी विंजणा हालतां मानवां । त्वचेस लागे तो उपजला कोठोनी? ॥६३०॥ जें तरंगरूप जळ । तेंचि जळ म्हणावें अचळ । जो स्थिर तोचि चंचळ । वारा गगनीं सर्वदा. ॥ ६३१ ॥ आणि **'यथाकाशस्थितो नित्यं'** म्हणोनी । अचळ वायुही या नित्यशब्दें करोनी । घेतला कीं न हाले तेधवांही गगनीं । नित्य असे. ॥ ६३२ ॥ अचळ वारा न दिसे । तथापि तो गगनीं असे । भूतग्राम ऐसा वसे । तरी न म्हणावें कीं भूतें हीं नसती मजमाजीं ॥ ६३३ ॥ अकळ वायु गगनीं अचळ । तैसीं भूतें ब्रह्मीं म्हणतो सकळ । ऐसें म्हणावें तरी जो नव्हे चंचळ । असेच गगन त्यांत तोही गगनीं असेच ॥ ६३४ ॥ कीं भूतें जैशीं त्यांत असती । तो नसे म्हणावा

तैसा भूतीं । अचळ वायु न कळे तरी व्यापकगती । आकाशचि असे त्या वायूंत. ॥ ६३५ ॥ तेव्हां मी भूतीं नसें म्हणे ऐसें । हें दृष्टांतीं साधेल कैसें? । कीं ब्रह्मीं भूतांचें असणें जैसें । तैसें अकळ वायूचें असणें आकाशीं. ॥६३६॥ आतां भूतेंही म्हणे मजमाजीं नसती । यास अकळ वायु गगनीं नाहीं न म्हणवे ये रीती । कीं जरी ब्रह्मीं भूतांची वसती । जो अचळ न कळे त्या वायूसारिखीं लेखिलीं. ॥ ६३७ ॥ म्हणे भूतें हीं मजमाजीं नसती । तेव्हां अकळ वायु गगनीं नसे जरी ये रीती । तरी अवश्य दृष्टांत हा मानिती । संत विवेकी शोधक. ॥ ६३८ ॥ दोहींपरि अघटित । पूर्वोक्त ज्ञानास न लागे हा दृष्टांत । कीं स्मृता अस्मृता भूतांचें अद्वैत । ऐसें अवधारीं म्हणजे ध्यान करीं म्हणतसे. ॥ ६३९ ॥ आणि वायूचीं रूपें दोनीं । ये स्थळीं निरर्थक काय म्हणोनी? । **'यथाकाशस्थितो नित्यं'** इतकिया वचनीं । निर्वाह दृष्टांताचा होतसे. ॥ ६४० ॥ **'सर्वत्रगो'** आणि **'महान्'** म्हणोनी । रूपें वायूचीं दोनी । आणि दृष्टांत पूर्वोक्तास लागेना यावरूनी । स्पष्ट भगवद्भाव हा नव्हे ऐसा श्लोकचि दावितो. ॥ ६४१ ॥ सर्वभूतीं आत्मा ध्यावा । हा बोध ज्यास असेल ठावा । त्यालाचि हा संदेहही उठावा । कीं ध्यातां उरलीं तीं आत्मयांत कैसीं पहावीं? ॥ ६४२ ॥ क्षुधा असेल ज्याला । अन्नाची इच्छा उपजेल त्याला । त्याच वरी कृपा अन्नदातयाला । उपजेल अन्न द्यावयाची. ॥ ६४३ ॥ त्यालाच त्या अन्नाचा रस । अनुभवास येतो सुरस । तैसा हा अर्थही जगन्निवास । सर्वभूतीं भगवद्भाव ज्यास त्यालाचि देतसे. ॥ ६४४ ॥ या अनुभवाचा ज्यांस ठाव नसे । ते हा अर्थ काढितील कैसे? । लागेचि ना तेथें? जैसे तैसे । गेले निर्वाहसा करूनियां. ॥ ६४५ ॥ षष्ठीं **'सर्वभूतस्थमात्मानं'** या श्लोकांत । सर्वभूतीं आत्मा सर्वभूतें आत्मयांत । तेथें सर्वघटीं जळ सर्वघट जळांत । बुडाले या दृष्टांतें हा अर्थ साधिती. ॥ ६४६ ॥ ऐसें द्वैत उरवूनि बोलती । प्रस्तुतीं मजमाजीं भूतें मी नसें भूतीं । येथें फेंस आणिला दृष्टांतीं । असे भगवद्भाव भूतीं तरी हें कळे. ॥ ६४७ ॥ प्रस्तुतीं त्या टीकेचें भक्त अत्यंत । ते येथें म्हणतील एकदेशी दृष्टांत । तरी आकाश जड चित्स्वरूप भगवंत । तेथें एकदेशी म्हणावें. ॥ ६४८ ॥ भूतें मजमाजीं त्या भूतीं । मी नसें तींही मजमाजीं नसती । असोनि नसणें इतकी तों रीती । दृष्टांताची मिळावी. ॥ ६४९॥ जळामाजीं फेंस दिसे । परि फेसीं जळ नसे । जिहीं इतकें तरी साधिलें तेचि कैसे । हा दृष्टांत तिकडे लाविती? ॥ ६५० ॥ वायु आकाशीं वसे । परि आकाश वायूंत नसे । ऐसा फेंस जळासारिखाही न दिसे । दृष्टांत येथें. ॥६५१॥

भूतें असोनि नसती । हें मुख्य साधितो येथें **य**दुपती । तो नवरा सोडोनि मिरवती । वराडी व्यर्थ? ॥ ६९२ ॥ अधिष्ठान असे सत्य । विवर्त भासे असत्य । ऐसे कोटि दृष्टांत सोडोनि अगत्य । काय हाच दृष्टांत सर्वज्ञास आठवला? ॥ ६९३ ॥ **भ**गवंत म्हणा वेडा । अथवा त्या टीकेची श्रद्धा सोडा । **गी**ता सोडोनि व्यर्थ पवाडा । गोष्टींचा वाचणें तरी वाचा गोड गोष्टी. ॥ ६९४ ॥ **गी**[1]ता जाते पश्चिमेकडे । टीका चढे पूर्वदिशापर्वताचे कडे । दोहींस हात लाविती बापुडे । अर्थ सांपडे कैंवी तयां? ॥ ६९५ ॥ दृष्टांत लागला कोणे अंशीं । कीं उरल्या साम्यास मानावें एकदेशी । सर्वज्ञ तत्त्व उपदेशी । दृष्टांत अयोग्य तो कां बोलेल? ॥ ६९६ ॥ भूतें मजमाजीं असती । हे प्रथम गोष्टी बोले **श्री**पती । आकाशीं वायु ये रीती । दृष्टांत एके गोष्टीस मानावा. ॥ ६९७ ॥ तरी भूतें आपणांत नसती । हें सिद्ध करावया आदीं म्हणे असती । वरास लावाया आदीं आणिती । हरिद्रा जैसी. ॥ ६९८ ॥ दवडोनियां त्या वरा । हरिद्राच म्हणती नवरा । अंतरपट म्हणती धरा । नवरी आणि हरिद्रा यांमाजीं. ॥ ६९९ ॥ भूतें असोनि नसती । हें सिद्ध करितो **श्री**पती । या दृष्टांतें भूतें निश्चित असती । बळकटी होती या गोष्टीची. ॥ ६६० ॥ मी त्यांत नाहीं । तीं मजमाजीं नसती कांहीं । उडाल्या या गोष्टी दोनीही । प्रथम गोष्टीस दृष्टांत हा देतां. ॥ ६६१ ॥ नसे गगन पवनीं । नसेच पवनही गगनीं । हें न घडे तेव्हां गेलिया उडोनी । दोनीही गोष्टी या दृष्टांतें. ॥ ६६२ ॥ **भ**गवंतीं असावीं भूतें । भूतीं नसावें **भ**गवंतें । पुन्हां भूतेंही **भ**गवंतीं नसती ऐशा दृष्टांतें । हा अर्थ साधावा. ॥ ६६३ ॥ येथें तत्त्व दावूनी अपरोक्ष । **भ**गवद्रूप दावी प्रत्यक्ष । हातींच्या कांकणास कोण दक्ष । अपेक्षी आरसा? ॥ ६६४ ॥ म्हणोनि विना दृष्टांत । तत्त्व दावी **भ**गवंत । अपरोक्षानुभवासही अशक्य अत्यंत । तेविषयीं दृष्टांत हा दावी. ॥ ६६५ ॥ कीं जाला अपरोक्ष साक्षात्कार । **भ**गवद्रूप देखे चराचर । तरी अशेष विश्व निरंतर । न दिसे तया. ॥ ६६६ ॥ एक **ई**श्वरच हें जाणे । ज्ञानियास सर्वही ब्रह्म इतकेंच बाणे । विश्वरूप दावितां **पा**र्थासि म्हणे । कीं या दृष्टीनें मातें पाहों न शकसी. ॥ ६६७ ॥ देऊनियां दिव्य दृष्टी । मग एकदांचि दाविली सर्व सृष्टी । अपरोक्ष उपदेश करुणावृष्टी । असोनि दिव्यदृष्टींच दाविलें विश्वरूप. ॥ ६६८ ॥ पावला अपरोक्ष साक्षात्कार **पा**र्थ । प्रथम श्लोकीं विश्वरूपी हा स्पष्ट अर्थ । या नवमीं तो समर्थ । पाहें पाहें म्हण-

---

१ वामनपंडितांनीं इतर टीकाकारांवर बऱ्याच ठिकाणीं असा कोरडा उडविला आहे.

तसे. ॥ ६६९ ॥ राजा सकळ विद्यांचा । राजा सकळ गुह्यांचा । ज्ञानविज्ञानसहित सांगतों म्हणे स्ववाचा । आणि पाहें म्हणोनि साक्षात्कारें दाखवी तें. ॥ ६७० ॥ एवं अपरोक्षसंपन्न पार्थ । तथापि विश्वरूप या दृष्टीं न दिसे यथार्थ । म्हणोनि सिद्ध होतो अर्थ । कीं न स्मरती तींही भूतें ये रीती पाहें आपणांत ॥ ६७१ ॥ कीं चंचळ आणि अचळ । द्विविधही एकाच गगनीं अनिळ । तैसीं स्मृतें अस्मृतें भूतें सकळ । एकाच निर्धर्मा स्वात्मयांत अवधारीं. ॥ ६७२ ॥ कीं अवधारणें बुद्धीचे शिरीं । परि तें तेजें दृष्टी प्रकाशे यापरी । आत्मयाकरितां सचेतन होतां चराचरीं । तो आत्मा पवन गगनीं ये रीती. ॥६७३॥ सूर्यतेजें प्रकाश पावे । ते दृष्टी तेजावरी धांवे । धांवतां तेज उरलें न म्हणवे । वेगळें तेज सूर्याचें. ॥ ६७४ ॥ तेजांत जेथवरी धांवे दृष्टी । तेथवरी देखे त्या तेजें प्रकाशली सृष्टी । पुढें तेंच तेज तेचि सृष्टी न दिसतां कष्टी । तदर्थ कोण होय ? ॥ ६७५ ॥ आत्मयानें प्रकाशली बुद्धिदृष्टी । आत्मप्रकाशित चित्तें स्मरे त्यांत सृष्टी । उरला आत्मा आणि सृष्टि तदर्थ कष्टी । न कळे आत्मत्वें म्हणोनि कां व्हावें ? ॥ ६७६ ॥ तोचि आत्मा उरला जैसें गगन । तेचि सृष्टी उरली गगनीं जैसा पवन । सर्वत्र आपण सर्व आपणांत ऐसें समाधान । या श्लोकीं केलें ऐसें अवधारीं म्हणोनी. ॥ ६७७ ॥ उदंड टीकाकार जाले समर्थ । परि या श्लोकांचा अचुंबितार्थ[1] । या 'यथार्थदीपिके'नेंच प्रगटला यथार्थ । अनन्यशरणगतिप्रतापें. ॥ ६७८ ॥ मंगलाचरणीं क्षुद्रदेवता । त्यांस कठीण अत्यंत हे गीता । विना गीताकार अनंता । कोण टीकाकार टीका करील गीतेची ? ॥ ६७९ ॥ अद्वैताच्या आश्रयें । ब्रह्मचि सर्वदेवता या निश्चयें । आम्हीं ज्ञानी जगद्गुरु स्वयें । ऐसें मानूनि वर्म चुकले भक्तीचें. ॥ ६८० ॥ ब्रह्म सर्वत्र सम । तरी घरची बटिक काय नव्हे ब्रह्म ? । कां तीचें श्रवणकीर्तन न करावें परम ? । कां मंगलाचरण तीचें करूं नये ? ॥ ६८१ ॥ देवता विघ्न हरी । तेचि मंगलाचरणीं वंदावी कां परी ? । एवं ब्रह्म सर्व परि उंच नीच पायरी । एकएकाची उपाधिभेदें. ॥ ६८२ ॥ एवं ईश्वरोपाधियुक्त निर्गुण । तेंचि एक भजावें सगुण । हे न कळोनि गीताप्रोक्त खूण । तक्र पिती दुग्ध म्हणोनी. ॥ ६८३ ॥ असोत त्या गोष्टी । अनन्यभक्तीवांचूनि दृष्टी । गीतार्थ न पडे वृथा कष्टी । टीकाकार जाले कितीएक. ॥ ६८४ ॥ हें परटीकादूषण । आणि स्वटीकाभूषण । अभिमानें किंवा न्यायें हें विचक्षण । पाहोत पूर्ण दीर्घदृष्टी.

---

१. अननुभूत किंवा न समजलेला अर्थ. ह्या ओंवीत वामनपंडितांनीं आपल्या कृतीचा अभिमान—गर्व नव्हे—व्यक्त केला आहे.

॥ ६८५ ॥ न करितां मृषा जडाचें रूप । न कळे सत्य चित्स्वरूप । शास्त्रविरुद्ध पक्ष विरूप । न दूषितां नव्हे रूप अर्था यथार्थाचें. ॥ ६८६ ॥ श्रोते हा सिद्धांत यथार्थ । परिसोनि तेही देखतील अर्थ । त्या बाधितार्थीं श्रद्धा धरोनि व्यर्थ । च्यवतील तत्त्वापासूनी. ॥ ६८७ ॥ यालागीं ते अर्थ बाधित । अगत्यस्थळीं दूषूनि हा अबाधित । अर्थ बोलावा लागतो हेंही भगवंत । कां ऐसें करितो तो जाणे. ॥ ६८८ ॥ सिद्धांत होतां यथार्थ । सहज उडती कित्येक अर्थ । ते दूषूनि कां व्यर्थ ग्रंथ । अत्यंत वाढवावा ? ॥ ६८९ ॥ येथवरी राजविद्याप्रकरण । प्रत्यक्ष हें भगवद्रूप ऐसें विवरण । जालें आतां जगद्वंद्यचरण । काय बोलेल तें पहावें. ॥ ६९० ॥ सा श्लोक या अध्यायांत । बोलिला ऐसे भगवंत । राजविद्याप्रसंग येथपर्यंत । अनन्यशरणें वाखाणिला. ॥ ६९१ ॥ यांत प्रथम श्लोक दोनी । राजविद्या अत्यंत थोर ते सांगतों म्हणोनी । तिसरिया श्लोकीं ज्या धर्मावांचूनी । हें प्राप्त नव्हे वर्णिलें त्याचे अश्रद्दधान. ॥ ६९२ ॥ पुढें जें राजगुह्य होतें बोलणें । तें दों श्लोकीं नारायणें । बोलोनि ये रीती आपणातें अवधारणें । म्हणोनि या एका श्लोकीं तें निरूपिलें. ॥ ६९३ ॥ ऐसी षट्श्लोकीं बोलिली । प्रत्यक्षही भगवद्रूपाची किल्ली । प्रकट करितां नाहीं उरली । उरी कांहीं गुह्य बोधाची यापुढें. ॥ ६९४ ॥ अशेष गेलें द्वैत । बिंबलें परम अद्वैत । प्रत्यक्ष जडभागही भगवंत । ऐसें बिंबलें. ॥ ६९५ ॥ प्रत्यक्षही हें भगवद्रूप देखे अर्जुन । याचें नांव पूर्वीं बोलिलें विज्ञान । आणि भूतें दिसोनि नसती हें ज्ञान । या ज्ञानेंचि विज्ञान हें होय. ॥ ६९६ ॥ म्हणोनि विज्ञानासहित । ज्ञान सांगेन म्हणे भगवंत । आणि या ज्ञानाचें साधन अत्यंत । भागवतधर्म. ॥ ६९७ ॥ म्हणोन याच्या धर्माचे अश्रद्दधान । तें न पावोनि मातें श्रद्धाहीन । मृत्युसंसारमार्गीं बहुत जन । परतले ऐसें मागें बोलिला. ॥ ६९८ ॥ एवं विना भगवद्भजन । सर्वथा नव्हे आत्मज्ञान । त्यांत कोणी मुमुक्षु जन । आत्मा कळतां सगुण सोडिती. ॥ ६९९ ॥ ते क्लेश अधिकही पावले । तथापि मुक्त तों जाले । जे ज्ञानें सगुण भजों लागले । ते पावले या भगवत्प्रबोधातें. ॥ ७०० ॥ परंतु होय आत्मज्ञान । त्यास साधन भगवद्भजन । त्या भगवद्भजनीं अश्रद्दधान । ते पढतमूर्ख संसारीं परतले. ॥ ७०१ ॥ मातें न पावोनि ते परतले । ऐसें मागें श्रीकृष्ण बोले । एवं आत्मस्वरूप कृष्णास पावले । ते न परतले कदापि. ॥ ७०२ ॥ त्यांत कोणीं धरिलें निर्गुण । कोणी निर्गुणज्ञानें भजती सगुण । परि स्वरूपातें पावले ते निपुण । न परतती कोणीही. ॥ ७०३ ॥ हा सिद्धांत जाला केवळ । परंतु एका संशयाचें हें स्थळ । कीं प्राप्त होतां प्रल-

यकाळ । ब्रह्मीं मिळे सर्वही. ॥ ७०४ ॥ कीं सूर्य शोषी थिल्लरजळें । त्यांत सूर्याचीं प्रतिबिंबें केवळें । तीं सूर्यांत मिळती सकळें । प्रलयीं ब्रह्मीं उपाधिसहित ये रीती. ॥ ७०५ ॥ प्रळयीं उपाधिसहित जीव । मिळती उरे निर्गुण स्वयमेव । तेथोनि पुनः होतसे उद्भव । उपाधीचा आणि जीवाचा. ॥ ७०६ ॥ ऐसे ब्रह्मीं पावले। ते जेव्हां परतले। तेव्हां हेही जरी ज्ञानी भले । तरी परततीच ऐसें म्हणावें.॥७०७॥ ते कां परतती ब्रह्म पावोनी । हे कां न येती परतोनी । ज्ञानी आणि अज्ञानी । ब्रह्मचि होती प्रलयीं दोघेही. ॥ ७०८ ॥ एवंच न पावले मातें । ते परतले ऐसें बोलिलें भगवंतें । तरी तेही प्रलयीं तयातें । पावती निश्चित. ॥ ७०९ ॥ जे पावले ते न परतती । तरी हेंही प्रलयकाळीं पावती । जरी हे पावोनि परतती मागुती । तरी तेही परतती म्हणावें. ॥ ७१० ॥ पावोनिही परतणें घडे । तेव्हां भगवंत बोलिला तें उडे । कीं मातें न पावोनि पडे । मृत्युसंसारमार्गीत. ॥ ७११ ॥ न पावतां जेव्हां परतले । तेव्हां न परतती जे पावले । ऐसें दाटूनि भगवंत बोले । येथें उडाली ते गोष्टी. ॥७१२॥ प्रलयीं ब्रह्म केवळ । पावती जीव सकळ । तेव्हां हे गोष्टी निष्फळ। कीं पावले ते न परतती. ॥ ७१३ ॥ एवं पूर्वपक्ष सबळ । हा परि हरूं पाहे मेघनीळ । प्रलयसृष्टिप्रकरणारंभमूळ । पूर्वपक्ष ऐसा वर्णिला. ॥ ७१४ ॥ कीं प्रलयीं सर्वही ब्रह्मस्वरूपीं । मिळती हें अन्यथा नव्हे कदापी । पुनरावृत्तिहेतु तथापि । त्यास असे तो बोलतो या श्लोकीं. ॥ ७१५ ॥

**सर्वभूतानि कौंतेय प्रकृतिं यांति मामिकाम् ।**
**कल्पक्षये पुनस्तानि कल्पादौ विसृजाम्यहम् ॥ ७ ॥**

अगा कुंतीसुता! माझी प्रकृती। जी करी प्रलयोत्पत्ती । हीं भूतें तीतें पावती। कल्पक्षयीं याकरितां पुनर्भव. ॥ ७१६ ॥ कल्पाचिया आदिकाळीं तया । पुनः निर्मितों धनंजया! । मज न पावोनियां जया । प्रलयीं पावणें प्रकृतीतें. ॥७१७॥ माझिया प्रकृतीतें पावती । या गोष्टींत संशयनिवृत्ती । कीं बीजांतूनि वृक्ष ये रीती । सृष्टिकाळीं उपजे प्रकृतीपासूनि हा प्रपंच. ॥ ७१८ ॥ तेव्हां उपाधि प्रकटती । जळें होतां प्रतिबिंबें दिसती । जे प्रकृतीतें पावती । त्यांतें निर्मितों या भावें म्हणतसे. ॥ ७१९ ॥ ज्ञान नाहीं तयांतें । हें सूचवी म्हणतां सर्वभूतें । प्रकृतींत मिळती ते कीं जयांतें । अभिमान देहा जडाचा. ॥ ७२० ॥ आत्मा जिहीं ओळखिला । जडभाग मिथ्या लेखिला। तिहीं तो नाहींच देखिला।

---

१. डबक्यांतील पाणी.

प्रलयकाळं. ॥ ७२१ ॥ ते कां प्रकृतीतें पावती । ज्यांस बाणली ब्रह्मात्मत्वस्थिती । त्यांची गणना नसे सर्वभूतीं । मातें पावले ते ऐसे. ॥ ७२२ ॥ एवं सकळ वेदवेदांत । बोलती हाच सिद्धांत । कीं ब्रह्म पावले जे भाग्यवंत । ते प्रलयीं न मिळती प्रकृतीतें. ॥ ७२३ ॥ उपाधि पावले ज्या प्रकृतीतें । ब्रह्मीं लय बोलिजेतो तीतें । पुन्हा उदय बोलिला ते गुणवतीतें । सृष्टिकाळीं.॥७२४॥ प्रलयकाळीं जें जें गिळी । सृष्टिकाळीं तें तें उगळी । लय पावती जैशीं तैशींच सगळीं । सृष्टिकाळीं प्रकटती. ॥ ७२५ ॥ प्रलयकाळीं मिळालीं तीतें । तीं सर्वेही म्हणावीं भूतें । प्राकृतें पावती प्रकृतीतें । ब्रह्म पावले ते ब्रह्मज्ञ.॥७२६॥ ज्यांची अविद्या गेली । जिहीं ब्रह्मीं ब्रह्ममय बुद्धि केली । ब्रह्मींच ते त्यांची निमाली । बुद्धिलहरी आनंदसिंधूंत. ॥ ७२७ ॥ जोंवरी प्रारब्धाचा वारा । तों बुद्धिवृत्ति जडतरंगाकारा । होत होत्या तो सरतां सारा । लहरी बुद्धीचीही निमाली. ॥ ७२८ ॥ बुद्धीच जीवोपाधी । ते ब्रह्मीं मिळे प्रलयाआधीं । तरी चिदंशास मग कधीं । प्राप्त नव्हे जीवत्व. ॥ ७२९ ॥ दिनांतीं लय मृगजळाचा किरणीं । प्रकृतीऐसी मिळे निर्गुणीं । ज्याचा उपाधि तिच्या त्रिगुणीं । न मिळे तो सृष्टिकाळीं उपजेना. ॥ ७३० ॥ घट फुटे नासे जळ । त्यांत कैसें प्रतिबिंबे सूर्यमंडळ । अविद्या नाशितां अविद्यामूळ । उपाधि नासे न मिळे प्रलयीं प्रकृतीतें. ॥ ७३१ ॥ अविद्या आहे ज्यांची । प्रलयीं प्रकृतीतें बुद्धि त्यांची । मिळे ते सृष्टिकाळीं प्रकटतां जीवाची । जीवदशा मागुतीं प्रगटते. ॥ ७३२ ॥ त्यांस भूतें शरीरें । आत्मा वाटती चराचरें । म्हणोनि त्यांस एकसरें । सकट भूतें म्हणे श्रीकृष्ण. ॥ ७३३ ॥ आतां क्रममुक्ति ज्यांला । प्रलयकाळीं ब्रह्मयासह मोक्ष त्यांला । परि अविद्यानिवृत्ति करूनि असे जाला । ब्रह्मात्मबोध. ॥ ७३४ ॥ जीवोपाधि ब्रह्मयाचा । ब्रह्मीं मिळे तैसाच त्यांचा । प्रकृतींत न मिळे ज्यांला साचा । आत्मा उपाधि मृषा जडावेगळा विदित. ॥ ७३५ ॥ एवं च अज्ञानयुक्त उरले । ते प्रकृतीतें पावले । तेचि येथें बोलिले । सर्वभूतें म्हणोनी. ॥ ७३६ ॥ कल्पक्षयीं प्रकृतीतें मिळती । त्यांस कल्पादिकाळीं म्हणे जगत्पती । मी निर्मितों कीं मातें पावती । निर्मित नसें तयां हा भाव. ॥ ७३७ ॥ म्हणतां कल्पक्षय । सूचवी महाप्रलय । कल्पादि शब्दें मायेचा उदय । तो प्रथम सृष्टिकाळ. ॥ ७३८ ॥ कल्पशब्दें ब्रह्मयाचा दिवस । म्हणोनि दिनप्रलय दिनसृष्टि यास । म्हणों नये कीं सर्व शब्दार्थरस । वायां जातो या अर्थें. ॥ ७३९ ॥ होतां महाप्रलय । तोही ब्रह्मयाचा समाप्तिदिन होय । आणि मायेचा जो उदय । तो प्रथम दिवस

कल्पाचा. ॥ ७४० ॥ ऐसा करावा अर्थ । अन्यथा सर्वशब्द होती व्यर्थ । आणि अष्टमीं दिनकल्प लय उदय पार्थ । सांगतां समजला त्याचीही पुनरुक्ती. ॥ ७४१ ॥ आणि लोकत्रयाचाच क्षय । होय होतां दिनप्रलय । सर्वांही भूतांचा लय उदय । तो नव्हे हें सर्वशब्दें अतिस्पष्ट. ॥ ७४२ ॥ एवं प्रकृतीतें पावती । त्यांतें पुन्हा निर्मितों म्हणे श्रीपती । यावरून मातें पावतां न परतती । सूचवी हें समाधान. ॥ ७४३ ॥ आतां यानंतर श्लोक । तो कां बोले उत्तमश्लोक । त्याचें निमित्त सुज्ञ लोक । परिसोत आदीं. ॥ ७४४ ॥ पूर्वश्लोकीं भगवंतें । ऐसें बोलिलें कीं सर्वभूतें । कल्पक्षयीं प्रकृतीतें पावती त्यांतें । मी कल्पादिकाळीं निर्मितों. ॥ ७४५ ॥ लय पावती प्रकृतींत । आणि मी निर्मितों म्हणतो भगवंत । कीं सत्ता तेथें निश्चित । ईश्वरत्व बोलावें. ॥ ७४६ ॥ कीं शूर भांडोनि गड घेती । रायें गड घेतला म्हणती । या भावें म्हणे जगत्पती । मी निर्मितों म्हणोनी. ॥ ७४७ ॥ तथापि अकर्ता आपण । सृष्टि स्थिति संहार हा प्रकृतिगुण । अधिष्ठान आपण निर्गुण । हे समस्त विवर्त मायाप्रकृति माझी तीचे. ॥ ७४८ ॥ तथापि ते सत्ताहीन । आपण तीचें अधिष्ठान । जेथें सत्ता तेथें ईश्वरत्व अर्जुन । समजे ऐसें बोलतो या श्लोकीं. ॥ ७४९ ॥

**प्रकृतिं स्वामवष्टभ्य विसृजामि पुनः पुनः ।**
**भूतग्राममिमं कृत्स्नमवशं प्रकृतेर्वशात् ॥ ८ ॥**

अंगा! आपली प्रकृती । अधिष्ठूनि तीतें मी जगत्पती । पुनः पुनः हा भूताचा ग्राम ये रीती । मी निर्मितों. ॥ ७५० ॥ प्रकृति अधिष्ठूनि निर्मितों म्हणे । तों अर्जुनास खूण बाणे । विवर्तातें अधिष्ठी अधिष्ठान हें जाणे । पात्र भगवत्कृपेचें. ॥ ७५१ ॥ रज्जु अधिष्ठी सर्पातें । शुक्ति अधिष्ठिते रुप्यातें । तंतु अधिष्ठी पटातें । घटातें मृत्तिका. ॥ ७५२ ॥ हे कार्यरूपिणी प्रकृती । सूचवी मायाधिपती । प्रलयानंतर जगत्पती । योगनिद्रा करी तेव्हां हे नसे. ॥ ७५३ ॥ रज्जूवरी सर्प दिसे । तेव्हां कीं द्रष्टा असे । कर्तयाविण न भासे । पट तंतूंत घट मृत्तिकेंत. ॥ ७५४ ॥ जे प्रलयकाळीं नव्हती । ते सृष्टिकाळीं कोठोनि आली प्रकृती । या गोष्टीच्या समाधानार्थ मायापती । **'प्रकृतिं स्वां'** म्हणतसे. ॥ ७५५ ॥ कीं ते कारणरूपिणी । अगम्यत्वें तेव्हां होती निर्गुणीं । मध्यान्ह टळतां किरणीं । जैसा असे जळभास. ॥ ७५६ ॥ वृक्षाचें पत्र पुष्प फळ पडे । तें अन्यत्र कोठें तरी सांपडे । मध्यान्ह टळतां कोणी-

कडे । जळभास गेला म्हणावा ? ॥ ७५७ ॥ जरी म्हणावा कीं नाश जाला । तरी दुसरे दिनीं कैंचा आला ? । म्हणावा आणीक उपजला । तरी नाश पूर्विल्याचा देखिला कोठें ? ॥ ७५८ ॥ एवं जळाभास कालचा । म्हणावा पक्ष हाचि साचा । परि प्रातःकाळीं भास त्याचा । लेशही मध्यान्हापूर्वीं दिसेना. ॥ ७५९ ॥ तेव्हां किरणरूपें किरणीं । होतें म्हणावें तें मृषा पाणी । तैसी प्रकृति निर्गुणरूपें निर्गुणीं । सृष्टिकाळापूर्वीं होती म्हणावी. ॥ ७६० ॥ तेव्हां ते म्हणों ये स्वप्रकृती । '**प्रकृतिं स्वामधिष्ठाय**' म्हणोनि मायाधिपती । म्हणे आणि तीतें अधिष्ठानीं मागुती । सृष्टिकाळीं निर्मितों भूतांतें म्हणतसे. ॥ ७६१ ॥ एवं प्रकृतिपुरुष एक । हें सूचवी उत्तमश्लोक । प्रकृतिपुरुषव्यतिरेक । तो एकत्व कळाया अन्वयें गुरु बोले. ॥ ७६२ ॥ एवं वाईट ते अविद्या । बरी सर्वथा ते ब्रह्मात्मविद्या । ऐक्यही न सोसे गुरुवराद्या । प्रलयादिकीं ज्या ऐक्यांत अविद्या वसतसे. ॥ ७६३ ॥ म्हणोनि मी देह । हा देहीं आत्मतेनें स्नेह । अविद्याजनित न तुटे संदेह । जडचैतन्यऐक्याचा. ॥ ७६४ ॥ ऐक्य जडचैतन्याचें । अन्वय ब्रह्मविद्येनें घडे तें साचें । अहंकारें देहा प्रतिबिंबाचें । ऐक्य तें ऐक्य म्हणों नये. ॥ ७६५ ॥ ते अहंकाररूपें ग्रंथी । जडचैतन्यास हें सर्वां ग्रंथीं । प्रसिद्ध असे मोक्षपंथीं । ते गांठी पहिली छेदावी. ॥ ७६६ ॥ तथापि प्रकृति त्रिगुण । तेही प्रलयीं निर्गुणीं निर्गुण । त्यांतही '**प्रकृतिं स्वामधिष्ठाय**' म्हणतां खूण । कारण प्रकृतीची सूचवी. ॥ ७६७ ॥ ते अकस्मात् प्रगटे निर्गुणीं । जळभास जैसा किरणीं । हे अनादि स्वशक्ति ऐसें चक्रपाणी । पुनः पुनः निर्मितो म्हणतां सूचवी. ॥ ७६८ ॥ कीं प्रतिदिनीं जळाभास किरणीं । प्रतिसृष्टिकालीं माया निर्गुणीं । पुनः पुनः म्हणोनि चक्रपाणी । प्रतिदिन मृगजळदृष्टांतें सूचवी. ॥ ७६९ ॥ कीं सृष्टीहूनि पूर्वकाळीं श्रुती । कांहींच नव्हतें म्हणती । येथें भेदवादी बोलती । कीं ते काळीं कांहीं नव्हतें म्हणतां असे तो काळ. ॥ ७७० ॥ तरी तें प्रलयशेष ब्रह्मच काळ । तेथें मिथ्या द्वैतकाळाचाही नसे विटाळ । म्हणोनि पुनः पुनः निर्मितों म्हणे मेघनीळ । दृष्टांत दिनदिनीं मृगजळाचा सूचवी. ॥ ७७१ ॥ सृष्टीहून पूर्वीं निर्गुण । तेंचि काळ ऐसी खूण । ऋग्वेदीं श्रुतिमुखें ब्रह्म सगुण । बोलतसे. ॥ ७७२ ॥ '**नासदासीन्नोसदासीत्तदानीं**' म्हणोनी । हे श्रुति म्हणे त्या काळीं कांहीं नव्हतें यावरूनी । ब्रह्मचि तो काळ हें '**तदानीं**'शब्देंकरूनी । श्रुति बोले. ॥ ७७३ ॥ जरी ब्रह्मीं ते काळीं कांहीं । श्रुति म्हणती नाहीं । तरी ब्रह्म एक आणि काळही । दुसरा एक सिद्ध होतो. ॥ ७७४ ॥ मागुती त्याहूनि अन्य

कांहीं । पुढें **श्रु**ति म्हणे नाहीं । तों म्हणतां पूर्वोक्त मागुतीही । काळच हा अर्थ सिद्ध होतसे. ॥ ७७५ ॥ **'तस्माद्धान्यन्नरः किंचनास'** । हे **श्रु**ति शेवटीं तच्छब्दें त्यास । जो **'तदानीं'** म्हणोनि बोलिला त्याच काळास । सूचवोनि म्हणे त्यावेगळें अन्य नसे. ॥ ७७६ ॥ एवं अखंड काळ ब्रह्म निर्गुण । तेथें काळशक्ति माया त्रिगुण । प्रगटे सृष्टिस्थितिसंहाररूण । कालत्रयाची तीकरितां. ॥ ७७७ ॥ ऐसे द्विविध काळ असती । पुढिलिया अध्यायांतही जगत्पती । सांगेल सांगतां विभूती । द्विविधकाळ तेथें. ॥ ७७८ ॥ **'कालः कलयतामहं'** म्हणोनी । **'अहमेवाक्षयः कालः'** म्हणेल मागुती यावरोनी । क्षयरूप अक्षयरूप काळ दोनी । सूचवील पुढें स्पष्टार्थही होणार. ॥ ७७९ ॥ एवं काळही नव्हे कारण । ब्रह्मीं प्रकृतीचें होतां चलन । ती करूनि द्रष्टा सगुण । सृष्टि निर्माण करितसे तो सृष्टिकाळ. ॥ ७८० ॥ मिथ्या होऊनि मृगजळ । नव्हे जैसा रज्जूवरील व्याळ । कीं टळतां मध्यान्हकाळ । द्रष्टा असे मृगजळ दिसेना. ॥ ७८१ ॥ जेव्हां द्रष्टा पाहे । तेव्हां रज्जूवरी सर्प आहे । द्रष्टा पाहे तरी न राहे । मृगजळ टळतां मध्यान्ह. ॥ ७८२ ॥ द्रष्टा पाहे तरी जेव्हां न दिसे । तेव्हां द्रष्टा न पाहे तरी असे । प्रतिसृष्टिकाळीं ऐसे । ब्रह्मीं लय उदय मायेचे. ॥ ७८३ ॥ माया प्रगटे प्रथम । तिच्या योगें सगुण होय ब्रह्म । तेधवां द्रष्टत्वधर्म । आणि इच्छा सृष्टीची तेधवां. ॥ ७८४ ॥ तेव्हां अधिष्ठूनि ते प्रकृती । स्वयें अधिष्ठान तिचें जगत्पती । सृष्टीकरितां उत्पन्न होती । भूतें स्थावर जंगमें. ॥ ७८५ ॥ जिव्हेनेंच जिव्हा म्हणे । तो जिव्हेस आपणासही द्रष्टा जाणे । जिव्हा आपणास त्यास दोहींसही नेणे । मायेनें ईश्वर द्रष्टा मायेचा ये रीती. ॥ ७८६ ॥ मायेनेंच मायेस आपणास पाहे । तीवांचूनि निर्धर्म जो आहे । तो निर्गुणीं निर्गुणच होऊनि राहे । सृष्टिकाळापूर्वीं कारणीं आपल्या. ॥ ७८७ ॥ एवं बीजांत वृक्ष वसे । ऐसी सृष्टीहूनि पूर्वीं प्रकृती असे । तें जडकारण तिचेंहि कार्य दिसे । वृक्षबीजांतूनि उपजे जे रीती. ॥ ७८८ ॥ ते ब्रह्मीं ऐसी कीं किरणीं जैसें जळ । कीं ब्रह्मरज्जूंत ते जैसा व्याळ । कीं सागरीं जैसे कल्लोळ । तैसें कार्य हें विश्व ब्रह्मीं त्या कारण प्रकृतीचें. ॥ ७८९ ॥ **'प्रकृतिं स्वामधिष्ठाय'** म्हणोनी । प्रकृति भिन्न नसे ऐसें 'स्व'शब्देंकरोनी । सूचवी कीं कार्य कारणावस्था दोनी । प्रकृतीच्या मजवेगळ्या नसती हा भाव. ॥ ७९० ॥ ये रीती हा भूतग्राम । पुनः पुनः निर्मितों म्हणे घनश्याम । नाना रूप नाना नाम । सकळ भूतग्राम मी निर्मितों. ॥ ७९१ ॥ प्रतिबिंब जीवांश त्यासहित । स्थावर अथवा जंगम शरीर तें भूत । त्यांचा ग्राम समुदाय म्हणे भगवंत ।

पुनः पुनः ये रीती निर्मितों. ॥ ७९२ ॥ निर्मितों प्रकृतीतें अधिष्ठूनी । आणि पुनः पुनः म्हणोनी । सूचवी या दों गोष्टींकरोनी । अनादित्व प्रकृतीचें. ॥ ७९३ ॥ आतां प्रकृति पुनः पुनः प्रगटते । तरी तेच प्रगटो भूतसृष्टि कां होते । शंका ऐसी ये स्थळीं येते । ते चतुर्थचरणीं परिहरतो. ॥ ७९४ ॥

चतुर्थचरण—**अवशं प्रकृतेर्वशात्** ॥

अगा! जो दुसरिया एकास वश । स्वतंत्रपण नसे लेश । तयास म्हणावें अवश । तरी अवश भूतग्राम हा. ॥ ७९५ ॥ कीं स्ववश असता स्वतंत्र । तरी न उपजता भूतग्राम हा विचित्र । तरी कोणास वश ज्यास्तव परतंत्र। भूतग्राम हा जरी म्हणसी. ॥ ७९६ ॥ तरी **अर्जुना!** हे अनादि प्रकृती । जे तुज सांगतों प्रस्तुतीं । वश भूतें तीतें असती । अवश भूतग्राम यास्तव. ॥ ७९७ ॥ वश भूतें प्रकृतीतें । म्हणोनि पुनः पुनः होती भूतें । मी अधिष्ठूनि तीतें । निर्मित असें. ॥ ७९८ ॥ अधिष्ठूनि निर्मितों म्हणे । यांत आपलें अकर्तृत्व बाणे ।पुनः सत्ता तेथें कर्तृत्व हेंही जाणे । स्वभक्त ऐसें बोलिला या श्लोकीं. ॥ ७९९ ॥ हें आयके **धनंजय** । तो मागुता सशंक होय । कीं जीवाचिया कर्मींही हाचि निश्चय । कीं प्रकृति अधिष्ठूनीच करिती जीवही. ॥ ८०० ॥ जीवत्वींही चिदंशातें । अकर्तृत्व ऐसेंच येतें । तथापि बंधक होतें । कर्म तें. ॥ ८०१ ॥ जरी न कळे तरी चिदात्मा अकर्ता । प्रकृति करी स्वयें तो नव्हे कर्ता । तथापि जीवांस बंध ऐसी वार्ता । आयकावी याचियाही अकर्तेपणाची. ॥ ८०२ ॥ या शंकेचा परिहार । करावया **सर्वेश्वर** । बोलतसे यानंतर । स्ववैराग्यसूचक श्लोक हा. ॥ ८०३ ॥

**न च मां तानि कर्माणि निबध्नंति धनंजय ।**
**उदासीनवदासीनमसक्तं तेषु कर्मसु ॥ ९ ॥**

अगा **धनंजया!** तींही । कर्में न बाधती मातें कांहीं । कीं मी आसक्त होत नाहीं । त्या कर्माच्या ठायीं कदापि. ॥ ८०४ ॥ एक कर्ता एक पारखा । उगा उदासीन असे त्यासारिखा । मी उदासीन असतों सखा । तुजसारखिया भक्ताचा. ॥ ८०५ ॥ **धनंजया!** म्हणोनी । ये स्थळीं या नांवें करूनी । आळवी सूचवोनी । अर्थ ऐसा. ॥ ८०६ ॥ कीं म्हणतां उदासीन । क्षणी घाबिरा होय **अर्जुन** । म्हणोनि सूचवी भाव गहन । कीं तूं तरी अगा! **धनंजय.** ॥ ८०७ ॥ मी सर्वत्र उदासीन । परि अकिंचनाच्या[१] ग्रंथीचें धन । धनलोभी धन करी जतन । प्रेमपाशें ऐसें मज ते बांधती. ॥ ८०८ ॥ प्रेम

१. कंगालाच्या, द्रव्यहीनाच्या.

तेथें मी वसें । धन आकिंचनाचें मी असें । तो रथीं सारथी होऊनि बैसे । घोडे तुझे हांकित. ॥ ८०९ ॥ मज ऐशा अकिंचनाच्या धना । तुवां जिंकिलें **अर्जुना!** । कीं तुजसारखिया आणिका सधना । लभ्य सर्वथा मी नव्हें. ॥ ८१० ॥ जें अलभ्य लभ्य जालें । तें त्याणें म्हणावें जिंकिलें । एवं **धनंजय** म्हणतां या बोलें । मजचि जिंकिलें तुवां हें सूचवी. ॥ ८११ ॥ भाव हा कीं उदासीन । मी होय परि जे भक्तजन । त्यांच्या ठायीं मी **जगज्जीवन** । उदासीन नव्हे सर्वथा. ॥ ८१२ ॥ **'ये यथा मां प्रपद्यंते'।** या श्लोकीं हे गोष्टी साधते । उदासीनताही जतन होते । भजती तैसा भजतों या स्वभावें. ॥ ८१३ ॥ **'ये यथा मां प्रपद्यंते'** या श्लोकेंकरोनी । **'तां तथैव भजाम्यहं'** म्हणोनी । चतुर्थाध्यायांत सिद्धांत जाला यावरोनी । उदासीन परि भजनानुरूप फळ देतों. ॥ ८१४ ॥ प्रस्तुतीं माझ्या पायीं आसक्त मन । त्यावरी मी नव्हें उदासीन । म्हणोनि तुवां जिंकिलें धन । अकिंचनाचें **धनंजया** ! ॥ ८१५ ॥ भक्तावेगळा अन्यत्र । आपण उदासीन सर्वत्र । म्हणोनि हें सूचवूनि म्हणे **कमलनेत्र** । **धनंजया** ! मी उदासीन म्हणोनी. ॥ ८१६ ॥ एवं जीवत्वींही चित्स्वरूपीं । कर्तृत्व न लागे तथापी । वासना त्याची पापी । असे त्यांच्या बुद्धींत. ॥ ८१७ ॥ बंध मोक्ष दोनी । उपाधीच्या शिरीं म्हणोनी । अहंकर्तृत्वाभिमानी । बुद्धि जीवांची करी जीवांस कर्मबद्ध. ॥ ८१८ ॥ जीवोपाधीस अज्ञान । म्हणोनी वासनायुक्त त्याचें मन । जीवा तया विना विषयचिंतन । प्रवृत्ति कर्मीं घडेना. ॥ ८१९ ॥ करिती वासनेनें ऐसें । उदासीन ते म्हणावे कैसे ? । रजतरूपें शुक्ति दिसे । ते रजतार्थी रजतीं उदासीन कां होती ? ॥ ८२० ॥ विश्व विषयाकारें भासे । ते वासनाबद्ध नव्हती कैसे ? । अज्ञानें विषयासक्त ऐसे । वैराग्य कैचें तयांतें ? ॥ ८२१ ॥ जे वैराग्यहीन । ते कर्मीं नव्हती उदासीन । यालागीं कर्में करिती बंधन । जीवांसी. ॥ ८२२ ॥ आपण नित्य विरक्त । म्हणोनी सृष्ट्यादि कर्मीं नसे आसक्त । नित्य ज्ञानी नित्य मुक्त । उदासीना सारिखा यालागीं. ॥ ८२३ ॥ **भगवच्छब्दीं** वैराग्यगुण । तो **भगवान्** षड्गुण । हे गोष्टी बोलतो आपण । **भगवद्गीतेंत.** ॥ ८२४ ॥ एवं कृपाळू स्ववैराग्यगुण । समजोन भजोत भक्त निपुण । म्हणोनि या प्रसंगसंगतीनें आपण वैराग्यगुण । आपला येथें बोलतो. ॥ ८२५ ॥ कीं वैराग्यगुणयुक्त । समजोनि भजती भक्त । तेही होती विरक्त । हें चतुर्थाध्यायांत बोलिला. ॥ ८२६ ॥

चतुर्थाध्यायश्लोक—**न मां कर्माणि लिंपंति न मे कर्मफले स्पृहा।**
**इति मां योऽभिजानाति कर्मभिर्न स बध्यते ॥**

हे मागेंचि पूर्ण जाली। प्रतुस्त गोष्टी ऐसी आली। कीं वैराग्यगुणपूर्वक उपासना केली। तरी वैराग्यलभ्य होय त्यातें. ॥ ८२७ ॥ यास प्रमाण हा चतुर्थाध्यायश्लोक। येथें म्हणे उत्तमश्लोक। कीं मज नव्हे कर्म बंधक। कर्मीं स्पृहा नसे म्हणोनी. ॥ ८२८ ॥ स्पृहा कर्मीं नसे यास्तव। मातें कर्में न लिंपती म्हणे देवाधिदेव। ऐसा आपला गुण जाणे मानव। तोही कर्मीं नव्हे बद्ध म्हणतसे. ॥ ८२९ ॥ एवं वैराग्यगुण जाणे। त्या भगवदुपासकासही वैराग्य बाणे। या चतुर्थाध्यायश्लोकांत म्हणे। उत्तरार्धीं ऐसें भगवंत. ॥ ८३० ॥ मज कर्मीं नसे स्पृहा। जो जाणतो माझा वैराग्यगुण हा। तोही निस्पृह होतां त्या फलनिस्पृहा। कर्मबंध नव्हे हा अर्थ. ॥ ८३१ ॥ तोचि वैराग्यगुण। या नवमाध्यायांत नवमश्लोकीं सगुण। श्रीकृष्ण बोलतो येथें खूण। पहावी जे या चतुर्थाध्यायश्लोकीं उत्तरार्धीं. ॥ ८३२ ॥ ऐसेच षड्गुण। समजोनि भजे ब्रह्म सगुण। षड्गुणांश लाभे तोचि निपुण। भगवत्पदातें पावतो. ॥ ८३३ ॥ प्रसंग बोलिला गुण। त्या प्रसंगाची हे खूण। कीं जीवत्वींही आत्मा निर्गुण। परि कर्मबंध त्यातें कर्में होतसे. ॥ ८३४ ॥ तरी ईश्वरासही असेल बंध। त्याच्या परिहारार्थ हा नवम पद्यप्रबंध। कीं मी उदासीन म्हणोनी गंध। न लागे मातें कर्मबंधाचा. ॥ ८३५ ॥ त्या कर्माचीं फळें जरी। मी इच्छितों आसक्त होतों तरी। मजही बंध होता परी। अनादिवैराग्यगुणें नसे मज बंध. ॥ ८३६ ॥ मी अनादि विरक्त। म्हणोनि त्या कर्मीं नसें आसक्त। जीवही कर्मबंधापासूनि मुक्त। होती फलासक्ति टाकितां हा भाव. ॥ ८३७ ॥ आतां यानंतर श्लोक। तो कां बोले उत्तमश्लोक। त्याचें निमित्त सुज्ञलोक। परिसोत आदीं. ॥ ८३८ ॥ चित्स्वरूपीं कर्तृता। जीवासही नसे तरी बंधवार्ता। असेचि तैसी अकर्तृता। असेल ईश्वराची ही. ॥ ८३९ ॥ ऐशिये शंकेचें स्थळ। देखोनि परिहरिता जाला मेघनीळ। कीं मी विरक्त उदासीनासारिखा केवळ। म्हणोनि मातें न बाधती कर्में. ॥ ८४० ॥ कर्मीं आसक्त न होणें। आणि उदासीनासारिखें असणें। हाही गुणधर्म कीं निर्गुणपणें। ऐसा आपण ऐसें न म्हणावें. ॥ ८४१ ॥ ज्यास हा वैराग्यगुण। त्यास म्हणवेना निर्गुण। आणि प्रकृतीचें तों अधिष्ठान-

पण । निर्गुणातें. ॥ ८४२ ॥ तेव्हां जगाचें उपादानकारण[1] । ब्रह्म तें म्हणावें निर्गुण । जयासि हे वैराग्यादि गुण । जगत्कारण न म्हणवे तयातें. ॥ ८४३ ॥ येथें संशय ये रीती । उपजेल हें जाणे जगत्पती । म्हणोनि मी सगुण जो मायाधिपती । तोचि जगत्कारण म्हणतसे या श्लोकीं. ॥ ८४४ ॥

**मयाध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम् ।**
**हेतुनानेन कौंतेय जगद्विपरिवर्तते ॥ १० ॥**

अगा ! मी अध्यक्ष मायेचा धनी । अध्यक्षता न घडे निर्गुणीं । युक्त होऊनि तिच्या सत्त्वगुणीं । धनी तिचा मी होतसें. ॥ ८४५ ॥ आणि मज अध्यक्षाच्याच योगेंकरोनी । प्रकृति चराचरसहित लोक तीनी । प्रसवे ते स्वयें प्रसवों न शके म्हणोनी । मी सगुणत्वींही कुंतीसुता ! जगत्कारण. ॥ ८४६ ॥ या हेतूकरोनी । जग विविध होऊनी । वर्ततसे म्हणोनी । कुंतीसुता ! मी सगुणत्वींही जगत्कारण. ॥ ८४७ ॥ कौंतेय म्हणजे कुंतीसुत । या नांवें गहनभावें आळवी भगवंत । कीं जननीपासूनि पुत्र उपजतो निश्चित । परि ते प्रसवते स्वपतीच्या हेतूकरोनी. ॥ ८४८ ॥ पति म्हणावा केव्हां । कीं बाईल करील जेव्हां । तिच्याच योगें तेव्हां । पति तिचा. ॥ ८४९ ॥ ते जेव्हां बाईल जाली । त्यास पति म्हणों लागली । आणि त्याच करितां व्याली । विविध-संतान. ॥ ८५० ॥ येथें कुंतीसुता ! कौंतेया ! । म्हणे हा अर्थ सुचवावया । कीं प्रकृतियोगेंच धनंजया ! । अध्यक्ष मी प्रकृतीचा. ॥ ८५१ ॥ आणि माझ्याच सत्तेंकरूनी । प्रसवते चराचर म्हणोनी । कौंतेया ! म्हणतां यावरूनी । सूचवी हा अर्थ. ॥ ८५२ ॥ याचा ऐसा विचार । कीं ब्रह्ममायायोगेंच ईश्वर । तीपासूनि होतें चराचर । परि संकल्पें त्याचि सर्वज्ञाचिया. ॥ ८५३ ॥ तिच्या योगेंचि तीतें । ईश्वर प्रवर्तवी प्रकृतीतें । प्रजांचे धनें प्रजांतें । वर्तवी जैसा भूपती. ॥ ८५४ ॥ प्रजांपासोनि घेऊनि धन । त्या धनें ठेवोनि सेवक जन । प्रजा वर्तवी करी शासन । ऐसा प्रकृतिगुणें प्रकृति गुणातें वर्तवी. ॥ ८५५ ॥ लोखंड पिटायाचें साधन । लोखंडाचाच चिमटा अेरणी[2] घन । तैसा प्रकृतीतें वर्तवी जगज्जीवन । त्याच प्रकृतीकरूनी. ॥ ८५६ ॥ एवं प्रकृतीचे भाग दोनी । एक ब्रह्म आपण म्हणोनी । या अखंड प्रत्ययेंकरूनी । निर्गुणीं सगुणत्व. ॥ ८५७ ॥ हा ईश्वर प्रत्यय । जो अविच्छिन्न अखंडानंदमय । सृष्टयादि शक्तीचा उदय । त्यापासूनि आणि लयही तयाच सगुणांत. ॥ ८५८ ॥ कीं

१ मुख्यकारण (घटाच्या मातीप्रमाणें.) २. ऐरण.

तो लयकाळही सरे । तेव्हां अभाव साक्षित्व स्फुरे । कांहीं उरलें नाहीं ऐसें स्मरे । उपाधि ब्रह्मात्मप्रत्यय ईश्वराचा ॥ ८५९ ॥ तेही माया पावे लय । तो योगनिद्रासमय । पुन्हा ब्रह्म आपण म्हणोनि उदय । प्रथम त्याच मायांशाचा. ॥ ८६० ॥ तेथें ब्रह्म निर्गुण आपण । इतकेंचि मात्र स्फुरण । त्या स्फुरणीं सर्वज्ञपण । भूतभविष्यस्मरणरूप प्रगटतें. ॥ ८६१ ॥ ब्रह्म आपण ऐसें अखंड जाणे । तेंचि मायायोगें ब्रह्मीं ईश्वरत्व बाणे । तेचि माया मी माया म्हणे । ब्रह्मयोगें ते शक्ति परदेवता शाक्तांची. ॥ ८६२ ॥ ब्रह्मात्मत्वाचें स्फुरण । तेथेंही वृत्ति माया आणि चैतन्य निर्गुण । मी माया येथेंही वृत्ति मायागुण । प्रकाशक तेंचि चैतन्य निर्गुण. ॥ ८६३ ॥ प्रथम स्फुरे ब्रह्म आपण । तो ईश्वर तें ब्रह्म सगुण । माया मी म्हणवोनि दुसरें स्फुरण । ते प्रकृति तो ईश्वर तिचा अध्यक्ष. ॥ ८६४ ॥ ईश्वरांशीं सर्वज्ञपण । मायांशीं जड सृष्ट्यादिकाचें स्फुरण । ते त्या अधीन ब्रह्म जो सगुण । आपण ब्रह्म म्हणे मायांशेंकरोनी. ॥ ८६५ ॥ तो ती करोनी जे सृष्टी करी । ते होणारच तीपासूनि परी । त्या-वांचोनि तिच्या कूसरी । न प्रगटती तिच्या स्वसामर्थ्यें. ॥ ८६६ ॥ दुग्धांत असे घृत । त्याच पासोनि उपजे तें निश्चित । परि तावीं विरजी मथी तदु-चित । क्रिया जाणणार कारण त्या घृताचें. ॥ ८६७ ॥ अथवा जैसा लोहार । लोहाचेच करितो नानाकार । परि घडमोडीसाधनप्रकार । या लोहाचेचि सर्व. ॥ ८६८ ॥ लोहाचे सर्व आकार । लोहाचपासूनि उपजती ते प्रकार । तथापि लोहसाधनेंयुक्तचि लोहार । कारण म्हणावा. ॥ ८६९ ॥ लोहाचपासोनि होती नग । मायेचपासोनि होतें जग । ते लोहाराकारणाकरितांच परि योग । लोहसाधनाचा त्यापाशीं. ॥ ८७० ॥ या लागीं म्हणे श्रीपती । कीं चराचर प्रसवे तेच प्रकृती । परि मायायोगेंचि अध्यक्ष मी मायाधिपती । त्या मजक-रितां म्हणे कीं ते प्रसवते. ॥ ८७१ ॥ एवं जगत्कारण निर्गुण । तेंचि आपण म्हणोनि ज्यास वाटे तो सगुण । तो सर्व जाणे म्हणोनि जगाचें द्विविधही कारण । ईश्वर म्हणावा. ॥ ८७२ ॥ घटास कारण माती । घटास सोडीना ये रीती । ब्रह्म सर्वत्र सर्वभूतीं । उपादानकारण तें म्हणावें. ॥ ८७३ ॥ तें निखळ निर्गुण । परि तेंचि मायांशें जाणे कीं ब्रह्म आपण । हा अखंडानुभव तें सगुण । सगुणचि उपादानकारण ये रीती. ॥ ८७४ ॥ घटीं सबाह्य माती । तैसें जगीं ब्रह्म तें आपण ये रीती. । अनुभव ज्याचा तो मायाधिपती । उपादानकारण जगाचें कां तो नव्हे ? ॥ ८७५ ॥ आणि घटास कारण कुंभार । जो घडी घटाचा आकार । तो निमित्तकारण तैसा सर्वेश्वर ।

तोचि निमित्तकारण सर्वज्ञ. ॥ ८७६ ॥ भूत भविष्य जाणे सुजाण । जीव कर्मानुरूप भूतें करी निर्माण । दोहींपरी कुंतीसुता जाण । मी जगत्कारण म्हणे या श्लोकीं. ॥ ८७७ ॥ राजविद्याविवरण । तें षट्श्लोकप्रकरण । तेथें आपणातें न पावतां जन्ममरण । पावती म्हणून बोलिला. ॥ ८७८ ॥ तों संशयाचें देखिलें स्थळ । कीं सृष्टीहूनि पूर्वीं ब्रह्मचि केवळ । तेव्हां ब्रह्मचि पावले सकळ । तरी पावले तेही परतती संसारीं. ॥ ८७९ ॥ याच्या परिहाराकारणें । सृष्टिप्रलयप्रकरण लागलें बोलणें । तेथेंही नरास नारायणें । सूत्रप्राय बहुविस्तार सूचविला. ॥ ८८० ॥ संक्षेपें सविस्तर । अर्थ सूचवी सर्वेश्वर । श्रीकृष्णकृपापात्र चतुर । विस्तार तितका समजला. ॥ ८८१ ॥ अन्यथा शब्द तों थोडे निपट । सृष्टिप्रलयाची बहुत खटपट । आणि अर्जुन जोडोनि अंजलिपुट । पुढें म्हणेल विस्तारें ऐकिलें म्हणोनी. ॥ ८८२ ॥ विश्वरूपदर्शनार्थ । प्रार्थील पुढें जेथें पार्थ । तेथें म्हणेल कीं विस्तार म्यां यथार्थ । सृष्टि प्रलय तुजपासूनि ऐकिले. ॥ ८८३ ॥

विश्वरूपाध्यायश्लोक—**भवाप्ययौ हि भूतानां श्रुतौ विस्तरशो मया।**
**त्वत्तः कमलपत्राक्ष माहात्म्यमपि चाव्ययम् ॥**

पुढें होणार याची । प्रस्तुत उपयोगीं ते हे गोष्टी साची । कीं सृष्टिप्रलय विस्तारें म्हणे सव्यसाची । तुजपासोनि म्यां ऐकिले दोनी. ॥ ८८४ ॥ एवं च गीता सूचवी पदोपदीं विस्तार । परि तो बोलतां ग्रंथ वाढेल फार । म्हणोनि संक्षेपरूप विचार । बहुत विस्तार बोलावा त्याचा बोलिजेतो. ॥ ८८५ ॥ हा विस्तार वाचितील सज्जन । त्यांचें तृप्त नव्हेच मन । ते प्रतिपदीं करितील नमन । त्याच सर्वेश्वरातें. ॥ ८८६ ॥ तृप्ति नव्हे पीतां अमृत । ये रीती हें ऐकतील वाचितील संत । परि जे व्यासंगी आणि परमार्थीही रत । संक्षेपेंचि मथितार्थ प्रिय तयां. ॥ ८८७ ॥ ते ऐसें म्हणतील कीं । पद्दें थोडीं असोनि श्लोकीं । विस्तारें अर्थरचना इतकी । कां वाढवावी? ॥ ८८८ ॥ तरी सृष्टीप्रलय । अतिसंक्षेपें बोले अव्यय । तें ऐकोनि म्हणे धनंजय । सृष्टिप्रलय विस्तारें ऐकिलें म्हणोनी. ॥ ८८९ ॥ तेव्हां अर्थीं जे भावार्थ । ते समजला पार्थ । तरी विस्तारें ऐकिलें म्हणे यथार्थ । एवं गहन भावार्थ गीतेचे. ॥ ८९० ॥ येथें सृष्टिप्रलयविचार । बोलावे करून अतिविस्तार । परि ग्रंथ वाढेल फार । म्हणोनि संक्षेपें वर्णिलें. ॥ ८९१ ॥ त्यांत जीं जीं संशयाचीं

---

१ अप्रधान (कुंभार जसा घटाचें कारण).

स्थळें । त्यांचें समाधान मेघनीळें । सूचविलें तैसें कृपाबळें । त्याच्या वाखाणिलें संक्षिप्त. ॥ ८९२ ॥ एवं उपादानकारण निमित्तकारण । दोनी जगाचीं स्वयें सगुण । ऐसें या श्लोकीं नारायण । नरावतार अर्जुनातें उपदेशी. ॥ ८९३ ॥ ऐसा सर्वोत्कृष्ट सर्वेश्वर । तो करावया जीवांचा उद्धार । निमित्त करोनी भूभार । अवतरला भूतळीं. ॥ ८९४ ॥ कामें तरल्या गोपांगना । भय द्वेषें तारिलें कंसशिशुपालादिदुर्जनां । सारथ्यपणें अर्जुना । गीतोपदेशें जो तारी. ॥ ८९५ ॥ सकळ जनांचा उद्धार । हा परमात्मा करणार । परंतु दाटोनी जे बुडणार । ते ऐसे. ॥ ८९६ ॥ कीं दुर्योधनादि मूढ जन । न करिती त्याचें भजन । जो स्वयें परमात्मा भवभंजन । मनुष्य मानिती तयाला. ॥ ८९७ ॥ पांडुकुमर भीष्म विदुर । हे जाणती कीं हा सर्वेश्वर । दैवी संपत्तीचे पुरुष चतुर । इत्यादि भजती. ॥ ८९८ ॥ आसुरीसंपत्तीचे नर । ते महिमा न जाणती पामर । म्हणोनि दोनी संपत्तींचे पुरुष सर्वेश्वर । बोलेल आतां. ॥ ८९९ ॥ त्यांत आसुरीसंपत्तीचे पुरुष । आपणावरी ठेविती दोष । तो प्रसंग परमपुरुष । बोलतसे या श्लोकीं. ॥ ९०० ॥

**अवजानंति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितम् ।**
**परं भावमजानंतो मम भूतमहेश्वरम् ॥ ११ ॥**

अगा! जे कां मूढमती । ते मातें अवमानिती । कीं मनुष्यतनूची आकृती । तिचा आश्रय म्यां केला. ॥ ९०१ ॥ म्हणोनि माझा अवमान । करिती ते मूढ जन । थोरास नीचासमान । मानणें अपमान तो हाचि. ॥ ९०२ ॥ मूढां तुच्छांस शक्ति किती? । कां ते अपमान थोरांचा करूं शकती? । त्यांस नीचासमान मानिती । हाच अपमान. ॥ ९०३ ॥ थोरपण ठेवोनि गूढ । फिरे त्यास नीच मानिती मूढ । त्याचें श्रेष्ठत्व जाणती प्रौढ । ते गूढपणीं तो भाव त्याचा आठविती. ॥ ९०४ ॥ एवं जो माझा परमभाव । कीं मी सर्वभूतांचा महेश्वर देवाधिदेव । तो माझा भाव म्हणिजे तें माझें अभिनव । रूप ते मूढ नेणती ॥ ९०५ ॥ सर्व भूतांचे ईश्वर । ब्रह्मादि देव ज्याच्या हातीं चराचर । त्यांहीहूनि समर्थ तो महेश्वर । मीच एक सर्वां भूतांचा. ॥ ९०६ ॥ माझा तो भाव नेणोनी । हाही एक आम्हांसारिखा म्हणोनी । मानिती मनुष्यतनुभाव माझा हा देखोनी । अवमानिती मातें. ॥ ९०७ ॥ एवं द्विविधही जगाचें कारण । तो मी अवतरलों नारायण । हा परमभाव नेणोनि जे अवलक्षण । ते मूढ मनुष्यभावें अव-

मानिती हा अर्थ. ॥ ९०८ ॥ येथें शंकला अर्जुन । कीं दुर्योधनादिक दुर्जन। यांचिया विवेकाचे नयन । कां झांकिले ? ॥ ९०९ ॥ आतां ते म्हणावे मूढ । तरी आम्हीही नेणों याचें ऐश्वर्य गूढ । परि नारदव्यासादि सर्वज्ञ प्रौढ। जाणों त्यांच्या मुखें ऐकोनी? ॥ ९१० ॥ ऐसें हेही जाणती । मागुती मनुष्यच यास म्हणती । कां जाली ऐसी नेणती । बुद्धि यांची. ॥ ९११ ॥ उद्योगपर्वीं थोर थोर मुनी । दुर्योधनातें हा सर्वेश्वर म्हणोनी । नाना आख्यानें करोनी । विशद अत्यंत बोलिले. ॥ ९१२ ॥ धृतराष्ट्र साक्षात्कारें बाप । तो दुर्योधनातें याचा महेश्वरत्वप्रताप । सांगे म्हणे अपजय आणि महत्पाप । आज्ञा या सर्वेश्वराची मोडितां. ॥ ९१३ ॥ आइके इत्यादि गोष्टी । विश्वरूप सभेस देखे दृष्टी । जेव्हां धरावा कृष्ण म्हणोनि दुष्टीं । विचार केला. ॥ ९१४ ॥ कर्ण दुःशासन दुर्योधन शकुनी । हें दुष्ट चतुष्टय मिळोनी । कृष्णास बांधितां पांडव जिंकिले म्हणोनी । विचार करूनि चार मांडिले. ॥ ९१५ ॥ तेव्हां सभेंत सर्वत्र। मागें पुढें कृष्ण कमलनेत्र । धृतराष्ट्रास देऊनि दिव्य नेत्र । दाखवी आणि दुर्योधनादिकांहीं. ॥ ९१६ ॥ ऐसें जयांस कळे । कां त्यांची बुद्धि न वळे । मनुष्यरूप देखोनि खवळे । मनुष्य हाही म्हणोनी. ॥ ९१७ ॥ ऐसी अर्जुनाची शंका । तत्काळ कळली शेषपर्यंका । याचें निमित्तही श्रीवत्सांका । बोलणें लागलें. ॥ ९१८ ॥ यावरोनि या वेगळेही नर । वेद शास्त्र पुराणें वाचूनिहि पामर । अवतारमहिमा समजोनिही आदर । न धरिती अवताररूपीं ईश्वराच्या. ॥ ९१९ ॥ तेही ऐसेच रीती। श्रद्धा कळत कळत न धरिती । हें किमर्थ तरी यांचें त्याचें जगत्पती । वृत्त मिसळोन सांगतो या श्लोकीं. ॥ ९२० ॥

**मोघाशा मोघकर्माणो मोघज्ञाना विचेतसः ।**
**राक्षसीमासुरीं चैव प्रकृतिं मोहिनीं श्रिताः ॥ १२ ॥**

अगा! बरें वाईट दोहींचें निमित्त । केवळ हें आपुलें चित्त । त्याचें विपरीत होतां वृत्त । व्यर्थ होतें सर्वही. ॥ ९२१ ॥ आशा जयाची व्यर्थ । कीं प्रारब्धीं नाहीं तो पुरुषार्थ । आपणास होऊ म्हणोनि तदर्थ । मज टाकोनि भजती क्षुद्रदेवतातें. ॥ ९२२ ॥ आणि जें प्रारब्धीं असे । तें यथाकाळें फळ दिसे । तदर्थ काम्यकर्म केलें तें बैसे । पुढें वज्रलेप बंधन करोनी. ॥ ९२३ ॥ धनमानसंतानाकारणें सेवा । करोनी भजतो क्षुद्रदेवा । नसे प्रारब्धीं तेधवां । आशा

१. पोरखेळ. २. लहान.

होते ते व्यर्थ. ॥ ९२४ ॥ प्रारब्धानुरूप कपाळीं । होणार होतें त्याकाळीं । जालें आणि या काम्यें पाडिला जाळीं । बंधाचिया. ॥९२५॥ येच जन्मीं मज संतान । हो म्हणोनि करी भजन । तें पुढें जालें बंधन। दोहीं परी. ॥९२६॥ ये जन्मीं नव्हे परी । फळ होईल जन्मांतरीं । आशा व्यर्थ नव्हे म्हणावी या-परी । तरी खरीच गोष्टी हेही. ॥ ९२७ ॥ परंतु सूकरादियोनी । जन्मांतरीं मज हो म्हणोनी । ये रीती तों त्याच्या मनीं । नव्हती आशा सर्वथा. ॥९२८॥ बहु काळ नांदो म्हणोनी । प्रवेशला स्थिर मुहूर्तें करोनी । तों शृंखळा पायीं त्या सदनीं । पडली शाश्वत बहु काळ. ॥ ९२९ ॥ त्या स्थिरा मुहूर्ताची । फळसिद्धि तों जालीच साची । परि आशा नव्हती याची । ऐसें व्हावें म्हणोनी. ॥ ९३० ॥ प्रयत्नें देवता भजोनी । न मागे सूकरादि योनी । अथवा जन्मां-तरीं फळ हो म्हणोनी । हेंही न मागे. ॥ ९३१ ॥ एवं च देवताभजन । करी इच्छी धन मान संतान । तें प्रारब्धानुरूप होतां सेवन । म्हणावें काय त्या देवांचें? ॥ ९३२ ॥ त्या देवें हें दीधलें । म्हणोनी याला जरी वाटलें । तें याचें यास लभ्य होतां जालें । व्यर्थ भजन त्या देवाचें. ॥ ९३३ ॥ यास न कळे हा अर्थ । तथापि आशेतें तो गोंवे व्यर्थ । याचा यास सांपडला पदार्थ । त्याची आशा वृथाचि ते जाली. ॥ ९३४ ॥ हें रहस्य[1] जन नेणे । त्यापासोनि आशा फळली म्हणे । परंतु साक्षी सर्वज्ञ जाणे । तो म्हणे मोघाशा[2] म्हणोनी. ॥९३५॥ प्रारब्धीं फळ नसे । ते मोघाशा तों त्यासही दिसे । जन्मांतरीं फळाचे फांसे । गळां पडती आशा वृथा करूनियां. ॥ ९३६ ॥ आतां पुढिले जन्मींच हो-याचें फळ । म्हणोनि आशा धरिली केवळ । तों पूर्वसंचित त्याहूनिही प्रबळ । जन्म शतही फळ तें न पावे. ॥ ९३७ ॥ तेही मोघाशाच तेव्हां मागुतीं । कीं देव न दे जें जे काळीं मागती । अथवा सूकरादि अधमा गती । पावोनि तें फळ जन्मांतरींच पावेल. ॥ ९३८ ॥ पुढिले जन्मीं क्षत्रिय । होईन म्हणोनि धरिला आशय । देवताभजनीं दृढनिश्चय । तपस्वी मोठा. ॥ ९३९ ॥ आणि कृत्तिकानक्षत्रीं कार्त्तिकमासीं । **स्वा**[3]मिदर्शनही घडलें होतें तयासी । सप्तजन्म विप्रजन्मासी । जाणें तया. ॥ ९४० ॥ क्षत्रियत्व देतें देवताभजन । व्यर्थ तेव्हां **स्वा**मिदर्शन । विप्र वेदपारग सधन । होतां देवताभजन तें व्यर्थ. ॥ ९४१ ॥ तो मातापितृश्राद्धें चुकला । तेव्हां कोटि जन्म चांडाळ जाला । दोहीं गतींतें विलंब लागला । व्यर्थ आशा दोहींची. ॥ ९४२ ॥ याचे पूर्वपक्ष

---

१. गौप्य. २. व्यर्थ आशा. ३. कार्त्तिकस्वामी.

सिद्धांत। विशद बोलतां ग्रंथ वाढेल अत्यंत। एवं टाकोनि भगवंत। ऐसे जे क्षुद्रदेवता भजती. ॥ ९४३ ॥ युगांतरीं यागादि कर्में केलीं। पुत्रादि फळें तत्काळ जालीं। तीं पूर्वपुण्येंच फळा आलीं। हें पुढें फळ होणार. ॥ ९४४ ॥ कांहीं न करी याहूनी। काम्यकर्ता बरा म्हणोनी। जैसें तैसें काम्यकर्मीं जनी। प्रवर्तावें तात्पर्य शास्त्रकाराचें. ॥ ९४५ ॥ ते तत्काळ फळ बोलती। तत्काळ फळें जालीं ऐसेंही म्हणती। जन्मांतरावांचूनि फळ नाहीं जाणती। तरी रुचि दाविती जनप्रवृत्तिनिमित्त. ॥९४६॥ बीजाचा होय तरुवर। फळ तेव्हां हें प्रत्यक्ष गोचर। कर्माचें फळ विना जन्मांतर। नव्हे सर्वथा. ॥ ९४७ ॥ हे मूढाकारणें प्रवृत्ती। शास्त्र बोले कीं जे मोक्षमार्ग न जाणती। ते मुक्तिप्रदा[1] मुकुंदा कां भजती। प्रस्तुतीं कळत इतर देवता भजती प्रसंग त्यांचा. ॥ ९४८ ॥ कीं ते मोघाश[2] म्हणावे। सकामदेवतांतर उपासक गणावे। मोघकर्म म्हणतां आणीकही जाणावें। निष्काम या वेगळे दोंपरी. ॥ ९४९ ॥ एक टाकोनि कामना। निष्काम देवतांतरोपासना[3]। कर्म करिती मोक्षार्थ तों होईना। एका मुकुंदावांचूनी. ॥९५०॥ एक उगीच निष्कामकर्में। करिती वर्णाश्रमोक्त धर्में। तृतीयाध्यायांत बोलिलें त्या नेमें। विष्णुचरणीं न अर्पिती. ॥ ९५१ ॥ **'यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र'**। या श्लोकीं बोलिला कमलनेत्र। कीं विष्णूस न अर्पितां कर्ममात्र। बंध करी म्हणोनी. ॥ ९५२ ॥ नव्हे मोक्ष न चुके बंध। निष्काम कर्मेंही होय फळसंबंध। न लागे बंधाचा गंध। कर्म अर्पितां भगवंतीं. ॥ ९५३ ॥ चुकोनि तें वर्म। निष्काम अनुष्ठिती स्वधर्म। त्याणें बंधचि होतां कर्म। व्यर्थ जालें. ॥ ९५४ ॥ कीं ज्याकारणें केलें। तें जेव्हां नाहीं होऊनि आलें। तें व्यर्थ म्हणावें जालें। मोघकर्में इत्यादि. ॥ ९५५ ॥ आतां मोघज्ञान। त्यांत दों प्रकारींचे जन। एक वेदश्रद्धाहीन। एक वेदाश्रित. ॥ ९५६ ॥ च्चार्वाक बौद्ध इत्यादि। यांस श्रद्धा नसे वेदीं। जे वेदप्रमाण आणि भेदवादी[4]। भेद त्यांचे त्यांत कितीएक. ॥ ९५७ ॥ कोणी इतर देवताभजन। करिती आणि अद्वैतही बोलती जन। मोघ त्यांचेंही ज्ञान। कीं अपरोक्ष न फळे तयांतें. ॥९५८॥ शब्दज्ञानीच ते होती। कळली जरी आत्मानात्मविवेकरीती। न बाणे स्वरूपसाक्षात्कारस्थिती। भगवत्प्रसादावांचुनी. ॥ ९५९ ॥ श्रीमद्भागवतीं वारंवार। बोलिला असे हा प्रकार। न बाणे अपरोक्षसाक्षात्कार। साकार भगवद्भजनावांचुनी. ॥ ९६० ॥ श्रीकृष्ण देवकीच्या उदरीं। ब्र-

१. मुक्तिदेणाऱ्या. २. व्यर्थ आशा. ३. अन्यदेवतांची. ४. द्वैतवादी.

ह्मादि देवीं स्तविला नानापरी । तेथें ब्रह्मा आणि शंकरवैखरी । बोले ऐसें या श्लोकीं. ॥ ९६१ ॥

भागवतश्लोक—**सत्त्वं न चेद्धातरिदं निजं भवे-**
**द्विज्ञानमज्ञानभिदापमार्जनम् ।**
**गुणप्रकाशैरनुमीयते भवा-**
**न्प्रकाशते यस्य च येन वा गुणः ॥**

शुद्धसत्त्वें अवतार । देवा! तूं करितोसि हा विचार । बोलतां ब्रह्मा आणि शंकर । अग्रगण्य देवांत हे वदती. ॥ ९६२ ॥ कीं हें निजसत्त्व तुझें हरी । प्रगट न होय रामकृष्णादि रूपें जरी । अज्ञाननाशक विज्ञान तरी । नव्हे जनांतें जी देवा! ॥ ९६३ ॥ कीं श्रवण कीर्तन । तुझ्या गुणांचें चिंतन । आणि सत्त्वमूर्तीचें भजन । न करितां मन निर्मळ न होय. ॥ ९६४ ॥ निर्मळ न होतां मन । नव्हे साक्षात्कार अनुभवज्ञान । तेव्हां न नासे अज्ञान । हा विचार मागें पुढें तेंचि वदले. ॥ ९६५ ॥ या भावें म्हणती या श्लोकीं हरी। सत्त्व तुझें न अवतरे जरी । अज्ञाननाशक विज्ञान तरी । नव्हे कधीं.॥ ९६६॥ आतां आपणास आपण । न जाणणें हें अज्ञानाचें लक्षण। आणि जड प्रकाशक आत्मपण । कळणें ज्ञान हें. ॥ ९६७ ॥ यास सत्त्वमूर्ती अवतार । कां लागले म्हणावे तेव्हां हा विचार । व्यर्थ होतो म्हणोन हा पूर्वपक्षप्रकार । परिहरिती ब्रह्मा आणि सदाशिव. ॥ ९६८ ॥ कीं जडतत्त्वें भेद तिहीं गुणांचें । स्वयें यातें प्रकाश कैंचे । ऐसें असोनि प्रकाश यांचे । दिसती ज्या करितां तो आत्मा स्वप्रकाश. ॥ ९६९ ॥ ऐसें जड आणि जडप्रकाशक ज्ञान । हें नव्हे अपरोक्ष हा अनुमान । साक्षात्कार तेव्हां कीं मन । तन्मय होऊनि पाहे तयातें. ॥ ९७० ॥ ज्याचा जो गुण । तो त्या वेगळा म्हणती निपुण । माझें त्याचें म्हणावें तें तों आपण । नव्हे सर्वथा. ॥ ९७१ ॥ प्रस्तुतीं अनुमानरीती । आत्मा जडावेगळा दाविती । ज्याचा गुण ज्याकरितां म्हणती । प्रकाशक तो म्हणोनी. ॥ ९७२ ॥ जो आत्मयातें विचारितो। त्याचा देहादि गुण ज्याणें प्रकाशतो । तो त्यास आपला आत्मा म्हणतो । हाही तर्क. ॥९७३॥ बुद्धि मन देह इंद्रियगण । इत्यादि जो जो ज्याचा गुण । तो ज्याणें प्रकाशतो तो आत्मा हे खूण । कळली तरी हा तर्क. ॥ ९७४ ॥ तो आत्मा असता वेगळा । तरी तर्कही दिसता निराळा । वाटते साक्षात्कारकळा । तो आत्मा आपणचि म्हणोनी. ॥ ९७५ ॥ परि नव्हे हा साक्षात्कार । कीं बुद्धि

न जाली तदाकार । शब्दज्ञानी हा आत्मविचार । साक्षात्कार मानिती. ॥९७६॥ एवं प्रकाशी जो जड गुण । कळली तया आत्मयाची खूण । तरी सत्त्ववृत्ति तन्मयपण । न पावे तर्कचि तोंवरी तो. ॥ ९७७ ॥ गातां आइकतां अवतार-गुण । ध्यातां शुद्धसत्त्वमूर्त्ति सगुण । सत्त्ववृत्ति चिन्मयपण । पावे तेव्हां साक्षात्कार तो. ॥ ९७८ ॥ एवं मुक्तिप्रद हरी । उपासना त्याची न करी । आणि आत्मस्थिति शब्दें बोले जरी । तरी मोघज्ञान तो म्हणावा. ॥ ९७९ ॥ कर्मार्पणप्रसंग संगती । आणि ऐसेंचि भागवतीं । शुक म्हणे परिक्षितीप्रती । या श्लोकीं. ॥ ९८० ॥

भागवतश्लोक—**नैष्कर्म्यमप्यच्युतभाववर्जितं**
**न शोभते ज्ञानमलं निरंजनम् ।**
**कुतः पुनः शश्वदभद्रमीश्वरे**
**न चार्पितं कर्म यदप्यकारणम् ॥**

कर्मातीत नैष्कर्म्यज्ञान । जें अतिशयें निर्मळ निरंजन । तेंही अच्युतभक्ति-हीन । न शोभे कीं न पावे साक्षात्कारातें. ॥ ९८१ ॥ तेव्हां कर्म अमंगळ । जें सर्वथा बंधक ओंगळ । तें निष्कामही नव्हे मंगळ । जें न अर्पिलें ईश्वरीं. ॥ ९८२ ॥ एवं भगवद्भक्तिहीन । म्हणावें व्यर्थचि तें ज्ञान । कीं न पावे शांति समाधान । भगवद्भक्तीवांचुनी. ॥ ९८३ ॥ आतां निर्गुणोपासक । भगवद्भक्ती-वांचूनिही कित्येक । पावले ज्ञानाचा परिपाक । ते तों मोघज्ञानी न म्हणवती. ॥ ९८४ ॥ येथें शंका ऐसी मानील जरी मन । तरी त्यांस पूर्वीं होतें भगव-द्भजन । सर्वथा जे भगवद्भजनहीन । प्रसंग येथें तयांचा. ॥ ९८५ ॥ राजा करी भूमिदान । तैसें भगवंतें दिधलें ज्ञान । भूदान घेऊनि सोडी राजसन्नि-धान । तरी प्रयत्नें पिकेलचि ते भूमी. ॥ ९८६ ॥ तैसें ज्ञान जालियावरी । सगुण भजन न लगे म्हणती परी । सगुण भजनें पूर्वींच बरी । बुद्धि जाली तयां निर्गुणोपासकांची. ॥ ९८७ ॥ सकाम आणि निष्कामही जे सर्वेश्वर । न भजती सर्वथा आणि देवता इतर । भजती आणि ज्ञानमार्गींहि चतुर । व्यर्थ तें ज्ञान त्यांचें हा अर्थ. ॥ ९८८ ॥ प्रस्तुत **'विचेतसः'** म्हणोनि । पूर्वार्धीं शेवटीं या पदें करूनी । सर्वत्र हेतु सूचवूनी । अभक्त ऐसें बोलिला. ॥ ९८९ ॥ तों अर्जुन म्हणे मनीं । यातें न भजतां अनर्थ ऐसें म्हणोनी । हींही शास्त्रें ऋषि बोलती यावरूनी । सद्बुद्धि न धरिती किमर्थ ? ॥ ९९० ॥ या शंकेचा परि-

हार । कीं नैसर्गिक[1] ज्याचे दुष्ट संस्कार । त्याच्या कानीं हाकलती ऋषि शास्त्रकार । तरी ते अधोमुखघटीं[2] वृष्टि होतसे. ॥ ९९१ ॥ अनेक जन्मकर्मानुसार । दृढतर जोडला जो संस्कार । तो नैसर्गिक म्हणती शास्त्रकार । बरा हो अथवा वाईट.॥९९२॥ त्यांत उत्तम संस्कारस्थिती । त्यास म्हणती दैवी प्रकृती । अधम नैसर्गिकास म्हणती । आसुरी म्हणोनी. ॥ ९९३ ॥ तिये आसुरीचे भेद तीनी । राक्षसी आसुरी मोहिनी म्हणोनी । जे बोलिले पूर्वश्लोकें करोनी । आश्रय प्रकृतित्रयाचाही तयांसी. ॥ ९९४ ॥ सर्वथा हिंसाकारांची हे प्रकृती । राक्षसी प्रकृति ईस म्हणती । कीं असुरांत मनुष्य भक्षिती । तेचि म्हणावे राक्षस. ॥ ९९५ ॥ दैत्य आणि दानव । हे असुर परि मानव । केवळ विषयासक्त भाव । बुद्धीचा तयांच्या. ॥ ९९६ ॥ 'असुर'शब्दीं अक्षरें तीनी । त्यांत 'असु' अक्षरें दोनी । 'र'कार तिसरा वेगळा करोनी । अर्थ विचारितां हा अर्थ.॥९९७॥ 'असु' म्हणिजे इंद्रियें । 'र' म्हणिजे रमणें निश्चयें । इंद्रियद्वारा विषयासक्त अत्यंत स्वयें । असुर ते भगवद्भक्तिरहित जे. ॥ ९९८ ॥ देवही विषयासक्त । परंतु सर्वेश्वराचे भक्त । क्षण न लगतां होती विरक्त । प्रतापें भगवद्भक्तीच्या. ॥ ९९९ ॥ असुर ते जे भगवद्भक्तिरहित । सर्वथा विवेकज्ञानवर्जित । म्हणोनि मोहिनीप्रकृतिसहित । तिहीं प्रकृतींचे आश्रित अभक्त ते. ॥१०००॥ भगवद्भक्तिवर्जित । ते भूतदयारहित । या भावें राक्षसी प्रकृतीचे आश्रित । तेचि म्हणतो श्रीकृष्ण. ॥ १००१ ॥ अन्यायें विषय सेविती । तेचि सर्वथा परपीडा करिती । म्हणोनि आसुरी प्रकृती । राक्षसी प्रकृति पुढें त्यांची बोलिली. ॥ १००२ ॥ बरें वाईट युक्तायुक्त कळे । तरी शास्त्रें सत्संगें सन्मार्गीं वळे । मोहिनी प्रकृति अधिक खवळे । सांगों जातां विवेक. ॥ १००३ ॥ करावें न करावें हा विवेक । याच्या विपरीत भाव मोह अविवेक । ऐसा संस्कार नैसर्गिक । मोहिनी प्रकृति ते म्हणावी. ॥ १००४ ॥ ऐसिया तिहीं प्रकृतीचे आश्रित । भगवद्भक्तिवर्जित । मोघाशा मोघकर्में मोघज्ञानें निश्चित । त्यांचीं कीं विषयविक्षिप्तचित्तें म्हणोनी. ॥ १००५ ॥ पूर्वश्लोकीं म्हणे भगवंत । कीं मातें अवमानिती मूढ अत्यंत । ते ऐसे प्रकृतित्रय आश्रित । या श्लोकीं वर्णिले '**विचेतसः**' म्हणोनी. ॥१००६॥ या तिन्ही प्रकृती । तिन्ही मिळोनी आसुरी संपत्ती । याचा विस्तार **यदु**पती । षोडशाध्यायांत बोलेल. ॥ १००७ ॥ तेथें म्हणेल अर्जुना ! । तूं शोक झणीं लागों देशी मना । कीं तूं दैवी संपत्तीचाच गा **पां**डुनंदना ! ।

---

१. स्वभावत:. २ पालथ्या घागरीवर.

न होसी आसुरी संपत्तीचा. ॥ १००८ ॥ कीं सांगतां आसुरी संपत्ती। त्यांतील कांहीं लक्षणें आपणाकडे लागती । म्हणोन शंकित होईल अर्जुनाची मती । तरी तूं तैसा नव्हेसी ऐसें पुढें बोलेल. ॥ १००९ ॥ कीं गुणत्रयाच्या जाती । बहुतेक आसुरीच प्रकृती । परि जे भजती रमापती । ते सकळ दैवी प्रकृतीचेच हा सिद्धांत. ॥ १०१० ॥ अत एव पूर्वश्लोकीं अभक्तजन । जे बोलिला श्रीशेषशयन । ते राक्षसी आसुरी मोहिनी म्हणोन । या श्लोकीं बोलिला.॥१०११॥ येथें संक्षेप प्रकार । षोडशीं याचा विस्तार । दैवी संपत्तीचा विचार । येथें बोलोनि तेथें बोलेल संक्षेपें. ॥ १०१२ ॥ तेथें म्हणेल जगत्पती । कीं विस्तारें मागें बोलिलों दैवी प्रकृती । आतां आसुरी संपत्ति तुजप्रती । विस्तारें सांगतों तें तूं आइक. ॥ १०१३ ॥ एवं अभक्त प्रसंग । बोलतां येथें म्हणे श्रीरंग । कीं राक्षसी आसुरी मोहिनी प्रकृतींत अंतरंग । रंगलें त्याचें. ॥ १०१४ ॥ संक्षेप इतकाच बोलोनी । तयाचा विस्तार पुढें सांगणें म्हणोनी । दैवी प्रकृतीचे स्वभक्त येथूनी । सांगतो प्रथम त्यांत हा श्लोक. ॥ १०१५ ॥

**महात्मानस्तु मां पार्थ दैवीं प्रकृतिमाश्रिताः ।**
**भजंत्यनन्यमनसो ज्ञात्वा भूतादिमव्ययम् ॥ १३ ॥**

**पार्था!** महा थोर ज्यांचीं चित्तें । ते तों अवलंबूनि दैवी प्रकृतीतें । अनन्य मनें करूनि मातें । भजती तत्त्व माझें जाणुनी. ॥ १०१६ ॥ चित्त जयांचें थोर । महात्मे म्हणावे ते नर । या शब्दें सूचवी सर्वेश्वर । गहन भाव. ॥ १०१७ ॥ अभक्तांच्या प्रकृति तीनी । राक्षसी आसुरी मोहिनी । महात्मशब्दें विलक्षण त्याहुनी । दैवी प्रकृति याची सूचवी. ॥ १०१८ ॥ कीं चित्त त्यांचेंच थोर । शांति अखंड ज्यांसमोर । न करिती ऐसे दयाळू नर । परपीडा कदापि. ॥ १०१९ ॥ पराचा अपराध सोशिती । ऐसा अवकाश असे ज्याचिया चित्तीं । अवकाश फार त्यास म्हणती । थोर घर म्हणोनी.॥१०२०॥ यावरून न असे तयासी । हिंसा प्रकृती राक्षसी । कीं अन्याय विषयासक्ति जयासी । सर्वथा असेना. ॥ १०२१ ॥ जे न्यायमार्गें वर्तती । ते परपीडा किमर्थ करिती । यावरोनी आसुरी प्रकृती । नसे हेंही सूचवी. ॥ १०२२ ॥ जे अत्यंत उदार । चित्त त्यांचें म्हणावें थोर । स्पृहा[1] नसणें हा प्रकार । उदारत्वाचा. ॥ १०२३ ॥ स्पृहेंकरोनि युक्त मन । आणि वेंचितो धन । तें त्याचें स्पृहेचें साधन । न म्हणावें औदार्य. ॥ १०२४ ॥ स्पृहा धरोनि लाभाची ।

---

१. इच्छा.

व्यवहारें उदंड धन वेंची । तेही काय तयाची । उदारता म्हणावी ? ॥१०२९॥ एवं नसे विषयस्पृहा । उदार म्हणावें त्या निस्पृहा । जो उदार त्याचेंच चित्त महा । थोर म्हणोनि जन म्हणती. ॥ १०२६ ॥ विषयनिस्पृह तों तोचि दिसे। कीं विवेक ज्ञान ज्यास असे । विवेक जेथें तेथें न वसे । मोह अविवेक जो म्हणावा. ॥ १०२७ ॥ मोह नसे म्हणोनी । नसे म्हणावी प्रकृति मोहिनी । एवं अभक्तांस ज्या प्रकृती तीनी । त्याहूनि विलक्षण प्रकृति यांची. ॥ १०२८॥ अत एव जे महात्मे ऐसे । ज्यांस दैवी प्रकृतीचाच आश्रय असे । माझिया भजनावांचूनि न वसे । चित्त अन्यत्र त्यांचें म्हणे भगवंत. ॥ १०२९ ॥ म्हणोनि ज्यांचें अनन्य मन । मजवांचूनि अन्याचें न करिती भजन । पार्था! मातेंच भजती ते जन । तत्त्व माझें जाणुनी. ॥ १०३० ॥ जाणोनि मातें भजती । म्हणोनि म्हणे जगत्पती । ज्ञानियास न लगे भजन म्हणती । ते न जाणत बोलती सूचवी ऐसें. ॥ १०३१ ॥ जे जाणोनि निर्गुण । मग न भजती सगुण । ते तों म्हणावेच निपुण। क्लेश अधिक जरी तयांसी.॥१०३२॥ ते निर्गुण मात्र उपासिती । कीं निर्गुणींच दृढ लागली त्यांची प्रीती । परि सगुण भजोंच नये ये रीती । ते न बोलती अपसिद्धांत. ॥ १०३३ ॥ जे स्वयें शब्दज्ञानी । उगेच निर्गुण वादाचे अभिमानी ।ते ज्ञानियास सगुण न लगे म्हणोनी । वृथा पांडित्य मिरविती. ॥ १०३४ ॥ सगुणभक्त जे ज्ञानी । या गीतेंत बोलिले थोर म्हणोनी । तेथें पांडित्य बळें ते भक्त अज्ञानी । म्हणोनी वाखाणिती. ॥ १०३५ ॥ त्यांचें मत जगत्पती । निषेधी कीं जाणोनि मातें भजती । ते जाणती जे रीती । ते या चतुर्थचरणीं बोलतो. ॥ १०३६ ॥

चतुर्थचरण—**ज्ञात्वा भूतादिमव्ययम् ।**

आदि सकळां भूतांची । ते सत्य निर्गुणसत्ता साची । आदि सुवर्ण मुकुटादिकांची । आदि मृगजळा सूर्यकिरण. ॥ १०३७ ॥ मुकुटादि आकाराचा होतां व्यय । सोनें मागुती उरे अव्यय । तैसीं भूतें नाशतां उरे अद्वय । ब्रह्मप्रलयानंतर. ॥ १०३८ ॥ ऐसेंचि घट जेथूनि उपजती । ते नाशतां उरे आदि त्याची माती । आणि घट जोंपर्यंत असती । तोंवरी प्रकाशती तेचि मृत्तिकेंकरूनी. ॥ १०३९ ॥ एवं जो आदि जो अंत। तोच मध्य त्याचा निश्चित। त्यांत सबाह्य आंत । एकचि कारण स्थितिकाळीं याचें. ॥ १०४० ॥ एवं घटीं जेंवि माती । ये रीती भूतांची आदि सर्वभूतीं । जाणोनि भक्त मातें भजती ।

१. उत्कट इच्छा.

म्हणे श्रीकृष्ण. ॥ १०४१ ॥ आतां ऐसें जाणोनि भजती । त्यांची कैसी भजनरीती । तें सांगतो जगत्पती । यानंतरचिया श्लोकीं. ॥ १०४२ ॥

**सततं कीर्तयंतो मां यतंतश्च दृढव्रताः ।**
**नमस्यंतश्च मां भक्त्या नित्ययुक्ता उपासते ॥ १४ ॥**

अर्जुना ! पूर्वश्लोकोक्त । जे जाणोनि मातें भजती भक्त । ते भक्तीकरून नित्ययुक्त । सर्वदा कीर्तिती मातें. ॥ १०४३ ॥ नित्ययुक्त भक्ति करूनी । आणि सर्वदा कीर्तन करिती म्हणोनी । कीर्तन आणि प्रेम हेंही दोनी । अखंडत्वें सूचवी. ॥ १०४४ ॥ आणि आपणास कीर्तनाचा सोहळा । तो आठवला मेघनीळा । प्रेमें दाटला गळा । सविस्तर न बोलवे. ॥ १०४५ ॥ माझिया नामाचें कीर्तन । म्हणावें तें म्हणे कमलनयन । मातेंचि कीर्तिती ऐसें वचन । वाचेस आलें. ॥ १०४६ ॥ कीर्तनी भक्तांची प्रेमकळा । वदतां आपला सोहळा । बोलतां आला कळवळा । म्हणे कीं सर्वही काळ मातें कीर्तिती. ॥ १०४७ ॥ आपणच आपलें नाम । ऐसें सूचवी घनश्याम । मातेंचि कीर्तिती ते आत्माराम । ऐसें म्हणे. ॥ १०४८ ॥ भक्तीकरून नित्ययुक्त । आणि नित्य गाती मातें भक्त । यांत आपण नित्य विरक्त । तरी असोसी[1] कीर्तनाची सूचवी. ॥ १०४९ ॥ कीं प्रेमयुक्त सर्वदा । आणि सर्वदा गोविंदा ! मुकुंदा ! । अच्युता ! अनंता ! आनंदकंदा ! । ऐसे कीर्तिती मातें. ॥ १०५० ॥ सर्वदा कीर्तन करिती । म्हणतां सूचवी कीर्तनाच्या विविध रीती । कीं सर्वदा जरी गाती नाचती । प्रारब्धनिष्ठ शरीरधर्मही चालावे. ॥ १०५१ ॥ भोजनादि काळ । तेथें अयोग्य नृत्य मांदळ[2] ताल । याच्या जिव्हे तों विटाळ । नव्हे नामविस्मरणाचा कदापि. ॥ १०५२ ॥ एवं च सर्वदा नाम वाचे । समयविशेषें गाय, नाचे । जागृतींत जे भाव कीर्तनाचे । ते स्मरती स्वप्नींही हें सत्य. ॥ १०५३ ॥ जागरीं जिव्हा जैसी वळे । स्वप्नीं त्याच शब्दीं चळे । त्याची साक्षी कीं देहीं जिव्हा चावळे । रामकृष्ण गोविंद अच्युत इत्यादि. ॥ १०५४ ॥ जों रंगीं गाय, नाचे । आणि सर्वदा नये नाम वाचे । ते विलास पोट भरायाचे । निष्ठा नसे कीर्तनीं हेंही सतत शब्दें सूचवी. ॥ १०५५ ॥ तोही इतरांहूनि बरा । कीं फुलांचा करी विकरा । सर्वथा नामीं विमुख त्या खरा । उद्धार नाहीं. ॥ १०५६ ॥ निष्ठा कीर्तनीं असे । नाम त्याचे वाचे वसे । नामें उठे नामें बैसे । टेंकळी[3] जिव्हेस नामाची. ॥ १०५७ ॥ शिंकेसरिसें नाम । ढेंक-

---

१. अतृप्ति, विशेष इच्छा. २. मृदंग. ३. छंद.

रासरिसा राम । जांभईसरिसा मेघश्याम । वाचेस उमटे. ॥ १०५८ ॥ ग्रासोग्रासीं भोजनीं । पसरितां पाटीं शयनीं । राम कृष्ण नारायण म्हणोनी । निजेला उठे. ॥ १०५९ ॥ स्नान करितां हरि हरि । म्हणोनि गर्जे वैखरी । अशुचि म्हणोनि न करी । नामास विमुख वाचेतें. ॥ १०६० ॥ मलमूत्राचें विसर्जन । करितां झांकी नासिका वदन । तों नामप्रवाह जैसें नदीजीवन । तुंबे धरण बांधितां. ॥ १०६१ ॥ जल कोंडितां मागें फिरे । तैसें मनीं नाम स्मरे । परंतु त्याही अशुचिकाळीं न विसरे । नाम जगन्निवासाचें. ॥ १०६२ ॥ एवं कीर्तनाच्या रीती । येथें सूचवी जगत्पती । जे भोजनादिकाळीं नाम वर्जिती । मुखभंग त्यांचा या सतत शब्दें. ॥ १०६३ ॥ [1]अशुचि गंगा आतळे । स्नान पानें अशुचिता जळे । कोणी होऊनि सोंवळे । न करिती स्नान गंगेचें. ॥ १०६४ ॥ चरणांगुष्ठमात्र । स्पर्शिली ते गंगा करी परम पवित्र । नाम त्याचें सर्व गात्र । कोण महिमा वर्णी तयाचा. ॥ १०६५ ॥ पादांगुष्ठा स्पर्शिली परी । गंगा नव्हे आंगें हरी । नाम आणि मुरारी । दोन नसती. ॥ १०६६ ॥ तनू घट शब्दाची । मृत्तिका घटरूपिणीच साची । गंगा पावेल [2]सरी नामाची । हें न घडे. ॥ १०६७ ॥ वेद म्हणेती सर्वांहूनी । थोर नाम तुझें म्हणोनी । पुत्रा नारायणा म्हणतां ज्या नामें करोनी । मुक्ति अजामिळ पावला. ॥ १०६८ ॥ न कळतां अरण्यशाक । भक्षितां करोनी पाक । रोगी आरोग्य पावे हें कौतुक । सकळ देखती. ॥ १०६९ ॥ न कळतांही नामप्रताप । वाचेस येतां नाशी पाप । न कळे बाळासि दीप । परि तम नाशितां अवलोकी मातेतें. ॥ १०७० ॥ नामें अज्ञान नासे । नामें आत्मा प्रकाशे । पावले जीवन्मुक्तदशे । नामेंचि करूनी. ॥ १०७१ ॥ मेघश्याम जगज्जीवन । सर्वत्र वर्षे कृपाजीवन । परि पापझोंपडींत जे जन । बिंदु न पडे त्यांवरी. ॥ १०७२ ॥ वीज नामाची कडकडो । ते पडतां कैंची पापाची झोंपडी । बारा वाटा होतां तेच घडी । शिरीं पडे कृपावृष्टि घननीळाची. ॥ १०७३ ॥ ऐसा ज्या नामाचा प्रताप । तें अशुचि म्हणतां म्हणणें पाप । ओवळियानें गंगेचें [3]आप । शिवों नये म्हणणें जे रीती. ॥ १०७४ ॥ जे हरिनामीं विमुख । पाहों नये त्यांचें मुख । त्यांस नाहीं स्वर्गसुख । मोक्ष तो नाहींच कीं तयांतें. ॥ १०७५ ॥ नामें सांग होय कर्म । अंगहीन नामें सांग धर्म । नाम दृष्टांतें शब्द ब्रह्म । वेद पावले श्रेष्ठत्व. ॥ १०७६ ॥ नामासमान जें तें अक्षर । म्हणोनि

१. स्वच्छ नव्हे अशी. २. बरोबरी. ३. उदक.

नामें वेदांस बडिवार। काशीसमान कोल्हापुर। पुराणें म्हणती जे रीती. ॥ १०७७॥ विमुख हरिनामीं तया। न फळती सकळही सत्क्रिया। प्रायश्चित्तें जाती वायां। विमुख होतां हरिनामीं. ॥ १०७८॥ गंगादितीर्थमात्र। यद्यपि म्हणावें पवित्र। परि न करिती शुद्ध मद्यपात्र। नामविमुखा प्रायश्चित्तें ये रीती. ॥१०७९॥ नामावांचूनि सदाचार। ते सकळही वेडेचार। पाय उचलोनि मूत्राची धार। निराळी सोडी श्वानही. ॥१०८०॥ नामावांचोनि आंघोळी। त्या बेडुकाच्या बुड्या जळीं। जळीं सर्वदा असे मासोळी। दुर्गंध आंगीं अनिवार. ॥१०८१॥ हरिनाम न म्हणे वाचा। निराहार उपवास एकादशीचा। बार्शिंग अलंकार मस्तकाचा। बांधिजे जे रीती पाठीसी. ॥ १०८२ ॥ अहोरात्र जागर उपवास। उपयोगी हरिनाम कीर्तनास। म्हणोनि निद्राहार जनास। ऋषि ते दिवसीं वर्जिती. ॥ १०८३ ॥ हें स्पष्ट बोलतां जन। कीर्तन करिती करोनि भोजन। म्हणोनि करिते जाले शासन। उपवासाचें. ॥ १०८४ ॥ त्यांच्या मुखीं जें निघालें। तें सत्यच फळ होऊं लागलें। राजवर्जित कर्म केलें। तिहीं गमाविलें जीवित्व. ॥ १०८५ ॥ विशेषें एकादशीदिनीं। ऋषि म्हणती करावीं दोनी। अहोरात्र जागरणीं। एवं कीर्तनीं तात्पर्य. ॥ १०८६ ॥ उपवास करी निराहार। सोंकटीं खेळोनि जागर। तो नव्हे व्रताचा बडिवार। मुख्य हरिकीर्तन ऋषि बोलती. ॥ १०८७ ॥ सासूसुनांचें भांडण। घडला उपवास जागरण। तें पुण्य एकादशीचें कारण। जालें विमान जावया. ॥ १०८८ ॥ म्हणोनि हरिकीर्तनाविण। निराहार आणि जागरण। करिती त्यांसही व्रतगुण। होय अमृतें अमरता जैसी [1]काकासी. ॥ १०८९ ॥ कावळा अमृत प्याला। वंश अवघा अमर जाला। म्हणोनि अमृत मिळतां मानव भला। न करी पान कावळा म्हणोनी. ॥ १०९० ॥ टाकोनि हरिकथामृत। निराहारी बसे जागत। फळ देईलही व्रत। परि नव्हे कृपापात्र देवाधिदेवाचें. ॥ १०९१ ॥ वाणीही मेळवी धन। धनचि मेळवी रायाचा प्रधान। परि तो रायासमान। [2]ग्राम्य तुच्छ धनिक [3]हा. ॥ १०९२ ॥ क्षण निद्रा येतां दिवसा। भंग जाला उपवासा। हरिनामप्रताप नव्हे ऐसा। कीं नाम पूर्ण करी न्यूनातें. ॥ १०९३ ॥ व्रत सफळ नामें परम। विना नाम सकळ अंगहीन कर्म। एकादशी तों भागवतधर्म। नामावांचूनि [4]शैव जैसें विनाप्राण. ॥ १०९४ ॥ एवं नामें सकळ काळ सफळ। त्यास वर्जिती भोजनादि काळ। ते नाममहिमा नेणती खळ।

१. कावळ्यास. २. गांवढळ, हलकट. ३. हा वाणी. ४. प्रेत.

जाणती ते ऐसें न म्हणती कदापि. ॥ १०९४ ॥ इत्यादि भावें सतत । म्हणजे प्रेमें सर्वदा अत्यंत । कीर्तन करिती म्हणे भगवंत । या श्लोकीं. ॥ १०९५ ॥ जे ऐसे त्यांची दैवी प्रकृती । एवं च याहूनि विपरीत ते असुरजाती । जे नामकीर्तनाचा महिमा निंदिती । ते असुर कीं विपरीत या प्रकृतीस प्रकृति त्यांची. ॥ १०९६ ॥ जे कर्ममात्र श्रेष्ठ म्हणती । त्यांस स्पष्ट असुरांत ऋषि गणिती । आतां जे गीता भागवत वेदांत जाणती । आणि न भजती हरीतें. ॥ १०९७ ॥ ते म्हणती पुराण वेद । नाममहिमा बोलती तो अर्थवाद । महत्त्व नसोनियांही महत्त्वाचा अनुवाद । अर्थवाद म्हणती शास्त्रीं तयासी. ॥ १०९८ ॥ वडबड करिती ऐसी परी । दूषणास युक्ति न सांपडे खरी । प्रमाण नाहीं म्हणावें तरी । पुराणें श्रुति स्मृतिही बोलती. ॥ १०९९ ॥ दूषण युक्तीकरोनि घडे । परंतु युक्ति बरी न सांपडे । मग म्हणती ते वेडे । कीं संस्कार नामें कां न होती ? ॥११००॥ म्हणती नाम थोर हा निर्वाह । तरी नामें न घडे कां मुंजी विवाह ? । तेथें लागे कर्मप्रवाह । हे कुयुक्ति ये स्थळीं बोलती. ॥ ११०१ ॥ या युक्तीचाही परिहार । येथें सूचवी सर्वेश्वर । सतत कीर्तन म्हणतां जेव्हां प्रकार । करावा तेव्हां तो काळ. ॥ ११०२ ॥ स्नानकाल संध्याकाल । होमकाल पूजाकाल । मुंजीकाल विवाहकाल । कर्मसंस्कारकाल सकळ आले. ॥ ११०३ ॥ **'यस्य स्मृत्या च नामोक्त्या'** म्हणोनी । नामें न्यून तितकें पूर्ण होतें या स्मृतीकरूनी । सर्वकर्मकाळीं नाम स्मरोनी । सफळ सर्व कर्मे करिती हें सूचवी. ॥ ११०४ ॥ **'ॐ तत्सदिति निर्देश'** । त्रिविध निजनामें हृषीकेश । सप्तदर्शी करील उपदेश । कर्म सफळ या नामें म्हणोनी. ॥ ११०५ ॥ **'ॐ तत्सद्ब्रह्मार्पण'** म्हणोनी । उदक सोडिती सर्व कर्मेंकरूनि । कर्म सांग नामावांचूनी । सर्वथा नव्हे. ॥११०६॥ जीवाकरितां देह सफल । तैसें नामें सफळ कर्म सकळ । अमंगळ देह जीवें मंगळ । तेंवी नामेंचि कर्म सुमंगळ. ॥ ११०७ ॥ तथापि नामेंचि केवळ । न होती संस्कार सकळ । तेव्हां नाममहिमा हा विफळ । कर्म थोर ते म्हणती. ॥११०८॥ तरी लक्षाचा मुकुट । पायीं बांधितां न चालवे वाट । पादरक्षा निकृष्ट निपट । पायीं घालितां कांटे न रुतती. ॥ ११०९ ॥ जे कर्मसिद्धि पादरक्षेंकरोनी । ते नव्हे मुगुटें म्हणोनी । मुकुट उणा पादरक्षेहूनी । हें काय घडे ? ॥ १११० ॥ मुकुट मस्तकींच घालावा । मार्ग पादरक्षेनेंच चालावा । नामें मोक्ष बोलावा । कर्मे वर्णाश्रमसंस्कार. ॥ ११११ ॥ कर्म वेदमंत्रें चाले । तरी नामेंही वेदवाणीच बोले । दोनी मार्ग प्रकट जाले ।

वेदाचपासूनी. ॥ १११२ ॥ संस्कार कर्में बोलती श्रुती । मोक्ष नामें वेदचि बोलती । जनास दोनी प्रकार सांगती । अनादि वेद. ॥ १११३ ॥ कन्या आणि दासी । श्वशुर दे जामातासी । नाम आणि कर्म दोनी जनांसी । वेदचि देती ये रीती. ॥ १११४ ॥ क्षयरोग नाशी रसराज । त्या रसराजें नासे खाज । म्हणोनि रसमहिमा वर्णितां लाज । वाटेल काय धन्वंतरियासी? ॥ १११५ ॥ नामें भगवत्प्रसाद । भगवत्प्रसादें कैवल्यानंद । संस्कार नव्हती म्हणोनि वेद । भीती काय वर्णितां महिमा नामाचा? ॥ १११६ ॥ नाममहिमा नये कर्मातें । नये वर्णाश्रमत्वसिद्धि धर्मातें । नाम पाववी वैकुंठधामातें । कर्में न चुके गर्भवास. ॥ १११७ ॥ लोहार शस्त्रें घडूं जाणे । तींच शस्त्रें शूर हाणे । तो शस्त्र घडूं नेणे । हाणों नेणे लोहार. ॥ १११८ ॥ तथापि शूर राजमान्य । लोहार सन्मानार्हही सामान्य । नामास भगवत्प्राप्तिप्राधान्य । गर्भवास कर्में न चुकती. ॥ १११९ ॥ शूराकरितां सफळ । विद्या लोहाराची सकळ । तैसें कर्म सुमंगळ । नामाकरितां. ॥ ११२० ॥ तथापि शस्त्रें न करी शूर । तीं घडितोचि लोहार । तैसे वर्णाश्रम संस्कार । न होती नामें. ॥ ११२१ ॥ सफळचि शूरांच्या हातीं । लोहाराच्या विद्या सकळ होती । तैशा वर्णाश्रमादि सिद्धि साधती । नामप्रतापें कर्माच्या. ॥ ११२२ ॥ म्हणोनी सर्व कर्माचिया काळीं । मातें कीर्तिती म्हणे वनमाळी । सतत शब्दें बुद्धि चाळी । सूचवूनि भाव इत्यादि. ॥ ११२३ ॥ कोणी म्हणती कीं नाम थोर जरी । कर्म टाकाना कां तरी । त्यांस म्हणावें कीं आरूढ हस्तीवरी । तो काय पायीं पादरक्षा घालीना? ॥ ११२४ ॥ सांग नामनिष्ठाचेंचि कर्म । उत्तम नामनिष्ठाचाचि धर्म । ते यथाविधि कर्म करूनि वर्म । जाणती कीं नाम थोर म्हणोनी. ॥ ११२५ ॥ असो तें आतां ऐसा प्रथम चरण । बोले जगद्वंद्यचरण । आतां दुसरिया चरणाचें विवरण । प्रयत्नही करिती ते दृढव्रत म्हणोनी. ॥ ११२६ ॥ म्हणोनि पूर्वचरणीं सतत । मातें कीर्तिती म्हणे भगवंत । आणि पूर्वश्लोकीं भूतादि अव्यय अनंत । जाणोनि मातें भजती बोलिला. ॥ ११२७ ॥ तरी ज्यास जालें ज्ञान । त्यास अन्वयें सर्वत्र भगवद्दर्शन । व्यतिरेकें निखळ स्वरूपध्यान । याचें तों कीर्तनच वर्णिलें सर्वदा. ॥ ११२८ ॥ तरी काय ज्ञानसमाधि टाकुनी । सर्वदा असतो नुसत्या कीर्तनीं? । शंका ऐसी म्हणोनी । **'यतंतश्च दृढव्रताः'** म्हणतसे. ॥ ११२९ ॥ **'यतंतश्च'** म्हणजे यत्नही करिती । म्हणजे यत्न करीतचि मातें कीर्तिती । **'यतंतश्च'** म्हणतां चकारें श्रीपती । स्वरूपसमाधि दोनीही सूचवितो. ॥ ११३० ॥ करणें स्वरूपाकार अंतःकरण । इतकेंचि

'यत्न'शब्दाचें विवरण । त्यांत चित्स्वरूप तंतुस्फुरण । जडपटीं स्मरणें हा अन्वयसमाधी. ॥ ११३१ ॥ तरी मुखीं नाम अर्थी दृष्टी । त्या ज्ञानदृष्टीस भगवद्रूपसृष्टी । पाहे गाय नाचे करी अमृतवृष्टी । जे आयकती तयांतें. ॥११३२॥ सर्वभूतीं वसे देव । तो म्हणावा वासुदेव । नाम गातां देवाधिदेव । विश्वरूपें जो पाहे. ॥ ११३३ ॥ म्हणे अच्युत अच्युत । देखे जड तरंगीं चित्सिंधु नाशरहित । म्हणतां अनंत अनंत । देखे उरला आत्मा व्यापूनि जग सारें. ॥ ११३४ ॥ भगवान् भगवान् म्हणतसे । तों भगवद्रूप हें प्रत्यक्ष दिसे । स्त्रीरूप नटवेष जो भासे । ज्ञाता पाहे प्रत्ययाकडे तयाच्या. ॥ ११३५ ॥ आपण दावितो स्त्रीवेष । हा स्त्रीवेषें असे मीच पुरुष । तैसा चराचररूपें अशेष । आपण असे हा प्रत्यय भगवंताचा भागवतांचाही. ॥ ११३६ ॥ कीं ज्या प्रकाशें चराचर ज्याला । प्रतीतीस येतो आत्माच आपला । ऐसा अन्वय समाधि बाणे तयाला । ज्ञानी भगवन्नामकीर्तन जो करी. ॥ ११३७ ॥ आतां देवकीनंदन । उचलितो गोवर्धन । गोवर्धनोद्धर कमलनयन । सगुण साकार नामें इत्यादि. ॥ ११३८ ॥ नामें उच्चारितां वाचे । मनीं स्फुरती अर्थ नामाचे । आविर्भाव त्या त्या रूपाचे । मनीं होती. ॥ ११३९ ॥ त्या त्या भगवद्रूपवृत्ती । स्वरूपसत्तेनें स्फुरती चित्तीं । पटीं तंतु घटीं माती ये रीती । आत्मसत्ता देखे त्या स्वरूपीं. ॥ ११४० ॥ या रीतीचें कीर्तन । सूचवी जगज्जीवन । आतां करितां निर्गुणध्यान । शब्द माघारां परततो. ॥ ११४१ ॥ सुषुप्ति आणि निर्गुणध्यान । येथें नसे शब्दाचें ज्ञान । जों शब्द तों कीर्तन । निरर्थक नव्हे सतत शब्द. ॥ ११४२ ॥ शब्द असे जोंपर्यंत । तोंवरी कीर्तन अखंडित । कीर्तनावांचूनि कोणे काळीं निश्चित । शब्द वायां त्याचा नव जाय. ॥११४३॥ कीर्तन आणि यत्नही करिती । भगवंत म्हणे ये रीती । आणि पूर्वश्लोकीं म्हणे मातें भजती । जाणोनि भूतादि अन्वय. ॥ ११४४ ॥ तरी ज्ञानी आणि भक्तराव । त्यांच्या कीर्तनादिकांचा ऐसा भाव । आतां उरल्या नवविधा भक्ति देवाधिदेव । तृतीय चरणीं सूचवितो. ॥ ११४५ ॥ **'नमस्यंतश्च'** म्हणे । चकाराचा अर्थ पार्थ जाणे । त्यास खूण ऐसी बाणे । कीं नवविधा भक्तीही बोलिला. ॥ ११४६ ॥ **'नमस्यंतश्च'** म्हणे श्रीपती । कीं नमस्कारही मातें करिती । नवविधा भक्ति करून नमस्कारेंही भजती । नमस्कारही करिती या शब्दीं हा अर्थ. ॥ ११४७ ॥ उगेंच नमस्कार करिती म्हणावें । तेथें नमस्कार करिती

---

१. झोंप.

या भावें । नमस्कारही म्हणतां जाणावें । कीं नवविधा भक्ति करूनही वंदिती. ॥ ११४८ ॥ प्रथम भक्ति श्रवण । कीर्तन न घडे श्रवणाविण । चरितश्रवण नसतां कवण । करूं शके कीर्तनातें? ॥ ११४९ ॥ एवं त्याचें वर्णितां कीर्तन। श्रवण स्मरण दोनी भक्ति कमलनयन । सूचवी कीं नाम स्मरेना जों मन । केंवी कीर्तन ते करितील ? ॥ ११५० ॥ एवं कीर्तनाहूनि पहिलें श्रवण । आणि कीर्तनकाळीं स्मरण । कीर्तन म्हणतां विवरण । भक्तित्रयाचें.॥११५१॥ सप्तमस्कंधीं भागवतीं । नवविधा भक्ति ज्या श्लोकीं असती । त्या पुढिलिया श्लोकीं दिसती । सफळ अर्पितां मुकुंदातें. ॥ ११५२ ॥

सप्तमस्कंधश्लोकद्वय—**श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम् ।**
**अर्चनं वंदनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम् ॥ १ ॥**
**इति पुंसार्पिता विष्णोर्भक्तिश्चेन्नवलक्षणा ।**
**क्रियते भगवच्छ्रद्धा तन्मन्ये धीतमुत्तमम् ॥ २ ॥**

यांत श्लोकें प्रथमें । नवविधा भक्तीचीं बोलिलीं नामें । दुसरिया श्लोकीं निष्कामें । अर्पितां भगवंतीं त्या भक्ति म्हणाव्या हा अर्थ. ॥ ११५३ ॥ भक्ति करूनि भगवंतीं । अर्पी निष्काम तरीच भक्त म्हणवती । एवं भक्तिसमर्पण प्रस्तुतीं । बोलणें असे. ॥ ११५४ ॥ बोले समर्पणाची रीति । **'यस्य स्मृत्या'** हे स्मृती । **'सद्यो वंदे'** म्हणोनी वंदिती । भक्त कर्मं करून अच्युतातें. ॥ ११५५ ॥ एवं च नवविधा भक्ति करूनी । समर्पिती भक्त वंदूनी । प्रस्तुत **'नमस्यंतश्च'** म्हणोनी । चकारें सर्व भक्ति येथें सूचवितो. ॥ ११५६ ॥ नमस्कारही करिती । म्हणजे भक्ति करून वंदूनि अर्पिती । या कारणें दृढव्रत ते म्हणे जगत्पती । कीं ढळणें नसे जयांतें. ॥ ११५७ ॥ भक्ति केली जैसी तैसी । ही बुद्धि नाहीं ज्यांपासीं । या भावें दृढव्रत ते म्हणोनि ऐसी । वाणी चक्रपाणी बोलतो. ॥ ११५८ ॥ कीं श्रवणादि भक्ति करिती । आणि वंदूनि मातें अर्पिती । दृढव्रत ऐसें भजती । भक्तियुक्त हा भाव. ॥ ११५९ ॥ त्यांत एक भक्तींत दुसरी । भक्ति न घडे परी । कीर्तन सर्व भक्तींत घडतें म्हणोनि हरी । कीर्तनींच बोले सतत शब्द. ॥ ११६० ॥ कीं श्रवणकाळीं कथा । गोड लागतां चित्तीं सर्वथा । रामकृष्ण अनाथनाथा! । उद्गार उदरांतूनि निघती नामाचे. ॥ ११६१ ॥ श्रवणकाळीं मौन धरिती । भोजनकाळीं मौनींही न बोलती । परंतु सर्वथा न आवरती । उद्गार निघती ढरढरां. ॥ ११६२ ॥ सावध असे श्रवणीं । तरी गोड वाटे अंतःकरणीं । तरी उद्गाररूपें वाणी । जय

राम जय वासुदेव म्हणतसे. ॥ ११६३ ॥ ऐसेंचि स्मरण पादसेवन । अर्चन आणि वंदन । दास्य सख्य आत्मनिवेदन । सर्वत्र मुखीं नाम देवाधिदेवाचें. ॥ ११६४ ॥ एवं सतत शब्द स्वकीर्तनीं । बोले आणिकही गहन भावें करोनी । खंडित नव्हे कीर्तन म्हणोनी । आपण अखंड त्यापासीं हा भाव. ॥ ११६५ ॥ नारदास म्हणे हरी । मी सर्वत्र असें परी । जो माझें कीर्तन करी । असें मी सर्वदा त्यापाशीं. ॥ ११६६ ॥ कीं भलत्या काष्ठीं अनळ । परि मथिला आयता केवळ । अग्निहोत्रीं सांपडे तैसा मी सर्वकाळ सकळ । परि कीर्तनापासीं वसतसें. ॥ ११६७ ॥ ऐसे भक्तीकरूनि नित्ययुक्त । माझें गुणीं रूपीं स्वरूपीं अनुरक्त । मातें उपासिती माझे भक्त । दैवी प्रकृतीचे अर्जुना! ॥ ११६८ ॥ ऐशा दैवी प्रकृती । यांच्या आणखीही भजनरीती । बोलतसे जगत्पती । या श्लोकें. ॥ ११६९ ॥

**ज्ञानयज्ञेन चाप्यन्ये यजंतो मामुपासते ।**
**एकत्वेन पृथक्त्वेन बहुधा विश्वतोमुखम् ॥ १५ ॥**

पूर्वोक्त भक्त त्यावेगळे अन्य । मातें ज्ञानयज्ञेंही यजती धन्य । पूर्वोक्तांस हा यज्ञ सामान्य । त्यांस विशेषें भजन हेंचि. ॥ ११७० ॥ बहुतेक जे भक्तिमार्गचतुर । वासुदेव सर्व या अन्वयबोधीं तत्पर । **'वासुदेवः सर्वमिति'** म्हणोनि सर्वेश्वर । सप्तमीं मार्गे तें बोलिला. ॥ ११७१ ॥ श्रवणकीर्तनादि तत्पर । सर्वत्र भगवद्भाव अवलोकिती सादर । ते व्यतिरेक निर्गुणसमाधींत निरंतर । न असती. ॥ ११७२ ॥ प्रस्तुतीं सगुणभक्ति असोनि चित्तीं । स्वरूपाकार करिती वृत्ती । श्रवणकीर्तनींही प्रवृत्ती । परि गोडी व्यतिरेकसमाधीची अत्यंत. ॥ ११७३ ॥ **'ज्ञानयज्ञेन चाप्यन्ये'** म्हणोनी । **'चापि'** या दोनी अक्षरेंकरूनी । पूर्वोक्त भक्तिही सूचवूनी । विशेषें ज्ञानयज्ञें यजती म्हणतसे. ॥ ११७४ ॥ ज्ञानें आत्मस्वरूप । अनुभवितां जळे पुण्यपाप । म्हणोनि आत्मा अग्निरूप । चित्तवृत्ति आहुति हविष्य[1]. ॥ ११७५ ॥ आतां चैतन्यैंकरूनी । प्रथम सचेतन होउनी । सर्व वृत्ति चेतवी म्हणोनी । सत्त्ववृत्ति म्हणावें तें चित्त. ॥ ११७६ ॥ त्या चित्ताच्या दोन वृत्ती । प्रपंचाकडे पाहे ते पराग्वृत्ती[2] । स्वरूप लक्षी ते उफराटी प्रत्यग्वृत्ती[3] । ते स्वरूपीं थारतां समाधी. ॥ ११७७ ॥ ते स्वरूपीं होय स्थिर । तेव्हां नसती वृत्ति इतर । तेव्हां वृत्ति समुदायसार । होमिलीच जाणों स्वरूपीं. ॥ ११७८ ॥ चतुर्थाध्यायांत उत्तमश्लोक ।

---

१. गाईपासून मिळणारें तूप वगैरे जिन्नस. २. बाह्य वस्तूकडील लक्ष. ३. अंतर्दृष्टीनें पाहणें.

'**सर्वाणींद्रियकर्माणि**' हा श्लोक । या यज्ञाविषयींच बोलिला तोही समाधि-व्यतिरेक । यज्ञरूपें वर्णिला. ॥ ११७९ ॥ प्रस्तुत नवमीं म्हणे सर्वज्ञ । कीं कोणी यजूनि ज्ञानयज्ञ । मातें उपासिती अभिज्ञ । कोणी एकत्वें. ॥ ११८० ॥ तरी आत्मज्ञानें उपासना । ते एकत्वाविण असेना । ज्ञानयज्ञ म्हणतां दिसेना । उपासना भिन्नत्वें. ॥ ११८१ ॥ ज्ञानयज्ञांत जें ज्ञान । तें जरी म्हणावें शास्त्र-ज्ञान । तेव्हां नसोनि अपरोक्ष ज्ञान । ज्ञान चाळी तो जिज्ञासु म्हणावा. ॥ ११८२॥ तरी या तृतीय चरणीं । पृथक्त्वेंही भजती म्हणे चक्रपाणी । त्यांस अद्वैत विश्वास अंतःकरणीं । भजे दास्यें भावें कळावया अद्वैत. ॥ ११८३ ॥ पृथक्त्वें भजती म्हणे भगवंत । तें भजन म्हणावें द्वैत । तरी द्वैत भजन निषिद्ध अत्यंत । बोले श्रुती. ॥ ११८४ ॥

श्रुति—**अथ योऽन्यां देवतामुपास्तेऽन्योऽसावन्योऽहमस्मीति न स वेद यथा पशुः ।**

श्रुत्यर्थ—अन्य मानूनि दैवत । जो उपासक असे भजत । तो कांहीं नसे जाणत । श्रुति म्हणे पशु जैसा.॥११८५॥तरी एकत्व कळलें ज्याला । ऐक्यउपासना घडे त्याला । जिज्ञासु ऐक्य नाहीं समजला । ऐक्य उपासना तो नेणे.॥११८६॥ त्यास पृथक्त्वेंकरून । भजन घडे म्हणोन । तोही कांहीं नेणे जैसा पशु याव-रून । म्हणावा काय? ॥ ११८७ ॥ तरी जिज्ञासु ऐक्य नेणे। परि देव अन्य मी अन्य ऐसें न म्हणे । अद्वैतनिश्चय ज्यास बाणे । अपरोक्ष नसोनिही शास्त्र-बळें. ॥ ११८८ ॥ जे अन्यत्वें उपासिती । ते पशु कांहीं न जाणती । जरी इतकेंच बोलती श्रुती । तरी जिज्ञासूकडेही लागतसे हे निंदा. ॥ ११८९ ॥ देव वेगळा आपण वेगळा म्हणोनी । ऐसें म्हणे बुद्धिपूर्वक दाटुनी । तो जैसा पशु श्रुति म्हणे यावरूनी । निष्ठा भेदींच त्याला श्रुति निंदिते. ॥ ११९० ॥ जो भेदवादी अमंगळ । तो देवता वेगळी मी वेगळाच म्हणे केवळ। ऐसें मानून भजे खळ । त्यास येथें श्रुति म्हणे पशु जैसा. ॥ ११९१ ॥ आतां प्रस्तुतीं गीतेंत । पृथक्त्वें भजती म्हणे भगवंत । ते दैवी प्रकृतीचे स्वभक्तिरत । त्यांत मेळवूनि सांगतसे. ॥ ११९२ ॥ तेव्हां न म्हणावें हे भेदवादी । जे निषेधिले पशूसमान वेदीं । हे जिज्ञासु अद्वैतवादी । अपरोक्षानुभव इच्छिती. ॥११९३॥ ते ऐक्य नेणती बापुडे । म्हणोनि एकत्व कळा न सांपडे । एकत्व न कळे तेव्हां सहजेंचि घडे । पृथक्त्वें भजन तें. ॥ ११९४ ॥ पृथक्त्वें भजती म्ह-णोनी । बोले दैवी प्रकृतींत लेखूनी । अद्वैतजिज्ञासु ते यावरूनी । म्हणावें ऐसें सूचवी. ॥ ११९५ ॥ एवं ज्ञानयज्ञें उपासिती । ते अनुभवीच ऐसें बोले

श्रीपती । ते एकत्व भजन काय नेणती । कीं एकत्वें भजती ते वेगळे लेखावे? ॥ ११९६ ॥ या एकत्वभजनाची मती । साधावी येथें ये रीती । कीं समाधिसुखाची स्थिति । न पावोनि भाविती एकत्व मात्र. ॥ ११९७ ॥ तत्पद आणि त्वंपद । यांच्या वाच्यांशीं असे भेद । तो परिहरोनि वेद । असिपदें एकत्व सूचविती. ॥ ११९८ ॥ तत्पदीं ईश्वरोपाधि उत्तम । जीवोपाधि त्वंपदीं अधम । परि दोहींचें प्रकाशक तें सम । चित्स्वरूप कळलें आत्मत्वें. ॥ ११९९ ॥ या एकत्वाचेंच चिंतन । आणि सगुणाचें श्रवण कीर्तन । एकत्वें भजती म्हणे कमलनयन । ते ये रीती. ॥ १२०० ॥ एवं निर्गुण समाधिज्ञानयज्ञ । एकत्व तत्पद त्वंपद ऐक्यमात्र जाणते आत्मज्ञ । आणि पृथक्त्वें जिज्ञासु जे नव्हती अभिज्ञ । एकत्व उपासनेचे. ॥ १२०१ ॥ आतां बहुधा म्हणजे बहुप्रकार । कीं इंद्रादिरूपें एक ईश्वर । म्हणूनि यज्ञ करिती चतुर । कर्मकांडीं. ॥ १२०२ ॥ आतां बहुधा म्हणती चराचर । स्वयें जाला ईश्वर । ऐसा अर्थ बोलावा तरी जगदीश्वर । यापुढेंचि **'विश्वतोमुख'** उपासना तेही बोलतो. ॥ १२०३ ॥ आतां मत्स्यकूर्मादिरूपें हरी । भजावा तें बहुधा भजन म्हणावें जरी । तरी अवतार अनंत म्हणोनि वैखरी । वेदीं पुराणीं प्रसिद्ध अघटित उपासना अनंतत्वें. ॥ १२०४ ॥ चराचर बहुधा दृष्टि दिसतसे । तरी तो अर्थ विश्वतोमुखें भजतां येतसे । मत्स्यादि अवतार नाना कैसे । भजावे न दिसती जे दृष्टी? ॥१२०५॥ एका ईश्वराचे अवतार । श्रवणें हे पूर्वोक्त सकळही उपासक चतुर । जाणती आतां बहुधा उपासनाप्रकार । कोणते यावेगळे लेखावे? ॥ १२०६ ॥ चरित्रें जीं नाना अवतारीं । तीं कीर्तनांत आटलींच याउपरी । बहुधा उपासना अंतरीं । ध्यान मत्स्यादि मूर्तींचें जरी म्हणावें. ॥ १२०७ ॥ तरी काय दहाच मत्स्यादि अवतार । अवतार दिव्य ईश्वराचे अपार । ध्यावे कोण टाकावे कोण हा विचार । युक्त न दिसे सर्वथा. ॥ १२०८ ॥ कोणी ऐसाचि अर्थ बोलती। तरी ते बोलिले यथामती । बहुधा भजनाची हे रीती । कीं इंद्रादि रूपें यजन एका सर्वेश्वराचें. ॥ १२०९ ॥ आतां **'विश्वतोमुख'** उपासना । **'विश्वतश्चक्षु'** इत्यादि वेदार्थरचना । हृदयीं धरोनि म्हणे अर्जुना! । **'विश्वतोमुख'** भजती कित्येक. ॥ १२१० ॥ चैतन्य तंतु जग अंबर । मूर्ती पटीं विणिल्या चराचर । नेत्र मुख कर चरण मांडिया उदर । अंग अंगतंतूच तो अवघा. ॥ १२११ ॥ विना तंतु न दिसे मूर्ती । ऐसी चराचराची आत्मस्फूर्ती । **'विश्वतोमुख'** विश्वमूर्ती । हेचि उपासना एकासी. ॥ १२१२ ॥ ऐसे वर्णिले भक्त । यांत कोणी अपरोक्षसाक्षात्कारयुक्त । कोणी ज्ञान नसोनि अनुरक्त ।

स्वचरणीं ऐसे वर्णिले. ॥ १२१३ ॥ एवं ज्यांच्या दैवीप्रकृती । ते आपणातें भजती । आणि आसुरी प्रकृति मानवजाती । न भजती आपणातें.॥१२१४ ॥ ऐसें बोलतां येथवरी । '**विश्वतोमुख**' उपासना हरी । शेवटीं बोलिला याउपरी । तें विस्तारूनि बोलेल या श्लोकापासुनी. ॥ १२१५ ॥

**अहं क्रतुरहं यज्ञः स्वधाहमहमौषधम् ।**
**मंत्रोऽहमहमेवाज्यमहमग्निरहं हुतम् ॥ १६ ॥**

अगा! क्रतु मी **अर्जुना**! । यज्ञ मी **पांडुनंदना**! । क्रतु म्हणजे **श्रुत्युक्त** होमरचना । यज्ञ ते **स्मृत्युक्त**. ॥ १२१६ ॥ अथवा क्रतु त्यास म्हणती । कीं यूपस्तंभ जेथें उभारिती । यूपस्तंभावांचूनि यजिती । यज्ञ त्याला म्हणिजेतें. ॥ १२१७ ॥ आतां क्रतुयज्ञीं देवतांच्या नामें आहुती । होमितां स्वाहा म्हणोनि म्हणती । पितरांस पिंड तिळ जळ देती । स्वधा म्हणोनी. ॥ १२१८ ॥ येथें स्वधा मी म्हणोनी । श्रीकृष्ण म्हणे यावरूनी । श्राद्धें तर्पणें पितृकार्यें या स्वधा शब्दें करूनि । **भगवद्रूपें** पहावीं हा भाव. ॥ १२१९ ॥ आतां ओषधि मी म्हणतसे । कीं धान्यें शेतीं उगवतां वाढतां जें दिसे । त्या ओषधि आणि धान्य गवसे । औषध म्हणावें तयातें. ॥ १२२० ॥ अन्नें क्षुधा हरती । अन्नें पुष्टीही करिती । तीं अन्नें औषधें आणि नाना रीती । रोगहर औषधाच्या जातीही ऐशाच. ॥ १२२१ ॥ एवं क्रतुयज्ञ देवांकारणें । आणि श्राद्धादि पितरांनिमित्त जें करणें । क्रतुयज्ञ स्वधा शब्दाचें हें विवरण । सूचवूनि मी औषधी म्हणे हें हविर्द्रव्य. ॥ १२२२ ॥ आतां मंत्र आज्य[1] अग्नीही मी । म्हणे सकळा यज्ञाचा स्वामी । आणि हुत[2] जालें जें होमीं । तेंही मी म्हणतसे. ॥ १२२३ ॥ हें बोले स्वयें **भगवान्** षड्गुण । जें तें म्हणे आपण । **भगवच्छब्दीं** ज्ञानगुण । ते खूण सूचवी ये स्थळीं. ॥ १२२४ ॥ उत्पत्ति वृद्धि परिणाम अपक्षय । शेवटीं नाश त्याचा तो क्षय । सर्वेही स्वकल्पनामय । जाणे कल्पक आपण. ॥ १२२५ ॥ वेष नट दाखवी निपुण । तैसा विश्वरूप आपणातें आपण । कल्पी **भगवान्** षड्गुण । ज्ञानगुण त्या कल्पनेच्या साक्षित्वें. ॥ १२२६ ॥ प्रस्तुतीं क्रतु यज्ञ श्राद्ध तर्पण । क्रियारूप कल्पूनी आपणा आपण । जालों मी स्वयें षड्गुण । हें सूचवी. ॥ १२२७ ॥ तैसाच ओषधींचा उद्भव । वृद्धि परिणाम कणिस धान्यादि भाव । कल्पूनि जालों स्वयमेव । मी **देवाधिदेव** हें सूचवी.॥१२२८॥ ऐसेंचि मंत्र आज्य हुत । इत्यादि यज्ञप्रकार बहुत । ते स्वयें मीच जालों **भग**-

---

१. तूप. २. आहुति.

वंत। आपणांस आपण कल्पूनी. ॥ १२२९ ॥ ब्राह्मण कल्पिले मनें। त्यांच्याच हातें यज्ञसाधनें। कल्पून करविलीं कल्पकानें। तरी ते कल्पना त्याचीच. ॥ १२३० ॥ ब्रह्मीं मायेचा उगम। होतां सृष्टि सकळ पुरुषोत्तम। मनें करून स्थावर जंगम। कल्पूनि आपण होतसे. ॥ १२३१ ॥ तत्त्वें आधीं निर्मिलीं। मग अनंतानंत ब्रह्मांडें केलीं। तीं तत्त्वें ब्रह्मांडें जालीं। त्यास काय सामग्री होती तेधवां? ॥ १२३२ ॥ नाना धातु आणि माती। ईश्वरकृत सांपडे आयती। तरीच त्यांचे घटादि पदार्थ घडती। कुंभार सोनार लोहार तांबट. ॥ १२३३ ॥ श्रुति पूर्वी सृष्टीहूनी। म्हणती कांहींच नव्हतें म्हणोनी। आणि ऊर्णनाभिदृष्टांतें करूनी। सृष्टि ईश्वर करी हेंही श्रुति वर्णिती. ॥ १२३४ ॥ किडा ऊर्णनाभि तंतु उगळी। त्यांत खेळे पुन्हा गिळी। तैसी हे सृष्टि सगळी। निर्मी संहारी ईश्वर. ॥ १२३५ ॥ राहाट अथवा चाती। कापूस वोख[2] ताग पोटांत नसती। माशीएवढा किडा कोणे रीती। तंतु अपार पोटांतूनि काढितो? ॥ १२३६ ॥ ऐसा ईश्वर सर्वेश्वर। कल्पोनि निर्मितो चराचर। येविषयीं प्रमाणें अपार। बोलतां ग्रंथ वाढेल फार. ॥ १२३७ ॥ मन मायेचेंचि केलें। त्या मनें पद्मनाभरूप आपणातें कल्पिलें। नाभिपद्मीं तेथें निर्मिलें। ब्रह्मयातें. ॥ १२३८ ॥ तो ईश्वराचा पुत्र मानस। ब्रह्मा लोकपितामह म्हणावें ज्यास। सनकादि मरीचि कर्दमादि त्यास। जाले मानससुत सकळ. ॥ १२३९ ॥ त्यांत पुरुष एक मनु म्हणोनी। शतरूपा म्हणोनि त्याची कामिनी। मनेंचि दोनी निर्मुनी। ब्रह्मा म्हणे सृष्टि करा. ॥ १२४० ॥ तीं दोघें भूतळा आलीं। भूतळीं अन्नें भक्षूं लागलीं। तीं अन्नेंही निर्माण केलीं। मनेंचि करूनियां ब्रह्मयानें. ॥ १२४१ ॥ निर्गुणीं मायेचा अंकुर। तेव्हां ईश्वर सगुण परि तोही निराकार। पद्मनाभरूप त्याचा अवतार। मनोमय कल्पना ईश्वराची.॥१२४२॥ शरीर ब्रह्मयाचें त्यापासुनी। त्याणें मनु शतरूपा त्याची कामिनी। धान्यें आणि सकळ लोक मनेंच करुनी। सृष्टि केली परि अपूर्ण. ॥ १२४३ ॥ भगवद्भक्ति पूर्वी ज्यांस। आणि विना ज्ञान पावले नाहीं मोक्षास। तितके विना गर्भवास। मानस मनेंचि उपजले. ॥ १२४४ ॥ परंतु गर्भवासाविना। ज्यांस उत्पत्ति सर्वथा असेना। ऐसे जीव अनंत नाना। ते उपजतां न वसती लोक चतुर्दश. ॥ १२४५ ॥ चतुर्दश लोकरचना। धान्यें आणि मानससृष्टीही नाना। मनु शतरूपा हे सकळही कल्पना। स्वस्वरूपीं सर्वेश्वराची.॥१२४६॥

---

१. कोळी. सूत काढणारा जंतु. २. अंबाडी.

ब्रह्मा त्याचेंचि रूप कल्पित । सनकादि मनुशतरूपापर्यंत । धान्यें चतुर्दश लोकही भगवंत । जाला आपणास आपण कल्पुनी. ॥ १२४७ ॥ मानससृष्टि येथवरी । मैथुनसृष्टि या उपरी । शुक्रशोणितापासूनी जाली परी । हेही ईश्वर-कल्पना. ॥ १२४८ ॥ स्वप्नीं मनेंचि कल्पिली कामिनी । तीस स्वप्नकल्पित पुरुषापासुनी । संतान जालें मैथुनें म्हणोनी । मनें कल्पिलें नव्हे तें काय? ॥ १२४९ ॥ स्वप्नीं नगर नद्या पर्वत । जैसीं सकळ मनःकल्पित । स्वप्नीं मिथुनापासूनि जाले सुत । तेही तैसेच कल्पित जे रीती. ॥ १२५० ॥ ऐसा प्रपंच सकळ । मनुशतरूपापर्यंत कल्पित केवळ । मिथुनसृष्टी तेथोनि पुष्कळ । हेही कल्पना ईश्वराची. ॥ १२५१ ॥ मानस मनुशतरूपा मिथुन । मानस अन्न शुक्र शोणित मैथुन । शुक्रशोणितापासूनि तेथुन । मिथुनसृष्टि-कल्पना हेही मानस. ॥ १२५२ ॥ परि हे मिथुनसृष्टी । उपजतां दिसते जे जे दृष्टी । या सृष्टिवृद्धीस मूळ वृष्टी । पर्जन्याची. ॥ १२५३ ॥ देवांअधीन ते वृष्टी । ते आहुतिद्वारा पावोनि तुष्टी । वृष्टि करितां मिथुनसृष्टी । वृद्धि पावते यथाकाळें. ॥ १२५४ ॥ आणि संतानवृद्धीस हेतु पितर । यज्ञें तोषती ते पितर आणि सुर । त्यास साधन ओषधि म्हणोनि सर्वेश्वर । इतकेंही पूर्व-श्लोकीं बोलिला. ॥ १२५५ ॥ ते सृष्टिवृद्धि हेतुरचना । आपण आणि आपली कल्पना । म्हणोनि ऋतु यज्ञ स्वधा ओषधि मी अर्जुना! । मंत्र आज्य अग्नि हुत मीच ऐसें सूचवूनि बोलिला. ॥ १२५६ ॥ ऐसी देव पितर करितां वृष्टी । वाढली हे मिथुनसृष्टी । आणि मानस मनु शतरूपा[1] ब्रह्मा न दिसती दृष्टी । हे दृष्ट अदृष्ट मीच म्हणतो या श्लोकीं. ॥ १२५७ ॥

**पिताहमस्य जगतो माता धाता पितामहः ।**
**वेद्यं पवित्रमोंकार ऋक्साम यजुरेव च ॥ १७ ॥**

अगा! मीच या जगाचा पिता । मीच या जगाची माता । मीच पितामह ज्याचें नाम धाता । अर्जुना! जाण. ॥ १२५८ ॥ चौऱ्याशीं लक्ष योनी । जगीं वसती म्हणोनी । चौऱ्याशीं लक्ष योनि यावरूनी । जग म्हणावें. ॥ १२५९ ॥ त्या चौऱ्याशीं लक्ष योनी । मनुष्यदेहाची जोडी म्हणोनी । सर्वां मनुष्यांस जे मायबाप दोनी । तींचि मायबापें चौऱ्याशीं लक्ष योनींचीं. ॥ १२६० ॥ **'कर्मानुबंधीनि मनुष्यलोके'** म्हणोनी । पंचदशीं या श्लोकचरणें करूनी । कर्मबंध या मनुष्यदेहींच यावरूनी । सर्वयोनिकर्मे मनुष्यदेहाचीं. ॥ १२६१ ॥ मनुष्यमात्राचा उपज । मनूपासूनि

---

१. मनूची बायको.

म्हणती मनुज । माता शतरूपा पिता मनु तेव्हां सहज । पितामह धाता ब्रह्मा सकळांचा. ॥ १२६२ ॥ बाप आपल्या बापाचा । पितामह तोचि ज्या त्या मानवाचा । ऐसें असोनि कां वेदवाचा । लोकपितामह म्हणे ब्रह्मयातें? ॥ १२६३ ॥ मनु मनुष्यजातीचा पिता । शतरूपा सकळ मनुजांची माता । पिता त्या पित्याचा स्वयंभु धाता । स्वायंभुव मनु नाम त्याचें. ॥ १२६४ ॥ पद्मनाभ विष्णु स्वयें ब्रह्मा जाला । म्हणोनि स्वयंभु म्हणावें ब्रह्मयाला । ब्रह्म-रूपें मनें कल्पिलें आपणाला । तो स्वयंभु मनें कल्पी मनूतें. ॥ १२६५ ॥ स्वायंभुव मनुजजातीचा पिता । त्या जातीचा पितामह स्वयंभु ब्रह्मा तत्त्वता । म्हणोनि आजा पितामह विधाता । सकळा जगाचाही. ॥ १२६६ ॥ कीं चौ-ऱ्याशीं लक्ष योनी । मनुष्य स्वकर्मे होतो म्हणोनी । जगाचा पितामह आजा यावरूनी । ब्रह्मा पिता मनुजजातीच्या बापाचा. ॥ १२६७ ॥ एवं ब्रह्मा मनु जैसी मनाची कल्पना । तैसीच मिथुनसृष्टिरचना । ऐसें सूचवूनी अर्जुना । जगद्गुरु श्रीकृष्ण बोले. ॥ १२६८ ॥ कीं ओषधशब्दें ओषधि अन्नें । आप-णचि आणि ऋतु यज्ञ त्यांचीं वृष्ट्यादि साधनें । आपणचि तेव्हां त्या अन्नापा-सूनि उत्पन्नें । तींही भूतें आपण हा भाव. ॥ १२६९ ॥ कीं हीं भूतें मानसा अन्नापासुनी । आणि मानसा मनुमरीच्यादिकांपासूनि म्हणोनी । हींही मान-साचीं जाण यावरूनी । ऐसें येथें सूचवी. ॥ १२७० ॥ मिथुनसृष्टीस कारण । ते मानसच अवघे मनु ऋषिगण । त्यांचें संतान जग ऐसी स्पष्टही खूण । विभू-तिअध्यायांत बोलेल या श्लोकीं. ॥ १२७१ ॥

दशमाध्यायश्लोक—**महर्षयः सप्त पूर्वे चत्वारो मनवस्तथा ।**
**मद्भावा मानसा जाता येषां लोक इमाः प्रजाः ॥**

सप्तऋषी भृग्वादिक । त्यांहूनि पूर्वी चौघे सनकादिक । आणि मनु अगा! ज्याच्या संततीनें लोक । भरले चतुर्दशाही. ॥ १२७२ ॥ एवं आजा बाप माय अन्नें । ज्यांपासूनि भूतें सर्वही उत्पन्नें । हीं सर्व मानसें तैसींच मनें । हीं भूतें कल्पिलीं हा भाव. ॥ १२७३ ॥ मनें कल्पिलीं मिथुनें । मनेंचि कल्पिलीं त्यांचीं मैथुनें । मनें गर्भ मनें संतानें । भलताही कल्पील. ॥ १२७४ ॥ परि क्षणिक भलतियाची कल्पना । अमोघ ईश्वरकल्पनेची रचना । एवं चतुर्दश

---

१. मरीचि, अत्रि, अंगिरस, पुलस्त्य, पुलह, क्रतु आणि वसिष्ठ. २. भूर्लोक, भुवर्लोक, स्वर्लोक, महर्लोक, जनोलोक, तपोलोक आणि सत्यलोक हे वरचे सप्तलोक आहेत. अतल, वितल, सुतल, रसातल, तलातल, महातल आणि पाताल हे खालचे सप्तलोक आहेत.

लोक देह नाना । कल्पना सर्व भगवंताची. ॥ १२७५ ॥ पिता माता अन्नें माझी कल्पना । म्हणोनि त्या त्या वेषें मीच आहें अर्जुना ! । तैसीच चराचराची रचना । माझी कल्पना मीच हा अर्थ. ॥ १२७६ ॥ **'ममात्मा भूतभावनः'** म्हणोनी । राजविद्याप्रकरणीं बोलिला त्यावरूनी । विश्व कल्पितो बुद्धीकरूनी । बुद्धि कल्पिते म्हणे या भाव. ॥ १२७७ ॥ सर्वही भूतरचना । माझे उपाधीची कल्पना । तिचें अधिष्ठान मी चित्स्वरूप अर्जुना ! । तेव्हां विश्व मीच हें कृष्णरूप मी जैसा. ॥१२७८॥ म्हणोनि उत्तरार्धीं जगत्स्वामी । आदीच म्हणतो कीं वेद्य[1] मी । म्हणजे जडीं पटीं स्थावरजंगमीं । वेद्य मी तंतु चित्स्वरूप.॥१२७९॥ तेव्हां चराचराची रचना । मजमाजीं माझ्या मायेची कल्पना । जाणावें तें इतकेंचि अर्जुना ! । वेद्य म्हणजे तें जें जाणावें. ॥ १२८० ॥ चित्स्वरूप सुवर्णमात्र । चराचर अलंकार हें विचित्र । वेद्य जें परम पवित्र । तें उपादान सर्व जाणणें इतकेंचि. ॥ १२८१ ॥ अविद्यानिर्मित विचित्र । जडभास अवघा अपवित्र । वेद्य त्या मिथ्या सर्पीं पवित्र । हार दिव्य सुमनाचा. ॥ १२८२ ॥ दृष्टि आदीं शिवे हार । तेव्हां देखे भुजंगाकार । चराचर प्रपंच सार । प्रतीतिगोचर मजकरितां. ॥ १२८३ ॥ तेव्हां हार दिसे तोचि असे । सर्प नाहीं जरी भासे । एवं वेद्य आत्माचि गवसे । प्रपंच नाहींच तो कैंचा. ॥ १२८४ ॥ पवित्र ऐसें तें मी गोविंद । त्यास साधन चारीही वेद । ऋग्वेद यजुर्वेद सामवेद । अथर्वण संग्रह तिहींचा. ॥ १२८५ ॥ त्यांत श्रेष्ठ ओंकार । तो मीच वर्णरूप सर्वेश्वर । कीं सृष्टि स्थिति संहार । त्रिमूर्तिप्रतिपाद्य ओंकारीं. ॥ १२८६ ॥ ऐसी मानस आणि मिथुनसृष्टी । दोहींकडे मानसकल्पनारूप दृष्टी । अर्जुना ! देऊनि पाहें ऐशा गोष्टी । विश्वतोमुख उपासनाप्रसंगें येथवरी बोलिला. ॥ १२८७ ॥ हीं भूतें जडें यांत जीव । तेही मीच अंशरूपें स्वयमेव । परि ते अविद्येनें युक्त सर्व । नेणती रहस्य ऐसें. ॥ १२८८ ॥ त्यांस कर्मानुरूप फळ । तीं फळें फळदाता मीच सकळ । या प्रसंगें ईश्वरत्व घननीळ । आणि सर्वात्मत्वही वदतो या श्लोकापासुनी. ॥ १२८९ ॥

**गतिर्भर्ता प्रभुः साक्षी निवासः शरणं सुहृत् ।**

अगा ! जग मी स्वयें जगत्पती । तेव्हां मीच सर्वां जीवांची गती । बहुविधा गति परंतु रीती । तिनीच सर्वां गतींच्या. ॥ १२९० ॥ एक मुक्ति अपुनरावृत्ति । स्वर्गादि लोक पुनरावृत्ती । तिसरी चराचररूपें उत्पत्ती । सर्व मीच

---

१. जाणतां येतो असा.

तेव्हां मीच गति सर्वांची. ॥ १२९१ ॥ ज्ञानें मुक्ति कर्मे गती । परि देणार मीच जगत्पती । म्हणोनि मीच मायाधिपती । भर्ता धनी सर्वांचा. ॥१२९२॥ जो जयांचा पालनकर्ता । तो म्हणावा त्याचा भर्ता । पुढिलिये श्लोकीं विश्वभर्ता । भर्तृपणही बोलेल. ॥ १२९३ ॥ म्हणसी तूं विश्व अंश तुझे जीव । कर्मेंकरून गतिही स्वयमेव । तेच कां न पावती तूं देव । कां देसी गति तयांतें? ॥ १२९४ ॥ तरी मी प्रभु समर्थ भगवंत । ते अविद्येनें बद्ध असमर्थ अत्यंत । आणि जें करिती तें मी साक्षी अनंत । जाणतों कर्मे तयांचीं. ॥ १२९५ ॥ समर्थ आणि साक्षीपण । म्हणोनि गतिदायकही मी आपण । तूं कां पाहतोस जीवांचें आचरण । म्हणोनि म्हणसी तरी मी निवासचि त्या सर्वांचा. ॥ १२९६ ॥ साक्षित्व माझा सहज गुण । आणि ते मजमाजीं वसती जीवगण । त्या साक्षित्वीं समर्थपण । फळ द्यावयाचें अनादी.॥१२९७॥ साक्षित्व प्रभुत्व हे दोनी । उपाधि अनादि माझे म्हणोनी । गतिप्रदत्व त्या दों गुणेंकरूनी । ईश्वरत्वीं लागलें. ॥ १२९८ ॥ आतां कर्मानुरूप फळ । तरी तुज कां भजती विवेकी सकळ । म्हणोनि म्हणसी म्हणे मेघनीळ । तरी मी शरणरक्षक शरणागतांचा. ॥ १२९९ ॥ जे मज रक्ष म्हणती । त्यांस देतों मी निज गती । मृत्युकाळापासुनी मी श्रीपती । रक्षितों सहज कल्पवृक्षस्वभाव. ॥१३००॥ आतां कल्पवृक्ष अज्ञ । तूं करुणासमुद्र सर्वज्ञ । शरण न येती त्यांसही कां न करिसी अभिज्ञ । कीं शरण या मातें म्हणोनी? ॥१३०१॥ न मागतां नेदी कल्पवृक्ष । शरण न येतां न रक्षिसी तूं अंबुजाक्ष । हा सहज गुण तुझा वर्णिती दक्ष । परि दयाळू सर्वही तुज म्हणती. ॥ १३०२ ॥ जरी आपणास ते येती शरण । यास कांहीं न रचिसी कारण । तरी तूं सुहृद् भूतांचा आपण । दुर्हृद्[1] न होसी यास्तव. ॥ १३०३ ॥ ऐसें म्हणेल पार्थ । म्हणोनि म्हणतो समर्थ । कीं मी सुहृत्सख यथार्थ । दुर्हृद् नव्हे कोणाचा. ॥ १३०४ ॥ वेद शास्त्र पुराणें अवतार । प्रगट करोनि वारंवार । शरण आले त्यांचा केला उद्धार । व्यासरूपें चरित्रें तीं कथिलीं. ॥ १३०५ ॥ कीं पुराणांचें करावें श्रवण । आणि मज यावें शरण । मग म्यां वेदांतरहस्य विवरण । गुरुरूपें करावें तयांतें. ॥ १३०६ ॥ म्हणोनि मीच भगवंत । व्यासरूपें वेदांताचा सिद्धांत । ब्रह्मसूत्ररूपें बोलिलों तो वेदांत । तारक जनां सर्वांचा. ॥ १३०७ ॥ पंचदशाध्यायांत म्हणोनी । 'वेदांतकृद्वेदविदेव चाहं' या श्लोकें करोनी । व्यास मीच म्हणेल यावरोनी । सुहृत्सखा सर्वां भूतांचा. ॥ १३०८ ॥ मज

---

१. शत्रु.

शरण यावें म्हणोनी । पुराणें केलीं चरित्रें करोनी । निर्दयत्व दोष या गोष्टीवरोनी । गेला माझा. ॥१३०९॥ राजा अन्नसत्र निर्माण । न करितां गेले क्षुधेनें प्राण । तरी त्यांच्या हत्येचें कारण । राजा होतो. ॥ १३१० ॥ तो अन्नसत्र करी। त्यांत न जेविती एक दोघे जरी । आणि मरती क्षुधेनें तरी । काय करावें राजानें? ॥ १३११ ॥ तैसे आत्मघातक नर । जरी पुराणश्रवणीं न होती तत्पर । निर्दय न म्हणावा सर्वेश्वर । तो सुहृद् सखाच सर्वांचा. ॥ १३१२ ॥ आतां बुद्धि प्रेरूनि ते नर । करावे श्रवणतत्पर । तरी सर्वसम सर्वेश्वर । सर्वांस त्याणें तारावें. ॥ १३१३ ॥ मोक्ष सकळांस द्यावा । तरी नाश होणार स्ववैभवा । स्वस्वरूप स्ववैभव देवाधिदेवा । न नाशवे सर्वथा कीं तें अभंग. ॥ १३१४ ॥ कीं जरी नासे ब्रह्म । तरी नव्हे प्रपंचाचा उगम । जीवांवांचूनि हें स्थावर जंगम । उपजेल कां? ॥ १३१५ ॥ न उपजतां जग । ईश्वरवैभवाचा भंग । जीव सर्व मुक्ति पावती मग । जग हें कोणा कारणें? ॥ १३१६॥ न उपजे विश्वद्रुम । जरी नासे याचें बीज निर्गुणब्रह्म । तें अव्यय बीज परम। सृष्टिस्थितिसंहाररूप वृक्षाचें. ॥ १३१७ ॥ जें बीज तो वृक्ष हे प्रसिद्ध । म्हणोनि सुहृद्पण आपलें सिद्ध । करावया बोलतो उत्तरार्ध । या श्लोकाचें. ॥ १३१८ ॥

**प्रभवः प्रलयः स्थानं निधानं बीजमव्ययम् ॥ १८ ॥**

प्रकर्षें पुनः पुनः उद्भव । तो प्रपंचाचा म्हणावा प्रभव । तो मीच कीं बीजचि संभव । म्हणावा वृक्षाचा. ॥ १३१९ ॥ तैसाच पुनः पुनः प्रकर्षें लय। त्यास म्हणावें प्रलय। तो प्रलयही मीच कीं स्वकल्पनामय। मीच होतों तो लय पावलों स्वस्वरूपीं. ॥१३२०॥ किरणचि जेव्हां मृगतोय । तेव्हां किरणचि त्याचा उद्भव लय । किरणचि म्हणोनि निश्चय । मनुष्यदृष्टि स्थितिकाळीं. ॥ १३२१ ॥ म्हणोनि स्थान म्हणिजे स्थिति । तेंही मीच म्हणे श्रीपती । कीं किरण बीजच स्वयें जे रीती । मृगजळरूपें भासते. ॥ १३२२ ॥ किरणेंचि उत्पत्ति स्थिति लय । मृगजळरूपें पावोनि स्वयें अव्यय । प्रतिदिनीं होय जाय । सृष्टि स्थिति संहार मृगजळाचा ये रीती. ॥ १३२३ ॥ बीज होऊनि अव्यय । बीज होऊनि अद्वय । मृगजळ उपजोनिही न घडे व्यय । किरणाचा इतरा बीजासारिखा. ॥ १३२४ ॥ उगेंचि मृगजळाचें बीज। किरण म्हणतां होतो उपज । इतरा बीजाचें नासे रूप निज। हें यथास्थित तेज सूर्याचें. ॥ १३२५ ॥ बीजनाशें होतां अंकुर । तेज शाश्वत होतांही मृगनीर।

म्हणोनि मृगजळाचें निधान म्हणती चतुर । प्रकाशास सूर्याच्या. ॥ १३२६॥ जैसा घट जळाचें निधान । निधान म्हणजे ज्यांत ज्याचें स्थापन । तरी घटांत घालावें टाकावें जीवन । घट तों न नासे बीजासारिखा. ॥ १३२७ ॥ परि घटा जळा ऐक्य न घडे । आणि घट बीजत्वें न सांपडे । ज्या दृष्टांतीं साम्य पडे । इतकेंही तो मृगजळ किरणांचा. ॥ १३२८ ॥ मृगजळ जैसें किरणीं । उत्पत्ति लय पावे मृषा[1] पाणी । नाश न पावे कोणे क्षणीं । म्हणोनि जैसें किरण निधान मृगजळाचें. ॥ १३२९ ॥ परि घटांतूनि न निघतांही पाणी । प्रतीतीस ये तैसें किरणीं । प्रलया न ये लयानंतरक्षणीं । नाहीं म्हणावें तरी उदय पावे तें. ॥ १३३० ॥ असोनि नये प्रलया । तेव्हां निधान केंवी म्हणावें तया । तेव्हां मृगांबुबीजचि म्हणावया । योग्य होय किरण तें.॥१३३१॥ कीं बीजांत वृक्षाचा प्रलय । नसोनिही वृक्ष असे हा निश्चय । प्रलय नये तरी मृगांबूदय । किरणीं होणार बीज यालागीं. ॥ १३३२ ॥ तरी अंकुर होतां नासे बीज । न दिसे त्याचें रूप निज । किरण जळभासाहूनि पूर्वी होतें सहज। तैसें मृगजळ उपजतां. ॥ १३३३ ॥ नव्हे निधान एका विचारें । नव्हे बीज एका प्रकारें । निधानही होय बीजही होय निर्धारें । त्याच्या एक एका गुणाच्या. ॥ १३३४ ॥ प्रलया नये परि असे । किरणीं जेव्हां जळभास न दिसे। कीं प्रगट होतां दृष्टीस गवसे । यास्तव किरण निधान मृगजळाचें.॥ १३३५॥ आणि बीजवृक्षन्यायें किरणापासुनी । मृगजळ उपजे यावरूनी । किरण बीज होय परि न नासती म्हणोनी । बीज अव्यय ऐसें म्हणावें. ॥ १३३६ ॥ सुचे इत्यादि निर्णय । ऐसें वचन बोले करुणालय । कीं निधान बीज अव्यय । मी या जगाचें अर्जुना! ॥ १३३७ ॥ कीं मजमाजी लय पावोनी । प्रपंच निघे मजपासुनी । याचें निधान मी म्हणोनी । म्हणतों यास्तव. ॥ १३३८ ॥ कीं पेटींत धन रिघतां न दिसे । दिसे जेव्हां त्या पेटींतूनि तें निघतसे । जे चतुर देखती ऐसे । ते पेटी म्हणती निधान त्या धनाचें. ॥ १३३९ ॥ तैसा मजमाजीं लय । मजपासूनि या जगाचा उदय । तेव्हां निधान मी अद्वय । या जगाचा होय कीं. ॥ १३४० ॥ परि जालिया जगाचा लय । जों न होय मायेचा उदय । तोंवरी जगाचा नसे प्रलय । किरणीं मध्यान्ह टळतां जैसा मृगजळाचा. ॥ १३४१ ॥ तेव्हां प्रलय नसोनी । उपजे मागुती मजपासुनी । प्रलय नसोनि बीजामधूनी । वृक्ष निघे जे रीती.॥ १३४२ ॥ म्हणोनी

---

[1] खोटें

मी अद्वय । बीज प्रपंचाचें जगन्मय । परि इतर बीज नासे मी अव्यय । नाश-रहित बीज या जगाचें. ॥ १३४३ ॥ एवं बीज आणि निधान । जगाचा लय आणि उदयाचें स्थान । आणि नव्हे अन्या निधाना बीजासमान । अव्यय निधान अव्यय बीज. ॥ १३४४ ॥ इतर बीजही नाशरहित । कीं फळीं प्रगटे निश्चित । परि सद्य असे नाश पावत । तैसें नव्हे बीज प्रपंचाचें. ॥१३४५ ॥ आणि इतर बीज नासे विटे । तरी अंकुर होणें पुनः खुंटे । प्रपंचबीज न विटे न फुटे । न खुंटे उद्भव प्रपंचाचा. ॥ १३४६ ॥ बीज नासे जयाचें । उप-जणें खुंटे तयाचें । तेव्हां सृष्टि स्थिति संहार होणें जगाचें । न चुके कदापी. ॥ १३४७ ॥ समर्थ ईश्वर तथापी । ऐसें न करूं शके कदापी । कीं प्रपंच आपल्या स्वरूपीं । न उपजे हा भाव या अर्धें[1] सूचवी. ॥ १३४८ ॥ प्रपंच जीवमूळ । ते मुक्ति पावतां सकळ । कां उपजे प्रपंच माया मृगजळ । आणि तो तों सर्वथा उपजणार. ॥ १३४९ ॥ कीं बीज त्याचें अव्यय । बीज तो अंकुर हा निश्चय । याकारणें न मागतां करुणालय । मुक्ति नेदी सर्वा जीवांसी. ॥ १३५० ॥ एवं अनादि जैसे जीव । अनादि जैसा देवाधिदेव । तैसें न मागतां मुक्ति नेदी तो स्वयमेव । हेंही अनादि. ॥ १३५१ ॥ मुक्त करावे सकळ । ऐसें सर्वांवरी कृपाजळ । सर्वदा वर्षे मेघनीळ । परि पालथे घट जनाचिया मुमुक्षेचे. ॥ १३५२ ॥ आतां ईश्वरें शक्तीकरूनी । मुमुक्षा त्यांस उपजवूनी । मोक्ष द्यावा तरी कोणास सोडोनी । कोणास द्यावा ? ॥ १३५३ ॥ सर्वांस द्यावा जरी । प्रपंचचि नव्हे त्या उपरी । तो प्रवाह खुंटे तरी । कीं बीज नासे जरी त्याचें. ॥ १३५४ ॥ म्हणोनि मोक्षाची अपेक्षा । ते अपेक्षा म्हणावी मुमुक्षा । तीवांचूनि कोणी न पावे मोक्षा । अनादि सहज निर्वाह हा ऐसा. ॥ १३५५ ॥ आणि दयावृष्टि सर्वांवरी सम । वर्षे अनादि सहज गुण सर्वोत्तम । मेघजळेंचि मोतीं उत्तम । विषयलता[2] वाढे जळें घनाचिया.॥१३५६॥ मुक्त्यपेक्षा म्हणावी मुमुक्षा । विषयभोगापेक्षा म्हणावी बुभुक्षा । फळ दे ईश्वर जैसी अपेक्षा । इतकेंचि सहज अनादि कृपाळुत्व ईश्वराचें. ॥ १३५७ ॥ हो सकळांचें कल्याण । म्हणोनि अवतार वेद शास्त्र पुराण । करोनि तरणोपाय निर्माण । सुहृत्[3] सर्वांचा अपेक्षा मात्र सर्वांची पुरवितो. ॥ १३५८ ॥ या भावें सुहृद् आपण । म्हणे पूर्वार्धेंकरून । सर्वांस मोक्ष कां नेदी तरी आपण । अव्यय बीज प्रपंचाचें म्हणे उत्तरार्धीं. ॥ १३५९ ॥ होणें न चुके प्रपंचवृक्षा । म्ह-णोनि मोक्ष नसे विना मुमुक्षा । भजतां पुरवणें ज्याची जैसी अपेक्षा । सहज

१. श्लोकार्धानें. २. विषयाची वेल. ३. सर्वांचा सखा; मित्र.

दयाळुत्व इतकेंचि ईश्वराचें. ॥ १३६० ॥ एवं आपण सुहृद सर्वांचा । हा शब्द उत्तरार्धें केला साचा । आतां यापुढें वाचा । सुहृदपणविवरणाची. ॥ १३६१ ॥ कीं पार्थ म्हणेल जी यदुपती! । जे तुझीं पुराणें न जाणती । त्यांस कृपाळू तूं कोणे रीती । सुहृदपण दाविसील आपलें? ॥ १३६२ ॥ आणि तुमचा सुहृत्सखा भर्ता । तुम्हां सकळांचा पालनादिकर्ता । मी आहें ऐसी वार्ता । केंवी विदित करिसी तयांसी? ॥ १३६३ ॥ याकारणें यापुढें श्लोक । बोलों पाहे तो उत्तमश्लोक । कीं जे वेदशास्त्रपुराणविमुख लोक । त्यांस पाळितों आणि प्रगट करितों ईश्वरत्वेंही. ॥ १३६४ ॥ भाव कळे ये रीतीचा । आणि सर्वात्मभाव आपला समजे साचा । अर्जुनातें ऐसी वाचा । बोलतसे या श्लोकीं. ॥ १३६५ ॥

**तपाम्यहमहं वर्षं निगृह्णाम्युत्सृजामि च ।**

अर्जुना! मी पर्जन्यवृष्टी । करितों तेंव्हां सर्व सृष्टी । सकळ भोग भोगिजे या दृष्टी । इहलोकीं विषय दिसती. ॥ १३६६ ॥ सकाम वेदशास्त्र पुराणें । ऐकोनि जे यजिती स्वर्गादिफळाकारणें । उरले ते इहलोकविषयचर्वणें । कृतकृत्य होती. ॥ १३६७ ॥ तरी मी सुहृत् सखा भर्ता । अपेक्षानुरूप सुखकर्ता । जे जाणती इहलोकमात्राची वार्ता । त्यांस वृष्टिद्वारा[1] सुख मीच करितसें. ॥ १३६८ ॥ कीं सूर्यकिरणद्वारा । मीच तपतों आणि मेघधारा । मीच वर्षतों त्या मज ईश्वरा । तर्कें समजती ते ऐसें मी करितों. ॥ १३६९ ॥ कीं किरणरूपें मी तपतों । मेघरूपें मी वर्षतों । मागुती वृष्टि ओढोनि धरितों । मागुती सोडितों वृष्टीतें. ॥ १३७० ॥ अगा! नित्य[2] सूर्याचा उदय अस्त । आणि नित्य मर्यादा न लंघिती सागर समस्त । इत्यादि माझें शासन ऐसें नेमस्त । लोक नेणती नियत[3] म्हणोनी. ॥ १३७१ ॥ नियत उदयास्त पावे दिनकर । नियत मर्यादा न लंघिती सागर । म्हणोनि यांचा नियंता ईश्वर । ऐसें कळेना जनातें. ॥ १३७२ ॥ वर्षाकाळीं नियत वृष्टी । असती आणि पिकती नियत सृष्टी । तरी न दिसे तें तर्काच्याही दृष्टी । ईश्वर एक आहे ऐसें जनातें. ॥ १३७३ ॥ हें कळावें जना । म्हणोनि वृष्टि अवरितों अर्जुना! । तेंव्हां मज जगज्जीवना । स्मरती लोक. ॥१३७४॥ कोण उपजवी घन? । कोण वर्षवी जीवन? । जरी नसे जगज्जीवन । विश्वंभर भर्ता जगाचा. ॥ १३७५ ॥ आकाश तुसतें

---

१. पाऊस पाडून. २. ज्याच्या नियमाचा कधींही भंग होत नाहीं असा. ३. नेहमीं घडून येणारें.

पोकळ । तेथें मेघ येती सजळ । त्या जळें जीवित्व सफळ । हें कर्तृत्व ईश्वराचें जन म्हणे. ॥ १३७६ ॥ शास्त्रें पुराणें नेणती । सुहृत्पण ऐसें त्यांहीप्रती। दावितो आणि तर्कें मज समजती । ऐशा प्रकारें वर्षतो. ॥ १३७७ ॥ ते इहलोकसुखचि इच्छिती । मी तितकेंचि देतों त्यांप्रती । परि अर्जुना! तुझी मती । एक विषमत्व येथें मजवरी स्थापील. ॥ १३७८ ॥ कीं सुहृत् सर्वांचा सम । परि स्वयें भक्तांस लभ्य सर्वोत्तम । इतरांस अन्नादि मात्र देतां विषम । कैसा नव्हे? ॥ १३७९ ॥ ऐसें म्हणसी म्हणोनि भाव । दावी परिहार याचा बोलतां देव । कीं विषम नसोनि देवाधिदेव। विषम फळ मी देतसें.॥१३८०॥ मीच मुक्तांची मुक्ती । मीच विषयासक्तांची भुक्ती । वैषम्यपरिहारयुक्ती । ऐसी बोलतो या उत्तरार्धें. ॥ १३८१ ॥

**अमृतं चैव मृत्युश्च सदसच्चाहमर्जुन ॥ १९ ॥**

अमृत मीच साच । आणि मृत्युही मीच । अप्रपंच[1] प्रपंच । सर्वेही मी. ॥ १३८२ ॥ कीं भक्तांस अमृत । अभक्तांस मृत्यु निश्चित । दोन्ही दोनी मीच भगवंत । कीं सत् बरें असत् वाईट सर्वेही मीच. ॥ १३८३ ॥ सुस्थळास मार्ग नीट । कुस्थळास आड वाट । परि वाट आणि स्थळें दोनी निपट । भूमीच ते. ॥ १३८४ ॥ त्या दोहींसही सम । भूमि सर्वथा नव्हे विषम । त्यांच्या करणीनें उत्तमाधम । फळें ते पावती. ॥ १३८५ ॥ मीच मोक्ष अमृत । जे मुमुक्षु पावती निश्चित । मृत्युही मीच भगवंत । बुभुक्षु विषयासक्त पावती. ॥ १३८६ ॥ याकारणें बरें वाईट । दोनीही मीच निपट । एकचि तंतु एकचि पट । राजहंस कावळे विणले तंतूच तो. ॥ १३८७ ॥ अमृत मृत्यु मी जेव्हां केवळ । तेव्हां मीच भक्तां अभक्तांचें फळ । म्हणोनियां अर्धें[2] मेघनीळ । ऐसें बोलिला. ॥ १३८८ ॥ ते अपेक्षानुरूप फळ पावती । हे सूचना संज्ञारूपें अर्जुनाप्रती । येथवरी बोलिला आतां जगत्पती । स्पष्ट बोलतो येथुनी. ॥ १३८९ ॥ परि अमृत मुमुक्षु इच्छिती । तें उचित देणें त्यांप्रती । मृत्यु तों कोणी न मागती । तो मृत्यु सकामास कां देतसे? ॥ १३९० ॥ अर्जुन ये रीती मनीं । शंका मानील म्हणोनी । अपथ्य पथ्य इच्छितां दोहीं करूनी । रोग आरोग्य पावती न मागतां. ॥ १३९१ ॥ आणि आरोग्याची अपेक्षा । तैसी मुमुक्षूची मुमुक्षा । पथ्यें आरोग्यबोधें मोक्षा । मुमुक्षु पावती अमृत तें. ॥ १३९२ ॥ तैसी त्यांस मृत्यूची अपेक्षा । नसे जे

१. परमार्थ. २. श्लोकार्धानें.

झोंबती सकामपक्षा । म्हणोनि मुमुक्षु फळसाम्य अंबुजाक्षा । बोलतां नये सकाम फळ मृत्यूतें. ॥ १३९३ ॥ कीं ते अमृत इच्छिती । हे कांहीं मृत्यूतें न मागती । अमृत मृत्यु दोनी गती । अपेक्षानुरूप हे रीती घडेना. ॥ १३९४ ॥ आतां अपथ्य रोगाचें मूळ । आणि आरोग्य पथ्याचें फळ । मृत्यु सकाम पावती सकळ । अमृत पावती स्वभक्त. ॥ १३९५ ॥ याप्रकारें मी सम । फळ देतांही अधम उत्तम । परंतु इच्छा पाहतां विषम । कीं न इच्छितां मृत्यु देतसें. ॥ १३९६ ॥ मोक्ष इच्छेवांचूनि नसे । मृत्यु इच्छेवांचूनि दिसे । तरी याही वैषम्यास असे । परिहार कांहीं. ॥ १३९७ ॥ भक्तीवांचूनि मुक्तीही भक्त । न अपेक्षिती तथापि होतीच मुक्त । याच्या साम्यें युक्त । मृत्यु न इच्छितां मृत्यु बोलणें सकामातें. ॥ १३९८ ॥ न इच्छितां मृत्यु त्यांला । न इच्छितां अमृत यांला । अपथ्य पथ्य सेवी तयां उभयांला । रोग आरोग्य न मागतांही. ॥ १३९९ ॥ म्हणोनि जे सकाम । त्यांस पुनः पुनः मृत्यु म्हणोनि मेघश्याम । आदीं बोलतो विश्वाभिराम । या दों श्लोकीं. ॥ १४०० ॥

**त्रैविद्या मां सोमपाः पूतपापा यज्ञैरिष्ट्वा स्वर्गतिं प्रार्थयंते ।**
**ते पुण्यमासाद्य सुरेंद्रलोकमश्नंति दिव्यान्दिवि देवभोगान् ॥ २० ॥**
**ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशंति ।**
**एवं त्रयीधर्ममनुप्रपन्ना गतागतं कामकामा लभंते ॥ २१ ॥**

वेदविद्या अवघिया तीनी । ऋग्वेद यजुर्वेद सामवेद म्हणोनी । तिहीं वेदमंत्रीं मातें यजूनी । प्रार्थिती स्वर्ग. ॥ १४०१ ॥ करूनि सोमवल्लीरसपान । होती यज्ञें निष्पाप पावन । इंद्रादिरूपें मी जगज्जीवन । त्या मातें अग्निमुखें ते यजिती. ॥ १४०२ ॥ स्वर्ग परम पुण्यलोक । पुण्येंच पावती पुण्यश्लोक । यज्ञ करूनि ते याज्ञिक । त्या स्वर्गास पावती. ॥ १४०३ ॥ पुण्यें सुरेंद्रलोक तो स्वर्ग । त्यातें पावोनि देवांचे दिव्य भोग । भोगिती ज्या भोगाचा भोगयोग । घडे परम पुण्यें करोनी. ॥ १४०४ ॥ तो स्वर्गलोक विशाळ । भोगोनि ते नियतकाळ । तें पुण्य सरतां तत्काळ । मृत्युलोकीं गर्भवासीं प्रवेशती. ॥ १४०५ ॥ ऐसे वेदत्रयाचे धर्म । त्यांतें शरण तेचि करिती काम्य कर्म । ते न जाणती आत्मा ब्रह्म । जाणें येणेंचि[१] ते पावती. ॥ १४०६ ॥ हे इतर देवता यजिती । आणि मातें यजिती म्हणे श्रीपती । त्यांची ही दैवी प्रकृती । ऐसें सूचवी. ॥ १४०७ ॥ कीं स्वर्ग सर्वदेवतारूपें ईश्वर । स्वयमेव

१. मृत्यु. २. पुनर्जन्म.

यज्ञभोक्ता फलदाता परात्पर। ऐसें जाणोनिही विषयतत्पर। म्हणोनि काम्यें इतर देवता यजिती. ॥ १४०८ ॥ ज्यांचा ऐसा नाहीं भाव। यजिती स्वतंत्र मानूनि देव। ते सकळ असुरस्वभाव। नरकास जाती ऐसें स्पष्ट षोडशीं बोलेल. ॥ १४०९ ॥ यालागीं स्वर्ग उत्तमा गती। हे निष्पाप सोमपानीं म्हणे श्रीपती। आतां मृत्युलोकास मागुती येती। हा सहज गुण काम्यकर्माचा. ॥ १४१० ॥ एवं कर्म स्वर्गाकारणें करूनी। मृत्युलोकास पावती पुन्हा म्हणोनी। अपथ्य भक्षितां रोग यावरूनी। काम्य इच्छितां मृत्यु हें सूचवी. ॥ १४११ ॥ आतां गोड म्हणोनीच अमृत। सेविती परि तें अमृत निश्चित। अमर करीच गुण हा नियत। अमृताचा. ॥ १४१२ ॥ भक्त माझे ये रीती। केवळ गोडच मी म्हणोनि भजती। कांहींच मज न मागती। परि माझा सहज गुण मी करितों. ॥ १४१३ ॥ जैसें न इच्छितां सकाम पावती मरण। कीं काम्य उपासनेचा सहज गुण। तैसें भक्तांचें सकळ कल्याण। न इच्छितां करावें गुण माझा. ॥ १४१४ ॥ म्हणोनि वर्णोनि आधीं सकाम। आतां मोक्षाविषयीं निष्काम। ते स्वभक्त सगुण मेघश्याम। बोलतसे या श्लोकीं. १४१५

**अनन्याश्चिंतयंतो मां ये जनाः पर्युपासते।**
**तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥ २२ ॥**

अगा अर्जुना! जे अनन्य। म्हणजे मजवेगळें नलगे ज्यांस अन्य। कीं शाश्वत मोक्षही न इच्छिती ते धन्य। तेव्हां नश्वर[1] पदार्थ इच्छिती ते काय? ॥ १४१६ ॥ माझे चरण लागतां गोड। ज्यांची मुमुक्षाही जाली रोड। माझ्या चिंतनाचेंचि कोडें[2]। सर्वदा जयांसी. ॥ १४१७ ॥ ज्यांस ऐसें माझें भजन। मज वेगळें कांहीं न इच्छिती जे जन। परि मी सकळ सुखदाता भवभंजन। योगक्षेम वाहतों तयांचा. ॥ १४१८ ॥ अर्जुना! ऐसे माझे भक्त। ते म्हणावे नित्याभियुक्त। सर्वदा सर्वभावें युक्त। नित्याभियुक्त ते म्हणावे. ॥ १४१९ ॥ माय बाप गुरु दैवत। भुक्ति मुक्ति मीच भगवंत। वाटतो मजविरहित। मुक्तीही नलगे जयांला. ॥ १४२० ॥ मुमुक्षु कैवल्यातें अपेक्षिती। हे त्यातेंही उपेक्षिती। स्वार्थ भक्तीचा लक्षिती। कैवल्यांत कैंचा तो स्वार्थ? ॥ १४२१ ॥ माझेंचि त्यांला प्रेम। अन्य कांहींच नलगे हा नेम। मज अगत्य त्यांचा योगक्षेम। सर्वविषयीं वाहणें. ॥ १४२२ ॥ अगा! करोनि पुण्याच्या कोटी। उपजावें भाग्यवंताच्या पोटीं। मग कोड

१. ज्याचा अवश्य नाश व्हावयाचा तो. २. कौतुक.

कौतुकासाठीं । प्रार्थणें नलगे तयातें. ॥ १४२३ ॥ पोटीं उपजतांच वाटे गोड । स्वभावेंच त्याचें पुरवी कोड । जतन करी जैसा तळहातींचा फोड । न प्रार्थितां. ॥ १४२४ ॥ गर्भ राहतां पोटीं । चिमणी त्या अंडियांसाठीं । तृण कापुसाची मृदु गोमटी । शेज करितां ते प्रार्थिती काय ? ॥ १४२५ ॥ सहज संतानाची माया । पोटासच यावें ते भोग घ्यावया । भक्तचि व्हावें धनंजया ! । मग दया मागणें लागेचना. ॥ १४२६ ॥ जरी त्यांस नाहीं कांहीं अपेक्षा । मज कोणे अंशीं त्यांची न करवे उपेक्षा । त्यांस नाहीं मुमुक्षा । परि मी कैसें गर्भवासी त्यां घालूं ? ॥ १४२७ ॥ सर्पास भीना बाळ । मुष्टि धरूं धांवे व्याळ । परंतु माता उचलोनि तत्काळ । तोंड ठेची सर्पाचें. ॥ १४२८ ॥ न मागतां देतों ज्ञान । न सांगतां नाशितों अज्ञान । न प्रार्थितां शाश्वतसुख निधान । मोक्ष देतों. ॥ १४२९ ॥ पूर्वी आपणास जें नव्हतें । आणि तें प्राप्त होतें । ऐसें प्राप्त होणें तयातें । योग म्हणती. ॥१४३०॥ कीं त्या अर्थाचा आणि आपला । प्राप्त होतां योग जाला । योग म्हणोनि त्याला । म्हणावें हा अर्थ 'योग'शब्दाचा. ॥ १४३१ ॥ भक्त सर्वत्र उदास । परि जे समयीं जें व्हावें त्यांस । तें मी पुरवीं जगन्निवास । योग वाहतों त्यांचा ये रीती. ॥ १४३२ ॥ आतां प्राप्त जालें जें नव्हतें । जतन करावें तयातें । म्हणावें त्या अर्थपरिपालनातें । क्षेम म्हणोनी. ॥ १४३३ ॥ एवं नाहीं जें जें तें देतों । याप्रकारें योग वाहतों । दिधलें तें मीच जतन करितों । क्षेम वाहतों ये रीती. ॥ १४३४ ॥ आंगडीं टोपी शिदोरी । बाळास पाहिजे जे जे परी । तें संपादूनि खांदियावरी । वाहे जतनही करी पिता जैसा. ॥ १४३५ ॥ माझ्या भक्तांतें अर्जुना ! । अपेक्षा मोक्षाचीही असेना । परि योगक्षेम मज त्यांचा कृपाघना । सहज स्वभावें वाहणें. ॥ १४३६ ॥ होऊनि गुरुरूपें प्रगट । आत्मसाक्षात्कार अतिउत्कट । देतों आणि तंतुरूपें जगपट । चराचर प्रतिमासहित मी दिसतों. ॥ १४३७ ॥ नव्हतें तें दिधलें ज्ञान । त्याणें हरिलें अनादि अज्ञान । योग वाहतों मी कृपानिधान । ये रीती तयांचा. ॥ १४३८ ॥ क्षेम त्याचें परिपालन । कीं तें ज्ञान बिंबोन होय जतन । तेंही मीच करुणाघन । वाहतों त्यांचें. ॥ १४३९ ॥ कीं पूर्वसंस्कारें त्यांची मती । क्षण पावतां स्वरूपाची विस्मृती । जागी करितों मी जगत्पती । स्वस्वरूपीं बुद्धीतें. ॥ १४४० ॥ अगा ! ते विसरती मातें । कीं पूर्वसंस्कार असे लागला त्यांतें । म्यां नित्यमुक्तें भगवंतें । विसरावें कैसें तयांला ? ॥ १४४१ ॥ समर्थासि दुर्बळ जन । जरी

कदन्न वाढी भोजन । न करी सभाग्य सधन । वाणी दिव्यान्नाची तयातें. ॥ १४४२ ॥ अगा! मी स्वयें जालों सर्व सृष्टी । तों पूर्वसंस्कारें जडत्वदृष्टी । क्षण पाहे तों मी वृष्टी । करितों करुणामृताची. ॥ १४४३ ॥ तेव्हां तंतु जैसा पटीं । कीं मृत्तिका मात्र जैसी घटीं । कीं सुवर्ण कटक कटिसूत्र मुगुटीं । पाहे जडीं ये रीती मातें एकत्वें. ॥ १४४४ ॥ त्यांस माझें प्रेम । मज त्याहूनि अधिक त्यांचें प्रेम हा नियम । नवल काय जरी योगक्षेम । वाहतों त्यांचे? ॥ १४४५ ॥ योगक्षेम वाहतों म्हणोनी । बोले या भावें करूनी । कीं नव्हतें तें ज्ञान देऊनी । बिंबवितों करितों जतन तें. ॥ १४४६ ॥ अन्नवस्त्रादि पदार्थ । यांचें योगक्षेम वाहतो इतकाच अर्थ । कोणी करिती, तरी गजांतलक्ष्मी देतो समर्थ । तो पादरक्षांची चिंता वाहतो म्हणणें हें काय? ॥ १४४७ ॥ लोटे अमृताची सरिता । अमर करी तत्त्वता । ते हरी तृषेची चिंता । म्हणणेंचि नलगे. ॥ १४४८ ॥ जो करून देतो विवाह । तो हळदीचा न करील काय निर्वाह? । ज्ञानें नाशी अवघा अज्ञानप्रवाह । अन्नवस्त्रादि नेदील तो काय? ॥ १४४९ ॥ ज्यास सर्वेश्वराचें प्रेम । तो त्याचें अन्नवस्त्र योगक्षेम । मी वाहतों म्हणोनि करितों म्हणे नियम । भुज उभारोनि दोहीं दळांत.॥१४५०॥ राजा तुष्टला दुर्बळावरी । तो त्याच्या लंगोटीवाकळांचा निर्वाह करी । आणि तें जतन करावयाचा मजवरी । भार असे ऐसें म्हणतसे. ॥ १४५१ ॥ कुटुंब-निर्वाह भक्तांचा । अथवा कुटुंबनिर्वाह अभक्तांचा । उभयत्रही रांधा पूर्वकर्माचा । संतुष्ट भक्त असंतुष्ट अभक्त इतकेंचि. ॥ १४५२ ॥ प्रारब्धें यावदायुष्य । सुखदुःख पावे भलता मनुष्य । याचें पाहोनि भविष्य । पूर्वींच निर्वाह केला ईश्वरें. ॥ १४५३ ॥ भक्त भजेल मातें । जें ज्याकाळीं पाहिजे तयातें । तें आदींच निर्मिलें भगवंतें । योगक्षेम वाहणें हा किती? ॥ १४५४ ॥ जें जे समयीं अपेक्षित । तें पूर्वींच करून राहिला भगवंत । प्रारब्धीं नसेल तेविषयीं अत्यंत । सहनशील करी तयांतें. ॥ १४५५ ॥ राज्य टाकूनि वनवास । राजे करिती तयांस । कां नेदी जगन्निवास । दिव्यान्नवस्त्र दिव्य शय्या? ॥१४५६॥ सर्वात्मभक्ति त्यांला अपेक्षित । त्या गोष्टीचा भार वाहतो भगवंत । आणि ज्याविण न चले अत्यंत । तें दे अथवा शक्ति दे. ॥ १४५७ ॥ देह न सोसी कदन्न । त्यांच्या प्रारब्धीं पूर्वींच निर्मी सदन्न । अथवा पर्ण भक्षूनि भक्तिसंपन्न । तैसेंच दृढ शरीर त्यांचें तो करी. ॥ १४५८ ॥ ज्ञान देऊनि योग वाहे । तें बिंबे ऐसें क्षेम वाहताहे । तो शरीर योगक्षेमही पाहे । कीं स्वच्छ शरीर तरी तें

ज्ञान बिंबतें. ॥ १४५९ ॥ भक्तांचें ओझें सकळ । वाहतो भक्तवत्सल । परि योगक्षेमशब्दें दृष्टफळ । इतकेंचि नव्हे. ॥ १४६० ॥ प्रस्तुत इतर देवतांचे सकाम । पावोनि स्वर्ग देवांचें धाम । पुनः मृत्युमुखीं पडती म्हणे मेघश्याम । आणि स्वभक्त योगक्षेम म्हणे मी वाहतों. ॥ १४६१ ॥ योगक्षेम या प्रकरणीं । ऐसा वर्णावा निपुणीं । कीं जन्ममरणवार्ताही श्रवणीं । पडों नेदी भक्तांचिया. ॥ १४६२ ॥ ज्या ज्ञानें खुंटे जन्ममरणप्रवाह । त्याचा योग आणि त्याचा क्षेमाचा निर्वाह । विझे अनादि तापत्रयाचा दाह । तेथें क्षुधा तृषा दाहशांति न घडे काय ? ॥ १४६३ ॥ एवं इतर देवता यजिती । ते पदें पावोनिही मृत्यु पावती । ते काय मृत्यु आपणातें अपेक्षिती । तथापि मृत्यु अभक्तां इतर भक्तांतें निश्चित. ॥ १४६४ ॥ आणि आपणावांचूनि अन्य । न अपेक्षिती कांहीं अनन्य । ते मोक्षामृत न इच्छिती जरी धन्य । तथापि योगक्षेम त्यांचा मी वाहतों. ॥ १४६५ ॥ एवं अपेक्षानुरूप सर्वोत्तम । फळ देऊनिही विषम । दिसे तरी विषम नव्हे सर्व सम । प्रसंग ऐसा. ॥ १४६६ ॥ तरी मुमुक्षूंस मोक्षाची मुमुक्षा । त्यांस अमृत देणें उचित अंबुजाक्षा । परि सकामास मृत्यूची तों अपेक्षा । नसोनि कां मृत्यु देतो ईश्वर ? ॥ १४६७ ॥ हे अपेक्षिती स्वर्गादि गती । आणि मृत्यु न मागतां पावती । रोग न इच्छिती आणि अपथ्य करिती । परि रोग फळ त्याचें वस्तुस्वभाव. ॥ १४६८ ॥ न इच्छितां मृत्यु ये रीती । न इच्छितां अमृत ही भक्तांची गती । म्हणोनि योगक्षेम मी वाहतों श्रीपती । न इच्छितां अमृत देतों हा स्वभाव माझा. ॥ १४६९ ॥ वैषम्यपरिहार ऐसा करी । प्रसंग ऐसा आला येथवरी । तों शंका उपजली याउपरी । वैषम्य मागुती लागेल. ॥ १४७० ॥ कीं सर्व आपणचि म्हणतो । आणि इतर देवताभक्तांस इतर फळ देतो । आणि योगक्षेम वाहतो । स्वभक्तांचा. ॥ १४७१ ॥ काय नव्हे हा सर्वदेवता । होय तरी स्वभक्तांतेंचि कां अमृतदाता । इतर योगक्षेमचिंता । कां न वाहे ? ॥ १४७२ ॥ या शंकेचा परिहार । भेदाचा करावा अंगीकार । अथवा फळ एक प्रकार । बोलावें इतर भक्तां स्वभक्तांतें. ॥ १४७३ ॥ तरी दोनी गोष्टी बोलणें विरुद्ध । उपाधिभेदें फळभेद सिद्ध । म्हणोनि दृष्टांत सूचवूनि प्रसिद्ध । बोलतसे हा श्लोक. ॥ १४७४ ॥

**येऽप्यन्यदेवताभक्ता यजंते श्रद्धयान्विताः ।**
**तेऽपि मामेव कौंतेय यजंत्यविधिपूर्वकम् ॥ २३ ॥**

अगा ! जे इतर देवता यजती । त्यांच्या श्रद्धेनें युक्त असती । तेही मातेंचि

पूजिती । परंतु अविधिपूर्वक. ॥ १४७५ ॥ कीं मी आणि त्या अन्य देवता । एकचि असों तत्त्वता । त्यांच्या यजनें मज अच्युता । यजतीच ते. ॥१४७६॥ परि ते विधि चुकती । कीं विष्णुरूपेंचि मातें न पूजिती । नित्य फलप्राप्तीच्या विधीची रीती । हे कीं विष्णुरूपें भजावें मज. ॥ १४७७ ॥ अगा! आपलाच देह सगळा । नवद्वारीं न म्हणवे वेगळा । परि तृप्तीची आणि क्षुधानिवृत्तीची कळा । मुखींच असे. ॥ १४७८ ॥ अन्नें क्षुधा नासे अन्नें पुष्टी । परि इतकाच विधि याचा दिसे दृष्टी । कीं मुखद्वारानें उदरांत वृष्टी । षड्रसांची करावी. ॥ १४७९ ॥ मुखें आणि इतर द्वारें । वेगळीं नव्हती ऐक्यनिर्धारें । परि अन्न इतर द्वारीं घालतील अविचारें । ते विधि चुकले. ॥ १४८० ॥ चरणीं आणि शिरीं । नसे देह वेगळा परि । शिरोवेष्टन गुंडाळी पायीं जरी । विधि चुकला म्हणावा तो. ॥ १४८१ ॥ भूमि एकचि सर्वत्र । परि पिके एकत्र तें न पिके अन्यत्र । मज देवांस चित्स्वरूपीं मात्र । ऐक्य परि उपाधिभेदें उंच नीच. ॥ १४८२ ॥ लोखंडाचीच बेडी । लोखंडाचेंच शस्त्र तोडी । ऐक्य दोहींचें न सोडी । लोखंड तें. ॥ १४८३ ॥ परंतु बेडी नाशपण । हा शस्त्राच्याच अंगीं गुण । मोक्षप्रद ब्रह्म सगुण । ऐक्य जरी देवां सर्वांसी. ॥ १४८४ ॥ बेडी तुटाया बेडीची । प्रार्थना ते एकत्वें शस्त्रास पावली साची । परंतु न तुटतां बेडीनें बेडी त्याची । अविधिपूर्वक जाली प्रार्थना. ॥ १४८५ ॥ मुकुंदावांचोनि मुक्ति । इतर देव देईल ऐसी भक्ती । श्रद्धा फळेल म्हणोनि आसक्ती । धरितांही न फळे कदापी. ॥ १४८६ ॥ श्रद्धा आस्तिकबुद्धी । फळ होईल ऐसी विश्वासाची समृद्धी । परंतु पुच्छश्रद्धा क्षीरसिद्धी । न करी विना गोस्तना. ॥ १४८७ ॥ स्तन पुच्छ शृंग कान । सर्वत्र देह गायीचा समान । भेद नसे परि विना स्तन । नव्हे प्राप्ति दुग्धाची. ॥ १४८८ ॥ मुखीं घातला ग्रास । तो पावेल त्याचा गोरस । परि हात न लावितां स्तनास । दुग्ध कैचें? ॥ १४८९ ॥ ब्रह्मचि मी सर्वेश्वर । ब्रह्मचि देवता इतर । परि मोक्ष नव्हे विना श्रीधर । मोक्षार्थ अविधिभजन अन्यदेवतांचें. ॥ १४९० ॥ इतर देवतांतें भजती । स्वर्गादि गति पावोनिही च्यवती । त्या प्रसंगीं श्रीपती । हा श्लोक ऐसा बोलिला. ॥ १४९१ ॥ कीं पाहतां सर्व वेदसिद्धांत । सर्वेही ब्रह्म अद्वैत । तेव्हां जो जें भजे दैवत । तें भजन अपलेंची हें सत्य. ॥ १४९२ ॥ ऐसें असोनि योगक्षेम । स्वभक्तांचा वाहतो हा नेम । पूर्वश्लोकीं बोलिला सर्वोत्तम । विरोध अद्वैतीं हा आला. ॥ १४९३ ॥ म्हणोनि त्याचा परिहार । बोलतां दाखवी ऐसा प्रकार । कीं तें माझेंच भजन हा निर्धार ।

परि तें अविधिपूर्वक. ॥ १४९४ ॥ येथें कोणी टीकाकार । जे अंतरीं भजती देवतांतर । ते अविधिपूर्वक म्हणतां प्रकार । आणिकचि वाखाणिती. ॥१४९५॥ कीं मोक्षाचा विधि जैसा । तो न घडला त्यांस तैसा । यांत अर्थ साधिती ऐसा । कीं मोक्ष इतरदेवताभजनेंही घडेच. ॥ १४९६ ॥ परि करिती अविधिपूर्वक भजन । म्हणोनि मोक्ष न पावती ते जन । जरी मोक्षप्राप्तिविधान । घडे तरी मोक्ष त्यांसही. ॥ १४९७ ॥ ऐसा बोलती अर्थ । परि विचारितां होतो अनर्थ । बडिवाराच्या कारणें व्यर्थ । वाखाणिती गीता. ॥ १४९८ ॥ भजतां अन्यदेवतागण । नव्हे मोक्ष या गोष्टीस कारण । जरी निमित्त अविधिपूर्वकपण । बोलतो म्हणावा. ॥ १४९९ ॥ आणि या प्रसंगीं आपणास त्यांस । एकत्व बोलतो जगन्निवास । त्यांतें पूजिलें तिहीं निश्चयें आपणास । पूजिलें ऐसें म्हणतसे. ॥ १५०० ॥ देवांस आपणास नाहीं द्वैत । जैसें मत्स्यकूर्मादि रामकृष्णरूपीं अद्वैत । तेव्हां राम भजतां निश्चित । भजलाच कृष्णातें. ॥ १५०१ ॥ कृष्णापासोनि होणार मुक्ती । तेच होणार करितां रामभक्ती । इतर देवता आणि विष्ण्वैक्याविषयीं युक्ती । ऐसी येथें बोलावी. ॥ १५०२ ॥ तेव्हां रामभजनीं जे लोक । न करिती मोक्षप्राप्ति विधिपूर्वक । त्यांस मोक्ष न घडे म्हणतां कृष्णोपासक । अविधिपूर्वक न पावणार हेही मुक्तीतें. ॥ १५०३ ॥ ऐसें असतां भक्त आपले । अविधिपूर्वक भजतांही भले । आणि अविधिपूर्वक रामभक्त वाईट ऐसें बोले । तरी उभय भजन सम बोलतो म्हणवेना. ॥ १५०४ ॥ प्रस्तुत तों अविधिपूर्वक । भजतांही आपले उपासक । अतिश्रेष्ठ आणि इतर देवांचे सेवक । निंदी त्याच अविधीनें. ॥ १५०५ ॥ सप्तमीं चतुर्विध भक्त । त्यांत आर्त अर्थार्थी कामनायुक्त । कां मग तेथें जाले प्रसक्त[1] । अविधिपूर्वकत्व योग्य निंदेसी? ॥ १५०६ ॥ काम्यफळीं जे रत । ते मोक्षप्राप्तिविधि चुकले निश्चित । ऐसें असोनि भगवंत । आर्त अर्थार्थी कामनायुक्तही वर्णी श्रेष्ठत्वें. ॥ १५०७ ॥ आर्त म्हणजे रोगी । भजे रोगपरिहारालागीं । आणि अर्थ धन त्यातें अर्थी अपेक्षी जगीं । अर्थार्थी सकाम बोलावा. ॥ १५०८ ॥ ऐसे कामेंकरून युक्त । तेही उदार म्हणतो स्वभक्त । आणि सकाम अन्यदेवताभजनीं अनुरक्त । सप्तमींच निंदी तयांतें. ॥ १५०९ ॥ 'कामैस्तैस्तैर्हृतज्ञानाः' । या श्लोकीं म्हणे अर्जुना । करिती अन्यदेवतोपासना । कामें हरिलीं ज्ञानें जयांचीं. ॥ १५१० ॥ एवं आर्त आणि अर्थार्थी दोघे कामयुक्त । तैसेच हे सकाम अन्य देवताभक्त । हें कां

---

१. प्रेमबद्ध.

वाईट आणि स्वभजनीं अनुरक्त । ते कां उदार सर्वकामही म्हणावे?
॥ १९११ ॥ दोघेही मोक्षविधि चुकले । दोघेही सकाम जेव्हां भजों लागले ।
आणि दोघेही आपलेच भक्त जाले । कीं भेद आपणा अन्य देवां असेना.
॥ १९१२ ॥ भजतां **सूर्य**वंशी **राम** । भजले **कृ**ष्णच **मे**घश्याम । जरी ऐसें
ऐक्य असतें तरी सकाम । स्वभक्त आणि अन्यदेवताभक्त सम होतो.
॥१९१३॥ स्वरूपभेद नसे अथवा नसे उपाधिभेद । **रामकृ**ष्णीं ऐसा अभेद ।
इतर देव आणि **ई**श्वर यांसी **वे**द । भेद उपाधिगत बोलती. ॥ १९१४ ॥
अभेदस्वरूपीं तें निर्गुण । **ई**श्वरोपाधि जीवोपाधि भिन्नपण । **ई**श्वर तो ब्रह्म
सगुण । मोक्षप्रदत्व इतरीं असेना. ॥ १९१९ ॥ या भावें म्हणतो **ह**री ।
कीं अन्यदेवता भजतां मातेंच भजले परी । अविधिपूर्वक कीं मुक्ति तोंवरी ।
नव्हे जों **ई**श्वरोपाधियुक्त ब्रह्मीं न भजती. ॥ १९१६ ॥ देवांस मज ऐक्य
निर्गुणपणीं । परि अविद्या न नासे निर्गुणीं । कीं सत्य रज्जुत्व लटिका फणी ।
न नासे नुसत्या रज्जूनें. ॥ १९१७ ॥ रज्जूविषयीं अज्ञान । त्या अज्ञानें दोरीं
सर्पभान । त्या रज्जूचें होतां ज्ञान । त्या ज्ञानें नासे तो सर्प. ॥ १९१८ ॥
निर्गुणविद्या अविद्या दोहींचें प्रकाशक । सगुणविद्योपाधि अविद्यानाशक ।
म्हणोनि अन्यदेवतोपासक । मुमुक्षुही विधि चुकले. ॥ १९१९॥ मोक्षार्थ वि-
धियुक्तही भजती । तथापि मोक्ष नेदी देवता भलती । कीं तेचि मुक्तीतें पा-
वती । जे भजती **ई**श्वरातें. ॥ १९२० ॥ आतां ऐक्य परस्पर । म्हणोनि सर्व
देव आणि **स**र्वेश्वर । एकचि तेव्हां चराचर । काय असे वेगळें त्याहुनी?
॥ १९२१ ॥ तरी देवचि काय अधिक । श्वान सूकरादि सर्व एक । उपा-
सना कां न करिती लोक । श्वान सूकर गर्दभादिकांची? ॥ १९२२ ॥ ज्ञानी
सर्वांसि वंदिती । तरी तें ज्ञान **ई**श्वराराधनें पावती । मग ते सर्वांभूतीं भजती ।
**'वासुदेवः सर्वमिति'** म्हणोनि सप्तमींही बोलिलें. ॥ १९२३ ॥ परि मोक्ष-
कारण ज्ञान । तदर्थ श्वानसूकरांचें भजन । करितां मोक्ष पावती जन । हें
तों घडेना. ॥ १९२४ ॥ आतां श्वानसूकरादि गण । यांस नाहीं दैवतपण ।
म्हणोनि श्वानसूकरादिभक्ती कोणी निपुण । न करिती ऐसें म्हणावें.
॥ १९२९ ॥ तरी दैवतपण नसे । तथापि भिन्नत्व तों न दिसे । कीं भेद
असता तरी कैसे । **वे**द सर्व ब्रह्म बोलते? ॥ १९२६ ॥ नसोनिही भेद ।
असोनिही अभेद । दैवतपण म्हणोनि **वे**द । कां हो उपास्यत्वें श्रेष्ठ म्हणती
देवांतें? ॥ १९२७ ॥ एवं च उपाधिभेदें फलप्राप्तिभेद । उपासने कामा नये
स्वरूपाभेद । श्वानसूकरादि नांवें आहुति **वे**द । न बोलती पुत्रादिकामा या-

गांत. ॥१९२८॥ 'सूकराय स्वाहा!' 'गर्दभाय स्वाहा!' । कां स्वर्गादि फळ नेदी याग हा । वेदतात्पर्य तों महा । सर्व ब्रह्म म्हणोनि एकत्वीं सर्वांच्या. ॥ १९२९ ॥ एवं उपाधिभेदें फळभेद । म्हणोनि ईश्वरानुग्रहें मोक्ष बोलती वेद । काय जालें जरी जाला अभेद । सर्वांसही. ॥ १९३० ॥ एवं सर्वेश्वरत्व जेथें । वेद बोलती मोक्षप्रदत्व तेथें । ऐक्य असोनिही प्रस्तुत येथें । अन्य भजन अविधिपूर्वक म्हणे भगवंत. ॥ १९३१ ॥ म्हणतांच अन्यदेवता । अन्यत्व समजे श्रोता । आणि मातेंचि ते यजिती म्हणतां तत्त्वता । समजे कीं अभेदही बोले ये रीती. ॥ १९३२ ॥ एवं च अन्यदेवताभजनीं । भगवद्भजनरूप ऐक्य करुनी । आणि मोक्ष नव्हे आपणावांचुनी । अविधिपूर्वकत्व उपाधिभिन्नत्वें. ॥ १९३३ ॥ आतां उपाधीही अवघी माया । परंतु विद्याच पाहिजे अविद्या जाया । म्हणोनि अनादि विद्योपाधि देवराया । भजणें तेंचि मुक्तिप्राप्तिविधिपूर्वकत्व. ॥ १९३४ ॥ असो बहुत बोलायाचें हें स्थळ । कीं ईश्वरोपाधि आणि ब्रह्म केवळ । तो भगवंत इतर देवोपाधि जळ । सचेतन त्याच्या प्रतिबिंबें. ॥ १९३५ ॥ बोलों जातां तो विचार । ग्रंथ वाढेल बहु फार । एवं व्यर्थ वेडेचार । मोक्ष इतर देवताभजनीं बोलणें. ॥ १९३६ ॥ स्वयें अंतरीं अन्य उपासक । आणि आपली टीका वाचोत इतर देवांचेही सेवक । कांहीं चरफड कांहीं प्रतिष्ठा कामुक । ते इतरदेवताभजनीं मोक्ष उपपादिती. ॥ १९३७ ॥ तथापि ते अर्थ । बाधितपणें दिसती व्यर्थ । जे हे 'यथार्थदीपिका' पाहती यथार्थ । मध्यस्थरीती मत्सर टाकोनियां. ॥ १९३८ ॥ या अन्यदेवताभजनीं कारण । अल्पदृष्टि अद्वैताचें श्रवण । तत्त्वतां न समजलें ब्रह्म सगुण । सर्व निर्गुण ऐकतां मोहिले. ॥१९३९॥ म्हणोनि इतरदेवतांतें भजती । आणि त्या उपास्यदेवांतेंही पावती । पावोनि समग्र भजन फळही च्यवती । ऐसें आतां दों श्लोकीं बोलेल. ॥ १९४० ॥ त्यांतें ईश्वरोपाधित्व आपलें । आणि तदधीनत्व सर्वां देवांस हें नाहीं कळलें । म्हणोनि नेणतां च्यवती हें बोलों आरंभिलें । प्रथम या श्लोकीं. ॥ १९४१ ॥

**अहं हि सर्वयज्ञानां भोक्ता च प्रभुरेव च ।**
**न तु मामभिजानंति तत्त्वेनातश्च्यवंति ते ॥ २४ ॥**

भोक्ता सर्व यज्ञांचा । अगा अर्जुना! मीच साचा । कां म्हणशील तरी देवां सर्वांचा । प्रभु मी म्हणिजे धनी मी. ॥ १९४२ ॥ **'भोक्ता च प्रभुरेव च'** म्हणोनी । या दों 'च'कारें आणि 'एव'कारें करूनी । **'अहमेव'** म्हणे यावरूनी ।

दुसरा कोणी सर्वयज्ञभोक्ता प्रभुही नव्हे हा अर्थ. ॥ १९४३ ॥ सर्व यज्ञ म्हणतां सर्व । बोलोनि दाविलेच देव । आणि म्हणे प्रभु अहमेव । प्रभु सर्वां देवांचा म्हणोनी. ॥ १९४४ ॥ अगा! ऐसा मी सर्वेश्वर। सर्वेश्वरत्व माझें ऐसें जाणती चतुर । मातेंच भजती ते तत्पर । म्हणोनि न च्यवती कदापी. ॥ १९४५ ॥ जे ऐसें न जाणती सर्वयज्ञभोक्तृत्व । नेणती माझें प्रभुत्व ईश्वरत्वतत्त्व। तत्त्वेंकरूनी माझें सर्वेश्वरत्व । न जाणती च्यवती यालागीं. ॥ १९४६ ॥ ऐसें आपणास सर्वयज्ञभोक्तृत्व । म्हणोनि सर्वांचें प्रभुत्व । ऐसें तत्त्वेंकरून नेणती म्हणतां तत्त्व । सर्वयज्ञभोक्तृत्वीं सूचवी. ॥ १९४७ ॥ स्वरूपीं सूचवी अद्वैत । उपाधींत दाखवी द्वैत । कीं मुख्य एका यागीं एक दैवत । अंगभूत देवता आणखी. ॥ १९४८ ॥ परि ज्यांच्या नांवें ज्या आहुती । ते त्याच आहुतीतें भक्षिती । एकाच्या आहुति एक भक्षूं न शकती । यागीं एका असोनी. ॥ १९४९ ॥ ज्या यागीं जें नसे दैवत । तें तों नेणेच त्या यज्ञातें निश्चित । सर्वयज्ञभोक्ता म्हणूनि भगवंत । भोक्ता सर्व आहुतींचा. ॥ १९५० ॥ आणि त्याच्या नांवें आहुती । जरी कोणीही न होमिती । तरी त्या यज्ञाचा भोक्ता श्रीपती । कीं यज्ञ तितका रूप त्याचें. ॥ १९५१ ॥ **'यज्ञो वै विष्णुः'** ऐसी श्रुती । त्याचें तात्पर्य बोलती । कीं अलंकार तितके दिसती । नुसतें सुवर्ण. ॥ १९५२ ॥ एक कटिदोरा अलंकार । त्यांत नाना कूसरीप्रकार[1] । ते सर्वही सोनें परंतु जे जे आकार । त्याकरितां रूप त्या कटिदोरियाचें. ॥ १९५३ ॥ नाना देव कुंडें हविर्द्रव्यें मिळवूनी । यजन होता म्हणावा यज्ञ म्हणोनी । ते यज्ञ सर्व हा सर्वेश्वर यावरूनी । मुख्य देवता अंगदेवता यज्ञाच्या सर्व हा. ॥ १९५४ ॥ **'तेऽपि मामेव कौंतेय यजंति'** । म्हणोनी पूर्वश्लोकीं बोले श्रीपती । तें ऐक्य सर्वा देवांस ये रीती । कीं कार्यासि ऐक्य कारणातें. ॥ १९५५ ॥ तथापि जें कारण । साधे त्यातेंचि कार्यरूपें सर्वपण । कीं सोनें नव्हे ऐसा कवण । असे अलंकार? ॥ १९५६ ॥ सरी मुधी कडीं चिंतांक । जें पहावें तें कनक । परंतु मुगुट नव्हे कटक । कडें मुगुट होईचना. ॥ १९५७ ॥ देवता सर्व नारायण । परि इंद्रें न म्हणावें वरुण । वरुण तोही मी इंद्र आपण । न मानीं ऐसें. ॥ १९५८ ॥ करितां ब्रह्मयाचें आवाहन । प्रगट नव्हे सहस्रनयन । अथवा प्रगट नव्हे चतुरानन । आवाहनीं इंद्राच्या. ॥ १९५९ ॥ जो सुवर्णविक्रय करी । त्यास मागीतली सरी । सरी नसतां नेदी परी । इतर अलंकार असती त्यापाशीं सुवर्णाचे. ॥ १९६० ॥ सरी

१. (जिन्नस करण्याच्या) करामतीचे प्रकार. २. एका प्रकारचा दागिना.

मागतां कटदोरा । प्राप्त नव्हे गिराइका नरा । सोनें मागतां निघे सारा पसारा । नाना नगांचा.॥ १९६१ ॥ तैसा सर्वयज्ञभोक्ता सर्वज्ञ । यजितां यजिले सर्वयज्ञ । म्हणोनि वेद आणि ऋषी सर्वज्ञ । यज्ञ म्हणती विष्णूतें. ॥१९६२ ॥ इंद्राच्या आवाहनीं । हरीही नये म्हणोनी । कोणी म्हणती तरी तोचि इंद्ररूपें करूनी । प्रगटतो. ॥ १५६३ ॥ त्याचे पद्मनाभादि देह । ते जगत्कारणाचे लीलाविग्रह । इंद्रादिकांसारिखा आग्रह । नसे देहात्मतेचा. ॥ १९६४ ॥ परि इंद्राची आहुति वरुण । घेतो म्हणों शके ऐसा कवण । कीं ऐक्य सर्वांस परि कार्यपण । कडें म्हणतां कटिदोरा केंवी येतो. ॥ १९६५ ॥ कारण स्वयें नारायण । तोचि निर्गुणही आणि सगुण । दोनी रूपीं कारणपण । एकाच त्याला. ॥ १९६६ ॥ सुवर्णाचे नग हें खरें । तैसें निर्गुणचि जग पाहतां बरें । परि नग तो न जाला तेव्हां कोणत्या आकारें । सुवर्ण होतें? ॥ १९६७ ॥ लांब लाटा चतुष्कोण वर्तुळ । सोनें होतें तोही अलंकार नव्हे केवळ । पीत छाया नुसती झळाळ । दिसे कोणा एका आकाराची. ॥ १९६८ ॥ आदीं लाटा अथवा गोळा मग । त्या आकारापासूनि होय नग । तैसें मायाशबलतेपासूनि[1] जग । दृष्टांत एकदेशी परि श्रुतिसिद्ध. ॥ १९६९ ॥ निर्गुणीं आपण निर्गुण । माया योगेंचि ऐसी खूण । तो ईश्वर एवं जो निर्गुण म्हणे आपण । तोचि निर्गुण सगुण होऊनिही. ॥ १९७० ॥ एवं जो जगत्कारण । तोचि स्वयें यज्ञनारायण । त्यातेंचि सर्वयज्ञभोक्तृत्वपण । प्रभुत्व त्यातेंचि सर्व देवांचें. ॥ १९७१ ॥ एवं जेथें सर्वयज्ञभोक्तृत्व । तेथेंचि सर्वा देवांचें प्रभुत्व । च्यवती याचें न जाणतां तत्त्व । हें तत्त्वतः म्हणतां तत्त्व ऐसें सूचविलें.॥१९७२॥ ऐसें अल्पबुद्धीचें अद्वैतश्रवण । शब्दें ऐकोनि सर्व ब्रह्मपण । मोक्ष एका विष्णुभजनाविण । न घडे ऐसें न समजलें तत्त्व. ॥ १९७३ ॥ ते सर्व ब्रह्म ऐकोनि कानीं । अल्पदेवतोपासना करूनी । च्यवती अगा! म्हणोनी । या श्लोकीं बोलोनि आतां काय बोलतो याउपरी. ॥ १९७४ ॥ जे दीर्घदृष्टि ऐसें न पाहती । अद्वैतमात्रश्रवणें मोहती । त्यातें म्हणे च्यवती । ते कोण? ॥ १९७५ ॥ विष्णूचेही उपासक । ऐसें तत्त्व नेणती कित्येक । इतरदेवतांचे सेवक । नेणतीच कीं. ॥ १९७६ ॥ तरी येथें च्यवती म्हणोनी । स्वउपासकही यावरूनी । निंदिले च्यवती या शब्दें करूनी । स्थळ हें ऐशा संशयाचें. ॥ १९७७ ॥ आणि तत्त्व ऐसें नेणती । ते जेव्हां म्हणावे च्यवती । तरी आदीं पदें पावती । तेव्हां च्यवती म्हणावें. ॥ १९७८ ॥ तरी यातें जे पावती । ते तों कधींहि न

---

१. मायेच्या मिश्रणापासून.

च्यवती । आणि च्यवती जे तत्त्वतां ईश्वरत्व नेणती । हें कैसें घडे? ॥१९७९॥ कीं भगवद्भजन करी परी । सर्वयज्ञभोक्तृत्व प्रभुत्वखूण नेणे ती बरी । पद पावोनि तोही तरी । च्यवतो म्हणावा कीं काय? ॥ १९८० ॥ इत्यादि शंकेचा परिहार । करावया सर्वेश्वर । बोलतसे यानंतर । हा श्लोक. ॥ १९८१ ॥

**यांति देवव्रता देवान्पितॄन्यांति पितृव्रताः ।**
**भूतानि यांति भूतेज्या यांति मद्याजिनोऽपि माम् ॥ २५ ॥**

धरूनि भलतें अल्प दैवत । त्यांच्या भजनीं दृढव्रत । ते देवव्रत पावती निश्चित । त्या देवांतें. ॥ १९८२ ॥ पितरांच्याच पूजनीं रत । ते म्हणावे पितृव्रत । ते पावती निश्चित । पितृलोकीं पितरांतें.॥ १९८३ ॥ जे वेताळादि भूतें । यजती तदर्थ नाना व्रतें । धरिती तेच गति तयांतें । कीं भूतें होऊनि भूतांतें पावती. ॥ १९८४ ॥ पितरांच्या पावोनि आकृती । पितृव्रत पितृलोका जाती । देवाकृति पावोनि राहती । त्या त्या लोकीं त्या त्या देवांचिया. ॥१९८५॥ तैसेच माझे भक्तही । मजवांचूनि त्यांस गति नाहीं । देवव्रतादि जैसे कांहीं । देवादिकां पावती. ॥ १९८६ ॥ कीं जो भजे जयातें । तोचि पावे तयातें । मजही भजे तो मातें । पावे अर्जुना! ॥ १९८७ ॥ मीच देवादि उपास्यरूप । कीं वेगळें नसे चित्स्वरूप । परि ज्या रूपें भजे त्या रूपासमीप । तो त्यारूपें असतसे. ॥ १९८८ ॥ मज विषमता नाहीं । कीं मीच त्या रूपें ते लोकही । आणि न च्यवती ऐसा जो कांहीं । लोक माझा तोही मद्रूप. ॥ १९८९ ॥ परि मी आणि माझा सत्त्व गुण । वैकुंठीं नसे रजतमपण । ज्ञानेंचि पावती निपुण । मातें वैकुंठलोकीं माझिया. ॥ १९९० ॥ **'इदं ज्ञानमुपाश्रित्य'** म्हणोनी । चतुर्दशीं या श्लोकें करोनी । बोलेल ऐसें कीं या ज्ञानाचा आश्रय धरूनी । माझें सारूप्य पावेल. ॥ १९९१ ॥ आणि **'आब्रह्मभुवनाल्लोकाः'** या श्लोकीं । अष्टमीं मागें बोलिला कीं । मातें पावोनि कोणीं मृत्युलोकीं । आला नाहीं परतोनी. ॥ १९९२ ॥ पुनरावृत्ति ज्ञानाविण । ज्ञानें अपुनरावृत्ति हे खूण । एवं आपणास पावती ते ज्ञानी निपुण । अष्टमीं न परतती म्हणतां सूचवी. ॥ १९९३ ॥ एवं ज्ञानाविण । न पाविजे ब्रह्म निर्गुण अथवा सगुण । तेव्हां भगवदुपासका ईश्वर आपण । ज्ञान देतो गुरुरूपें. ॥ १९९४ ॥ तेव्हां ते त्यास पावती । पावले ते न परतती । इतर देवांची या गती । उपासना मात्रें. ॥ १९९५ ॥ येविषयीं उत्तमश्लोक । बोलिला आधींच पूर्वश्लोक । कीं सर्वयज्ञभोक्ता प्रभु मीच एक । हें तत्त्व न जाणती ते च्यवती म्हणोनी. ॥ १९९६ ॥ तरी जे आपलें सर्वोत्कृष्टत्व नेणती ।

तेचि इतर देवादिकांतें भजती । आणि तेचि त्यातें पावोनि च्यवती । तैसे नव्हती स्वभक्त हें या श्लोकीं सूचवी. ॥ १५९७ ॥ **'मद्भक्ता यांति मामपि'** म्हणोनी । मद्भक्त मातें पावती म्हणे यावरूनी । ते न च्यवती कीं आपणातें पावोनी । कोणी न च्यवे ऐसें पूर्वीं बोलिला. ॥ १५९८ ॥ आतां सर्वयज्ञभोक्तृत्व । आणि आपुलें सर्वप्रभुत्व । जे न जाणती हें तत्त्व । ते च्यवती ऐसें बोलिला. ॥ १५९९ ॥ तरी सर्वयज्ञभोक्तृत्व । आणि आपुलें सर्वप्रभुत्व । हें न जाणती स्वभक्त त्यांसही हें तत्त्व । कळतें स्वप्रसादें ऐसेंही सूचवी. ॥ १६०० ॥ कीं जे आपणातें पावती । ते कधींही न च्यवती । हें मागें अर्जुनाप्रती । स्वयें बोलिला. ॥ १६०१ ॥ यावरून तर्करीती । समजली पार्थाची मती । कीं यातें पावोनि न च्यवती । तेव्हां ते जाणतीच हें तत्व. ॥ १६०२ ॥ कीं भोजनावांचूनि न घडे पुष्टी । आणि तो पुरुष पुष्ट जेवितां न दिसे दिवसां दृष्टी । तेव्हां तो रात्रीं जेवीत असेल हे गोष्टी । तर्कें समजावी पुष्टीवरूनी. ॥ १६०३ ॥ ऐसें भगवंताचें प्रभुत्व । आणि सर्वयज्ञभोक्तृत्व । हें त्यास कळलेंचि तत्त्व । **'मद्भक्ता यांति मामपि'** म्हणतो जयातें. ॥१६०४॥ तर्कें ऐसा समजला अर्जुन । हेंचि पुढिलिया अध्यायांत मधुसूदन । बोलेल कीं **'मच्चित्ता मद्गतप्राणाः'** ऐसे जे जन । त्यांतें मी देतों बुद्धियोग. ॥ १६०५ ॥ **'ददामि बुद्धियोगं तं'** म्हणोनी । बोलेल स्वयें यावरूनी । च्यवती जे न जाणती मज तत्त्वेंकरूनी । ते पूर्वश्लोकीं बोलिला ते अन्यउपासक. ॥ १६०६ ॥ स्वउपासकांस आपण । बुद्धियोग देतों आणि करितों निपुण । ते सर्वयज्ञभोक्ता प्रभु मी सगुण । ऐसें तत्त्व जाणती हा भाव. ॥ १६०७ ॥ जे सगुण तत्त्व ऐसें न जाणती । अल्पदृष्टी अद्वैत आयकती । सर्वदेव आणि सर्वेश्वर समान मानिती । भजती क्षुद्रदेवतांतें. ॥ १६०८ ॥ मीच ते देव सकळ । चित्स्वरूप एकचि केवळ । परि सर्वयज्ञभोक्ता प्रभु मी एकचि ऐसें निवळ । सगुणतत्त्व त्यांतें कळेना. ॥ १६०९ ॥ सर्वेही एक ब्रह्म निर्गुण । म्हणोनि क्षुद्रदेवतांतें भजती कृपण । तेही मातेंच भजती कीं मज त्यांस एकपण । परि भजन होतें अविधिपूर्वक. ॥ १६१० ॥ मनीं धरोनि ऐसा भाव । जें पुढें बोलणार देव । तें सूचवोनि देवाधिदेव । **'येऽप्यन्यदेवताभक्ताः'** या श्लोकीं तें बोलिला. ॥ १६११ ॥ कीं अन्यदेवतोपासक । मातेंच भजती कीं मी आणि ते देव एक । परंतु अविधिपूर्वक । स्वभजन तें. ॥ १६१२ ॥ तें अविधिपूर्वकत्व । हेंच कीं आपलें सर्व यज्ञभोक्तृत्व प्रभुत्व । न जाणती हें न कळतां तत्त्व । च्यवती ते

भक्त अन्य देवांचे. ॥ १६१३ ॥ कीं देवांस पावती देवव्रत । पितरांसि पावती पितृव्रत । भूतांतेंचि पावती निश्चित । जे वेताळादि भूतांतें उपासिती. ॥ १६१४ ॥ तैसेंच मातेंही जे यजती । ते मातेंचि पावती । मज पावले ते न च्यवती । यालागीं भजन माझें विधिपूर्वक. ॥ १६१५ ॥ हा भाव दावी नारायण । हें श्लोकत्रयप्रकरण । त्यांत सिद्धांत निर्गलित विवरण । इतकेंची. ॥ १६१६ ॥ कीं सर्व देव आणि सर्वोत्तम । एकचि कीं सर्व निर्गुण सम । परि सर्वयज्ञ भोक्ता प्रभु पुरुषोत्तम । मोक्ष भजनें तयाच्या. ॥ १६१७ ॥ तेंचि विधिपूर्वक यजन । कीं त्या हरीचेंचि केवळ घडे भजन । अन्यदेवतांस भजती जन । जे ते त्यातेंचि भजती परि अविधिपूर्वक. ॥ १६१८ ॥ म्हणोनि जो भजे जयातें । तो पावे तयातें । तैसेचि पावती मातें । ते न च्यवती भजन विधिपूर्वक म्हणोनी. ॥ १६१९ ॥ तत्त्व न जाणोनिही जन । करिती आपलेंचि भजन । त्यांस तत्त्व आपलें भवभंजन । दावील ऐसें सूचवी. ॥ १६२० ॥ ऐसें विधिपूर्वक भजन आपलें परी । तें कठीण असेल म्हणोनि अर्जुना! मानसीं जरी । तरी तें बहु सुगम म्हणतो हरी । आतां या श्लोकीं. ॥ १६२१ ॥

**पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति ।**
**तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मनः ॥ २६ ॥**

अगा! जो भक्तीकरूनी । अर्पितो तें अर्पिलें भक्तीनें म्हणोनी । मी आवडीनें भक्षितों यावरूनी । सुलभ भजन माझें तूं जाण. ॥ १६२२ ॥ अगा! निष्काम शुद्ध चित्त ज्याचें । अर्पित पत्र पुष्प फल जल तयाचें । माझें अखंडानंदानुभवत्व साचें । याहूनि गोड मज वाटतें. ॥ १६२३ ॥ माझ्या अखंडानंदानुभवीं दया । मी तत्पर जनोद्धार कराया । मज कांहीं अर्पितां मोक्ष तया । या सुखें तदर्पित त्याचें भक्षितों. ॥ १६२४ ॥ अगा! म्हणे ते 'द्वासुपर्णा' श्रुती । 'अनश्नन्नन्यो अभिचाकशीति' । कीं ईश्वरास अशन म्हणजे भोजन नाहीं म्हणती । कीं मी भोक्ता नव्हे विषयांचा. ॥ १६२५ ॥ ज्या इंद्रियाचा जो विषय । भोजन तयाचें हा निश्चय । परि मी अतींद्रिय । इंद्रियेंचि नसती मजलागीं. ॥ १६२६ ॥ मजही दर्शन श्रवण इत्यादि असे । परंतु मीच सर्व आहें ऐसें दिसे । जो विषय सत्यत्वें न गवसे । तोंवरी इंद्रिय तयातें न म्हणावें. ॥ १६२७ ॥ अविद्येनें वाटे सत्य विषय । ते वृत्ति म्हणावी इंद्रिय । अविद्या जातां चिन्मय । विषय इंद्रियें ज्ञानी देखतो. ॥ १६२८ ॥ परि सूर्य न देखे तम । तैसा अनादि विद्याशबलित मी पुरुषोत्तम । अविद्या

नेणें म्हणोनि हें स्थावरजंगम । सत्य कदापि न वाटे मजलागीं. ॥ १६२९ ॥ मज ऐशिया विषयाचें अशन । नाहीं तथापि शुद्धचित्तजन । भक्तीनें करितां भजन । जें अर्पिती तें मी भक्षितों ॥ १६३० ॥ अगा! तुळसीपत्र आदिकरुनी । भलतें एक गलित पत्र आणुनी । मज समर्पिती तें भक्तीनें अर्पिलें म्हणोनी । अशन करितों मी तयाचें. ॥ १६३१ ॥ कीं त्या पत्रीं जो जैसा रस । तो माझाच अखंडानंदानुभव सुरस । तें पत्र वाळलें विरस । परि विरस नव्हे अखंडानंदानुभव माझा. ॥ १६३२ ॥ कीं शब्द स्पर्श रूप रस गंध । मज यांचा साक्षित्वसंबंध । परि सर्वही स्वस्वरूपानंद । ऐसेंचि वाटे. ॥ १६३३ ॥ जीवांस हा अनुभव असेना । त्यांस विषयांची असे वासना । त्या वासनेनें मज जगज्जीवना । जडविषयरूपें ते पाहती. ॥ १६३४ ॥ ते विषय त्या वासनेंकरूनी । फळ अपेक्षूनि अन्यदेवांपासूनी । अर्पिती मातेंचि परि अशुद्ध चित्त म्हणोनी । मज अर्पिती ऐसें न वाटे. ॥ १६३५ ॥ कीं ते विषयासाठींच अर्पिती । विषयचि फळ तयाचें पावती । अनुग्रहदृष्टि मी जगत्पती । न पाहें तयांतें. ॥ १६३६ ॥ एवं तिहीं जें अर्पिलें । तेंही स्वस्वरूपचि देखतों आपुलें । परंतु मी प्रसन्न नव्हे म्हणोनि नाहींच पावलें । जें तिहीं अर्पिलें मजलागीं. ॥ १६३७ ॥ जे शुद्ध भक्त माझे अर्जुना! । ज्यांस फळवासना असेना । आणि भक्तीनें मज जगज्जीवना । पत्र पुष्प फल जल किमपि अर्पिती. ॥ १६३८ ॥ त्यांस वांछित नसे फल । मज ते माझें स्वरूपचि वाटे केवळ । म्हणोनि भक्षितों त्यांचें पत्र पुष्प फल जल । माझा स्वरूपानुभवचि अशन माझें. ॥ १६३९ ॥ सर्वही माझा अखंडानंद । परि अर्पितां फळ वासनेनें होतो बंध । म्हणोनि अभक्तांतें फळसंबंध । होतो यास्तव पावलेंचि नाहीं मातें. ॥ १६४० ॥ आणि भक्तें भक्तीकरूनी । अर्पिलें शुद्ध चित्तें म्हणोनी । अर्पण फळापेक्षेवांचूनी । आड नसे फळ कांहीं. ॥ १६४१ ॥ त्याणें तों मज अर्पिलें । आणि फळ तरी कांहीं न इच्छिलें । तेव्हां तें अर्पणचि उरलें । तें तो अखंडानंदस्वरूप माझें मज वाटे. ॥ १६४२ ॥ कीं मज माझ्या स्वरूपाची प्रीती । आत्मा सर्वांचा प्रिय मी जगत्पती । जे मज आवडीनें भजती । न दिसे भेद माझिया त्यांचिया प्रीतीतें. ॥ १६४३ ॥ ऐसी माझी ज्यांस गोडी । तिहीं अर्पिलें त्यांचीच मज आवडी । अखंडानंदाच्या पर[१]वडी । वाटती पत्र पुष्प फळ जल तयांचें. ॥ १६४४ । तिहीं जें अर्पिलें पत्र । तें मी आदरें भक्षितों पवित्र । भलतसें पुष्प आपलें तें विचित्र । मज वाटे.

---

१. प्रकार.

॥ १६४५ ॥ तें पुष्पही मी भक्षितों । कीं माझा अखंडानंदचि मी लक्षितों । आणि पदार्थरूपें यथायोग्य भोग देखतों । भक्षणें नांव त्याचेंचि. ॥ १६४६ ॥ पुष्पाचा जो परिमळ । घ्राणद्वारा कळतो केवळ । तो भोग भक्षण म्हणोनि कुशळ । सर्व म्हणती. ॥ १६४७ ॥ द्वितीयाध्यायांत हेचि श्रीपती । विषय निराहारांचे म्हणे परतती । आहारशब्दें इंद्रियांस भोग विषयाचा म्हणती । हेंचि तात्पर्य वेदाचें. ॥ १६४८ ॥ म्हणे, **'द्वासुपर्णा'** श्रुती । **'अनश्नन्न्यो अभिचाकशीती'** । कीं अशन न करी जगत्पती । तरी काय उपवास करितो ऐसें म्हणावें? ॥ १६४९ ॥ नाहीं करीत अशन । म्हणजे करीत नाहीं भोजन । अर्थ ऐसा करावा तरी इतर विषयसेवन । घडतें काय ईश्वरातें? ॥ १६५० ॥ एवं अनशन । म्हणजे अर्थ तो अभोजन । परि इंद्रियद्वारा विषयाचें जितकें सेवन । अशन म्हणावें तितकेंही. ॥ १६५१ ॥ एवं विषयसेवन म्हणावें अशन । विषय न सेवणें अनशन । ऐसी वेदभाषारीती गहन । विचारितां अर्थ सांपडे. ॥ १६५२ ॥ प्रस्तुत पुष्पाचें भक्षण । या भावें बोलिला कमलेक्षण । कीं पुष्पाच्या भोगाचें जें लक्षण । तेंचि भक्षण तयाचें. ॥ १६५३ ॥ पुष्पें गुंफोनि माळा । अर्पितां भोग होतो गळा । तेंचि याच्या भक्षणाची कळा । चरणीं अथवा शिरीं अवतंस. ॥ १६५४ ॥ तें गुंफिलें अथवा मोकळें । तें साजूक अथवा वाळलें । भलतसें भक्तीनें अर्पिलें । तें मी माझा अखंडानंद मानितों. ॥ १६५५ ॥ याच प्रकारें फळ । याच प्रकारें जळ । मज अर्पी भक्तीनें प्रेमळ । तें मी आदरें भक्षितों. ॥ १६५६ ॥ मज पाहिजे प्रेम । मज प्रेमें कांहीं समर्पावें हा त्यास नेम । म्हणोनि त्याचें भलतसें मी सर्वोत्तम । भक्षितों भोगितों तें यथायोग्य. ॥ १६५७ ॥ सहज आवडे पोटींचा बाळ । क्षेम देतां अमृत वाटे त्याची लाळ । तैसें प्रेमळाचें पत्र पुष्प फळ जळ । भलतसें मज गोड वाटे. ॥ १६५८ ॥ ज्याची नसे आवडी । त्याचें अमृतही नेदी गोडी । प्रीती ज्याची त्याची खरवडी । वाटे ती अमृताची. ॥ १६५९ ॥ अगा! गोड ते क्षुधा । क्षुधितास कांजीही वाटे सुधा । धुंडोनि पाहतों सर्व वसुधा । तों क्षुधा मज सर्वदा प्रेमाची. ॥१६६०॥ याहूनि सुगम भजनाची रीती । सांगतो आतां जगत्पती । सुलभत्वप्रसंगें पार्थाप्रती । परम आणि प्रथम भागवतधर्म बोलतो या श्लोकीं. ॥ १६६१ ॥

**यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत् ।**
**यत्तपस्यसि कौंतेय तत्कुरुष्व मदर्पणम् ॥ २७ ॥**

अगा! तूं जें करिसी । आणि जें तूं भक्षिसी । आणि जें तूं होमिसी ।

आणि देसी जें तूं. ॥ १६६२ ॥ तूं होमिसी ज्या होमातें । तूं तपसी ज्या तपातें । तें समर्पीं सर्वही मातें । कुंतीसुता ! ॥ १६६३ ॥ ज्यास पाहिजे माझें दास्यपण । त्याणें समर्पावें सर्व कर्म जाण । कीं दास जाला कोणी सेवेविण । हें घडेना. ॥ १६६४ ॥ मुख्य सेवेचा धर्म । कीं स्वामीचेंचि सर्वदा करावें कर्म । दास्यपणाचें वर्म । आणीक नसे. ॥ १६६५ ॥ स्वामिकार्यावेगळा काळ । क्रमी तो दास फटकाळ । कांहीं स्वामिकार्य कांहीं स्वकार्यपाल्हाळ । तो भाडेकरी दास म्हणवेना. ॥ १६६६ ॥ आठ प्रहर साठ घटिका । प्रतिदिवसीं काळ इतका । स्वामिसेवेंतचि वेंची तितका । तोचि दास. ॥ १६६७ ॥ एवं करूनि अष्टप्रहर सेवा । सेवावें दास्यत्वें देवाधिदेवा । तरी त्या सेवेचा करी हेवा । जगदंबा लक्ष्मीही. ॥ १६६८ ॥ परंतु सेवा तरी घडे । कीं अगत्य स्वामीस कार्य पडे । तेव्हां सर्वेश्वराचे सेवेस पडे । अवसर कोण. ॥ १६६९ ॥ तो अवाप्तसकळकाम । त्याचें करावें कोणतें काम । मुक्तार्थ होऊनि निष्काम । सर्व कर्म अर्पावें श्रीचरणीं. ॥ १६७० ॥ अर्पितां सर्व क्रियांतें । आणि अर्पितां [१]अवस्थात्रयातें । आठ प्रहर सेवा तयातें । घडे सर्वेश्वराची. ॥ १६७१ ॥ म्हणोनि म्हणतो कीं अर्जुना ! । सर्व कर्में मज भवभंजना । समर्पीं कीं भगवद्भक्त जना । प्रथम भागवतधर्म हाचि भाव. ॥ १६७२ ॥ ऐसें कर्म अर्पितां सकळ । म्हणसी काय होईल फळ । तरी मी सर्वात्मा केवळ । त्या मज पावसी म्हणतो या श्लोकीं. ॥ १६७३ ॥

**शुभाशुभफलैरेवं मोक्ष्यसे कर्मबंधनैः ।**
**संन्यासयोगयुक्तात्मा विमुक्तो मामुपैष्यसि ॥ २८ ॥**

अगा ! ऐसा तूं जेव्हां होसी । कीं सर्व कर्में मज अर्पूं लागसी । तेव्हां शुभाशुभ दोहीं फळांपासूनी सुटसी । तुटती शुभाशुभ दोनी कर्मबंध. ॥ १६७४ ॥ अशुभ पापकर्में बेडी जैसी । शुभ पुण्यफळ बेडीच तैसी । सुवर्णाची बेडीच ते कैसी । बरी म्हणावी ? ॥ १६७५ ॥ मज कर्में आर्पिसी सकळ । तयाचें मोक्षचि फळ । कीं दास माझा जाला निर्मळ । मग बंध कैंचा तयासी ? ॥ १६७६ ॥ जाला समर्थाचा दास । भय कैंचें मग त्यास । संसारबंधप्रयास । नुरती होतां निजदास माझा. ॥ १६७७ ॥ सर्व कर्में अर्पी मातें । आठ प्रहर सेवा घडली त्यातें । माझें अनन्य दास्य जोडलें ऐसें जयातें । बंध त्यातें मग कैंचा ? ॥ १६७८ ॥ दिवसरात्रीं साठ घटिका । माझ्याच सेवेंत

१. जागृति, स्वप्न आणि सुषुप्ति.

कंठी काळ इतका । कीं खाणें जेवणें इत्यादि [1]कर्मकलाप तितका । मज अर्पितां कर्म त्याचें सकळ सेवा माझीच ते. ॥ १६७९ ॥ सेवा सर्वदा घडे ज्यास । निजदास कैसें न म्हणावें त्यास ? । दास म्हणावें त्यास । संसारबंधास लावून देऊं मी कैसा ? ॥ १६८० ॥ एवं च संसारबंध तोंचवरी । कीं सर्वकर्मापण मातें न करी । कर्म अर्पूं लागला तेव्हां मजवरी । ओझें पडलें तयाचें. ॥ १६८१ ॥ कीं जाला आपुला निजदास । त्याची उपेक्षा आणि तद्विषयीं जो उदास । कोण भला म्हणेल त्या मंदास ? । जो भला म्हणेल तोचि मंद.॥१६८२॥ भला समर्थ म्हणिजे तरी । कीं स्वदासाची सर्व पीडा हरी । हा उत्तमोत्तमाचा गुण परी । माझ्या गुणाचाच अंशांश. ॥ १६८३ ॥ मजपासूनि सद्गुण सकळ । माझेच गुण सर्व सद्गुणांचें मूळ । तो मी सर्वेश्वर केवळ । केंवी उपेक्षूं दासांतें ? ॥ १६८४ ॥ दास्याचें माझ्या हेंचि वर्म । कीं मज अर्पी सर्व कर्म । मुख्य प्रथम भागवतधर्म । सर्व कर्मसमर्पण मजलागीं. ॥ १६८५ ॥ एवं सर्व कर्मे मजला । ज्या दिवसापासून अर्पूं लागला । त्याच दिवसापासून संकल्प अमोघ माझा जाला । कीं मोक्ष द्यावाच आतां मी यातें. ॥ १६८६ ॥ या भावें म्हणे अर्जुनासी । कीं तूं ऐसा जेव्हां होसी । तेव्हां शुभाशुभ बंधापासूनि सुटसी । म्हणिजे पावसील तूं मोक्षा. ॥ १६८७ ॥ आतां ज्ञानें अविद्याग्रंथि सुटे । पुढें गर्भवासा येणें खुंटे । एवं आत्मज्ञानें बंध तुटे । शुभाशुभसंचितक्रियमाणाचा. ॥ १६८८ ॥ [2]प्रारब्ध सरे भोगें । [3]संचित जळे चित्त चैतन्ययोगें । कर्महेतुप्रकृतिवियोगें । साक्षी होतां बुद्धीस लेप न लागे [4]क्रियमाणाचा. ॥ १६८९ ॥ हे आत्मज्ञानाचे विलास । यांत आदीं पाहिजे संन्यास । **'संन्यस्य श्रवणं कुर्यात्'** म्हणोनि मोक्षार्थियास । श्रुति म्हणे. ॥ १६९० ॥ आणि **'त्यागेनैकेन अमृतं'** ऐशा श्रुती । एक्या त्यागेंचि मोक्ष म्हणती । हे दोनी सोडोनि श्रीपती । कर्मार्पणेंचि मोक्ष बोलतो. ॥ १६९१ ॥ तरी जों संन्यास आणि त्याग न घडे । ज्ञानें अविद्येचें कवाड नुघडे । शुभाशुभ कर्मबंधही न विघडे । तोंपर्यंत. ॥ १६९२ ॥ हा क्रम ठेवून एकीकडे । कृष्ण म्हणे कीं सर्व कर्मार्पण घडे । तरी त्याचा शुभाशुभ कर्मबंध विघडे । तरी काय मोक्ष विना ज्ञानें बोलावा ? ॥ १६९३ ॥ या शंकेचा परिहार । कीं हाच संन्यास आणि हाच त्यागप्रकार । आणि याच उपासनेनें सर्वेश्वर । ज्ञानद्वारा देतो मोक्षातें. ॥ १६९४ ॥ त्यांत सर्व कर्मसमर्पणीं । त्याग सूचवी चक्रपाणी । आणि

---

१. कर्मांचा खटाटोप, पसारा. २. या जन्मीं भोगण्याकरितां बरोबर आणलेलें. ३. गोळा केलेलें, पूर्वजन्मीं जमवून ठेवलेलें गांठोडें. ४. या जन्मीं जें करावयाचें तें.

**'संन्यासयोगयुक्तात्मा'** हे वाणी । संन्यास सूचवोनि बोलतसे. ॥ १६९५॥ अष्टादशीं सर्वकर्मफलत्याग । श्रीकृष्ण म्हणेल कीं तोचि त्यागयोग । नव्हे सर्वकर्मफलवियोग । कृष्णीं न अर्पितां हें तृतीयाध्यायांत बोलिला. ॥१६९६॥ एवं च त्याग सर्वकर्मार्पण । परि तो न घडे संन्यासाविण । काम्यत्याग संन्यासलक्षण । कर्मसमर्पण तो त्याग. ॥ १६९७ ॥ काम्यकर्में टाकी समूळ । आणि नित्यकर्में लौकिककर्में सकळ । करी आणि अर्पी तेव्हां त्यागफळ । आत्मसाक्षात्कार तो लाहे. ॥ १६९८ ॥ जो काम्यकर्में करी । तो दास नव्हे भाडेकरी । दास न होतां जगद्गुरु हरी । नेदी आत्मसाक्षात्कारातें. ॥ १६९९ ॥ यालागीं म्हणतो हरी । कीं **'संन्यासयोगयुक्तात्मा'** होसी जरी । मातें पावसी तरी । आत्मज्ञानें. ॥ १७०० ॥ आपण देह आणि देहासहित । प्रपंच सत्य वाटे हें विपरीत । या विपरीतभावापासूनि सुटणेंचि अत्यंत । नाश अविद्याबंधाचा. ॥ १७०१ ॥ एवं विपरीतापासूनि मुक्त । तोचि म्हणावा विमुक्त । अविद्यानाश आत्मसाक्षात्कारयुक्त । विमुक्त तो. ॥ १७०२ ॥ यालागीं जगद्गुरु या वचनीं । म्हणे मातें पावसी विमुक्त होउनी । काम्यकर्मत्यागें सर्व कर्में समर्पूनी । अविद्येपासूनि सुटोन मातें पावसी. ॥ १७०३ ॥ एवं सर्वसमर्पणत्याग । काम्यत्याग संन्यासयोग । विपरीतभावाचा वियोग । विमुक्तशब्दें बोलिला. ॥ १७०४ ॥ अष्टादशीं आरंभींच पार्थ । संन्यासत्याग या दोहींचा पुसेल अर्थ । तेथें बोलेल समर्थ । तत्त्व ऐसेंच संन्यासाचें आणि त्यागाचें. ॥ १७०५ ॥ तेथें सर्वकर्मफलत्याग । त्यातें म्हणेल मुख्य त्याग । न घडे नित्य निष्कामकर्मफलाचाही वियोग । ईश्वरीं न अर्पितां. ॥ १७०६ ॥ हा तृतीयाध्यायांत । **'यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र'** या श्लोकीं सिद्धांत । कीं बंधातें न करी एकचि ईश्वरार्पित । त्यावेगळीं बंधकें कर्में सकळही. ॥ १७०७ ॥ दूरी करणें वस्त्रमळ । म्हणतां साधन न बोलतां बोलिलें जळ । येविषयीं तों स्वयें केवळ । बोलिलाच अध्यायांत तिसरिया. ॥ १७०८ ॥ पुढें बोलिजेल हा प्रकार । प्रस्तुत ग्रंथ वाढला फार । कीं अगत्य अगत्य जो विचार । तो संक्षेपें बोलतां विस्तार इतका पावला. ॥ १७०९ ॥ एवं च काम्यकर्म त्यागावें । नित्यकर्म देहनिर्वाहादिकर्मही करून अर्पावें । तेव्हां विपरीतभावनेपासूनि सुटावें । पावावें वैकुंठनाथातें. ॥ १७१० ॥ हा सुगम भजनमार्ग । श्लोकद्वयें बोलिला श्रीरंग । येथें कांहीं शंका तिचा भंग । आतां येथून करीतसे. ॥ १७११ ॥ कीं सर्वकर्में अर्पी आपणास । तो तों जाला आपला दास । म्हणोनि मोक्ष देतो त्यास । या गोष्टीनें विषमता लागली. ॥ १७१२ ॥ कीं दास न्यावे मोक्षा । इत-

रांची करावी उपेक्षा । हे विषमता लागली अंबुजाक्षा । जनांस आणि अर्जुनास ऐसें वाटेल ॥ १७१३ ॥ म्हणोनि याचा परिहार । करितो आतां सर्वेश्वर । समता साधूनि भक्तीचा बडिवार । बोलतसे या श्लोकीं. ॥ १७१४ ॥

**समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः ।**
**ये भजंति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम् ॥ २९ ॥**

अगा ! मी सर्वोत्तम । सर्वांभूतीं सम । धुंडितां सर्व स्थावर जंगम । कोणी द्वेषी अथवा कोणी प्रिय असेना. ॥ १७१५ ॥ सागरास एक अप्रिय । अथवा तरंग एक प्रिय । हें काय घडे सम अद्वय । चित्समुद्र जडतरंगीं ये रीती. ॥ १७१६ ॥ अगा ! मीच जड भूतें सकळ । मीच प्रतिबिंबरूपें जीवही केवळ । जीवास हें न कळे त्या न कळण्याचें मूळ । अविद्या अनादि. ॥ १७१७ ॥ भूतें मजमाजीं सकळ । सर्वभूतीं मी केवळ । परंतु जीवास हें अकळ । अविद्येंकरूनी. ॥ १७१८ ॥ म्हणोनि मजमाजी भूतें मी सर्वभूतीं । हें रहस्य जीव कोणी नेणती । मी एक आहें ऐसा जगत्पती । न जाणती हेंही.॥ १७१९॥ मी कल्पवृक्षस्वभाव भगवंत । जैशास तैसाच होतों निश्चित । चतुर्थाध्यायांत बोलिलों हा सिद्धांत । **'ये यथा मां प्रपद्यंते'** या श्लोकीं. ॥ १७२० ॥ मी सर्वत्र असें परी । जे न भजती त्यांस दूरी । मी त्यांत ते मजमाजीं हे गोष्टी खरी । परि त्यांस माझें विस्मरण. ॥ १७२१ ॥ म्हणोनि मज वाटतें ऐसें । कीं मी त्यांत आहें म्हणों कैसें ? । आणि ते मजमाजीं आहेत हेंही ऐसें । न वाटे मज. ॥ १७२२ ॥ जे भक्तीनें मातें भजती । मज वाटतें कीं तेच मजमाजीं असती । आणि त्यांमाजीं मी जगत्पती । आहें ऐसें वाटतें. ॥ १७२३ ॥ असोनि उदकीं तृषित । तो नाहींच उदकीं म्हणावा निश्चित । अन्नांत पुरिला तरी क्षुधित । नाहींच म्हणावा अन्नांत त्या. ॥ १७२४ ॥ जलसमृद्धींत जल पितो । अन्नसमृद्धींत अन्न खातो । आहे उदकीं अन्नीं म्हणावा तो । तैसे भक्त मजमाजीं मी भक्तांत. ॥ १७२५ ॥ विषम जनाच्याच कल्पना । कल्पद्रुमीं विषमता असेना । कल्पनानुरूप जना । फळ दे म्हणावा समचि तो. ॥ १७२६ ॥ सर्व कर्में मज अर्पिसी । तरी तूं शुभ अशुभ कर्मबंधापासूनि सुटसी । या प्रसंगीं विषमता लागणार ते ऐसी । कल्पतरुन्यायें परिहरिली. ॥ १७२७ ॥ परंतु तेंचि प्रकरण । म्हणोनि संशया आणिका एकाचें होतें स्फुरण । त्या शंकापरिहाराचें विवरण । या पुढिलिया श्लोकीं. ॥ १७२८ ॥ **'यत्करोषि यदश्नासि'** या श्लोकीं अर्जुनातें । म्हणे समर्पी सर्व कर्में आपणातें । दुसरिया श्लोकीं म्हणे तयातें । **'संन्यासयोगयुक्तात्मा'** म्हणोनी. ॥ १७२९ ॥ कीं

काम्यकर्मत्याग । तो म्हणावा संन्यासयोग । एवं ज्यास नसेल कामनेचा रोग । तोचि काम्यकर्में टाकील. ॥ १७३० ॥ तेव्हां समर्पितां कर्में । मुक्ति ज्ञानें तें ज्ञान या भागवतधर्में । विचारितां ऐशिया क्रमें । सुगम भजन दुर्गम हें. ॥ १७३१ ॥ सुगम कर्मसमर्पणें । आणि विवेकें सुगमचि कर्म त्यागणें । परंतु सद्यः विषयाचें भोगणें । परम कठिण त्याग त्याचा. ॥ १७३२ ॥ कीं काम्य टाकील तोचि तो निष्काम । निष्काम तोचि कीं विषयभोगीं ज्यास न असे काम । हें तों अत्यंत कठिण काम । सद्यः त्यागणें विषयभोग ॥१७३३॥ जों न शके टाकूं विषयभोग । तों त्यास आहेच कामनेचा रोग । ऐशियास काम्यत्याग संन्यासयोग । कैंवी घडे ? ॥ १७३४ ॥ आणि संन्यासयोग हा न घडे । उगाच लागे कर्मार्पणाकडे । तरी ज्ञानद्वारा कैसा उपडे । कंठबंध शुभाशुभ कर्माचा ? ॥ १७३५ ॥ एवं कठिण टाकणें सद्यः विषयभोग । विषयभोग इच्छी तोंपर्यंत न घडे संन्यासयोग । जों नव्हे विषयभोगत्याग । तों हा भक्तियोग साध्य सहसा होईना. ॥ १७३६ ॥ हे शंका पार्थाच्या मनीं । ते सर्वसाक्षी जाणोनी । असला वाईट गुण भक्ताचा याहीहुनी । तरी तो उत्तमचि जाण म्हणतो या श्लोकीं. ॥ १७३७ ॥

**अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ।**
**साधुरेव स मंतव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ॥ ३० ॥**

अगा ! तो पूर्वोक्त । सर्वकर्म समर्पणार भक्त । असला यथान्यायें स्वधर्में विषयासक्त । तरी तो साधु हें नवल काय तुज सांगूं ? ॥ १७३८ ॥ जरी तो असेल दुराचारी अत्यंत । आणि त्यास दैवत मीच एक भगवंत । भजे मज आणि अन्यदैवत । न भजे कदापी. ॥ १७३९ ॥ तोही साधुच मानावा संतीं । कीं निश्चय अत्यंत उत्तम त्याच्या चित्तीं । कीं अनन्य अव्यभिचारिणी अनंतीं । भक्ति त्याची. ॥ १७४० ॥ जाली उत्तमाची गृहिणी । पाहतां आहे व्यभिचारिणी । दों पुरुषांशीं रमे जारिणी । ते व्यभिचारिणी पतिव्रता म्हणवेना. ॥१७४१॥ ते उत्तमांगना । ऐसें भल्यांच्या वाचेस येइना । तैसा मज भजे इतरांसही भजे अर्जुना ! । तो सदाचारीही साधु न म्हणवे कदापि. ॥ १७४२ ॥ न भजे अन्य देवांतें । अनन्यभावें भजे मातें । तो अत्यंत दुराचारी असला तरी त्यातें। साधूच मानावा सज्जनीं. ॥ १७४३ ॥ पहावें त्याच्या निश्चयाकडे । कीं मजवांचून इतर दैवत नावडे । अनन्यभावें भक्ति माझी घडे । तो अतिदुराचारीही साधु मानावा. ॥ १७४४ ॥ अगा ! रोग आहे देहीं । परि अपथ्य टाकोनि आरोग्यकर अत्यंत जें कांहीं । तें औषध निरंतर सेवितो तोही ।

निरोगी जाला म्हणोनि उत्तम वैद्य मानिती. ॥ १७४५ ॥ संसाररोगातें हरी । ऐसें दिव्य औषध मी हरी । मज सेवी आणि विषयरोग वाढवी तीतें न सेवी जरी । विषयवासनारोगनिर्मुक्तचि तो मानावा. ॥ १७४६ ॥ अगा! औषधाविण। निरोगी जाला कोण? । माझ्या भक्तीवांचून विषयप्रवीण । चित्त तें शुद्धी कैसें पावतें? ॥ १७४७ ॥ परंतु जों केला नाहीं दुराचारत्याग । आणि चित्तीं माझा भक्तियोग । न भजे इतरांस तरी संन्यासयोग । साधलाच त्याला. ॥ १७४८ ॥ कीं काम्य टाकिलेंची असेल जरी । इतर देवांतें न भजे तरी । उरली सद्यः भोगेच्छा दिसे परी । नाशक तीचें माझें अनन्यभजन आरंभिलें. ॥ १७४९ ॥ परिस हाता आला । तो तेव्हांच कनकसंपन्न जाला । माझें भजन अनन्य लागलें ज्याला । साधु त्याला म्हणावेंचि. ॥ १७५० ॥ कीं कीटकही भ्रमर होतो ध्यातां । सत्त्वशुद्धि तैसी मज सत्त्वोपाधीस भजतां । रजोवृद्धिकारका अन्या त्यजितां । नासेचि वासना तया अनन्यभक्तीची. ॥ १७५१ ॥ ऐसा स्वभक्त आणि दुराचारी । ज्यास वर्णितों येथवरी । तो जातीनें पापजाती ऐसी वैखरी । वदती कोण्ही तें विरुद्ध. ॥ १७५२ ॥ कीं पुढिलिया श्लोकावरी । त्यातेंचि वर्णूनि हरी । त्या पुढिलियाच श्लोकीं मुरारी । तें पापजातीचें वेगळेंच वर्णील. ॥ १७५३ ॥ **'मामुपाश्रित्य कौंतेय येऽपि स्युः पापयोनयः'** म्हणोनी । म्हणेल कीं जे यावेगळे पापयोनी । आणि स्त्रिया वैश्यादिही तरती म्हणेल यावरूनी । हा दुराचारी सत्कुलप्रसूतचि जाणावा. ॥ १७५४ ॥ आतां याचा अर्थ ये रीती । कीं दुराचारी आणि जोडे सत्संगती । ते असोनिही दुराचारी मती । त्याची अनन्यहरिभजनीं जरी लागे, ॥ १७५५ ॥ तरी त्या भजनें कृतार्थ । होणार ऐसा याचा अर्थ । याकारणें म्हणे समर्थ । कीं तो साधुच मानावा. ॥ १७५६ ॥ कीं साधुत्व अवलंबाया । विलंब नाहीं उरला तया । तेही गोष्टी धनंजया । आईक म्हणतो या श्लोकीं. ॥ १७५७ ॥

**क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छांतिं निगच्छति ।**
**कौंतेय प्रतिजानीहि न मे भक्तः प्रणश्यति ॥ ३१ ॥**

अगा! चित्तधर्मेंकरून युक्त । ऐसा अतिशीघ्र होतो तो माझा भक्त । कीं जे शांति शाश्वत तीतें होऊनि विरक्त । अतिशयें पावतो अतिशीघ्र. ॥ १७५८ ॥ हा प्रताप माझ्या भक्तीचा । अर्जुना! जे वादी तयां न वाटे साचा । बडबड करील त्यांची वाचा । कीं हें ऐसें घडों शकेना. ॥ १७५९ ॥ सूर्य दिवांधाच्या मतें नसे । जन्मांधास काय दिसे । गर्भिणीचे डोहळे कैसे । वांजेस होती. ॥ १७६० ॥ मार्ग भक्तीचा ठावा नसे । त्यांस हें सर्व मिथ्या

भासे । ते समजाविल्याही समजतील कैसे । हा पंथचि ठावका ज्यांला असेना. ॥ १७६१ ॥ परंतु देखोनि त्यांची सभा । भुजा आपल्या करूनि उभा । ये विषयीं सुभद्रावल्लभा । प्रतिज्ञा करीं गर्जोनियां. ॥ १७६२ ॥ अगा निगमरूपिणी अमोघ ज्याची वाणी । तो मी प्रतिज्ञापूर्वक बोलतों चक्रपाणी । कीं माझा भक्त वांया न जाय कोणी । कदापि कुंतीनंदना ! ॥ १७६३ ॥ कौंतेय म्हणिजे कुंतीसुत । अर्जुनास या नांवें आळवी अनंत । भाव गहन अत्यंत भगवंत । दावी आळवितां या नांवें. ॥ १७६४ ॥ कीं दुराचारीही माझा भक्त । न नासे कधीं जरीही विषयासक्त । व्यर्थ सदाचारी आणि विरक्त । भक्त माझा जो नव्हे. ॥ १७६५ ॥ कीं तूं कुंतीचा सुत । उत्पत्ति तुझी पुरुषांतराचें[1] रेत । कीं तूं न होसी निश्चित । पुत्र आपल्या बापा पंडूचा. ॥ १७६६ ॥ असोनि ऐसें सारथी । मज भक्तीकरून बैसविलें रथीं । लाळा घोटिती महारथी अतिरथी । दुर्योधनाचे आणि तो. ॥ १७६७ ॥ उत्पत्ति ऐसी असोनि मद्भक्त । म्हणोनि मोक्ष आणि जयलक्ष्मीनें होसील युक्त । दुर्योधन मरेल अभक्त । जरी वीर्याचाच आपल्या बापाचिया. ॥ १७६८ ॥ अभक्त नासे सदाचारी । भक्त तरे जरी दुराचारी । यमुनापुलिनसंचारी । स्पष्ट बोलिला या श्लोकीं. ॥ १७६९ ॥ दुराचार सत्कुलप्रसूत । त्या भक्ताचे विषयीं ऐसें बोलिला देवकीसुत । आतां कुलेंकरून नीच बहुत । तेही स्वभक्तीनें तरती म्हणतो या श्लोकीं. ॥ १७७० ॥

**मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः ।**
**स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम् ॥ ३२ ॥**

अर्जुना ! जे असती पापयोनी । तेही माझ्या आश्रयें करूनी । परमगतीतें पावती गावरूनी । पाहें बडिवार माझ्या भजनाचा. ॥ १७७१ ॥ चांडाळादि अधमजाती । जरी माझाच आश्रय धरिती । कीं तारक आम्हांस एक श्रीपती । तरी तेही परमगति पावती अर्जुना ! ॥ १७७२ ॥ तैशाच गा अर्जुना ! स्त्रिया । सत्कुलप्रसूताही मूर्तिमंत माया । असत्यसाहसअतिलोभतादि[2] धर्म-

---

१. पंडुव्यतिरिक्त पुरुषाचें, इंद्राचें. पंडूस किंदमऋषीचा शाप असल्यामुळें कुंतीनें इंद्रापासून अर्जुनाची प्राप्ति करून घेतली होती. २. बिचाऱ्या अबला स्त्रीजातीवर पंडितरायांचा केवढा हा दोषारोप ! स्त्रिया अज्ञान असतात असें कदाचित् म्हणतां येईल. परंतु त्या सर्व दुर्गुणांचें माहेरघर आहेत असें म्हणणें मोठ्या धाडसाचें आहे. स्त्रियांच्या विषयीं अशा प्रकारचा कटाक्ष बऱ्याच पुरातन कालापासून असावा असें दिसतें. 'अनृतं साहसं माया' इत्यादि दुर्गुण संस्कृत कवींनीं त्यांच्या पदरीं बांधले आहेत. परंतु ह्या श्लोकास हरताळ लावणारीं किती तरी स्त्रीरत्नें आपल्या देशांत निर्माण झालीं आहेत !

जया! । दुर्गुण जयांचें माहेर. ॥ १७७३ ॥ दुर्गुण पुरुषासही असती । परि स्त्रिया खाणीच दुर्गुणाच्या दिसती । पति, पुत्र, पिताही वंचिती । सहज कृत्रिम स्वभाव स्त्रियांचा. ॥ १७७४ ॥ स्त्रिया ऐशा वाईट परी । मज अनन्य-भावें भजती जरी । त्याही साधुपदवी पावोनि बरी । परमगतीतें पावती. ॥ १७७५ ॥ पुरुषांतही कुलीन । वेदीं अधिकार ते वैश्यजन । परि त्यांस लोभ अत्यंत गहन । धनाचे ठायीं. ॥ १७७६ ॥ सर्वां वर्णांसही प्रिय धन । परि वैश्यांस धनेंचि केवळ जीवन । धनेंचि भोग धनेंचि साधन । धन मेळवावयाचें तयांला. ॥ १७७७ ॥ परमलोभिष्ठप्रकृती । वैश्य धनतृष्णेच्या आकृती । तेही जरी अनन्यभावें सुकृती । मज भजती पावतीच परम गतीतें. ॥ १७७८ ॥ शूद्र केवळ तमोगुणी । वेद न पडे ज्यांच्या श्रवणीं । तेही मज अनन्यभावें जे क्षणीं । भजती पावलेच म्हणावे परमगतीतें. ॥ १७७९ ॥ स्त्रिया शूद्र आणि इतर अधम जाती । माझ्या भजनें मुक्ति पावती । ब्राह्मणही नरकास जाती । मज न भजतां वेदशास्त्रसंपन्नही हा भाव. ॥ १७८० ॥ सर्ववर्णगुरुत्व अधिकार । जाणती वेदवेदांत बोलती सार । परि भगवद्भजनावांचूनि निःसार। सर्व जालें तयांचें. ॥ १७८१ ॥ भगवद्भजन करिती जरी । तरि त्यांस तो तिळही नसे दूरी । प्राप्ती त्यांस अति लवकरी । हें स्पष्ट बोलतो या श्लोकीं. ॥ १७८२ ॥

**किं पुनर्ब्राह्मणाः पुण्या भक्ता राजर्षयस्तथा ।**
**अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम् ॥ ३३ ॥**

अगा! अत्यंत अधम जाती । माझ्या भजनें वैकुंठास जाती । ब्राह्मण तों परम सुकृती । हे मोक्ष पावती नवल काय? ॥ १७८३ ॥ नीचयोनी मोक्ष पावती । मज भजतां हें बोलिलों तुजप्रती । ब्राह्मणाची गोष्टी मागुती । बोलणेंचि नलगे. ॥ १७८४ ॥ कीं त्या पापजाती । ब्राह्मण पुण्यवंत सुकृती । वेदशास्त्रसंपन्न सहजाकृती । काय यांचें आश्चर्य? ॥ १७८५ ॥ ब्राह्मण सुकृती मद्भक्त । त्याचें नवल नाहींच होतां मुक्त । तैसेच क्षत्रिय राजर्षि मद्भक्तियुक्त । काय सांगों हे मुक्ति पावतील म्हणोनी. ॥ १७८६ ॥ भजन माझें ऐसें म्हणोनी । अर्जुना! तुज मागतों पदर पसरुनी । कीं भज मज अनन्यभक्तिकरूनी । अगा अर्जुना! ॥ १७८७ ॥ दुर्लभ हा मनुष्यदेह । येथें मोक्षप्राप्तीस नाहीं संदेह । परि साधन नरक दुःखासही देह गेह । मी माझें म्हणतों

---

१. प्रस्तुत कालीं तर स्त्रियापेक्षां पुरुषांमध्येंच दुर्गुणी व्यक्ति जास्त सांपडतील.

शरीर हेंचि. ॥ १७८८ ॥ म्हणसी भजोंच तूतें परी । विषय भोगूं तारुण्य आहे तोंवरी । तरी अगा! एक घडिभरी । शाश्वत राहेल हा भरंवसा याचा असेना. ॥ १७८९ ॥ अगा! हा मनुष्यलोक अनित्य । म्हणोनि आदीं भज गा! मज अगत्य । स्वयें नित्य नसोनिही नित्य । पदप्राप्ति देतो देह हा. ॥ १७९० ॥ अगा! समर्थ कोण काळापरिस । त्यापासूनि जायाचा हा नरदेह परिस । प्राप्त जाला म्हणोनि बापा! आळस । न करीं सोनें करी लोखंडें आपलीं. ॥ १७९१ ॥ परिस पांचभौतिक नरदेह । लोखंडें इंद्रियें मन बुद्धि इत्यादि लिंगदेह । भगवद्भजनें योग दोहींचा होतां निःसंदेह । जगदलंकार हेमचि तो ब्रह्म होणार. ॥ १७९२ ॥ एके हातीं जयाच्या परिस । एके हातीं लोखंडही असे बहुवस । सोनें करायास करितो आळस । तोचि अभाग्य या लोकीं. ॥ १७९३ ॥ ज्याचा परिस जायाचा तो काळ । क्षण न लगतां नेतो तत्काळ । ऐसें कळोनिही दरिद्री फटकाळ । तोचि जाणावा जो सुवर्ण न करी लोखंडें आपलीं. ॥ १७९४ ॥ जायाचा चिंतामणि क्षणभरी । समर्था काळापासूनि हाता आला तरी । त्याणें आपला नाहीं मागितला तोंवरी । परम अभीष्ट तेंचि चिंतावें. ॥ १७९५ ॥ म्हणोनि हा मनुष्यलोक अनित्य । परि येथें साधतो आनंद नित्य । म्हणोनि तुज अर्जुना! सांगतों कीं आदीं अगत्य । भज मज अनन्यभावें करोनी. ॥ १७९६ ॥ हें ऐकोन अर्जुन । म्हणेल कैसें करावें भजन । तरी सर्वकर्मार्पण भवभंजन । पूर्वींच बोलिला. ॥ १७९७ ॥ सहज कर्म अर्पितां जाला दास । मग निजभक्ति देतो देव त्यास । तोचि स्वयें जगन्निवास । स्वभजन उपदेशितो या श्लोकीं. ॥१७९८॥

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।**
**मामेवैष्यसि युक्त्वैवमात्मानं मत्परायणः ॥ ३४ ॥**

अगा! मन माझिया चरणीं । भक्ति माझी अंतःकरणीं । भक्त माझा तूं होऊनि ऐसा स्मरणीं । राहें माझिया. ॥ १७९९ ॥ माझ्या यजनाचे प्रकार । करीं आणि मातेंचि करीं नमस्कार । तरी मातेंचि पावसी हा निर्धार । इतकियास कारण तें शेवटीं हें आइक. ॥ १८०० ॥ अगा! या सर्वांस कारण । तूं होय मत्परायण । मज तारक एक नारायण । धरी ऐसा परम आश्रय माझा विश्वासें. ॥ १८०१ ॥ श्रीकांत वासुदेव । तोचि सर्वदेवाधिदेव । भक्त त्याचेच सर्व देव । तोचि एक तारक मजलागीं. ॥ १८०२ ॥ मज आश्रय त्यावांचूनी । नसे आणि नसोच म्हणोनी । ऐसा विश्वास माझा प्रीतीकरूनी ।

ज्यास असतो तो मत्परायण म्हणावा. ॥ १८०३ ॥ त्या मुकुंदासमान अथवा अधिक । असे ऐसा वाटे देव कोणीएक । तरी हाचि तारक मज शेषपर्यंक । ऐसें वाटे किमर्थ. ॥ १८०४ ॥ वाटे सर्वांहुनी श्रेष्ठ । तरीच भाव ऐसा वसे उत्कृष्ट । ज्यास न वाटे इतर दैवत अभीष्ट । तोचि मत्परायण हा अर्थ. ॥ १८०५ ॥ ऐसा होय मत्परायण । मग मजमाजी योजी अंतःकरण । ऐसा अंतःकरण योजोनि तूं निपुण । मातेंचि त्या नित्यानंदातें पावसी. ॥ १८०६ ॥ ऐसा अध्याय नवम । अनन्यभक्तीनेंच अर्थ याचा सुगम । व्यभिचारिणी भक्ति ज्याची त्यास दुर्गम । अर्थ अबाधित लागेना. ॥ १८०७ ॥ कनकपरीक्षेची कसवटी जैसी । ज्ञानपरीक्षेची कसवटी तैसी । राजविद्या ते या अध्यायांत ऐसी । बोलिला श्रीकृष्ण. ॥ १८०८ ॥ ज्ञान त्याचेंच निर्मळ । कीं अनन्य हरिभक्तिच ज्यांला केवळ । जे अनन्यत्वें न धरिती कृष्णपदकमल । ते चावळती राजविद्या वाखाणितां. ॥ १८०९ ॥ निषिद्ध इतरदेवताभजन । भजावा एक श्रीकृष्ण भवभंजन । हें गीतारहस्य विरळ जन । भगवद्भक्त जाणती. ॥ १८१० ॥ वाखाणावयाची गीता । तरी मंगलाचरणीं स्मरावें अनंता । न प्रार्थितां अन्यदेवता । अंतीं समर्पावा ग्रंथ त्यासची. ॥ १८११ ॥ गुरुवचनें आत्मा कळल्या उपरांतिक । जे योगसिद्धीकारणें नुसत्या निर्गुणाचे उपासक । त्यांस सगुणभजन वर्णनकौतुक । नसेच कांहीं. ॥ १८१२ ॥ जे अपरोक्ष आत्मा कळल्यावरी । **'यतो वाचो निवर्तंते'** या अनुभवाकारणें वृत्ति बरी । निर्गुणींच योजिती त्यांस कूसरी । न लागतीच सगुण वर्णनाच्या. ॥ १८१३ ॥ **'यतो वाचो निवर्तंते'** हा अनुभव । आणि सर्वभूतीं दिसे वासुदेव । ऐसें असोनि सगुण देवाधिदेव । सेव्य जया. ॥ १८१४ ॥ तिहींच वाखाणावी गीता । आदिअंतीं स्मरावें एकाच त्या अनंता । ग्रंथ अध्यायावसानीं भगवंता । तया समर्पावा. ॥ १८१५ ॥ आत्मज्ञान जाहल्यावरी । समर्पणादि नियम कां परी । कोणी ज्ञानाभिमानी वैखरी । चाळिती चावळोनि ऐसीही. ॥ १८१६ ॥ तरी ज्ञान जाहल्यावरी । टीका मंगलाचरण हि कां परी । मंगलाचरणादिनियम जरी । तरी ग्रंथावसानीं समर्पणही करावें तयातें. ॥ १८१७ ॥ **'ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य'** म्हणोनी । या श्लोकीं अनन्ययोगेंचि करूनी । ध्याती आणि सर्व कर्मे अर्पिती म्हणेल यावरूनी । अनुभवी भक्तही अर्पिती स्वकर्मे. ॥ १८१८ ॥ गुरु शिष्य एक ऐसें ज्ञान जाल्यावरी । गुरुभजन ज्ञानियास मग कां परी । गुरुभजन कर्तव्यच जरी तरी । अनन्य सगुणभजन कर्मा-

र्पणही कां नसावें? ॥ १८१९ ॥ **गी**ता वाखाणावी तरी । कीं भक्ति श्रेष्ठ स-र्वांत वाटे जरी । कीं अष्टादशींच ऐसें हरी । स्वयें बोलेल. ॥ १८२० ॥ **'य इदं परमं गुह्यं'** या श्लोकीं । **'भक्तिं मयि परां कृत्वा'** म्हणोनि बो-लेल कीं । या **गी**तेंत थोर ते भक्ति **श्री**वत्सांकीं । ऐसी **गी**ता जो वाखाणी माझ्या भक्तांत. ॥ १८२१ ॥ त्यासारिखा प्रिय दुसरा । **'न भूतो न भवि-ष्यति'** अगा **पां**डुकुमरा! । म्हणोन म्हणेल त्या उदारा । मंगलाचरणीं ईश्वरा समर्पावा ग्रंथ त्यातेंचि. ॥ १८२२ ॥ कीं अर्पी कर्मैं सकळ । आणि सगुण भजे अनुभवी होऊनि केवळ । न करी अन्यदेवताभजनविटाळ । प्रेमें भजे ऐसी भक्ति हेचि. ॥ १८२३ ॥ ऐसी हे नवमाध्यायाची ही टीका । आरंभिली स्मरोनि **दे**वा निष्कलंका । शुद्धसत्त्वोपाधि **श्री**वत्सांका । **शे**षपर्यंकचरणावरी समर्पिली. ॥ १८२४ ॥ टीका समर्पितां पायीं । उचलोनि ठेवी हृदयीं । टी-काकारही तोचि **शे**षशायी । **वा**मन म्हणे. ॥ १८२५ ॥

यो राजगुह्यमवदन्निजराजविद्यां धर्म्यामृताय उपदिश्य रराज विद्याम् ।
भक्तो न नश्यति कुतोऽपि स मावरोऽस्तु प्रत्यक्ष एव जगदाकृतिराविरस्तु ॥

इति श्रीमद्वामनपंडितविरचितायां यथार्थदीपिकायां नवमोऽध्यायः ॥